कादंबरीमय पेशवाई

१०

पेशवाईंतील

# धर्मसंग्राम

लेखक

## विठ्ठल वामन हडप

१९३०

परचुरे पुराणिक आणि मं.
मुंबई नं. ४

किंमत 

# प्रास्ताविक

This remarkable siege (वसईचा वेढा) the mots vigorous ever prosecuted by Marattas.

—*Grant Duff*.

× × ×

The siege (वसईचा वेढा) was carried on with such extraordinary vigour, skin and perseverance, as perhaps Marattas have in no other instance displayed.

—*Anderson*.

× × ×

मराठयांच्या इतिहासामध्यें अतुल पराक्रम, अचाट साहस, अलौकिक तेज अद्वितीय रणोत्साह व अपार स्वाभिमान हे गुण व्यक्त करणारे जे कांहीं युद्धप्रसंग आहेत, त्यांमध्यें वसईचा रणसंग्राम हा अग्रस्थानीं गणण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. फिरंगी लोकांनीं हिंदुधर्माचा व हिंदु प्रजेचा अत्यंत छळ केला, म्हणून संतप्त झालेले निस्सीम स्वधर्माभिमानी महाराष्ट्रवीर एकत्र होऊन दृढ निश्चयानें शत्रूस जिंकण्याकरितां वसईवर चढाई करून गेले; व तेथें मोठया आवेशानें तीन महिनेपर्यंत सतत अग्निगोलांचा भयंकर वर्षाव होत असतांही वेढा देऊन बसले; आणि अखेर आपल्या बाहुबलानें शत्रूस पादाक्रान्त करून वसईवर आपला स्वधर्मसंरक्षणाचा बाणा दाखविणारा भगवा झेंडा फडकविण्यास समर्थ झाले; तो वीररसानें ओतप्रोत भरलेला वृत्तान्त ऐकून ज्याचें अंतःकरण आनंदानें व कौतुकानें थक्क होणार नाहीं असा मनुष्य विरळा. —कै० पारसनीस.

× × ×

'**पेशवाईतील धर्मसंग्राम**' ही 'कादंबरीमय पेशवाई' मालेंतील दहावी कादंबरी आज महाराष्ट्र-सरस्वतीच्या चरणीं अर्पण करण्यांत येत आहे. कै० पारसनीस यांच्या पूर्वोक्त शिरोलिखितांतील शब्दांत या कादंबरीची रूपरेखा

स्थूलतः पण यथार्थतेनें प्रतिबिम्बित झाली असल्यानें तिचें येथें पुनर्दिग्दर्शन करणें नलगे.

ह्या कथानकाच्या ऐतिहासिक भूमिकेचें विशदीकरण कथानकाच्या ओघानें व जागजागीं निर्णयात्मक टिप्पणी देऊन करण्यांत आलेंच आहे; पण कथानकांत वर्णिलेल्या कांहीं प्रसंगांचें व पात्रांचें औचित्य काय हें येथें थोडक्यांत सांगणें अशक्य आहे.

ह्या कादंबरींत वर्णिलेल्या चिमाजीअप्पा, बाजीराव, मानाजी आंग्रे, शंकराजी नारायण फडके, खंडूजी माणकर, गंगाजीनाईक अणजूरकर वगैरे नाईकबंधु, मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, तुळभजी मोरे, अंताजी व रामचंद्र रघुनाथ कावळे, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, रामाजी महादेव बिवलकर, सेनापति पेरीरा, सेनापति पेड्रो डि मेलो, सेनापति अँटोनिओ कार्डिम फ्रो, आल्काकोव्हा, लुई बुयेलो वगैरे भूमिका ऐतिहासिक आहेत याविषयीं बहुशः जागोजागीं कथानकांत टिप्पणी देऊन प्रमाणें देण्यांत आलीं आहेतच. भगवानजी, भैरव, अंताजी ऊर्फ अँटोनिओ, फ्रॅन्सिस, रॉबर्टसन, फादर पोर्टो, डोमिंगो, सिद्धेश्वरशास्त्री, धोंडशास्त्री, भय्याशास्त्री, सोफिया, पोर्शिया, मेरी, बार्बारा, मार्गारेट, कॉन्स्टन्स वगैरे कांहीं काल्पनिक भूमिकांची पूर्वोक्त ऐतिहासिक भूमिकांना जोड देऊन कथानकाची रचना करण्यांत आली आहे. रामानंद ही भूमिकाही काल्पनिकच आहे; ती भूमिका रंगविणारी व्यक्ति मात्र खरीखुरी आहे.

असें जरी आहे, तरी काल्पनिक भूमिकांची जोड कथानकाला देऊनही ऐतिहासिक वास्तवतेचा कोठेंही भंग न होईल अशी शक्य तितकी खबरदारी घेण्यांत आली आहे. शिवाय काल्पनिक भूमिका रंगवितांनाही पूर्ण औचित्य राखण्यांत आलें आहे. इतिहासावरून तत्कालीन परिस्थितीचा मनाला जो बोध होतो, तो कथानकांत यथावत् दर्शविण्यासाठीं अशा काल्पनिक पात्रांची आवश्यकता असतेच, व अशीं पात्रें दिमतीला घेण्याची कादंबरीकाराला पूर्ण मुभाही असते. असें असतांही काल्पनिक भूमिका रंगवितांना मीं इतकी खबरदारी घेतली आहे कीं, तत्कालीन इतिहासाचें सामाजिक-धार्मिक-राजकीय अशा सर्वांगानीं निरीक्षण करणाऱ्या निरीक्षकांनाही त्याच नांवाचीं नाहींत तरी त्या इष्टानिष्ट स्वभावधर्माचीं माणसें त्याकाळीं तितक्याच प्रामुख्यानें समाजांत वावरत असलीं पाहिजेत हें सामान्यतः मान्य करावें लागेल.

त्याप्रमाणेंच कादंबरींत वर्णिलेल्या प्रसंगांचेंही. चुळणें व निर्मळ येथील शुद्धीकरणाचे प्रसंग, मंडपेश्वर येथील युद्धप्रसंग, असे कांहीं प्रसंग काल्पनिक असले तरी उपलब्ध ऐतिहासिक साधनांवरून तसे प्रसंग त्या ठिकाणीं अथवा अन्यत्र त्या काळीं घडले असण्याचा बराच संभव आहे. थोडाफार फरक असेल तो तपशिलांत; पण इतिहासानें मान्यता दिलेली संभवनीयता म्हणजे इतिहासाचें—निदान तत्कालीन लोकस्थितीचें प्रतिबिम्बच होय असें मान्य करण्याला कोणाचा प्रत्यवाय असणार नाहीं असें मला वाटतें.

मात्र प्रस्तुत कादंबरींतील शुद्धीकरणाच्या प्रसंगांविषयीं—कथानकांत जागोजागीं निर्णयात्मक टिप्पणी दिल्या असतांही—येथें दोन शब्द सांगणें अवश्य आहे. ह्या प्रसंगांशीं सध्यांच्या शुद्धिसंघटणाच्या चळवळीचा संबंध जोडून त्यांची ऐतिहासिकदृष्ट्या अवास्तवता सिद्ध करण्याचें मनावर घ्यावेंसें कोणा टीकाकाराला वाटल्यास त्यानें टीकास्त्र उचलण्यापूर्वी वसई-साष्टी प्रांतांतील तत्कालीन ख्रिस्ती धर्मप्रसाराचा भडक इतिहास सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करावा, म्हणजे वसईच्या वढ्या-च्या पूर्वी—पोर्तुगीजांची अस्मानी-सुलतानी तेथे गाजत होती तेव्हांही—साधारणतः पोर्तुगीज अत्याचारांना त्या प्रांतीं प्रारंभ झाल्यापासून ख्रिस्ती धर्मप्रसाराबरोबरच क्रियेची प्रतिक्रिया या न्यायानें शुद्धिसंघटणाची चळवळ तितक्याच जोमानें सुरू होती व ती जशास तसें या न्यायानें प्रस्तुत कादंबरींत वर्णिल्याप्रमाणेंच सुरू होती, असें आढळून येईल. इतकेंच काय, पण तेव्हांचें शुद्धीकरण सध्यांपेक्षांही जास्त सुलभतेनें व जास्त जोमानें चाले. हिंदुजनांच्या नाजुक धार्मिक भावनांचा फायदा घेऊन ख्रिस्ती मिशनरी हिंदूंच्या विहिरींत भाकरीचे किंवा मांसाचे तुकडे टाकून हिंदूंचे गांवचे गांव बाटवून सोडीत; त्या भ्रष्टीकरणाला आळा घालण्यासाठीं तत्कालीन जाणत्या ब्राह्मणांनीं तीर्थस्नानासारख्या अत्यंत सोप्या विधीनें शुद्धीकरणाची मोहीम यशस्वितेनें चालविली. ही त्यांची कल्पकता आज शुद्धिसंघटण करणाऱ्या हिंदुधर्माभिमान्यांनीं अवश्य धडा घेण्यासारखी आहे. प्रसंग पडला कीं उपाय सुचतो हे कांहीं खोटें नाहीं. ही शुद्धीकरणाची कल्पकता वसई-साष्टी प्रांतांतील ब्राह्मणांनाच सुचली होती असें नाहीं; अशीच, किंबहुना याहीपेक्षां कुतूहलजनक अशी एक असामान्य कल्पकतेची गोष्ट शीखांच्या इतिहासांतही नमूद आहे. रणजितसिंगाचा एक सेनापति हरिसिंग ललवा ह्या अफगाणिस्तान जिंकण्याला गेला होता. शीख लोकांना गोमांस वर्ज असून डुकराचें मांस प्रिय असतें हें मशहूर

आहेच. हरिसिंगाची फौज अफगाणिस्तानच्या मोहिमेवर असतांना प्रसंगोपात्त अफगाण लोकांनीं शिजविलेलें अन्न लुटून आणून त्यावर आपला निर्वाह करीत असे. शीख लोक गोमांस खात नाहींत असें अफगाणांना समजतांच अफगाणांनीं मुद्दाम पुष्कळ गाई मारून त्यांचें मांस शिजवून तयार ठेविलें. पुढे तें लुटण्याला शीख लोक आले तेव्हां त्यांना तें गोमांस आहे असें कळलें. त्याबरोबर हरिसिंगानें एक डुकराचें हाड मिळवून तें त्या मांसान्नांत घालून सर्व मांस खूप ढवळिलें, आणि 'वाः ! गुरुजीका खालसा !' 'वाः ! गुरुजीका फत्ते !' असा आपला मंत्र म्हणून 'हे डुकराचें मांस आहे; सर्वांनी खुशाल खा' असें आपल्या शिपायांना सांगितलें. शिपायांनींही ते मांस डुकराचें आहे असें समजून निःशंकपणे सेवन केले. तात्पर्य, बचावाच्या वेळीं जशास तसें वर्तन ठेवल्याशिवाय गत्यंतर नसतें, व असे वर्तन ठेवील तोच आणीबाणीच्या वेळीं बचावतो.

आतां, वसई-साष्टी प्रांतांतील शुद्धिसंघटणाच्या चळवळीला पेशव्यांचे साह्य होतें किंवा नाहीं अशी कांहीजण कदाचित् शंका घेतील. ह्या चळवळीला पेशव्यांनीं प्रत्यक्ष प्रोत्साहन दिल्याचीं उदाहरणे जरी इतिहासांत उपलब्ध नाहींत, तरी विरोध केल्याचींही उदाहरणे उपलब्ध नाहींत. उलटपक्षीं पेशवाई अंमलांतील कांहीं उदाहरणे अशीं दाखवितां येतील कीं, ज्यांवरून पेशवे ह्या शुद्धीकरणाच्या चळवळीला अनुकूल होते असाच स्पष्ट निष्कर्ष निघतो. त्याप्रमाणेंच ब्राह्मणांतील पोटजातिभेद व ब्राह्मणेतर जातींचे धर्माधिकार ह्या बाबतींतही पेशव्यांचें धोरण सरास उदारपणाचें व प्रगमनशीलतेचें होते याविषयींही कोणाला शंका घेण्याचें फारसें कारण नाहीं. शेवटच्या बाजिरावाच्या कारकीर्दीतील सर्वच बजबजपुरी सोडली तर बाजीराव, नानासाहेब, माधवराव, सवाईमाधवराव व रघुनाथराव ह्या पेशव्यांच्या कारकीर्दीत पेशव्यांच्या धर्मविषयक प्रगमनशीलतेचे पुरावे कांहीं थोडेथोडके नाहींत. शिवाजीमहाराजांपासूनचा काळ घेतला तरीदेखील मराठशाहीच्या राज्यकर्त्यांची धर्मविषयक प्रगमनशीलता ठळकपणें दिसून येत. ह्या गोष्टी येथे विस्तारशः निवेदन करण्याला स्थलावकाश नाहीं, त्याला नाइलाज आहे. ज्यांना याचें स्थूलतः प्रत्यंतर पहावयाचे असेल त्यांनीं कै० न्यायमूर्ति रानडे यांच्या 'Rise of the Maratha Power' ह्या ग्रंथांतील रिशिष्टांतील कै० न्यायमूर्ति तेलंग यांचा 'Gleenings from Maratha chronicles' हा निबंध पहावा.

आतां, वसई येथे विजय प्राप्त झाल्यावर पेशव्यांनीं त्या अनुभवापासून घ्यावयाचा तो धडा घेतला कीं नाहीं याचा विचार करूं लागल्यास त्याचें उत्तर उघड उघड नकारात्मकच द्यावें लागेल. विशेषतः पेशव्यांनीं आंग्र्यांच्या दौलतीवर निखारा ठेवण्याची चूक केल्यामुळें आरमारी सामर्थ्याच्या दृष्टीनें महाराष्ट्र-स्वराज्य जें अगदींच दुबळें झालें, ती चूक वसई एथें नवें जंगी आरमार स्थापून पेशव्यांना सहज सुधारतां आली असती. अनायासें वसई-साष्टी प्रांतीं असलेले पोर्तुगीजांचे जहाजांचे व युद्धोपयोगी साहित्याचे अनेक कारखाने पेशव्यांच्या हातीं आले होते. सुधारलेल्या युद्धोपयोगी साहित्याचें महत्त्वही वसईच्या लढाईंत पेशव्यांच्या चांगलेंच निदर्शनाला आलें होतें. पण त्या अनुभवाचा पेशव्यांनीं यत्किंचित् देखील उपयोग करून घेतला नाहीं व केवळ मुलुखगिरीवर भिस्त ठेवून मराठी साम्राज्याचा विस्तार त्यांनीं आरंभिला, म्हणूनच तो त्यांचा उद्योग परिणामीं हळुहळू अंतर्गत अव्यवस्थेच्या बुजबुजाटाचा फांफटपसारा ठरला. पण या चिकित्सक दृष्टीनें पेशवाई-कारभाराचें समालोचन करण्याचें हें स्थळ नसल्यानें त्या बाबतींत मुग्ध राहणेंच श्रेयस्कर होय.

प्रस्तुत कादंबरीविषयी प्रसिद्धपणें कागदोपत्रीं अनुपलब्ध अशी कांहीं महत्त्वाची ऐतिहासिक माहिती मिळविण्याच्या कामीं मला अणजूरकर गंगाजी नाइकांचे वंशज श्री० दिवाकर भाई नाईक यांचें बरेंच साह्य झालें आहे. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

'कादंबरीमय पेशवाई'मधील आजवरच्या नऊ कादंबऱ्यांतून बाळाजी विश्वनाथ पेशवे व थोरले बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दीतील पेशवाई मराठशाहीच्या उत्कर्षाचा वृत्तान्त निरनिराळ्या प्रसंगांच्या अनुरोधानें निवेदन करण्यांत आला. एकट्या बाजिरावांच्या कारकीर्दीवरच आजवर 'पेशवाईचा पुनर्जन्म', 'पेशवाईतील पुनर्वैभव', 'पेशवाईचा दरारा', 'पेशवाईतील दुर्जन', 'पेशवाईतील पश्चिमदिग्विजय', व 'पेशवाईतील धर्मसंग्राम' अशा सहा कादंबऱ्या विरचिल्या गेल्या. पण बाजिरावांनीं आपल्या कारकीर्दींत दिल्लीच्या बादशहातील शह देऊन मराठशाहीची सर्वतोपरी प्रतिष्ठा वाढविण्याचा जो उद्योग आमरणान्त केला, तीच त्यांची अत्यंत भरींव अशी कामगिरी होय. त्या कामगिरीचें स्वरूप, त्याप्रमाणेंच राजकारणांत व मस्तानीच्या खासगी बाबतींत-

ही बाजिरावांना दरबारी प्रतिस्पर्ध्यांकडून व धर्मठ आप्तपरांकडून जो जाच सोसावा लागला व ज्या जाचाला बाजिरावांच्या अकाल निधनाबद्दल बव्हंशी जबाबदार धरतां येईल, त्या जाचाचें स्वरूप वाचकांना यथावत् पटवून देणारी

**'पेशवाईतील उत्तरदिग्विजय'**

ही बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दीवरील अखेरची व 'कादंबरीमय पेशवाई'मधील अकरावी कादंबरी पुढे यथानियम प्रसिद्ध होईल एवढें सांगून वाचकांची तूर्त रजा घेतों.

व्यंकटपुरा, सातारा.
ता. १०।६।१९३०.

**विठ्ठल वामन हडप**

# पेशवाईतील धर्मसंग्राम

## विषयप्रवेश

वसंत ऋतु हा नेहमींच वर्षाच्या सहाही ऋतूंत अत्यंत उत्साहजनक व आनंद-कारक असतो, यांत सांगण्यासारखें नवल कांहींच नाहीं; पण इ० सन १७३९ सालांतील वसंत ऋतु वसई-साष्टी भागांतील रयतेला विशेष उत्साहजनक व आनंदकारक आणि नवजीवनदायी वाटत होता. याचें कारण दोन अडीच शतकां-पूर्वीपासून पोर्तुगीजांच्या अमानुष जुलमी अमलाचें ग्रहण जें कोंकणपट्टीच्या त्या भागाला लागलें होतें, तें सुटण्याचा ऐन रंग आतां बहुश: प्राप्त झाला होता. बाजीराव पेशवे व छत्रपति शाहूमहाराज यांच्या वतीनें बाजीराव पेशव्यांचे परम प्रतापी कनिष्ठ बंधु श्रीमंत चिमाजीअप्पा पेशवे यांनीं वसई-साष्टी भागांतील पोर्तुगीजांच्या जुलुमाविषयींचीं तेथल्या प्रजेचीं गाऱ्हाणीं मनावर घेऊन अशा जुलमी पोर्तुगीजांचा नायनाटच केला पाहिजे अशा निर्धारानें वसई साष्टी प्रांतीं येऊन पोर्तुगीजांशीं जो धर्मसंग्राम मांडला होता, त्याला आतां साधारणत: तीन वर्षांचा काळ लोटला होता.* एवढ्या काळांत उभय पक्षांचीं अनेक निकराचीं युद्धें

* वसईच्या मोहिमेचा कार्यकारणभाव शोधावयाचा तर प्रत्यक्ष मोहिमेच्या काळाच्याही मागें जाणें अवश्य आहे. पोर्तुगीज लोकांनीं वसई प्रांतांत पदार्पण केलें तेव्हांच वस्तुत: धर्मच्छल सुरू केला. पण त्या छळाचा बोभाटा छत्रपतींच्या कानीं व्यवस्थितपणें गेला असा प्रथम छत्रपति संभाजीमहाराजांच्या कारकीर्दींत; व तो बोभाटा गंगाजी नाईक अणजूरकर यांनीं नेला. पण संभाजीमहाराजांच्या कारकीर्दींत व पश्चात् मराठशाहीची सर्वच घडी विस्कळित झाल्यानें त्या बोभाट्या-चा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें इ० सन १७२२ मध्यें गंगाजी नाईक व इतर क्षत्रिय-प्रभु मंडळीनें पुन्हा शाहूमहाराज, बाजीराव पेशवे व चिमाजीअप्पा यांजपाशीं फिर्याद नेली; त्याप्रमाणेंच मालाडकर सरदेसाई बंधुद्वय अंताजी व रामचंद्र रघुनाथ कावळे यांनींही तशीच फिर्याद पेशव्यांपाशीं नेली; व त्यांना

होऊन त्या युद्धांत बहुशः प्रत्येक वेळीं मराठ्यांनाच विजयश्रीनें माळ घातली होती व पोर्तुगीजांना ठिकठिकाणचीं ठाणीं हातचीं सोडून व वर आणखी अनेक सैनिकांच्या, सेनापतींच्या रक्ताचें आणि अपार युद्धसाहित्याचें उदक मराठ्यांच्या हातावर सोडून तेथून पळ काढावा लागला होता.

पोर्तुगीजांच्या अत्याचारांचा हृदयद्रावक वृत्तान्त निवेदन केला. तरीही पेशव्यांना इतर महत्त्वाच्या राजकीय भानगडी मिटविनां मिटवितां पुढे बरीच वर्षेपर्यंत वसईकडील राजकारणांत पूर्णपणे मन घालण्याला अवसर सांपडला नाहीं पुढें कृष्णराव महादेव जोशी हा बाजिरावांचा मेहुणा इ० सन १७३० मध्ये कल्याणचा सुभेदार झाल्यापासून त्यानें गंगाजी नाईक, अंताजी रघुनाथ प्रभृतींच्या साह्यानें त्या भागांतील लोकांची गाऱ्हाणीं भागविण्याला सुरुवात केली होती. पुढे थोड्याच दिवसांत कोकणपट्टींत सिद्दीनें थैमान मांडले, तेव्हां त्याच्या पारिपत्याचा प्रश्न तांतडीनें हातीं घेणें पेशव्यांना भाग पडलें ('पेशवाईंतील पश्चिमदिग्विजय' पहा ) त्या वेळी चिमाजीअप्पांना पोर्तुगीजांच्या अत्याचारांची यथावत् कल्पना आली व त्यांना बाजीराव पेशव्यांच्या सल्ल्यानें पोर्तुगीजांचे पारिपत्य करण्याचे कार्य इ० सन १७३७ च्या उन्हाळ्यांत हातीं घेतलें. शंकराजीपंत फडके, गंगाजी नाईक, विठ्ठल शिवदेव, रामाजी महादेव, खंडूजी माणकर, अंताजी रघुनाथ, रामचंद्र हरि पटवर्धन, नारायण जोशी, मोरोजी शिंदे, चिमणाजी व बाजी भीवराव, कृष्णराव जोशी वगैरे मंडळी प्रारंभापासून चिमाजीअप्पांसह फिरंग्यांशीं लढत होती. मोहिमेच्या पहिल्याच सपाट्यांत ठाण्याचा किल्ला ता. १७।३।१७३७ रोजीं मराठ्यांनीं काबीज करून साष्टींत प्रवेश केला. लगेच थोड्याफार कालानें त्याच पहिल्या सपाट्याला मराठ्यांनीं अर्नाळा, मांडवी, तांदुळवाडी, टकमक, वेसावें, काळदुर्ग, मनोर, बेलापूर इतकीं ठाणीं पहिल्याच वर्षी काबीज केलीं. पर्जन्यकाळ येतांच चिमाजी अप्पा आपल्या शूर सरदारांवर मोहिमेचें काम विसंबून माघारे पुण्याला गेले तों माघारीं शत्रूनें पुन्हा उचल खाल्ली. चिमाजीअप्पा व बाजीराव हे निजामाचे पारिपत्य करण्यासाठी उत्तरेकडे चालले होते. त्यांना हें वर्तमान कळतांच त्यांनीं मल्हारराव होळकर व शिंदे यांना इतर मराठा सरदारांची कुमक करण्यास वसई प्रांतीं पाठविलें व त्यांच्या मागोमाग थोड्या दिवसांनी चिमाजीअप्पाही निघाले. पुन्हा जानेवारी इ० सन १७३९ मध्यें मोहिमेला जोराचे तोंड लागलें. पुढें दोन आठवड्यांच्या आंत माहीम, डहाणू,

आतां पोर्तुगीजांचा खास अंमल असा वसईचा किल्ला व त्या किल्ल्यांतील कांहीं कोसांचा टापू एवढ्याच भागावर बाकी उरला होता. तेवढा प्रदेश व तेवढा किल्ला जिंकल्याशिवाय आपल्या धर्मसंग्रामाची खरी सार्थकता होणार नाहीं हें ओळखून त्याविषयीं योग्य ती उपाययोजना करण्यासाठींच चिमाजी-अप्पा व बाजीराव पेशवे यांनीं जंजिरे अर्नाळा ह्या मजबूत ठाण्यांत तळ दिला होता. आतां वसईचा किल्ला एवढें एकच मजबूत ठाणें पोर्तुगीजांच्या ताब्यांत बाकी राहिलें होतें, व तें ठाणें पाडाव केल्याने कोंकणपट्टींतून पोर्तुगीज सत्तेचा नायनाट केल्याचें श्रेय मराठ्यांच्या पदरीं पडणार होतें हे जितकें खरें, तितकेंच हेंही खरें कीं, हा विजय मराठ्यांना दुःसाध्य होता. पण तो असाध्य होता असेंही नाहीं. पोर्तुगीजांनीं आपले सर्व सामर्थ्य वसईच्या किल्ल्यांत एकवटून व किल्ल्याची सर्व बाजूंनीं मजबूत तटबंदी करून मराठ्यांशीं तोंड देण्याची जय्यत तयारी केली होती व मराठेही पोर्तुगीजांच्या वर्मी घाव घालून त्यांचा नाश करण्याला डोळ्यांत तेल घालून टपून बसले होते. आतां प्रश्न होता तो वर्मी घाव नेमका कसा घालावा एवढाच. वसईसारखें मजबूत ठाणें स्वसंरक्षणासाठीं हातीं असल्या-मुळें पोर्तुगीज लोक विजयी मराठ्यांना कांहींसे भारी--निदान तुल्यबल तरी होऊन बसले होते. अर्थात् वसईचा संग्राम झालाच तर मोठ्या निकराचा होणार हें उघड होतें. बरें, मराठ्यांनीं पोर्तुगीजांच्या ताब्यांत असलेल्या तेवढ्या टापू-खेरीज बाकीच्या सर्व भागांत मजबूत नाकेबंदी करून पोर्तुगीजांचा कोंडमारा केल्यामुळें पोर्तुगीजांचें आपल्या ताब्यांतील टापूपलीकडील भागाशीं दळणवळण अजिबात खुंटल्यासारखें झालें होतें. बाहेरून त्यांना मदत येण्याचीही फारशी आशा उरली नव्हती. त्यांना बाहेरून मदत यावयाची आशा फक्त मुंबईकर इंग्रजांकडून व गोंव्यांतील मुख्य सरकाराकडून; पण चिमाजीअप्पांनीं व्यंकटराव घोरपड्याला अगोदरच गोंव्याकडे पाठवून तिकडील पोर्तुगीज सत्तेला खासा

---

नारगोळ, खतलवाडा, अशेरी व तारापूर हीं ठाणीं मराठ्यांनीं घेतलीं. तारापूर-चा संग्राम फारच निकराचा झाला. फेब्रुवारी-मार्चांत खंडूजी माणकर वगैरेंनीं वांद्रें, धारावी, वेसावें हीं ठिकाणें काबीज केलीं. तात्पर्य, चैत्र शुद्ध १ शके १६६१ ( ता. २९।३।१७३९ ) पर्यंत पोर्तुगीजांचा वसई साष्टीकडील बहुतेक प्रांत मराठ्यांनीं काबीज केला असून फक्त वसई व आजूबाजूचा टापू एवढाच भाग कथानकाच्या आरंभकालीं पोर्तुगीजांच्या ताब्यांत शिल्लक उरला होता.

पायबंद लावण्याची खबरदारी वेळींच घेतल्यामुळें व व्यंकटरावानें तिकडे जाऊन पोर्तुगीजांचीं हाडें खाशीं खिळखिळीं केल्यामुळें गोंव्याचा पोर्तुगीज गव्हर्नर जनरल काउंट डी सॅंडो मिल यालाच त्राहि भगवान् होऊन गेलें होतें. तो वसईला मदत कोठून पाठविणार !* बरें, त्यांतूनही त्यानें वसईकरांचा शक्य तेवढा उपराळा करण्याचें मनांत आणलें असतें तरी तें साहित्य स्वाहा करण्यासाठीं मराठ्यांच्या खुश्की व आरमारी फौजा आ पसरून बसल्याच होत्या.

रहातां राहिले इंग्रज. त्यांनीं मनांत आणलें असतें तर वसईकर पोर्तुगीजांना साह्य करणे त्यांना अगदींच अशक्य नव्हतें. पण ते पडले मोठे धूर्त, कावेबाज व मतलबी लोक. त्यांना तरी पोर्तुगीजसत्तारूपी गोरी सवत कोठें हवी होती ! त्यांतूनही त्यांनीं पोर्तुगीजांना उपराळा केला असता, पण केव्हां ! पोर्तुगीजांच्या हातून मराठ्यांचा पूर्ण मोड होईल व कोंकणच्या किनाऱ्याला आपणाला आपला व्यापार व आपली सत्ता यांचा अनिरुद्ध फैलाव करण्याला मार्ग निष्कंटक होईल अशी त्यांची खात्री असती तर ! प्रथम प्रथम मुंबईकर इंग्रजांनीं मराठ्यांविरुद्ध वसईकर पोर्तुगीजांना चोरून मारून थोडें फार साह्य केलें, नाहीं असें नाहीं. पण तें साह्य वसईकर पोर्तुगीजांना अपुरें पडलें व दिवसेंदिवस त्यांचा पाय खोलांत जाऊं लागला. मग इंग्रज तरी फाटलेल्या आकाशाला ठिगळें कोठवर लावीत बसणार ! त्यांनीं पाहिलें कीं, ह्या मोहिमेंत मराठे सर्वत्र विजयी होऊन पोर्तुगीजांची कोंकणपट्टींतील सत्ता मुळापासून खणून काढणार, व 'इंग्रजांनीं आमच्या शत्रूंना मदत केली' असा पेशव्यांचा ठपका आपल्या माथीं येणार. पूर्वीच पेशवे व इंग्रज यांच्यांत जे परस्पर स्नेहभावाचे संबंध होते, त्यांना अनुसरून वागावयाचें तर इंग्रज पोर्तुगीजांना मराठ्यांविरुद्ध साह्य न करण्याला, इतकेंच काय पण

---

* व्यंकटराव घोरपडे हा बाजीराव पेशव्यांचा मेहुणा. यानें पेशव्यांच्या आज्ञेवरून बारा हजार घोडेस्वार व चार हजार पायदळ एवढें प्रचंड सैन्य घेऊन ता० २३।१।१७३९ रोजीं गोंव्यावर चाल केली. गोंव्याच्या गव्हर्नर जनरलनें वसईच्या बचावासाठीं बहुतेक सैन्य पूर्वीच पाठविल्याकारणानें त्यांची गोंव्याकडील बाजू बरीच लंगडी पडली होती. त्यामुळें व्यंकटरावाचा मार्ग सोपा झाला. त्यानें राचोळचा किल्ला म्हणजे गोंव्याचें नाक घेऊन तिकडील पोर्तुगीज सत्तेला चांगलाच पायबंद लाविला.

जरूरच तर मराठ्यांना साह्य करण्याला बांधलेले होते. निदान त्यांनीं त्या झगड्यांत पूर्णपणें तटस्थ राहणें तरी अत्यंत उचित होतें. असले करारमदार मतलबापुरते पाळावयाचे हें जरी इंग्रजांचें प्रारंभापासूनचें ब्रीदवाक्य असलें, तरी मतलबासाठीं म्हणून देखील ते पोर्तुगीजांना साह्य करून मराठ्यांना दुखवूं शकत नव्हते. इतकेंच काय, पण केवळ मतलबासाठींच आपण पोर्तुगीजांना कितीही मदत केली तरी मराठेच अखेर विजयी होणार हें ओळखून देखत्या देवा दंडवत या न्यायानें मुंबईकर इंग्रजांनी पुढें पुढे मराठ्यांनाच थोडेबहुत चोरटें साह्य केलें. मराठ्यांना मात्र त्या साह्याचा चांगलाच उपयोग झाला. आणि तेव्हांचा मुंबईचा गव्हर्नर जॉन हार्न याची जर बदली झाली नसती, तर कदाचित् मराठ्यांना पुढेंही वसईच्या मोहिमेच्या अखेरपावेतों मुंबईकर इंग्रजांकडून हरजिनसी साह्य झालें असतें. पण जॉन हॉर्नच्या जागीं स्टीफन लो या नांवाचा नवा गव्हर्नर आला, त्याचा कल थोडासा पोर्तुगीजांच्या बाजूला झुकूं लागला होता. तरीही स्टीफन लोदेखील पोर्तुगीजांच्या विनंतीला पूर्णपणे मान देण्याला तयार होईना. त्यानें पोर्तुगीजांची युद्धसाहित्याची मागणी साफ नाकारून दाणागोटा वगैरे जीवनोपयोगी साहित्य तेवढें जलमार्गानें पाठविण्याचें कबूल केले होतें * पण चिमाजीअप्पांना त्यांच्या हेरामार्फत अगोदरच ही बातमी कळली असून त्यांनीं तो दाणागोटाही वसईपर्यंत जाऊन पोंचूं नये अशाविषयीं योग्य ती खबरदारी घेण्याला ठिकठिकाणच्या आपल्या सर्व मराठे सरदारांना बजावलें होते.

अर्थात् त्या धर्मसंग्रामांतील अखेरचा निश्चयात्मक विजय आपल्या आटो-क्यांत आहे असेंच चिमाजीअप्पा व त्यांचे इतर मराठे सरदार सार्थीदार यांना वाटत होतें. आणि म्हणूनच त्यांनीं वसईचा मुख्य पोर्तुगीज सेनापति मार्टिनो डि सिल्व्हेरा§ व वसईचा किल्लेदार जॉन डी पेरीरा यांच्याशीं असें सलोख्याचें बोलणें लावलें होतें कीं, 'आज किंवा उद्यां लौकर किंवा उशिरां आम्ही वसई

* पारसनीस व किंकेडकृत 'हिस्टरी ऑफ दि मराठा पीपल', भाग २, पृष्ठ २५७ पहा.

§ गोव्याच्या गव्हर्नर जनरलनें ॲन्टोनिओ कार्डिम फ्रो याच्या जागीं वसई येथें सेनापतिपदावर मार्टिनो डि सिल्व्हेरा याची इ० सन १७३९च्या प्रारंभीं नेमणूक केली.

काबीज करणार यांत संशय नाहीं. मग विनाकारण रक्तपात करण्यांत अर्थ काय ? तुम्ही सामोपचारानें किल्ला आमच्या स्वाधीन करून आमचा प्रांत सोडून निघून जात असाल, तर आम्ही तुम्हांला सुखरूपपणें जाऊं देऊं'.

ह्या सलोख्याच्या बोलण्यावर वसई येथील पोर्तुगीजांकडून अजून उत्तर मिळावयाचें होतें. ह्या गोष्टीचा विचार करण्यासाठीं वसईकर पोर्तुगीज अधिकाऱ्यांना जी मुदत देण्यांत आली होती, ती गुढीपाडव्याच्या दुसऱ्या दिवशीं संपत होती. मात्र सलोखा होईल ह्या भरंवशावर चिमाजीअप्पा व बाजीराव यांनीं पुढच्या संग्रामाची तयारी शिथिल पाडली नव्हती. त्यांनीं वसईच्या वेढ्याची सर्व सिद्धता जारीनें चालविली होती, व मोहिमेला सुरवातही झाली होती. *

इतके पोर्तुगीज जेरीला आले होते, त्यांच्या सत्तेच्या अंतकाळ इतका समीप आला होता, तरी त्यांच्या मगरुरीला व अमानुष अत्याचारांना यत्किंचित् देखील आळा पडला नव्हता. उलट ते जिवावर उदार होऊन चिडल्यासारखे झाले होते; व त्यांना धिंगाणा घालण्याला आतां वसईचा टापू तेवढाच शिल्लक उरल्यामुळें त्या टापूंत त्यांनीं नुसतें सैतानी अकांडतांडव आरंभिलें होतें. दिवा विझतांना मोठा होतो त्यांतलीच त्यांची गत झाली होती. त्यांच्या सैतानी अकांडतांडवाचा एक मासला वसईजवळील चुळणें गांवच्या लोकांना गुढीपाडव्याच्या पूर्व दिवशीं अचानक पहावयाला सांपडला. त्या दिवशीं सूर्यास्तापूर्वी त्या गांवांत पुढीलप्रमाणें जाहीरनामा फडकूं लागला.

* * *

सर्व लोकांस जाहीर करणेत येतें कीं, जे लोक आमच्या प्रभु येशूच्या परमकृपेनें प्रभूच्या धर्माचा अंगिकार करून पावन झाले आहेन, त्यांच्यावर प्रभूची—त्या आकाशांतील बापाची पूर्ण कृपा आहे. कां कीं, त्या लोकांनीं आपल्या मनांवरील सैतानाची सत्ता झुगारून देऊन प्रभूच्या चरणांचा आश्रय केला आहे. अशा प्रभूच्या सर्व ख्रिस्ती लेकरांस अभय आहे.

आज प्रभूच्या परमपवित्र धर्मावर सैतानाचे भक्त मराठे यांनीं परम संकट आणलें आहे ते प्रभूची ह्या भागांतील सत्ता व प्रभूचा धर्म नाम-

* वसईच्या धर्मसंग्रामांतील ही शेवटची मोहीम होय. ह्या मोहिमेला खरी सुरुवात माघ शुद्ध १०—ता० २७।१।१७३९ रोजीं झाली.

[illegible] करण्यासाठीं झटत आहेत. जे पुण्यवान लोक सैतानाच्या ताब्यांतून सुटून प्रभु येशूच्या कळपांत येऊन निरंतरचे पावन झाले, त्यांना पुन्हा सैतानाच्या ताब्यांत देण्यासाठीं पेशवे व रामानंदस्वामि वगैरे त्यांचे हस्तक दुष्ट ब्राह्मण यांनीं शुद्धीकरणाची घातकी चळवळ ठिकठिकाणीं जोरानें सुरू केली आहे. ह्या चळवळींत प्रभूच्या लेंकरांचें कल्याण होणें शक्य नाहीं; व त्या चळवळींत सांपडून नाममात्र शुद्ध होणाऱ्या लोकांस हिंदुधर्मही लाभणार नाहीं. कां कीं, एकवार कोणत्याही निमित्तानें भ्रष्ट झालेला हिंदु पुन्हा पावन होऊन हिंदु धर्मांत प्रविष्ट होऊं शकत नाहीं असें हिंदूंतील महाविद्वान् अशा धर्ममार्तंडांचेंही मत आहे.

पेशवे व त्यांचे हस्तक ब्राह्मण यांनीं पोर्तुगीज सत्तेविरुद्ध व आमच्या प्रभु येशूच्याविरुद्ध लोकांना चिथवून आमच्याविरुद्ध सध्यां सुरू असलेल्या धर्मसंग्रामांत शस्त्रग्रहण करण्याला प्रवृत्त करण्यासाठीं ही शुद्धि-संघटणाची घातकी चळवळ जोरानें चालविली आहे. कां कीं, ह्या चळवळीच्या जोरावर त्यांना सर्व लोकांची एकी करून आमच्याविरुद्ध बंड करावयाचें आहे. पण आमचा मोड तर ह्या आमच्या शत्रूंच्या हातून होणें शक्यच नाहीं. कां कीं, आमच्या डोक्यावर आमच्या प्रभु येशूचें-त्या आकाशांतील बापाचें कृपाछत्र झळत आहे. मात्र प्रभूच्या आज्ञेला पायांखालीं तुडवून जे लोक आमच्या शत्रूंना सामील होतील, त्याप्रमाणेंच शुद्धि-संघटणाच्या चळवळीला बळी पडून त्यांना तारक असलेल्या प्रभूच्या धर्माची अवहेलना करतील, पुन्हा हिंदु धर्माचा स्वीकार करून उदयीक हिंदुधर्माप्रमाणें गुढया तोरणें उभारतील, त्यांना आमच्या प्रभूच्या पवित्र इच्छेनुसार स्थापन झालेल्या धर्मशासन-मंडळामार्फत अत्यंत कठोर शासन करण्यांत येईल.

त्याप्रमाणेंच आमच्या शत्रूच्या पक्षांतील कोणाही पापी मनुष्याला आमचे जे धर्मबांधव कोणत्याही प्रकारें साह्य करतील, त्यांनाही कठोर शासन करण्यांत येईल. मात्र ज्या अभागी लोकांनीं अजून आमच्या प्रभूच्या पवित्र ख्रिस्ती धर्माचा अंगीकार केला नसेल, असे लोक ख्रिस्ती होऊन आमच्या प्रभूच्या कळपांत सामील होऊन स्वतःचा उद्धार करून घेतील तर

त्यांचें हे आमच्या आकाशांतील बापा! हे प्रभो येशू! तूं तारण कर. त्याचें रक्षण व संगोपन आमच्या हातून होवो.

रामानंदस्वामि व पेशव्यांचे इतर हस्तक यांना पकडून जो कोणी आमच्या स्वाधीन करील, त्याला योग्य बक्षिस दिलें जाईल.

  

याप्रमाणे जाहीरनामा गांवांत फडकला, व तेव्हांच त्याच आशयाची दवंडीही गांवांत सर्वत्र पिटण्यांत आली.

तो दिवस गेला, दुसऱ्या दिवशीं गुढीपाडवा होता तोही दिवस गेला व तिसऱ्या दिवशीं म्हणजे चैत्र शुद्ध द्वितीया शके १६६१ सिद्धार्थीनाम संवत्सरे या दिवशीं सूर्योदयाच्या सुमाराला त्याच चुळणे गांवांतील देवीच्या देवालया-समोर एक अत्यंत विस्मयजनक देखावा दिसू लागला. हत्यारबंद गोऱ्या पोर्तुगीज शिपायांनीं कांही काळ्या शिपायांच्या मदतीनें गांवांतून कोंडवाड्याकडे किंवा कसाईखान्यांत गुरे हांकलून न्यावीं त्याप्रमाणें सुमारें पन्नास तरुण लोकांना तेथें आणून देवीच्या पटांगणांत एका भल्या मोठ्या तारेच्या कुंपणांत कोंडून ठेविलें होतें. त्या कुंपणाच्या अलीकडे देवालयाच्या सभामंडपांत दोन उच्चासनें मांडण्यांत आलीं असून त्यांपैकीं एका उच्चासनावर एक सुमारें तीस वर्षांच्या उमरी-चा रुबाबदार पण खुनशी चेहऱ्याचा तरुण बसला होता. त्याच्या एकंदर वेषावरून तो लष्करी अधिकारी असावा असा स्पष्ट बोध होत होता. त्याप्रमाणेंच त्याच्या चर्येवर झळकणारा खुनशीपणाचा आनंद व तारेच्या कुंपणांतील बंदीवान तरुणां-च्या दीनवाण्या मुद्रा यांकडे तुलनात्मक दृष्टीनें पाहतां तो अधिकारीच त्या लोकांना कैद करण्याला कारण असावा असा स्पष्ट बोध होत होता. त्या तरुण अधिकाऱ्या-च्या थेट समोर देवालयाच्या पटांगणापलीकडील पाषाणी दीपमालांपाशीं, जेथें पूर्वी दरसाल शिमग्याची होळी उभारली जाई, त्या जुन्या जागीं एक सुमारें पांच हात उंचीचा, पायाच्या जांघेइतका जाड निमुळता लोहस्तंभ पुरून उभा करण्यांत आला होता. त्या लोहस्तंभाच्या टोंकाला ख्रिस्ताचा क्रूस लटकविण्यांत आला होता. त्या लोहस्तंभापासून थोड्या अंतरावर एक औरस चौरस चार हात लांबी-रुंदीचें व तितक्याच खोलीचें अग्निकुंड प्रज्वलित करण्यांत आले होते. लोहस्तंभा-पासून थोड्या अंतरावर एक सुमारें तिशीच्या उमरीचा भरदार शरीरबांध्याचा पाणीदार तरुण, एक सुमारें एकवीस बावीस वर्षांच्या उमरीची नाकाडोळ्यांनी

नीटस अशी स्त्री, तिलाच बिलगून तीन वर्षांच्या वयाचा एक तरतरीत व निमगोऱ्या वर्णाचा देखणा बालक व एक पन्नाशीच्या उमरीचा निमम्हातारा अशी चार मंडळी थोडयाच वेळांत बंदीवान म्हणून आणून उभी करण्यांत आली.

तो तरुण व तो म्हातारा यांचे तोंडवळे इतके सारखे होते कीं, त्यावरून ते पिता-पुत्र असावे असें कोणालाही ठाम वाटले असतें. त्याप्रमाणेच त्या बालकाच्या व त्या तरुण स्त्रीच्या चर्येत इतका सारखवटपणा होता कीं, तो बालक जरी त्या स्त्रीला बिलगून उभा राहिला नसता, तरी तीं मायलेकरें आहेत हें कोणींही ओळखलें असतें. आणि तो तरुण मधून मधून त्या स्त्रीकडे व त्या बालकाकडे इतक्या स्नेहमय दृष्टीनें पाही कीं, त्यावरून ती स्त्री त्याचीच धर्मपत्नी असावी व तो बालक हे त्यांचेच अपत्य असावे अशी कोणालाही निःशंकपणें खात्री वाटली असती. पण इतके कशाला ? तो बालक तेथें येतांच मधून मधून केविलवाण्या नजरेनें त्या तरुणाकडे, त्या स्त्रीकडे व त्या निमम्हाताऱ्याकडे पाहून अनुक्रमे 'बाबा !' 'आई !' 'आजोबा' अशा हांका मारूं लागला; त्या ऐकून कोणाचीही निःसंदेह खात्री पटली असती कीं, तीं सर्व एकाच कुटुंबातील माणसें आहेत. त्या चौघांचेही हातपाय लोहशृंखलांनी बद्ध केलेले होते—होय ! त्या लहानग्या गोजिरवाण्या अर्भकाचे हातपायही शृंखलाबद्ध होते. तीं मंडळी तेथें येतांच त्यांच्या शृंखलाबद्ध पायांतून एक सांखळी ओवून त्या सांखळीचीं दोन टोकें दोन्ही बाजूंना एकेका दगडाला बांधून टाकण्यांत आलीं. त्या अधिकाऱ्यानें एकवार त्या बंदीवानांकडे पाहिले, तेव्हां त्याला कोणीं पाहिले असतें तर ताबडतोब ओळखलें असतें कीं, तो अधिकारी त्या मंडळीचा हाडवैरी आहे.

त्या सर्व मंडळीराभोंवार सुमारें पन्नास गोऱ्या हत्यारबंद शिपायांचा खडा पहारा होता. त्या उच्चासनावर बसलेल्या अधिकाऱ्याच्या मागें चार हत्यारबंद शिपाई अत्यंत अदबीनें उभे होते. तो तरुण अधिकारी व तेथले एकंदर हत्यारबंद शिपाई यांचे चेहरे तजेलदार व अधिकारमदानें धुंदावलेले दिसत होते. पण इतर सर्व मंडळीच्या चर्येवर मात्र म्लानतेची केंविलवाणी काळसर छाया पसरलेली होती. त्या मंडळींत बंदीवान म्हणून उभ्या असलेल्या चौघां मंडळीच्या चर्येवरही निराशेचीं व म्लानतेचीं घनदाट अभ्रें दाटलेलीं दिसत होतीं. पण अभ्राच्छादित आकाशांत मधून मधून विद्युल्लता चमकावी त्याप्रमाणें तो बंदीवान तरुण, ती तरुणी व तो म्हातारा यांच्या तेजस्वी पण संतप्त

नेत्रांतून मधून मधून तिरस्कारयुक्त संतापाची चमक मारत होती. त्यांच्यांतील त्या अर्भकाच्या चर्येवर मात्र संतापाचा मागमूसही नव्हता. त्याला आपल्या सभोंवारच्या परिस्थितीची काय जाणीव! त्याला जाणीव फक्त त्याच्या शृंखलाबद्ध हातांपायांना होणाऱ्या वेदनांची होती; त्या वेदना व सभोंवारच्या भेसूर परिस्थितीमुळें उत्पन्न झालेलें भय यांमुळे त्याची कोमल चर्या अग्निज्वालांनीं होरपळून गेलेल्या नाजुक पुष्पाप्रमाणे कोमेजून गेली होती.

ती चार दुर्दैवान मंडळी तेथे हत्यारबंद शिपायांच्या कडेकोट पहाऱ्यांत येऊन धडकतांच तेथे पूर्वीच तारेच्या कुंपणांत डाम्बून पडलेल्या लोकांच्या तोंडून हळहळीचे मानसोद्गार निघूं लागले व कांहींच्या डोळ्यांतून दुःखाश्रुही वाहूं लागले. तो लोहस्तंभ व तें धडाडलेलें अग्निकुंड पाहून त्या कैद्यांच्या चर्याही एकदम पालटल्या, जीवितविषयीं पूर्णपणें निराश झालेल्या जीवांच्या चर्येवर ज्या प्रकारची अत्यंत भेसूर पण किंचित बेफिकिरीची छाया पसरते, तशा प्रकारची छाया तो तरुण, ती स्त्री व तो निमम्हातारा मनुष्य यांच्या चर्येवर पसरली होती. आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत जीवाची जीविताविषयींची आशा सुटत नाहीं असा जगाचा सर्वसाधारण अनुभव असतो. पण कांहीं अपवादात्मक प्रसंग असे प्राप्त होतात की, त्या प्रसंगीं जीवाचा प्रत्यक्ष अंत होण्यापूर्वीच त्या अंताच्या पूर्ण जाणिवेच्या जबरदस्त धक्क्याने त्या जीवाचा जीविताविषयींचा आशातंतु तुटून गेलेला असतो. त्या अभागी कैद्यांची स्थिति अशीच होती.

ते कैदी तेथें येऊन डांबून पडतांच त्या अधिकाऱ्याने तुच्छतापूर्ण खुनशी दृष्टीने एकसारखें दोनतीन वेळां त्यांच्याकडे पाहिलें व लगेच आपल्या मागच्या एका काळ्या शिपायाकडे वळून विचारलें, "आल्बुकर्क! पोर्टोसाहेबांना यावयाला अजून कितीसा अवकाश आहे?"

"साहेब इकडे यावयाला निघाले आहेत. ते एवढ्यांत यावयाला हवे होते. अजून कां आले नाहींत नकळे." आल्बुकर्क उत्तरला.

"मार्गांतच कोणा बदमाषानें त्यांच्यावर एखादें संकट ओढवून आणलें नसेल ना!" तो तरुण अधिकारी समोर जमलेल्या सर्व लोकांच्या घोळक्याकडे एकवार लक्षपूर्वक पहात म्हणाला, "खरेंच, तो वेरड कृष्णभजी ह्या मंडळींत कोठें दिसत नाहीं. आणि तो स्वामीही दिसत नाहीं. त्यांना तुम्हीं कां पकडून

आणलें नाहीं? तुमच्यापाशीं मीं जी वहिमी माणसांच्या नांवांची यादी कालच दिली होती, त्यांत त्यांचीं नांवें प्रथमच होतीं; खरें ना?"

"होय साहेब!" आल्बुकर्क उत्तरला.

तो तरुण अधिकारी आपल्या मागच्या दुसऱ्या एका काळ्या शिपायाकडे वळून म्हणाला, "जॉन! तूं तर त्या बेरडांना चांगला ओळखतोस. आपल्या माहितींतील वहिमी माणसांवर नजर ठेवून त्यांना कैद करून आणण्याची जबाबदारी तुझ्यावर होती. खरें ना?"

जॉन उत्तरला, "होय साहेब!—"

"होय साहेब काय? तूं तुझी कामगिरी नीट बजावली नाहींस!"

"साहेब! रात्रभर मी कुळभजी ज्या घरांत रहात असे त्या घरावर सशस्त्र पहारा ठेवला होता पण त्यापूर्वींच तो जो कोठें बाहेर गेला होता, तो आज उजाडेपावेतों घरीं आलाच नाहीं. आणि तो स्वामि तर आमचें सैन्य गांवांत येऊन पोंचण्यापूर्वींच बाहेरगांवीं कोठें निघून गेला असल्याचें मला नक्की कळलें. अशा स्थितींत माझा काय इलाज चालणार?"

"हें तूं अगोदरच माझ्या नजरेला कां नाहीं आणलेंस?" तो अधिकारी किंचित् त्रासिकपणानें जॉनला म्हणाला, "असा हलगर्जीपणा अशा महत्त्वाच्या कामीं मुळींच उपयोगाचा नाहीं. पोर्टोसाहेबांशीं त्या हरामखोर रामानंदाचा उभा दावा आहे हे तुला कसें माहीत नाहीं? जा पाहूं! अगोदर पोर्टोसाहेबांचा तपास करून ये जा."

याप्रमाणें त्या अधिकाऱ्याचा हुकूम होतांच जॉन तसाच पोर्टोसाहेबाच्या तपासासाठीं निघाला. तो थोडा दूर जातो न जातो तोंच तेथें एक पालखी येऊन थडकली. ती पालखी पहातांच कोणी तरी 'बडें घर पोकळ वांसा' या थाटाची गोरी भिक्षेकरीण आली हें देवालयासमोर जमलेल्या सर्व मंडळीला अजमावतां आलें. इतका अचूक अंदाज त्याना करतां येण्याचें कारण अलीकडे पोर्तुगीजांच्या पडत्या काळांत अशा प्रकारचे प्रतिष्ठित भिकार देशांत सर्वत्र फारच लोटले होते.* प्रतिष्ठित गोऱ्या भिकारणींनीं स्वतः पालखींतून भिक्षा

* गोव्यांतील पोर्तुगीज सत्तेला उतरती कळा लागल्यावर तेथील लोकांचे जे हाल होऊं लागले त्याचा हा परिणाम होय. अशा प्रकारची विपन्नावस्था पोर्तुगीज समाजाला हिंदुस्थानांत त्यापूर्वींच प्राप्त झाली होती. टॅव्हर्निअर इ० सन

मागावयाला निघावयाचें व त्यांच्या बरोबरच्या नोकरांनीं पुढें जाऊन भिक्षा गोळा करावयाची, असल्या प्रतिष्ठित भिक्षांदेहीचा परिपाठ होता. त्या परिपाठाला अनुसरून त्या पालखीबरोबर दोन तरुण व सुंदर दासी होत्या. त्यांना पहातांच तो कोणा प्रतिष्ठित भिकारणीचा लवाजमा आहे हें कोणालाही ओळखतां येण्याजोगें होतें. किंबहुना त्या काळांत पालखींतून भिक्षा मागावयाला निघणाऱ्या ह्या मिजासखोर गोऱ्या भिकारणींचा इतका सुळसुळाट झाला होता कीं, त्यामुळें खरोखरीचे प्रतिष्ठित व पालखीपदस्थ लोक पालखींतून त्या प्रांतीं हिंडण्याला कचरूं लागले होते. पुरुष पालखींतून मिरवणारे असे थोडेच. पालखीपदस्थ श्रीमंतांच्या बायका काय त्या देवदर्शनाला अथवा एखाद्या समारंभाला जावयाला निघाल्या कीं पालखींतून जावयाच्या; पण पडदानशीन पालखींत एखादी मिजासखोर गोरी भिकारीण बसली आहे कीं कोणी थोरामोठ्याची बायकामंडळी बसली आहे हें सामान्य जनांनीं कसें ओळखावें ! बरें, अशा पालखीपदस्थ थोरामोठ्यांच्या बायका कधींतरी पालखींतून बाहेर पडावयाच्या; एरव्हीं नेहमीं गांवांतून रस्तोरस्तीं पालख्या हिंडावयाच्या त्या अशा गोऱ्या भिकारणींच्या. त्यामुळें पालखी व त्या पालखीबरोबर थोडासा चारदोन माणसांचा लवाजमा दिसतांच सकृद्दर्शनीं जो तो मनांत खूणगांठ बांधी कीं, गोरी भिकारीण आली.

आज ती पालखी आलेली पहातांच देवालयासमोर जमलेल्या कांहीं लोकांना तर त्याहूनही जास्त बोध झाला कीं, ही किल्लेदारीणबाईंची पालखी असावी. त्या अधिकाऱ्यानें तर प्रथम म्हणजे पालखी दृष्टिपथांत यावयाच्या पूर्वीं केवळ पुढें आलेल्या दोघी दासींना पाहूनच ती सोफियाची पालखी आली असावी असें अजमावून चट्कन् उठून पुढें जाऊन पाहिलें. तेथल्या कांहीं लोकांना वाटलें कीं, गोरी भिकारीण आलेली पाहून गोऱ्या कातडीला मान देण्यासाठीं तो अधिकारी उठला. पण त्याच्या उठण्याचें कारण निराळेंच होतें. तें त्याच्या बरोबरच्या शिपायांना मात्र माहीत असावें. कारण ते लगेच एकमेकांकडे पाहून डोळे मिचकावून हंसले. ते कां हंसले असावे बरें ?

---

१६४८ मध्यें लिहितो, 'पूर्वींचीं श्रीमंत कुटुंबें हल्लीं भिक्षा मागूं लागलीं आहेत, तरी त्यांनी आपला थाट टाकून दिलेला नाहीं. पोर्तुगीज बाया पालखींत बसून भिक्षा मागण्यास जातात आणि बरोबरचे नोकर आंत जाऊन भिक्षा गोळा करितात. ज्या ज्या ठिकाणीं पोर्तुगीजांनीं राज्य कमावलें, तेथें सर्वत्र असाच थाट उत्पन्न झाला, आणि त्याचा परिणामही तोच झाला.'

## प्रकरण पहिलें

# सोफिया

सोफिया कोणत्याही कारणानें कां असेना, पण त्या प्रांतीं—नव्हे, गोवेंप्रांतींही गाजलेली बाई होती. ती आजला वयानें सुमारें एकवीस वर्षांची होती. पण तिला पाहून कोणीही ती सोळा वर्षांच्या वयाची तरुणी असावी असेंच म्हटलें असतें, इतकी तिच्या शरिराची ठेवण व घडण बांधेसूत होती. सोफिया रूपानें फार सुंदर होती असें जरी नाहीं, तरी ती मोहक होती एवढें मात्र निःसंशय. तिच्या नेत्रांत असें कांहीं विलक्षण पाणी होतें कीं, तिला नजरबंदीचा जादूटोणा माहीत नसतांही ती ज्याच्याकडे पाही त्याची नजरबंदी करून सोडी. आतां, पाणीदार नजर देखील दोन प्रकारची असते. एक प्रकारची पाणीदार नजर सद्विचारी माणसांच्या मनांत आदर व अनुकंपा उत्पन्न करते आणि दुर्जनांना विलक्षण धाक—दरारा दाखविते. ज्याचे आचार-विचार पवित्र गंगा-जलाप्रमाणें निर्मळ असतात, अशा पाणीदार दृष्टीच्या माणसांच्या दृष्टींतच अशा प्रकारचें पवित्र पाणी खेळत असतें. दुसऱ्या प्रकारची पाणीदार नजर सज्जनांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न करते व दुराचारी जनांच्या अंतःकरणांत गुदगुल्या करते. ज्यांचे आचार-विचार अपवित्र असतात, अशा दुराचारी माणसांपैकीं ज्यांची दृष्टि पाणीदार असते त्याच्या दृष्टींत असलें पाणी खेळत असतें. सोफिया-च्या दृष्टींत ह्या दुसऱ्या प्रकारचें पाणी खेळत होतें. इतकें असूनही ज्याला ज्याला सोफियाची ओळख झाली, तो तो मनुष्य कधींही तिच्या मोहजालांत गुरफटला जात नसे. त्यामुळें सोफिया इतकी सुंदर व इतकी चंचल असूनही आणि जगाच्या रहाटीप्रमाणें तेव्हांदेखील स्त्रीलंपट नादान लोकांची तेव्हांच्या समाजांत वाण नसून सुद्धां—फार काय, खुद्द सोफियाच्या जातभाईंत तेव्हां सर्व प्रकारचे अना-चार परमावधीला पोंचलेले असतांनादेखील जगाच्या बाजारांत सोफियाच्या दुःशीललांछित सौंदर्याला पुरें मोल मिळणें अशक्य झाल्यामुळें एका काळीं लक्षाधिशाची सहचारिणी शोभणारी ती आज भिक्षापात्राची मिरासदारीण झाली होती ! एका काळीं तिनें जिथें सोनें वेंचलें तिथें गोवऱ्या वेंचणें आज तिच्या कपाळीं आलें होतें !

सोफिया ही गोव्यांत एका नादान पण श्रीमान् अशा पोर्तुगीज धर्मगुरूच्या विलासमंदिरांतील एका परमसुंदर मुसलमान स्त्रीच्या पोटीं जन्माला आलेली होती. गोव्यांतील पोर्तुगीज लोकांच्या पाशवी अत्याचाराच्या इतिहासांत अशीं उदाहरणं असंख्य असल्यानें व आजचा त्या प्रांतांतील वारयोषितांचा मोटा वर्ग तत्कालीन अत्याचारांची प्रत्यक्ष साक्ष देत असल्यानें सोफियाची आई त्या कोणा नीच पोर्तुगीज धर्मगुरूच्या विलासमंदिरांत कशी ओढली गेली, ह्या हृदयद्रावक प्रसंगाचें वर्णन येथें न केल्यानेंही भागण्याजोगें आहे. एवढें मात्र खरें कीं, सोफिया ही जन्मतःच अभागी होती. ती जन्माला येऊन महिना लोटला नाहीं तों तिच्या आईनें परलोकचा रस्ता धरला. राहिला बाप;पण विलासदासीच्या अपत्याला किंमत देण्याइतकी माणुसकी त्या बापाच्या अंगीं मुळींच नव्हती. त्यानें लगेच एका अनाथालयांत त्या एक महिन्याच्या तान्ह्या अर्भकाला पाठविलें. तेथें सोफिया वयाला पंधरावें वर्ष लागेपर्यंत राहिली. ती वयांत आल्यावर तिच्या जन्मदात्या बापानें तिच्या करितां एवढेंच केलें,–तेव्हांच्या पोर्तुगीज गव्हर्नर जनरलपाशीं एक शब्द खर्च करून सोफियाशीं जो कोणी तरुण लग्न लावील त्याला पोर्तुगीज सैन्यांत शिलेदारीं मिळण्याची व्यवस्था केली. तेव्हां बेकार गोऱ्या लोकांना मुळींच दुष्काळ नव्हता. तशांत अर्धवाटग्या, बेशिस्त व व्यसनी तरुणांनीं तर तो सारा देश गजबजून गेला होता. अशा अर्धवाटग्या तरुणांना सैन्यांत जागा देऊन त्यांच्या पोटापाण्याची सोय करण्याचे प्रयत्न सरकाराकडून प्रथमपासून कसून चालले होते हें खरें.* पण लाखांनीं असली घेडगुजरी व नादान प्रजा निर्माण झाली, तितक्या

* पोर्तुगीज लोक हिंदुस्तानांत आले ते ऐषआरामी व चैनी बनले. त्यांना पायदळांत नोकऱ्या करणें कमी प्रकारचें वाटूं लागलें व हिंदुस्थानांतील राजे-रजवाडे व इतर लोक यांच्याशीं झगडण्याला भरंवशाची फौज तर पाहिजे. तेव्हां ती संपादन करण्यासाठीं अल्बुकर्क यानें युरोपांतील पोर्तुगीज लोकांचीं एतद्देशीय स्त्रियांशीं लग्नें लावून देण्याची युक्ति प्रथम काढली. अशीं लग्नें लावणाऱ्या स्त्रियांना बक्षीस मिळे व पुरुषांना नोकऱ्या मिळत. ह्यामुळें अर्धब्राह्मणी प्रजा पुष्कळ वाढली. परंतु त्यामुळें उत्पन्नापेक्षां खर्च जास्त येऊं लागला. तरीही ही व्यवस्था कायम ठेवण्याबद्दल धर्माधिकाऱ्यांचा फार आग्रह असे. हे बाटगे लोक घमेंडखोर व आळशी असत, आणि त्यांना नोकऱ्या देऊन

सर्वांची सोय सरकार तरी कुठे लावणार? त्यामुळें सोफियाशीं लग्न करून शिलेदारी मिळविणारा बेकार तरुण सांपडण्याला मुळींच अडचण पडली नाहीं. त्याला सोफिया आवडली व तो सोफियाला आवडला; दोघांचे लग्न झाले व तो तरुण शिलेदार बनला. पण बिचाऱ्याने सहा महिने देखील शिलेदारीचा किंवा संसार-सुखाचा उपभोग घेतला नाहीं. तो अकस्मात् एका प्राणांतिक आजाराला बळी पडला व सोफिया विधवा झाली. तेव्हां तिला नुक्तेंच पंधरावे वर्ष पूर्ण झालें होतें.

पण सोफियेला वैधव्यपंकांत फार दिवस रुतून बसावें लागले नाहीं व तीही पतिनिधनामुळें झुरत बसणारी स्त्री नव्हती. वैधव्य वांट्याला आल्यापासून दोन महिन्यांच्या आंत तिने एका वड्या लष्करी अंमलदाराशीं आपलें लग्न आपण होऊनच जुळविले. कोणाला वाटेल कीं, सोफियाचे नशीब ह्या दुसऱ्या विवाह-संबंधाने उदयाला आलें. पण तसेंच केवळ नाहीं. तिच्या प्रेमपाशांत अडकून तिचा पति झालेला तो लष्करी अंमलदार ह्या लग्नाच्या वेळीं साठ वर्षांच्या वयाचा होता व हें त्याचे सहावे लग्न होतें. सोफियाने जाणून बुजून अशा जख्खड थेरड्याशीं लग्न लावलें ते केवळ त्याच्या संपत्तीकडे पाहून लावलें, व अशा विषम लग्नाचा परिणामही पुढे त्या काळच्या अस्सल पोर्तुगीज किंवा बाटग्या खिस्ती स्त्रीसमाजाच्या सार्वत्रिक अधःपातमय जीविताला अनुसरून

---

पोसण्याचा खर्च सरकारावर पडे. ह्या अवाढव्य खर्चामुळें पुढे पुढें सरकारांत पैशाची टंचाई पडूं लागली व त्या अवाढव्य खर्चावर पोसले जाणारे पोर्तुगीज लोक व त्यांची प्रजा यांनी जे पेढार बनलें; तेही शिस्त मोडून बंडखोरां-प्रमाणे वागूं लागलें. ते लोक आपल्या बंदुकी देखील इकडील राजे लोकांना विकीत व पोट भरण्याकरितां वाटेल तें नीच कृत्य करीत. याविषयीं तक्रारी इ० सन १५४८ मध्यें राजाकडे गेल्या व अशा बेकार लोकांना लष्करी नोकर समजून पगार सुरू करण्याविषयीं शिफारस करण्यांत व त्या शिफारशीची योग्य अंमलबजावणीही झाली. पण त्या उडाणटप्पू घमेंडखोर लोकांना पगार सुरू झाला तरी जुगारासारख्या व्यसनांत त्याचा अपव्यय होऊं लागला व त्यांची दैना कायम-च राहिली. पोर्तुगीजांच्या उतरत्या कळेंत पुढें पावणेदोनशें वर्षांनीं पोर्तुगीजांचा हा अधःपात कोणत्या थराला गेला असेल याची योग्य कल्पना कोणासही करतां येईल.

व्हावयाचा तोच झाला.* त्या लष्करी अंमलदाराचें सोफियाशीं लग्न झाल्यावर थोड्याच दिवसांत त्या अंमलदाराची ठाण्याच्या किल्लेदारीच्या कामावर नेमणूक झाली. अर्थात् सोफियाही त्याच्याबरोबरच एकदम गोव्याहून ठाण्याला आली. त्या वेळचा सोफियाचा श्रीमंतीचा थाट कांहीं औरच होता. ती अगोदरच विलासप्रिय व चंचलवृत्तीची होती, तशांत तिचा हा दुसरा पति तिच्या पंधरा

* डानव्हर्ससारख्या अनेक इतिहासकारांनीं आपल्या इतिहासांत हिंदुस्थानांतील तत्कालीन पोर्तुगीज समाजाच्या सार्वत्रिक अधःपाताचें शब्दचित्र रेखाटून ठेविले आहे, तें असें:—'...व्यापाराने हिंदुस्थानांतील पोर्तुगीज लोक धनाढ्य झाले होते व शिवाय लष्करी भपका व धर्माधिकाऱ्यांचा डामडौल अतोनात वाढला होता. लोक आपलीं सर्व कामें गुलामांकडून करून घेत असत. त्याप्रमाणेंच घरंदाज गणल्या जाणाऱ्या पोर्तुगीजानें कोणताही धंदा करणें अप्रतिष्ठितपणाचें समजलें जाई. त्यांच्या बायकांनाही घरांतील कामें करणें प्रशस्त वाटत नसे. लष्कर, धर्मखातें, सरकारी नोकरी व थोडाबहुत समुद्रावरील व्यापार यांशिवाय इतर कोणताही धंदा पोर्तुगीज लोक स्वतः करीत नसत. त्यामुळें ते आळशी व व्यसनाधीन बनले. आळशी पुरुषांच्या झुंडी रस्त्यातून व जुगारीच्या अड्ड्यांतून हिंडताना दिसून येत. जुगारीचा सरकाराला कर मिळत असून तेथें सर्व प्रकारची चैन चाले. नाच, तमाशे, गाणेंबजावणें, जादूटोणा, खुषमस्करी इत्यादि चैनीच्या प्रकारांचा तेथें सुकाळ असे. बायकांना पुरुषांत मिसळण्याची मनाई असल्यानें त्या पडद्यांत बसून गाणें, खेळणें, भांडणें, खुषामस्करे व गुलाम यांच्याशीं चेष्टाचार करणें इत्यादि प्रकारच्या चैनींत कालक्रमणा करीत. त्या उष्णतेचा ताप टाळण्यासाठीं बहुशः अर्धनग्नावस्थेंत रहात. त्या कपटविद्येंत निष्णात असत, व मोगल लोकांच्या जनानखान्यांतील अनाचारांप्रमाणेच अनाचार ह्या पोर्तुगीजांच्या जनानखान्यांत चालत. नवऱ्याशीं कपट लढवून, त्याला गुंगीचें औषध वगैरे पाजून त्या स्त्रिया आपला अनीतिमय प्रीतिव्यवहार यथेच्छ चालवीत. प्रार्थनेकरितां मंदिरांत वगैरे जाणें झाल्यास त्या स्त्रिया मोठा थाटमाट करीत. त्यांचा पोषाक बहुमोल भरगच्चीचा असून तो हिरे, माणकें, मोत्यें वगैरे रत्नांनीं मढविलेला असे. त्या डोक्यांत, दंडांत, हातांत व कमरेंत नाना प्रकारचे मौल्यवान् अलंकार धारण करीत; डोक्यावरून पायांपर्यंत झिरझिरीत वस्त्राचा बुरखा घेत; व बरोबर पहारेकऱ्यांचा लवाजमा घेऊन भरगच्चीच्या म्यान्यांत

सोळा वर्षांच्या भरजवानींतील उमरीच्या मानानें तिचा आजोबा शोभण्याइतका वृद्ध असल्यानें त्यानें आपल्या ह्या तरुण पत्नीला प्रसन्न ठेवण्यासाठीं मनसोक्त आचरण करण्याची मोकळीक तिला ठेवली होती. स्वातंत्र्य, तारुण्य, सौंदर्य, नैसर्गिक वृत्तिचांचल्य, दुःसंगति व अपार धनवैभव इतक्या सर्व गोष्टींचा एकत्र समुच्चय सोफियाच्या ठायीं होतांच ती ताळतंत्र सोडून बेफामपणानें वागूं लागली यांत आश्चर्य तें काय ! तिच्या बेफाम वर्तनाला तेव्हांच्या चालीरीतींप्रमाणें फक्त एकाच गोष्टीचा आळा होता. आजकालच्या युरोपीय समाजाप्रमाणें त्या काळीं स्त्रियांना पुरुषांत मोकळेपणानें सर्रास मिसळण्याची मोकळीक नव्हती, त्यामुळें सोफियाला उजळ माथ्यानें समाजांत वावरतां येत नसे इतकेंच काय तें; पण पडद्याआड पाहिजे तसें वर्तन ठेवावयाला तिला कोणताच आडपडदा नव्हता. त्या काळच्या चाली-रीतींप्रमाणें सोफिया इतर जनाना हटकून दिसावयाची ती फक्त प्रार्थनामंदिरांत जातांना. त्या वेळीं ती भरजरी रेशमी पोशाक करी. तोंडाला सुवासिक उटणीं फांशी. तिच्या पोलक्याला व झग्याला लक्षावधि रुपये मोलाच्या मणिमौक्तिकांच्या किनारी लावलेल्या असत. ती आपल्या मस्तकावर एखाद्या महाराणीच्या मुकुटाशीं स्पर्धा करणारा मणिमुक्ताखचित अलंकार धारण करी. तिच्या दंडात कांहींसे बाजूबंदांसारखे रत्नखचित अलंकार असत. गळ्यांत टपोऱ्या मोत्यांचा हार असे व हातांत हिऱ्याच्या बांगड्या असत. उघड्या अंगानें बाहेर पडावयाचें नाहीं म्हणून ती पायांपासून डोकीपर्यंत रेशमी बुरखा घेई; पण त्या बुरख्यालाही बहुमोल मोत्यांची किनार असे व तो बुरखा इतका झिरझिरीत असे कीं पहाणाऱ्या लोकांनाच काय, पण खुद्द तिलाही आपण बुरखा घेतला आहे असा भास देखील होऊं नये. ती अशा वेळीं पायांत मोजे

---

बसून प्रार्थनामंदिरांत जात. त्या स्त्रिया पायांत मोजे न घालतां मोत्यांनीं मढविलेले सपाट पायांत घालीत. त्या सपाटांची टांच सुमारें सहा इंच तरी उंच असे. त्या स्त्रिया गालांना रंग फांशीत. मंदिरांत पोंचल्यावर एक दोन नोकर त्यांना धरून आंत नेत, कारण उंच टांचांमुळें त्यांना मुळींच चालतां येत नसे. ह्याप्रमाणें मंदिरांत दहा-चाळीस पावलें चालून जाण्यास त्यांना निदान पाव तास तरी लागे. अशा मंदगतीनें चालणें हें तेव्हां मोठ्या सभ्यपणाचें लक्षण समजलें जात असे'.—सरदेसाईकृत 'ब्रिटिश रियासत' (पूर्वार्ध).

न घालता उघड्या पायांत फारच उंच टांचांचे मोत्यांनीं मढविलेले भरजरी सपाट घाली. अशा थाटानें ती भरगच्ची पालखींत बसून खास पहाऱ्यांतून प्रार्थना-मंदिराकडे निघाली कीं, लोक नुसते तिच्याकडे मंत्रमुग्धाप्रमाणें टकमक पहात जागजागीं उभे राहात. तिच्या पहारेकऱ्यांचा एकंदर थाटमाट तिच्या थाटमाटाला साजेसाच असे व आपणाप्रमाणेंच रूपानें सुंदर व उमद्या अशाच पहारेकऱ्यांची ती नेहमीं निवड करी. ती प्रार्थना-मंदिरापाशीं जाऊन पोंचली कीं तिला हात देऊन आंत चालवीत नेण्यासाठीं बरोबरच्या पहारेकऱ्यांत अहमहमिका सुरू होई. दरवाजापासून बैठकीपर्यंत जाईतों तिला अर्धी घटका तरी वेळ लागे. एवढ्या वेळांत प्रार्थनामंदिरांतील सर्व लोक बुभुक्षित नजरेनें तिच्याकडे टक लावून पहात बसत. प्रार्थना आटोपून परत येतांनाही ह्याच गोष्टीची पुनरावृत्ति होई. सोफियाच्या सौंदर्यानें व डामडौलानें तेव्हां ठाण्याच्या खिस्ती रहिवाशांना इतकें वेडावून सोडले होतें कीं, कधींही प्रार्थनामंदिरांत न येणारे लोकही ज्या दिवशीं सोफिया प्रार्थना मंदिरांत येई, त्या दिवशीं हटकून तेथें येत. तेवढ्यासाठीं ते सोफिया कधीं प्रार्थनामंदिरांत कोणत्या दिवशीं जाणार याबद्दल बातमी काढण्यांत तत्पर असत, व बातमीदारांनाही अशा बातम्या पोंचवून योग्य किफायत करतां येई.

पण एथेंही पुन्हा सोफियाच्या दैवानें दगा दिला. ती आपल्या तैनातीतील एका हलकट पण छानछोकीच्या उडाणटप्पू तरुणाच्या नादीं लागली. त्या नादीपणाचा हां हां म्हणतां इतका कळस झाला कीं, त्या लफंग्या माणसाच्या साह्यानें तिनें प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याला विष चारून ठार मारण्याचा बेत केला. तिच्या दुर्दैवानें तो बेत सिद्धीला जाण्यापूर्वीच उघडकीला आला व तिच्या नवऱ्यानें तिच्याशीं काडीमोड करून तिला आपल्या घराबाहेर काढून दिलें. ज्या लफंग्याच्या नादानें तिनें हे आसुरी कृत्य आरंभिलें होतें, त्याला मात्र देहान्त शासन मिळालें. आणि हा प्रकार तिचें त्या किल्लेदाराशीं दुसरें लग्न लागल्यावर अवघ्या एका वर्षांत झाला तेव्हां तिच्या वयाला सोळावें वर्षही पुरें झाले नव्हतें.

एवढ्यावरच सोफियाचें भाग्यचक्र थांबलें नव्हतें. तिच्या आयुष्याचे धिंडवडे अजून निघावयाचे होते. वरच्याप्रमाणेंच आणखी दोन वेळां तिच्या विवाहाचा योग जुळून आला. पैकीं पहिल्या म्हणजे एकूण तिसऱ्या वेळचा तिचा पति हा एक पोर्तुगीज सरदार होता. तो एकंदरींत सोफियाला प्रिय वाटणारा असाच

तरुण, मान्यतेचा व वैभवसंपन्न पति होता; आणि त्याच्या संगतींत सोफियाचीं दोन वर्षे सुखानें गेलीं. पण तो सरदारही नादी होता, व त्या नादापायींच त्याचा ठाण्याच्या किल्ल्यांत एके दिवशीं खून झाला. खरा प्रकार असा कीं, त्याचा खून झाला, पण लोकापवाद मात्र असा उत्पन्न झाला कीं,सोफियानें मारेकरी घालून त्याला ठार केलें. तिनें आपल्यापूर्वीच्या पतीला विषप्रयोग करून ठार मारण्याचा व्यूह रचिला होता ही गोष्ट जगजाहीर असल्यानें असा लोकापवाद उत्पन्न होऊं शकला; व तो हां हां म्हणतां इतका विकोपाला गेला कीं, अखेर धर्मशासनमंडळासमोर सोफियाची पतिहत्येच्या अपराधाबद्दल रीतसर चौकशी होऊन तिला मुंडण करून जिवंत जाळण्याची शिक्षा ठोठावली गेली. पण त्या शिक्षेची अंमलबजावणी होण्यापूर्वींच सोफिया तुरुंगावरील लांचखाऊ वाटग्या अधिकाऱ्याचे हात ओले करून तेथून निसटली व थेट गोव्याला पळून गेली.

गोंव्यांतच काय, पृथ्वीच्या कोणत्याही भागावर गेलें तरी मानवजातीचे सर्व-साधारण नैसर्गिक मनोविकार थोडेच बदललेले असणार ! सोफिया जी गोव्यांत गेली, ती एकदम योगिनी बनून तेथल्या एका मठांत वास्तव्य करूं लागली या ठिकाणींही तिच्या तारुण्यानें व सौंदर्यानें तिला दगा दिला म्हणावें किंवा त्या दोन साधनांचा तिनें स्वार्थसिद्धीकडे उपयोग करून घेतला म्हणावे, त्या नव्या दिशेनें तिच्या आयुष्याची नौका कांहीं काळ म्हणजे सुमारें एक दोन वर्षें सुरळीत-पणें चालली व अखेर ती एकवार जी अथांग भवसागरांत वहात गेली, ती पुन्हा मार्गाला लागली नाहीं. योगिनी म्हणून आयुष्य कंठीत असतांनाच तिचा तेथल्या गव्हर्नराच्या पुतण्याशीं—लुई बुथेलो या नांवाच्या एका तरुण व वैभव-शाली लष्करी अधिकाऱ्याशी—परिचय झाला, व थोड्याच दिवसांत त्या परिचया-चे प्रेमांत रूपान्तर होऊन त्या दोघांचें लग्न झालें. लग्नानंतर लौकरच लुई बुथेलो-ची ठाण्याचा किल्लेदार म्हणून नेमणूक झाली व अर्थातच सोफिया त्याच्याबरोबर ठाण्याला आली. ती ठाण्याची राणी म्हणून सत्ता गाजवूं लागली. पुन्हा तिचा थाटमाट सुरू झाला, रंगढंग सुरू झाले, सर्व कांहीं पूर्ववत् सुरू झाले.

पण लुई बुथेलो सोफियाइतका सुंदर नव्हता व तो हडेलहप्पी गडी होता. तो सोफियाला फार दिवस प्रसन्न ठेवूं शकला नाहीं. त्याच्या संसारांत सोफिया दिवस कंठीत असतांना तिच्या प्रेमसंबंधाला पुन्हा फांटे फुटूं लागले. त्याच सुमाराला बुथेलोला त्या प्रांताचा मुख्य सेनापति नेमण्यांत आलें. अर्थात् ती योगायोगाची

गोष्ट होती. मराठ्यांनीं बुथेलोच्या शिरजोरपणामुळें चिडून, त्यानें प्रत्यक्ष पेशव्यांना एका प्रसंगीं तडजोडीच्या बोलण्यांत शिव्या देऊन त्यांचा अपमान केला होता तो डाव मनांत धरून व ठाण्याचा किल्ला काबीज करण्याचा निर्धार करून किल्ल्याला वेढा दिला, तेव्हां बुथेलोनें मुंबईकर इंग्रजांना विनंति करून त्यांच्यापासून कांहीं युद्ध-साहित्य व कांहीं चांगले गोलंदाज मागविले. इंग्रजांनीं बुथेलोच्या मागणीप्रमाणें नाहीं तरी कांही अंशीं त्याला मदत केली. तेव्हां मुंबईहून जे गोलंदाज ठाण्याला आले, त्यांत रॉबर्टसन या नांवाचा एक धाडसी व सुंदर असा अविवाहित गोलंदाज तरुण होता. रॉबर्टसन गोलंदाजीच्या कामांत चांगलाच वाकबगार होता. त्याची मर्दुमकी पाहून सोफिया त्याच्यावर आषक झाली. पण हा प्रकार बुथेलो-च्या हाताखालील एक सेनानी आल्काकोव्हा व बुथेलोच्या हाताखालील दुय्यम सेनापति पेड्रो डि मेलो यांच्या दृष्टोत्पत्तीला येऊन त्यांनी बुथेलोला सावधगिरीची सूचना दिली. बुथेलोने ताबडतोब रॉबर्टसनला पकडून धर्मशासनमंडळासमोर हजर केलें व त्या मंडळाने रॉबर्टसनला हद्दपारीची शिक्षा ठोठावली. वास्तविक त्याला प्राणदंडाचीच शिक्षा व्हावयाची, पण तो इंग्रजाचा प्रजाजन व सेवक असल्यानें हद्दपारीच्या शिक्षेवर बचावला.

पण रॉबर्टसनने जाता जातां ह्या गोष्टीबद्दल बुथेलोवर साधला तेवढा सूड घेतला. त्यानें इंग्रज गोलंदाजांना गोलंदाजीच्या कामांत हेतुपुरःसर कुचराई करावयाला लावलें, आणखीही नाना भानगडी केल्या; व त्यांचा परिणाम अखेर ठाण्याच्या लढाईत बुथेलोच्या माथीं अपशयाचें खापर फुटण्यांत झाला. मराठे व पोर्तुगीज यांची खडाजंगीची लढाई होऊन सर्व पोर्तुगीज सैन्य त्या लढाईत कापलें गेले, मराठ्यांनीं ठाण्याचा किल्ला काबीज केला व बुथेलोला तेथून वसई-कडे पळ काढून आपला जीव बचावावा लागला. ठाण्याचा किल्लेदार पेड्रो डि मेलो व मुख्य पोलीस अधिकारी अॅन्टोनिओ डि आल्काकोव्हा यांना आपल्या मुख्य सेनापतीच्या पळपुटेपणामुळें नाइलाजानें किल्ला मराठयांच्या स्वाधीन करून तेथून निघून जावें लागलें. ही ठाण्याच्या पाडावाची अशुभ वार्ता गोवें एथें गव्हर्नर-जनरलला कळतांच त्यानें आपल्या पुतण्याला ताबडतोब सेनापतिपदावरून दूर केलें व त्याच्या जागीं अॅटोनिओ कार्डिम फ्रो ह्या नव्या अनुभवी व धिम्या स्वभावाच्या सेनापतीची नेमणूक केली.¶ सोफियाला बुथेलो हा कुरूप असल्या-

¶ पारसनीस व किंकेडकृत 'हिस्टरी ऑफ दी मराठा पीपल', भाग २ रा.

मुळें आवडत नव्हताच. शिवाय त्यानें तिच्या नूतन प्रियकराला हद्दपार केल्या-मुळें ती त्याच्यावर जास्तच रुष्ट झाली होती. त्यांत आणखी ह्या नामुष्कीच्या पराजयाची भर पडली. त्यामुळे बुथेलो गोव्याला माघारा जावयाला निघाला तेव्हां सोफिया त्याच्याबरोबर तिकडे न जातां वसईतच कायम राहिली. तिचें वैभव गेलें, मान्यता गेली, सर्वत्र तिची छीः थूः झाली; तरीही ती फारशी न डग-मगतां पुन्हा आपले नशीब उदयाला येईल ह्या आशेनें आजवरच्या सर्व पतींना नागवून जें काय जडजवाहीर तिच्या गांठीला होतें त्यावर शक्य तों आपला पूर्वीचाच इतमाम कायम ठेवून अनुकूल कालाची वाट पहात होती. आपल्या वांटयाला अशी विपन्न दशा आणण्याला आल्काकोव्हा व पेड्रो डि मेलो हे दोघे कारण झाले ही गोष्ट तिनें मनांत वागविली होती, व त्या दोघांवर सूड घेण्याची संधि केव्हां प्राप्त होते अशा संधीकडे तिचे डोळे लागून राहिले होते.

इतकी विपन्न दशा प्राप्त झाली, तरी ज्या एका माणसामुळे सोफियाच्या जन्माची अशी होळी झाली होती त्या रॉबर्टसनला ती विसरली नव्हती व तिलाही तो विसरला नव्हता. दोघांचाही गुप्त पत्रव्यवहार सुरू होता व लौकरच योग्य संधि पाहून रॉबर्टसन सोफियाला मुंबईला नेऊन तिच्याशीं लग्न लावणार होता. पण दोघांची गांठ कशी पडणार हाच अवघड प्रश्न होता. रॉबर्टसनला पोर्तुगीजांच्या हद्दींत यावयाला बंदी होती, व सोफियाला वसईची हद्द सोडून बाहेर जाण्याला बंदी होती. तरी पण अशा निराशामय अंधारांतही तिला एक आशेचा किरण सांपडला. सेनापति अँटोनिओ फ्रो याला मराठयांच्या चढावाच्या धोरणामुळें सर्व काम आवरतां येईना, व तशांत डि मेलो आणि आल्काकोव्हा हे दोघे महत्त्वाकांक्षी अधिकारी सेनापति फ्रो याच्या आज्ञेंत वागेनात, तेव्हां गोव्याहून फ्रोच्या जागीं मार्टिनो डि सिल्व्हेरा याची नेमणूक झाली; त्याच वेळीं डिसोजा डि पेरिरा याला वसईचा किल्लेदार नेमण्यांत आलें. ह्या दोन नव्या तडफदार अधिकाऱ्यांच्या नेमणुकीमुळें पेड्रो डि मेलो व आल्काकोव्हा यांचे महत्त्व बरेंच कमी झालें. तशांत नवा सेनापति मार्टिनो डि सिल्व्हेरा हा सोफि-च्या पूर्वपरिचयाचा असल्यानें व सोफियाचे जे कांहीं रंगेल चहाते होते त्यांपैकीं तो एक असल्यानें वारा वाहील तशी पाठ फिरविण्यांत तरबेज असलेल्या सोफियाला स्वतःची वसईतील नजरकैदेंतून मुक्तता करून घेण्याइतकी त्याची

मर्जी संपादन करतां आली. तिचा विचार सिल्व्हेराला आणखी प्रसन्न करून घेऊन त्याच्याशीं लग्न लावण्याचाही होता. पण इतक्या थोड्या काळांत म्हणजे सुमारे चार पांच वर्षांच्या अवधींत सोफियाचे एका मागून एक चार पति कोणत्या ना कोणत्या कारणानें मृत्युमुखीं पडल्यामुळें व सोफिया ही दगलबाज स्त्री आहे असाही तिच्या नांवाचा सर्वत्र बभ्रा झाल्याकारणानें 'ती नवरे खाणारी लांम आहे व तिचा सहवास सर्वनाश करणारा आहे' असा सार्वत्रिक समज झाला होता. यामुळें ती तरुण व सुंदर असतांही कोणी तिच्याशीं लग्न करण्याला तयार होईना. तिच्याविषयींचा हा सार्वत्रिक गैरसमज लौकरच सिल्व्हेराच्या कानीं आला व सिल्व्हेरा स्वभावतःच असल्या शकुन-अपशकुनांवर भरंवसा ठेवणारा असल्यानें त्यानें सोफियाशीं लग्न करण्याचें धाडस केलें नाहीं. तात्पर्य, सिल्व्हेरापासून फक्त स्वतःची नजरकैद टाळण्यापुरताच उपयोग सोफियाला करून घेतां आला. पण त्यानें आपणांशी लग्न केले नाहीं याबद्दल तिचा सिल्व्हेरावर राग होता व त्याच्यावरही सूड घेण्याचा तिचा मानस होता.

आतां पुढें काय करावयाचें हा प्रश्न सोफियापुढें होताच. तिच्यापाशीं जी काय थोडीबहुत पुंजी होती, ती पूर्वीच्या थाटामाटानें आजवर राहण्यांत खर्च झाली होती. तिचे बहुमोल अलंकारही त्या थाटामाटापायीं सर्व संपले होते. वरें; ती अपशकुनी म्हणून तिच्याशीं कोणी लग्न करावयालाही तयार होईना व ती देशद्रोही म्हणून तिला सरकारांतूनही आश्रय मिळेना. अशा स्थितींत तिला तत्कालीन परिस्थितीला व पूर्वपरंपरेला अनुसरून एकच मार्ग मोकळा होता, तो भिक्षांदेहीचा. पण तो मार्ग अवलंबितांनाही तिनें आपले डामडौल कायम राखले होते. सुशृंगारित म्याना तिच्यापाशीं होताच व कांहीं नोकर-चाकरही होते. श्रीमंती भिक्षांदेहीच्या प्राथमिक तयारीपुरती थोडीशी पुंजीही तिच्या गांठीला होती. शिवाय थोरामोठ्यांची बायको हें नांव, तारुण्य व सौंदर्य ह्या तीन दैवी देणग्याही तिच्यापाशीं होत्या. त्या सर्व साहित्यांत तिनें आणखी एका महत्त्वाच्या साहित्याची भर घातली. देशांत लूटमार करणाऱ्या लोकांच्या एका टोळीपासून तिनें दोन तरुण व सुंदर हिंदु मुली थोड्याशा पैशांना विकत घेऊन त्यांना आपल्याबरोबर भिक्षांदेहीची दीक्षा दिली व फादर पोर्टो या नांवाच्या एका पाद्र्याच्या ओळखीनें मंडपेश्वर* ह्या त्याच्या वास्तव्यस्थानाशेजारीं कान्हेरी येथें एक टुमदार घर

* ठाणें जिल्ह्यांत बी. बी. ॲण्ड सी. आय. रेल्वेच्या बोरिवली स्टेशनापासून

विकत घेऊन तेथें वास्तव्य करून तेथून भिक्षांदेहीप्रीत्यर्थ आजूबाजूच्या भागांत संचार सुरू केला.

दरम्यान सोफियाला तिच्या इंग्रज प्रियकराचें पत्र आलें. त्यांत पुढील भावार्थाचा मजकूर होता.

"प्रिय सोफिया!

"चिमाजीअप्पा पेशव्याच्या मदतीसाठीं वसई-ठाण्याकडे कांहीं इंग्रज गोलंदाज रवाना व्हावयाचे आहेत व त्यांत मीही आहे. अर्थात आपली भेट होण्याचा हा सुयोग आहे. माझ्या महत्त्वाकांक्षा फार जबर आहेत, व तुझ्या माझ्या शत्रूंवर सूड घेणे ही त्यांतली एक महत्त्वाकांक्षा आहे पण आधीं करावें व मग सांगावें ह्या बाण्याचा मी असल्यानें तूर्त जास्त कांहीं लिहीत नाहीं. मला तुझें नवीन मकाण तुझ्या पत्रावरून माहीत झालेंच आहे. तेथें येऊन मी तुला भेटेन. गोरा वांदर इकडील अपयशानें काळे तोंड करून माघारा गोव्याला गेला हें बरें झालें. इति.

सदैव तुझा
**रॉबी.**"

---

पूर्व दिशेस सुमारें पाच मैलांवर कान्हेरी गांव असून तेथील व त्याच्या शेजारीं मंडपेश्वर येथील बौद्धांचीं कोरींवलेणीं फार प्रसिद्ध आहेत. हीं लेणीं म्हणजे प्राचीन काळच्या बौद्धांची मोठी वसाहतच होय. लेण्यांत बौद्धांना रहाण्याकरितां खोल्या, प्रार्थनामंदिरें, सभागृहें, समाधिस्थानें वगैरे सर्व सोयी केलेल्या होत्या. लेण्यांतील शिलालेखांवरून तीं इ०सनच्या दुसऱ्या शतकांत तयार झालीं असें दिसतें. हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा ऱ्हास इ०सनच्या सहाव्या शतकांत झाला, तरी त्यानंतरही त्या लेण्यांत बौद्धांची वसती होती. त्यामुळेंच इ०सन १५३४ मध्यें पोर्तुगीजांनीं साष्टी बेट घेतलें तेव्हां त्यांना तेथें बौद्ध सांपडले. मुंबई बेट पोर्तुगीजांच्या ताब्यांत गेलें तेव्हां त्यांच्या मिशनरींची वक्रदृष्टि कान्हेरी-मंडपेश्वराकडे वळली. तेथील लेण्यांतून त्यांनीं ख्रिस्ती धर्माच्या प्रार्थना सुरू केल्या. हें काम करणारा मुख्य पाद्री ॲंटोनिओ पोर्टो हा होय. एका वसईप्रांतांत दोन वर्षांच्या अवधींत त्यानें हजारों लोक बाटविले. ह्या पोर्टोची आठवण फार दिवसपर्यंत लोकांना चांगली होती. त्यानें कान्हेरी–मंडपेश्वराच्या लेण्यांत जे बैरागी व साधु सांपडले त्यांना दाटवून लेण्यांत ख्रिस्ती प्रार्थना करण्यास भाग पाडलें. हें काम

सदर पत्र सोफियाला मिळाल्यावर बरेच दिवसपर्यंत तिनें आपल्या प्रियतम रॉबर्टसनची वाट पाहिली. ती रोज आपल्या इतमामासह भिक्षेला बाहेर पडे; पण सहसा वस्तीला परगांवीं रहात नसे. शिवाय रॉबर्टसन आला तर ताबडतोब खबर मिळण्यासाठीं तिनें एका विश्वासू नोकराला मुद्दाम आपल्या घरीं ठेवून दिलें होतें. सोफियाला रॉबर्टसनचें पत्र आल्यावर थोडयाच दिवसांत कसलेल्या इंग्रज गोलंदाजांची एक टोळी ठाण्याच्या वेढ्यांत मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे ह्या पेशव्यांच्या सरदारांना येऊन मिळाल्याची वार्ता सोफियाच्या कानीं आली तेव्हां तिला प्रसन्नतापूर्वक वाटलें कीं, 'आपला रॉबी त्या टोळींत खास असेल'. लगेच थोडया दिवसांनीं 'ठाण्याच्या वेढ्यांत पेड्रो डि मेलो हा एका इंग्रज गोलंदाजाच्या तोफेच्या गोळ्याला बळी पडला+व त्यामुळें पोर्तुगीज

त्यानें सरकारचें व फौजेचें पाठबळ घेऊन जबरदस्तीनें केले. ह्या भ्रष्टीकरणाला अडथळा करणारांचा अतोनात छळ करण्यांत आला. ह्या लेण्यांत मुख्य चैत्य जेथें आहे, तेथें सेंट मायकेलचें मंदिर स्थापन करण्यांत आलें. हल्ली त्या लेण्यांत ख्रिस्ती धर्माची कांहींच खूण सांपडत नाहीं. मराठ्यांनीं वसई काबीज केली तेव्हां त्या लेण्यांतील व सभोंवारच्या प्रांतांतील ख्रिस्ती धर्माचीं चिन्हें त्यांनीं पार नष्ट केलीं. मात्र ख्रिस्ती लोकांनीं भग्न केलेल्या मूर्तींचे कांहीं अवशेष तेथें अजूनही पहावयास सांपडतात, हीच ख्रिस्ती धर्माची खूण होय! फादर पोर्टो मंडपेश्वर येथें आला, तेव्हां तेथें सुमारें पन्नास योगी होते. ते एकदम भिऊन पळून गेले. नंतर त्यानें देवालयांत जाऊन त्याचें ख्रिस्ती मंदिर बनविलें. पुढें ह्याच ठिकाणीं पोर्तुगीज राजा तिसरा जॉन यानें बाटलेल्या लोकांच्या मुलांकरितां एक विद्यापीठ स्थापन केले, आणि त्याच्या खर्चासाठीं पूर्वींच्या हिंदु मंदिरांचें सर्व उत्पन्न लावून दिलें. ह्या मंदिराचें सभागृह फार मोठें म्हणजे शंभर हात लांब व तीस हात रुंद होतें. तेथें पांच ख्रिस्ती धर्मगुरु तेव्हां रहात असून त्यांना सालीना दीडशें खंडी तांदुळांची नेमणूक होती. पुढे मराठ्यांनीं हें विद्यापीठ मोडून त्याचीं लांकडें ठाण्यास नेलीं व हिंदु देवदेवतांच्या मूर्ति ख्रिस्ती लोकांनीं चुन्यानें बुजविल्या होत्या, त्या पुन्हा उघड्या करून पूर्ववत् त्यांची पूजा सुरू केली.

+ग्रँट डफनें ह्या प्रसंगीं एंटोनिओ फ्रो मारला गेला असें म्हटलें आहे. तें चुकीचें आहे. कारण इस्माइल ग्रेशिअस यानें आपल्या 'O Oriente

सैन्याची दाणादाण उडून ठाण्याचा किल्ला पूर्णपणें मराठ्यांच्या स्वाधीन झाला' अशी बातमी आली. तेव्हां सोफिया मनांत म्हणाली कीं, 'माझ्या रॉबोनेंच डि मेलोवर हा सूड घेतला असेल. खासें झालें'. पण काय असेल तें असो, रॉबर्टसन कांहीं सोफियाला भेटला नाहीं. तो आज भेटेल, उद्यां भेटेल, अशी सोफियाला पुढें कैक दिवस आशा वाटत होती; पण फुकट ! ठाण्याच्या किल्ल्यावर मराठ्यांना दुसरा विजय प्राप्त होऊन किल्ला कायमचा त्यांच्या अंमलांत आल्याला आज उणेपुरे सहा महिने लोटले होते, तरी रॉबर्टसनचा पता नव्हता. रॉबर्टसन जर जिवंत असता तर आपणांला खास भेटला असता अशी सोफियाची खात्री होती. व ज्या अर्थी तो इतक्या दिवसांत भेटला नाहीं त्या अर्थी तो त्याच वेळांत ठार झाला अशी सोफियेनें आपल्या मनाची समजूत करून घेतली होती.

सोफियाची तिच्या इंग्रज प्रियकराच्या बाबतींत निराशा झाली एवढी एक अखेरची गोष्ट सोडून दिली तर तिनें भिक्षांदेहि पत्करल्यापासून त्या धंद्यांत तिला चांगलीच किफायत होत होती. मात्र ती तिच्या अकलेची किफायत होती, केवळ धंद्यांतील किफायत होती असें नाहीं. ती भिक्षेकरीण असली तरी बडी भिक्षेकरीण होती. अर्थात् ती बड्या बड्या लोकांकडे भिक्षेला जाई. गतकालांतील थोरपणा, वर्तमानकाळांत देखील उपलब्ध असलेल्या तारुण्य व सौंदर्य या दैवी देणग्या मधुर व चित्तवेधक भाषण, हृदयस्पर्शी नेत्रकटाक्ष, नवलाईचा डामडौल, नीति-अनीतीविषयीं बेफिकिरी, मोहक रूपाच्या सौंदर्यवती तरुण मुलींचा लवाजमा, व गोरी कातडी एवढ्या सर्व अमोघ मूर्तामूर्त शक्ति सोफियाच्या ठायीं एकवटल्या गेलेल्या असल्यानें ती जेथ जेथें म्हणून भिक्षेसाठीं जाई तेथून तेथून राजशाही थाटाचा पाहुणचार घेऊन माघारी येई. ती कोठेंही भिक्षा मागे ती भिक्षा म्हणून न मागतां जणु काय खंडणी म्हणून मागे, प्रस्तुतच्या धर्मसंग्रामांत पोर्तुगीजांना यशप्राप्ति होण्यासाठीं देवा धर्माच्या नांवावर दान म्हणून मागे, किंवा तसाच कोणी रंगेल गडी भेटला तर तो तिच्यावरच फिदा होऊन तिला अलोट पैसा देत असे. खंडणी मागावयाची ती

---

Portuguese' ह्या ग्रंथांत पोर्तुगीज सरकाराकडून या बाबतींत मुंबईच्या गव्हर्नरला ता. ४।१।१७३९ रोजी लिहिलेलें पत्र दिलें आहे, त्यावरून मारला गेलेला सेनापति पेड्रो डि मेलो हाच होता याविषयीं संशय उरत नाहीं.

मरहूम गोऱ्या किल्लेदाराची पत्नी म्हणून, देणगी मागावयाची ती बाटग्या लोकांच्या सुखसोयींसाठीं, व दान मागावयाचें तें धर्मसंग्रामांत ठार झालेल्या सैनिकांच्या अनाथ-अपंग बायकापोरांना पोसण्यासाठीं. गोऱ्या कातडीचे लोक जात्यभिमानाला न धर्माभिमानाला बळी पडून तिला द्रव्यसाहाय्य करीत; काळ्या कातडींचे लोक साहेबी गोऱ्या कातडीला भिऊन तिची तुंबडी भरीत; व रंगेल लोक तिच्या आणि तिच्या बरोबरच्या भिक्षेकरी सुंदर मुलींच्या रसाळ यौवन-सौंदर्याला भाळून तिची धन करीत.

त्या सुंदर व तरुण मुली सोफियानें कोठून व कशा पैदा केल्या होत्या, हें पाहण्याची आतांच घाई करण्याचें कारण नाहीं. तूर्त सोफियाच्या जीवनवृत्तान्ताची स्थूल रूपरेखा आपणांसमोर आहे तेवढी पुरे आहे.

प्रकरण दुसरें

# अर्नाळा किल्ल्यावर

बाजीराव पेशवे व चिमाजीअप्पा यांनीं आपल्या सर्व सरदारांना अर्नाळ्या-वर* एकत्र जमवून सर्वांच्या विचारानें वसईच्या मोहिमेची पुढील निश्चित रूपरेखा आंखण्याचें ठरविलें होतें हे पूर्वी निवेदन करण्यात आलेंच आहे. त्याप्रमाणें आज म्हणजे चुळणें गांवांत अनर्थ चालला होता, त्याच दिवशीं मल्हार-

---

* अर्नाळा हा गांव वसईपासून उत्तरेला सुमारें पंधरा सोळा मैलांच्या अंतरावर आहे. येथे वैतरणी नदी समुद्राला मिळते व त्यामुळें तें पवित्र क्षेत्र गणलें आहे. सोमवती वगैरे पर्वणीच्या वेळीं पुष्कळ भाविक लोक ह्या क्षेत्रावर समुद्रस्नानासाठीं येतात. हें बंदरही आहे. गांवापासून पाऊण मैलावर समुद्रांत अर्नाळा हा जंजिरा किल्ला आहे. तो फार मजबूत आहे. मराठ्यांनीं वसईच्या मोहिमेंत इ० सन १७३७ मध्यें हा किल्ला पोर्तुगीजापासून जिंकून घेतला. त्या वेळीं तो किल्ला म्हणजे एक सामान्य गढी होती. पण लगेच बाजीरावांनीं वसईशेजारीं वसईशीं टक्कर देणारें तितकेंच मजबूत ठाणें मराठ्यांच्या हातीं असलें पाहिजे असें पाहून सध्याचा मजबूत किल्ला पुढील मोहिमेचें धोरण राखून बांधविला. याविषयीं किल्ल्याच्या दरवाज्यावर पुढीलप्रमाणें शिलालेख आहे—'बाजीराव अमात्य मुख्य सुमती आज्ञापिलें शंकरा। पाश्चात्यासि वधूनि सिंधु उदरीं बांधा त्वरें जंजिरा। अर्नाळा जलदुर्ग चिंतुनि मनीं बाजी तुळाजी सुता। शिल्पज्ञें दृढ शौर्य जाणुनि तया दुर्गासि संस्थापिता॥ अंक[9]बाण[5]रस[6]चंद्र[1] शकातें। ज्येष्ठ पिंगल सित्तेंदु दिनातें। रोहिणी ध्रुव सुपुष्यहि जेव्हां। यशवंत बुरुजा करि तेव्हां॥ हा किल्ला बांधणारा बाजी तुळाजी याचें देऊळ किल्ल्यावर आहे. शिवाय पेशव्यांच्या वेळचीं आणखी कांहीं देवळेंही आहेत. किल्ल्यांत व बंदरावर कोळी लोकांची बरीच वस्ती आहे. हे लोक मासळी मारण्याचा धंदा करितात. ह्या लोकांत ख्रिस्ती कोळी व हिंदु कोळी अशा दोन जाती आहेत; तरी त्यांच्यामधील रीतिरिवाज, आचार-विचार व पोषाक यांत फारसा फरक नाहीं. ख्रिस्ती कोळी हिंदूंप्रमाणें शेंडी राखतात, हिंदु पद्धतीचीं नांवें ठेवतात व हिंदूंचे सणही करितात. अर्थात् हे लोक पोर्तुगीज अंमलांत बाटून नांवाला ख्रिस्ती झाले आहेत.

राव होळकर, राणोजी शिंदे, मानाजी आंग्रे, गंगाजी नाईक, अंताजी रघुनाथ, खंडूजी माणकर ही प्रमुख मंडळी तेथे जमा झाली होती. विठ्ठल शिवदेव, जोशी, पटवर्धन वगैरे मंडळी ठिकठिकाणच्या बंदोबस्तासाठी गुंतून पडल्यामुळें आली नव्हती, तरी पुढील योजना तेथें जमणाऱ्या मंडळीला निश्चितपणें ठरवितां यावी म्हणून त्या मंडळीनें त्या दिवसापर्यंतचा आपणाकडील इत्थंभूत वृत्तान्त हेरां-मार्फत पेशव्यांना कळविला होता. त्यावरून सर्व परिस्थितीचा विचार करून पुढील धोरण ठरविण्यासाठीं पूर्वोक्त मंडळीची खासगी बैठक किल्ल्यावरील एका भव्य सुशोभित वाड्यांत पेशवे बंधूंचें वास्तव्य होतें त्या वाड्यांतील प्रशस्त दिवाणखान्यांत सायंकाळीं भरली होती.

त्या बैठकींत बराच वेळ सर्व साधकबाधक गोष्टींचा खल झाला; वसई काबीज करून फिरंग्यांचें तेथून कायमचें उच्चाटण करीपर्यंत मोहिमेचें कार्य पूर्ववत् अर्धवट सोडून जावयाचें नाहीं असाच बाजिरावांशिवाय इतर सर्वांचा स्पष्ट निर्धार दिसून आला; पण बाजिरावांना कांहीं तें पटेना. परंतु आपणांला हें पटत नाहीं असें स्पष्टपणें सांगण्याचीही त्यांची छाती होईना. कोणीं कोणतीही गोष्ट सुचविली तरी 'ठीक आहे', 'बरें आहे' अशा उडवाउडवीच्या उत्तरांनीं ते त्यांची बोळवण करूं लागले. त्यामुळें इतरांचा बराच कोंडमारा झाला. श्रीमंत मोकळ्या मनानें बोलत नाहींत, मग आपण तरी कसें बोलावें, ह्या विचारानें जो तो हातचें राखून बोलू लागला. त्या मंडळींत विशेष निस्पृह व पोर्तुगीज अत्याचारांत पूर्णपणे होरपळून निघालेले असे गंगाजी नाईक, अंताजीपंत कावळे व खंडूजी माणकर हे होते. त्यांना बाजिरावांची मुग्धता पाहून चीड आली. त्यांतल्या त्यांत गंगाजी नाईक हे सर्वांत वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध व भीष्माप्रमाणें शूर असून आज सतत पन्नास वर्षे पोर्तुगीजांशीं झगडत आलेले, त्या झगड्यांतच ते सर्वस्वावर पाणी सोडून देशासाठीं सर्वसंगपरित्यागी बैरागी बनलेले,+ तेव्हां

+ वसईच्या धर्मसंग्रामाचे मूळ उत्पादक गंगाजी नाईक हे होत. गंगाजी नाइकांचा वंश फार पुरातन असून त्या प्रांतीं चंदा परगण्यांत नाइकांची सत्ता होती. गंगाजी नाइकांना आणखी बुबाजी, शिवाजी, मुरारजी व नारायणजी असे धाकटे बंधु होते. नाइकांचा वंशविस्तारही तेव्हां फार मोठा असून वांद्रें, वेसावें, ठाणें, अणजूर, कळंबे वगैरे त्यांच्या मालकीच्या अनेक गांवांत वैभवसंपन्न नाइकांचे वंश नांदत होते. गंगाजी नाईक हे त्यांतील प्रमुख. पोर्तुगीजांच्या

खंडूजी माणकर, अंताजी रघुनाथ वगैरे मंडळी त्यांनाच एकीकडे म्हणाली, "बाबा, वाऱ्यावर वरात व दर्यावर हवाला या न्यायाची टोलवाटोल्वी आतां पुष्कळ झाली. श्रीमंत जे आपल्या बेताला मनमोकळेपणानें उत्तर देत नाहींत, तें त्यांच्या मनांत आहे तरी काय हें त्यांना एकदां विचारा तर खरें !"

गंगाजी नाइकाच्या मनांतही तेंच होतें. तशांत त्यांना इतर सर्व मंडळींचें साह्य मिळतांच अधिकच धीर आला. त्यांनीं 'विचारतोंच त्यांना, एकदां काय तो सोक्षमोक्ष झालेला बरा' असें म्हणून बाजिरावांना विचारलें, "श्रीमंत ! आपण स्पष्टपणें का बोलत नाहीं ? आपला बेत काय आहे तें तरी आम्हांला कळूं द्या !"

"आम्ही तुम्हां मंडळींच्या बाहेर थोडेच आहों !" बाजीराव म्हणाले. "तुम्हीं सर्वांनीं मिळून पूर्ण विचार करून काय तें ठरवा, त्यांत आम्ही आहों." गंगाजी नाइकांना बाजिरावांच्या ह्या कायम ठशाच्या उत्तराचा राग आला. ते

---

सैतानी सत्तेचा त्या प्रांतीं फैलाव होऊं लागताच प्रथम त्या सैतानांना जोराचा विरोध गंगाजी नाइकांनींच केला. पण दुर्दैवानें त्यांचा इलाज चालेनासा होऊन त्यांना पराजय व छळ सहन करावा लागला. त्या छळांत त्यांच्या कुटुंबांतील कैक पुरुष-स्त्रिया-मुलें ठार झालीं व सर्व नाईक वंश देशोधडीला लागला. त्या प्रळयांतून जी थोडी मंडळी बचावली, त्यांत गंगाजी वगैरे चौघे बंधु बचावले; ते चौघे चार दिशांना पांगले. ह्या प्रळय निवारण्यासाठीं गंगाजी नाइकांनीं थोर तपश्चर्या केली व त्यांना सिद्धिविनायकाचा साक्षात्कार होऊन आशीर्वाद मिळाला. गंगाजी नाईक सर्वसंगपरित्याग करून तपस्वी बनले होते; पण गुरूंच्या आज्ञेप्रमाणे त्यांना पुन्हा आपल्या देशाचा संसार शिरावर घ्यावा लागला; त्यांनीं आपल्या मायभूमीच्या दास्यविमोचनार्थ पुन्हा शस्त्रग्रहण केलें. त्यांना त्यांच्या बंधूंचा व अंताजीपंत कावळे, खंडूजी माणकर वगैरे इतर स्वाभिमानी वीरांचा पूर्ण पाठिंबा मिळाला. पेशव्यांना ह्या मंडळीनेंच वसईच्या मोहिमेचा उद्योग हातीं घ्यावयास लावलें व त्यांना सर्वतोपरी साह्य केलें. असा वृत्तान्त गंगाजी नाइकांच्या विद्यमान वंशजांकडून मिळतो. थोरल्या संभाजीमहाराजांच्या कारकीर्दींत गंगाजी नाइकांनीं फिरंग्यांविरुद्ध तक्रारी महाराजांपाशीं नेल्या होत्या व वसईच्या मोहिमेनंतरही कांहीं काल नाईक जिवंत होते, यावरून वसईच्या मोहिमेच्या सुमाराला नाईक पाऊणशें वर्षांच्या घरांत तरी खास असावेत.

रागाला येऊन म्हणाले. "श्रीमंत, असले कोरडे आशीर्वाद आम्हांला नको आहेत ! मी माझ्या देशाच्या, धर्माच्या व समाजाच्या चिर कल्याणासाठीं फिरंग्यांच्या अत्याचारांना विरोध करतां करतां रावणाच्या चौदा चौकड्यांच्या राज्याप्रमाणे माझी चौदा परगण्यांची अपार दौलत गमावून बसलों ! माझ्या वंशांतील शेकडों कर्तबगार पुरुषांना व बायकामुलांनाही फिरंग्यांनीं गांजून गांजून ठार केले तरीही मी नमलों नाहीं व आजवर जो अज्ञातवासांत जगलों आहे, तो आपले कोरडे आशीर्वाद ऐकण्यासाठीं काय ? मी अमळ माझी पायरी सोडून वडीलपणाच्या नात्यानें अधिक उणा शब्द बोललों तर त्याबद्दल माझ्या वयाकडे व पिकल्या केसांकडे पाहून आपण मला क्षमा केली पाहिजे; आपले आधींच सांगून ठेवतों. असले आशीर्वाद देण्याचा मान माझ्यासारख्या म्हाताऱ्या माणसांचा आहे ज्यांचे कर्तृत्व संपले व हातीं स्मरणी घेऊन 'हरि हरि' करण्याची वेळ आली, त्यांनीं असले कोरडे आशीर्वाद द्यावे; हें आपणांसारख्या तरण्याबांड व कर्तबगार राज्यकर्त्यांचें काम नव्हे. हेच पहा, छत्रपति शाहूमहाराज ह्या अवघ्या मराठी दुनियेचे धनी असतां त्यांच्यावर न विसबतां त्यांचे नुसते आशीर्वाद घेऊन आम्हीं आज इतकीं वर्षं पायपिटी करून आपल्या पायांपाशीं धांवून येत होतों ते कशासाठीं ! नुसते कोरडे आशीर्वाद घेण्यासाठीं काय ! "

" मग आम्ही काय करावें असें तुमचें म्हणणें ? "

" ही मोहीम तिचा सोक्षमोक्ष होईतों अशीच जोमानें चालू ठेवावयाची, कीं आजवर इतकीं वर्षं धरसोड चालली आहे तशीच पुढेही चालू ठेऊन वांदराच्या जखमेसारखें हें काम असेंच चिघळत ठेवावयाचें ते आम्हांला आपण सांगा."

अंताजीपंत म्हणाले, " हो ! आज वीस वर्षं ही वांदराची जखम एकसारखी चिघळतेच आहे. ज्यानें यावें त्यानें जरा डिवचून पहावें, पुन्हा येरे माझ्या मागल्या ! सध्यां आपणांला भोगावा लागतो आहे तो ह्या दिरंगाईचाच परिणाम ! "

अंताजीपंतांचा हा टोमणा पेशव्यांना झोंबण्याजोगाच होता. त्याला नाइकांनीं आणखी दुजोरा दिला. नाइकांनीच प्रथम संभाजीमहाराजांच्या कारकीर्दींत म्हणजे सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं मराठ्यांच्या राजदरबारीं फिरंग्यांच्या अत्याचारांविषयीं गाऱ्हाणीं नेलीं होतीं व तेंव्हांपासून त्यांचा तो क्रम एकसारखा सुरू होता; पण मराठी दरबारांत आजवर त्या गाऱ्हाण्यांची लागावी तशी दाद लागली नव्हती त्या गोष्टीला उद्देशून हा टोमणा आहे हे बाजीराव व चिमाजीअप्पा

ह्या दोघांनाही कळले. चिमाजीअप्पांनीं कांहीं न बोलतां फक्त एकवार बाजि-रावांकडे पाहिलें बाजीराव किंचित् रागाला येऊन म्हणाले, " मग काय नाईक! तुमचें म्हणणें, कीं तुमची फिर्याद कानीं येतांच सर्व महत्त्वाच्या राजकारणाच्या भानगडींवर पाणी सोडून आम्हीं तुमची दाद घेण्यासाठीं फिरंग्यांवर स्वारी करावयाची होती!"

नाईक म्हणाले, " श्रीमंत! माझें म्हणणें इतकेंच कीं, आपल्या मागें ज्या अनेक महत्त्वाच्या भानगडी होत्या, त्यांतलीच ही एक होती व ती तशी आपण मानली पाहिजे होती."

" जो तो आपल्या पुरतें पहातो. अंताजीबावा! नाईक! तुम्ही जर आमच्या जागीं पेशवे असतां, तर आमच्या अडचणी तुमच्या ध्यानीं आल्या असत्या. घर बांधून पहावें व लग्न करून पहावें असें व्यवहारांत मुरलेले लोक सांगतात, त्याप्रमाणेंच आम्हीही म्हणतों कीं, राज्य करून पहावें, म्हणजे राज्यकर्त्यांच्या अडीअडचणी कळतील. इतरांना त्यांची कल्पना येणें शक्य नाहीं. आज सातारा तर उद्यां कर्नाटक तर परवां दिल्ली, असा एकसारखा धांवपळीचा संचार करतांना भरारीचे पक्षीदेखील भिरभिरी येऊन दमतील, तिथें ह्या मराठशाहीचा जगड्-व्याळ पसारा आवरतांना आमची काय त्रेधा उडत असेल ती आमची आम्हांला माहीत!"

अंताजीपंत म्हणाले, " गोष्ट खरी आहे; पण आम्हीदेखील–मी काय किंवा नाईक काय—आपल्या पायांपर्यंत गाऱ्हाणीं आणलीं, तीं केवळ आमचीं एकेका व्यक्तीचीं गाऱ्हाणीं होतीं असें नाहीं; साऱ्या अष्टागराची दैना फिरंग्यांनीं मांडली, देश बुडाला, धर्म बुडाला, गो ब्राह्मणांचा व दीन-दुबळ्यांचा त्राता कोणी उरला नाहीं, म्हणूनच आम्ही आपल्या पायांपर्यंत आलों; 'ही पेशवाई आहे कीं झोटिंगपादशाही आहे' असे आपल्या कारभाराला कमीपणा आणणारे उद्गार काढण्याइतका लोक गांजला, यापेक्षां मोगलाई बरी असें म्हणूं लागला, मराठ-शाहीचा व पेशवाई अंमलाचा बूज कोंकणपट्टींतून कायमचा उडतो कीं काय असें भय आम्हांला उत्पन्न झाले, म्हणून आम्हांला तरी इतकी यातायात करावी लागली. जी गत माझी, तीच नाइकांजीही! उलट मी तर म्हणतों, नाइकांसारखे चौदा परगण्यांचे धनकुबेर जेथें फिरंग्यांच्या अमानुष अत्याचारांत धुळीला मिळून रस्त्यावरचे भणंगभिकारी बनले, तिथें आमच्यासारख्यांचा काय पाड! इतकेंही

करून श्रीमंत! आम्हांला केवळ आमच्यापुरतेंच पहावयाचें असतें तर इतकी यातायात करून वर आणखी आप्तजनांचा छळ, स्वतःचा छळ व दौलतीचें वाटोळें करून घेण्याचें कांहीं कारण नव्हतें. 'गप्प बसावयाला काय ध्याल' या न्यायानें गोगलगाईसारख्या गरीबपणानें आमच्याशीं गोडीगुलाबीनें वागावयाला फिरंगी एका पायावर तयार होता—"

नाईक मध्येंच म्हणाले, "तें सारें मागचें मागें जाऊं द्या. आतां पुढचें पहा."

"तेंच तर आपण पहातों आहों. नाईक! अंताजीबाबा! तुमच्या बोलण्याचा रोंख एकंदरींत असा दिसतो कीं, आम्ही वसईच्या मोहिमेकडे मुद्दाम दुर्लक्ष करीत आहों—"

"तसें नाहीं. श्रीमंत! तसे आमचें म्हणणें नाहीं." अंताजीपंत म्हणाले.

"नाहीं कसें? हें पहा, तुम्ही इथें भीडमुर्वतीचा आड पडदा ठेवून बोलण्याचें कारण नाहीं. तुमचा आमच्यावर असा आरोप आहे हें आम्ही जाणतों. सर्व तक्रारी आमच्या कानीं आल्या आहेत. अप्पा मध्यंतरीं मोहीम अर्धवट सोडून गेले त्यामुळे तुम्हां सर्व मंडळींचा हिरमोड झाला खरा."

"होय, हिरमोड झाला खरा." नाईक म्हणाले. "धाकट्या श्रीमंतांनीं त्या वेळीं जावयाला नको होतें असें अजूनही माझें मत आहे."

चिमाजीअप्पा इतका वेळ स्तब्ध होते ते म्हणाले, "नाईक! आम्ही बेफिकिरीनें मोहीम अर्धवट सोडून गेलों असे तुम्हाला वाटत असेल, तर तसें नाहीं बरें! उत्तरेकडे बादशाही पक्षानें आम्हांला कसें पेंचांत आणलें होते, निजाम सर्व मराठशाहीला गट्ट करण्यासाठीं कसा 'आ' वासून बसला होता, हें तुम्हांला आम्हीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. श्रीगजाननाच्या कृपेनें व तुम्हां सर्वांच्या पुण्याईनें तो प्रसंग यथायोग्य निभावला म्हणून निभावला.* भोपाळच्या युद्धांत जर दुर्दैवाने आमचा पराजय झाला असता, तर तिथेंच मराठी साम्राज्याचा मृत्युलेख लिहिला गेला असता व औरंगजेब बादशहाच्या अमदानींतही हिंदवीची दैना झाली नाहीं एवढी दैना आज झाली असती. त्या प्रसंगापुढें मूठभर फिरंग्यांनीं ह्या टीचभर प्रांतांत चालविलेल्या दैनेची काय मातब्बरी!"

* 'पेशवाईंतील उत्तरदिग्विजय' ह्या पुढील कादंबरींत हा सविस्तर वृत्तान्त यावयाचा आहे.

" मूठभर फिरंगी आणि टीचभर प्रांत ! " गंगाजी नाईक किंचित् हंसून म्हणाले. " पण धाकटे श्रीमंत ! मूठभर वटबीजांतील एकेका कणांत किती जगड्व्याळ वटवृक्ष दडले असतात ! आणि तीन पाउलें—फक्त तीन पाउलें धरणी बळीराजापाशीं दान मागणारा वामन तिसऱ्याच पावलाला बळीराजाला कसा सप्तपाताळांत लोटतो ! देव-दानवांची तुलना करणें बरोबर नाहीं; वामन तो वामन व फिरंगडे ते फिरंगडे. पण मनांतला दावा साधण्यासाठीं फळांतल्या आळीचें रूप विषारी तक्षकानें कसें घेतलें होतें हें आपणाला पुराणांतरीं ऐकून माहीत असेलच. हे टोपडे मूठभरसे तुम्हांला वाटतात व तें खरेंही आहे; पण आपण ह्या टीचभर प्रांतांतील रहिवासी असतां, म्हणजे तुम्हांला त्या मूठभर लोकांचा प्रभाव कळून आला असता."

बाजीराव मुद्दाम त्या गोष्टीला बगल देण्याच्या इराद्यानें म्हणाले, " बरोबर आहे; पण अप्पा मोहीम अर्धवट सोडून गेले ते तरी तुमच्यासारख्या पराक्रमी पाठीराख्यांच्या जिवावरच ना ? आणि तुम्हींही त्याचा तो विश्वास यथार्थ करून दाखविला. आजवर ह्या मोहिमेंत जे यश संपादन झालें, तें सारें तुमच्या प्रतापाचें फळ होय, आणि पुढेंही तुम्हीच ह्या मोहिमेचा समर्थपणें शेवट लावाल असा आम्हांला पूर्ण भरंवसा आहे."

" एकूण आपण आतांदेखील ह्या मोहिमेंतून अंग काढून घेणार असें दिसतें." नाईक म्हणाले.

" असा अर्थ नाहीं. पण हें पहा, आमच्या उत्तरदिग्विजयाची सांगता होण्यापूर्वींच तिकडे नादीरखानाच्या स्वारीचें महाअरिष्ट ओढवलें आहे.* दिल्लीचें बादशाही तख्त त्या इराणी रावणानें बळजबरीनें आपल्या मांडीखालीं घातलें आहे. या वेळीं सारी दक्षिण एक होऊन त्या अरेरावाला हिंदुस्थानांतून हुसकून लावूं म्हणेल तरच कांहीं तरणोपाय आहे. बादशाही सत्ता कालपर्यंत आमच्याशीं टक्करा देऊन इतकी दुबळी झाली आहे कीं, नादीरशहाच काय, दुसरा एखादा सामान्य धाडसी दरोडेखोर दिल्लीवर चालून गेला असता तर त्याला देखील ती सत्ता विरोध

* नादीरशहाची हिंदुस्थानावर फेब्रुवारी १७३९ मध्यें स्वारी झाली. बाजीराव व चिमाजीअप्पा हे त्यापूर्वींच भोपाळच्या वेढ्यांत निजामाचा पाडाव करून उत्तरदिग्विजय संपादून जानेवारी १७३९मध्यें माघारे आले होते.

करण्याला असमर्थ ठरली असती. दिल्लीचे बादशाही तरुण आज आम्हां मराठ्यां-च्या कावृत असून आमचा हिंदुपदपादशहा उद्यां त्या तख्तावर आरूढ व्हावयाचा आहे. बादशहा हें एक तख्तनशीन बोलतें चालते बाहुले आहे. पण अजून कांहीं काळ आम्हांला तो बादशाही सत्तेचा डोलारा तसाच राखला पाहिजे बरें आणखी भय असें कीं, नादीरशहा मुसलमान व बादशहाही मुसलमान! दोघांनीं मिळून संगनमत करून हिंदुपदपादशाहीचा उद्योग समूळ हाणून पाडण्याचें मनांत आणल्यास त्यांचे काय घ्या? यास्तव आम्हांला नादीरशहाच्या पारिपत्यासाठीं तांतडीने उत्तर केलें पाहिजे. ही वसईची मोहीम आतां पूर्णपणें आपल्या आटोक्यांत आली आहे आतां फिरंग्यांनीं वसईचा बळकट किल्ल्याचा आश्रय केल्यामुळे त्यांना तेथून हुसकून लावणे बरेंच अवघड आहे खरें; पण त्यासाठीं इथें आपल्या साऱ्या सैन्यानें किती दिवस अडकून पडावयाचें? पावसाळा तर डोक्यावर आला आहे. असुक दिवसांत किल्ला सर होईल अशी कांहींच खात्री नाहीं बरें; आपा, मल्हारराव, राणोजीबाबा, ही मुरब्बी मंडळी इकडे फार दिवस अडकून पडण्यावर आमचा दिल्लीकडील उद्योगही अपुरा पडणार. धड हेंही नाहीं व तेंही नाहीं. त्यापेक्षां आम्ही म्हणतो, येथला उद्योग तूर्त आहे ह्याच स्थितींत मुक्त ठेवून आपण प्रथम सर्व लक्ष दिल्लीकडील उद्योगांत घालावें."

"—आणि इकडे आजवर रगारूपाला आणलेल्या उद्योगावर पाणी पडूं द्यावें! आजवर धोपटून अर्धमेला केलेल्या सर्पाला बिळांत आरामशीरपणे ताजातवाना होऊं द्यावें आणि तो मनांत दावा धरून दंश करील तेव्हां मुकाटपणें मरून जावें! आपलें बरोबर आहे. आपल्या डोळ्यांसमोर हिंदुपदपादशाहीचें विशाल ध्येय आहे. त्या ध्येयाच्या वाढत्या यशानें आपली दृष्टि दिपून गेली आहे. इकडे फिरंग्यानें आम्हां अष्टागरच्या लोकांचा फडशा केला व सारें अष्टागर ख्रिस्तमय बनवून सोडलें तर त्याचें आपणांला काय होय? हत्तीच्या पायाखालीं मुंगी चिरडली तर त्यामुळें हत्तीला इजा थोडीच होणार आहे! श्रीमंत! हेंच आपलें गोब्राह्मणप्रतिपालन—हीच आपली स्वदेशनिष्ठा—हाच आपला हिंदु-धर्माभिमान—हीच आपली कोटमाप हिंदु रयतेविषयींची कळकळ काय? छत्रपतीं-ची मराठशाही व पेशव्यांची पेशवाई यांत औचित्याच्या दृष्टीनें कांहींच अंतर नाहीं असें समजून अलम हिंदु दुनिया आजवर आपल्या पेशवाईच्या झेंड्याखालीं जमा होऊन मरणमोलानें शत्रूशीं झगडत आली त्याचें हेंच फळ काय? तसें

असलें तर आम्ही म्हणतों, 'ही पेशवाई आम्हांला काय होय ! फिरंगी अष्टागरांत अनर्थ मांडतात ना ? मांडीनात; अष्टागरांतील लोकांचें जीवित-वित्त-कलत्र समूळ नाश पावलें तर पावेना; कुठचे कोण फिरंगी टोपीवाले कोंकणपट्टीत बळी मातून बसले आहेत ना ! बसेनात, आम्हांला काय त्याचे !' असें आपणच म्हणू लागलों, तर मग आम्हांलाही म्हणणें प्राप्त आहे कीं, पेशवाईसत्ता कमजोर झाली, पेशव्यांचा हिंदुपदपादशाहीचा उद्योग बुडाला, तर आम्हांला काय त्याचें ! सोय जाणे तो सोयरा !" नाईक संतापून म्हणाले.

गंगाजी नाइकांचा तो रुद्रावतार पाहून त्या बैठकींतील सारे लोक चपापून एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. नाइकांना तेव्हां शिकस्तीचा आवेश चढला होता. संतापातिशयानें त्यांचें सर्वांग थर थर कांपत होतें. डोळे तप्त खदिरांगाराप्रमाणें लाल झाले होते. त्यांचें सडेतोड बोलणें सर्वांनाच पटण्याजोगें होतें; पण त्यांतल्या त्यांत अंताजीपंत व खंडूजी माणकर यांना तें विशेष पटल्यासारखें त्यांच्या उत्तेजित चर्येवरून स्पष्ट दिसून आलें.

अंताजीपंत म्हणाले, " श्रीमंत ! माझ्या मनांत एक शंका डांचते आहे, ती बोलून दाखवूं का ? "

" बोला, खुशाल बोला. आम्हांला त्याचा राग नाहीं. आम्ही माणसांचीं अंतःकरणें ओळखून वागतों. धन्वंतरीसारख्या वैद्यानें दिलेलें औषध कडू जहर असलें तरी आपल्या अंगच्या गुणांनीं तें अमृताप्रमाणें मधुर ठरतें. सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं हा जगाचा न्याय असला तरी सत्ता म्हणजे शहाणपण नव्हे हें आम्ही जाणतों. ज्ञानाच्या, अनुभवाच्या व शहाणपणाच्या चार हितकर गोष्टी सांगून आम्हांला कर्तव्यतत्पर करणें हें तुमच्यासारख्या-नाइकांसारख्या वडील माणसांचें कामच आहे." बाजीराव शांतपणानें उद्गारले.

" आपल्या ह्या कळकळीच्या उद्गारांनीं माझी शंका बहुतेक फिटली." अंताजीपंत म्हणाले. धडाडलेल्या वडवानलावर पर्जन्यवृष्टि होऊन तो वडवानल विझून जावा तशी अंताजीबाबांच्या संतापाची अवस्था झाली. ते क्षणभर थांबून पुष्कळच शांतपणानें म्हणाले, " श्रीमंत ! हीच आपली थोरवी व हेंच आपलें वैशिष्ट्य. सत्ता म्हणजे शहाणपण नव्हे हें जितकें खरें, तितकेंच हेंही खरें कीं, शहाणपण वयावर नसतें. हाच अलौकिक गुण धाकट्या श्रीमंतांच्याही अंगीं आहे, म्हणूनच ही मोहीम आजवर यशस्वी झाली. आमचें शहाणपण झालें तरी

आपणांसारख्या खाशांच्या हुकुमाची ताबेदारी कसोशीनें करण्याइतकेंच. रावणाची लंका वानरसेनेनें जाळली खरी; पण दाशरथी रामाची ती वानरसेना होती म्हणून !"

" हा न्याय खासा ! आधीं लेंकराचे कान उपटा व मग त्याच्या तोंडावरून प्रेमानें हात फिरवा !" बाजीराव स्मितहास्यपूर्वक उद्गारले. " बरें, पण अंताजीबाबा ! तुमची शंका तुम्हीं बोलून दाखविली नाहीं."

" श्रीमंत ! माझी शंका फिटली म्हणालों ना ?"

" नाहीं. तसे नाहीं. ती तुम्हीं बोलून स्पष्ट केली पाहिजे. शंकेचें बीज अमरवेलीपेक्षांही अमर असतें. तिचें साकसुरत निरसन झालेले बरें." चिमाजीअप्पा म्हणाले. कांहीं क्षणांपूर्वी नाइकांच्या कठोर उद्गारांवरून बैठक मोडून मोहिमेचा सर्व मामला बिघडतो कीं काय असे भय त्यांना वाटत होतें. त्यांना भय वाटण्याचें कारण त्यांनींच प्रथमपासून त्या मोहिमेत पुढाकार घेतला होता. अंताजीपंत वगैरे मंडळीच्या आग्रहाची सत्यता त्यांच्या मनाला पूर्णपणें पटली होती. अंताजीपंत व गंगाजी नाईक हे त्यांचे डावे उजवे हातसे त्या मोहिमेंत आरंभापासून वावरत असल्यानें त्या दोघांच्या मर्जीची त्यांना विशेष पर्वा वाटत होती. त्या दोघांच्या मनांत कोणताही किंतु राहिल्यास तो आपणांला मोहिमेच्या अखेरीपावेतों जाचेल, हें ओळखूनच त्यांनीं अंताजीपंतांना आपली शंका बोलून दाखविण्याचा आग्रह केला.

अंताजीपंत म्हणाले, " नाईक ! तुम्हींच बोला."

अखेर नाइकांना बोलणे भागच पडलें. ते म्हणाले, " उभयतां श्रीमंतांचा आग्रहच आहे म्हणून बोलतों, कांहीं कांहीं लोकांनीं जातिमत्सराची भुतावळ उठवून ह्या मोहिमेच्या कार्याला अडथळे उत्पन्न करण्याचा लांडा कारभार आरंभिला आहे."

" सोडून द्या तो विषय नाईक ! हत्ती आपल्या वाटेनें चालला की गल्ली बोळांतील कुत्रीं त्याच्यावर भुंकूं लागतात, हा त्यांचा स्वभावगुणच आहे. तिकडे आपण लक्ष्य कशाला द्या ?" खंडूजी माणकर म्हणाला.

" छे छे ! हा सोडून देण्यासारखा विषय नाहीं. भुंकणें हा कुत्र्यांचा स्वभावधर्म असला तरी तीं पिसाळून ज्याचे त्याचे चावे घेऊं लागलीं तर त्यांचा योग्य

बंदोबस्त झालाच पाहिजे. नाईक ! असे कोण कोण विघ्नसंतोषी लोक काय काय लांडेकारभार करतात तें स्पष्टपणें सांगा." बाजीराव म्हणाले.

" श्रीमंत ! मी नांवें कोणाचीं कशीं घेऊं ? आम्हांला ह्या मायभूमींत रहावयाचें आहे, तोंवर जळांत राहून माशांशीं वैर मांडून आमचा पल्ला यावयाचा नाहीं. मी एवढेंच सांगू शकतों कीं, आम्हीं आरंभिलेल्या देशोद्धाराच्या व धर्मोद्धाराच्या कार्याला कोंपरखऱ्या मारण्याचा उद्योग सध्यां आपल्यांतीलच मंडळीकडून सुरू आहे. जुनीं भांडणें व मानापमान उकरून काढून आज भांडत बसणें बरोबर नाहीं हे तर खरें ना ? "

" अगदीं खरें." बाजीराव म्हणाले.

" पण अशा अनिष्ट गोष्टी आज सर्रास सुरू आहेत व त्यांविषयीं तक्रारी केल्या तरी कोणी दाद घ्यावयाला तयार नाहीं. फार काय, रामानंद स्वामींनीं निरपेक्षपणें अलीकडे शुद्धिसंघटणाचा व लोकजागृतीचा उद्योग आस्थापूर्वक व झपाट्यानें चालविला आहे, त्यांनाही ह्या विघ्नसंतोषी लोकांनीं पाण्यांत पहावें ? " नाईक म्हणाले.

" आजवर ह्या गोष्टी आमच्या कानांवर मुळींच आल्या नाहींत. आल्या असत्या तर आम्हीं ताबडतोब जरूर तो बंदोबस्त केला असता. हेंच पहाना, रामानंद स्वामींना आम्हीं अजून पाहिलेले नाहीं किंवा ते कोणाच्या प्रत्यक्ष माहितीचेही नाहींत. पण त्यांची कीर्ति ऐकून त्यांचे कार्य सुकर होईल अशी खबरदारी घ्यावयाला आम्ही कमी करीत आहों का ? रामानंदांच्या साह्यानें आपल्या गांवांत शुद्धिसंघटणाची चळवळ करण्याला प्रोत्साहन आम्हींच दिलें." चिमाजीअप्पा म्हणाले.

" गोष्ट अगदीं खरी; व आम्हीं आजवर ह्या तक्रारी आपणांसमोर आणल्या नाहींत हेंही खरें. याचें कारण असें कीं, असल्या सामान्य गोष्टींत देखील श्रीमंतांना त्रास देणें आमच्या जिवावर येतें. श्रीमंतांच्या मागें थोडे का उद्योग आहेत ! " अंताजीबाबा म्हणाले.

" पण ह्या गोष्टी सामान्य नाहींत. विस्तवाची ठिणगी कितीही बारीक असली तरी ती कोरड्या गवतावर पडली कीं वणवा पेटवितें." चिमाजीअप्पा म्हणाले.

" नाइकांनीं सांगितल्या ह्या गोष्टी विस्तवाच्या ठिणगीसारख्याच आहेत. अत्यंत बेजबाबदार व मत्सरग्रस्त माणसाखेरीज इतरांच्या हातून असला आगलावेपणा होणें शक्य नाहीं." बाजीराव म्हणाले.

चिमाजीअप्पा म्हणाले, " असेंच केवळ नाहीं. फाजील धर्मभोळेपणादेखील अशा गोष्टी माणसाच्या हातून घडवूं शकतो. त्यांतून मत्सरी स्वभावाला धर्म-भोळेपणाची जोड मिळाली कीं मग ठिणगीचा वणवा पेटावयाला उशीर लागत नाहीं. नाईक ! बाबा ! तुमच्या बोलण्याचा रोंख साधारणपणें आमच्या ध्यानीं आला. रामाजीपंतांवर तुमचा बोल असावा."

" होय, आतां ह्या थराला गोष्टी आल्या तेव्हां स्पष्टच बोलावयाला काय हरकत आहे ! रामाजीपंतांवर तर आमचा बोल आहेच; पण आम्हांला प्रत्यक्ष असे रामाजीपंतांपेक्षां त्यांचे हस्तकच जास्त नडतात. विशेषतः ह्या प्रांतांत सनातन धर्ममार्तंड म्हणून प्रसिद्ध असलेले विद्वन्मुकुटमणि धोंडशास्त्री व निर्मळचे इनामदार भय्याशास्त्री ह्या सासरे-जावयांचा आडमुठा धर्माभिमान आम्हांला फार नडतो. हे दोन्ही लोक आम्हीं चालविलेल्या शुद्धिसंघटणाच्या चळवळीला शक्य त्या भल्याबुऱ्या उपायांनीं विरोध करावयाला नेहमीं तत्पर असतात. एक पडले जाडे विद्वान् व दुसरे पडले जाडे धनवान; त्यांना विद्वत्ता व धन ह्या जोडगोळीनें आमचे प्रयत्न हाणून पाडण्याला चांगलें फावतें. बरें, दोघेही रामाजीपंतांचे जिवलग स्नेही असल्यानें रामाजीपंतांचें कृपाछत्र त्यांच्या मस्तकीं सदा ढळत असतें. आम्हीं रामाजीपंताकडे तक्रारी कराव्या व त्यांनीं त्या एका कानानें ऐकून दुसऱ्या कानानें सोडून द्याव्या, असा प्रकार चालला आहे." अंताजीपंत म्हणाले.

" असें असेल तर याचा बंदोबस्त ताबडतोब झाला पाहिजे." बाजीराव चिमाजीअप्पांकडे वळून म्हणाले. " अप्पा ! ताबडतोब रामाजीपंतांना ताकीद पोंचती करा, कीं तुम्हीं धर्मसंबंधीं कामांत मुळींच लुडबुड करतां कामा नये. रामानंदांच्या चळवळीला अडथळा आणतां कामा नये. जे कोणी शुद्धिसंघटणा-च्या चळवळीविरुद्ध हस्तें किंवा परहस्तें खटपट करतील, ते मग ब्राह्मण असोत, किंवा कोणीही असोत; त्यांना कडक शासन करा असेंही त्यांना लिहा." लगेच ते मंडळीकडे वळून म्हणाले, " आणि तुम्हांलाही आमची अशी परवानगी

आहे कीं, अशा धर्मकार्याला विरोध करणारा कोणीही आढळला तरी त्याला तेथल्या तेथें याद राही असें शासन करीत जा."

खंडूजी माणकर हात जोडून म्हणाला, " सरकार ! ब्राह्मणांना आम्हीं शासन कसें करावें ? "

" याचा अर्थ काय ? न्यायाच्या दरबारांत ब्राह्मण-अब्राह्मण हा भेद नाहीं. अपराधी मग तो ब्राह्मण असो किंवा कोणीही असो—अपराधीच ! तुम्हांला त्याचें काय ? सरकारची सेवा करतांना जात, वय, नातें असल्या गोष्टींचा मुळींच विचार करावयाचा नसतो. बरें, तुम्हीं जें आतां निर्मळच्या भय्याशास्त्री इनामदाराचें नांव घेतलें, हा कोठला कोण ? याला इनामदार कोणीं केले ? " बाजीरावांनीं विचारलें, " निर्मळचे मार्तंडशास्त्री ? "

" होय. त्यांचेच हे दत्तक चिरंजीव. तुर्के पांच वर्षांपूर्वी मार्तंडशास्त्री वारले. वारण्यापूर्वी चार दिवस त्यांनीं आपल्या घरचा पुजारी दत्तक घेतला, तेच हे भय्याशास्त्री." अंताजीबाबा उत्तरले.

खंडूजी माणकर म्हणाला, " सरकार ! लोक असेंही बोलतात कीं, हे भय्याशास्त्री व धोंडशास्त्री हे दोघेही फिरंग्यांचे हस्तक आहेत. त्या दोघांचेंही परोळ, मंडपेश्वर, वसई वगैरे ठिकाणच्या पाद्र्याकडे व वसईच्या मोठमोठ्या फिरंगी अधिकाऱ्यांकडे वारंवार जाणें येणे असते. निर्मळचा पाद्री तर भय्यासाहेबांचा जिवलग दोस्त आहे. फिरंग्यांचे जासूद वारंवार त्यांना येऊन भेटतात, कोठें शुद्धि व्हावयाची असल्यास त्यांना खबर देतात—व ते दोघे अथवा त्यांपैकीं कोणी तरी एकजण त्या शुद्धिस्थानीं जाऊन बखेडे उत्पन्न करतात. "

" ते शत्रूचे हेर आहेत अशी तुमची खात्री आहे ? " बाजिरावांनीं लगेच अंताजीबाबा व नाईक यांच्याकडे वळून विचारले. " आणि तुमचें देखील असेंच मत आहे ? "

" होय. पण ते पडले रामाजीपंतांसारख्या थोर अधिकाऱ्यांचे जीवश्चकण्ठश्च स्नेही. त्यांना नांवें कोणीं ठेवावीं ? " अंताजीपंत म्हणाले.

" ठीक आहे. त्या दोघांनीं पुन्हा असा गुन्हा केला कीं त्यांना पकडून आमच्यासमोर किंवा अप्पांसमोर हजर करा.–बरें; आपला मोहिमेचा विषय अपुराच राहिला ! "

" आतां धाकट्या श्रीमंतांनीं काय तें सांगावें. " अंताजीपंत म्हणाले.

" हो, आतां आई वज्रेश्वरी* धाकटया श्रीमंतांना काय मति देईल ती खरी. कारण धाकटया श्रीमंतांनीं प्रथम त्या देवीला नमन करूनच मोहिमेच्या क्षेत्रांत पाऊल टाकलें आहे; तिच्या अंगीं आम्हां सर्वांचें प्रिय करण्याचें सामर्थ्य आहे. धाकटे श्रीमंतच ह्या मोहिमेंत आमचे प्रारंभापासूनचे पुढारी आहेत. आज दोन तीन वर्षें ते इकडील सर्व स्थिति प्रत्यक्ष अवलोकन करीत आहेतच." नाईक म्हणाले.

" ठीक आहे. अप्पा ! तुम्ही सांगाल ती गोष्ट सर्वांना कबूल तशी आम्हांलाही कबूल. सांगा, पुढें मोहिमेचें काय करावयाचें ! वसईचा किल्ला कबजांत येईतों इथेंच कुचमून बसावयाचें कीं उत्तर दिग्विजयाची सांगता अगोदर करावयाची ? " बाजिरावांनीं चिमाजीअप्पांना प्रश्न केला.

चिमाजीअप्पा उत्तरले, " तुम्ही तर अगोदर तांतडी करून उत्तर हिंदुस्थानांत जावयाला निघाच."

" आम्हांला तर गेलेंच पाहिजे. त्यावांचून सुटका नाहीं. पण तुम्ही, मल्हारराव, राणोजीबाबा, ही विश्वासांतील मंडळी पाठीशीं नसल्यावर आम्ही एकटे तिकडे

---

* ठाणें जिल्ह्यांत भिवंडीपासून उत्तरेला सुमारें बारा मैलांवर तानसा नदीच्या कांठीं वडवली या नांवाचें खेडें आहे. तेथेंच थोड्या अंतरावर टेंकडीच्या उतारावर वज्रेश्वरी या नांवाचें रम्य देवस्थान आहे. त्या देवीच्या हातीं वज्र आहे म्हणून वज्रेश्वरी हे नांव तिला प्राप्त झालें असावें. जवळच अनेक उन्हाळीं आहेत व लहानमोठीं आणखी बरींचशीं देवळेंही आहेत. त्यांना वज्राबाईचीं उन्हाळीं असेंच म्हणतात. तेथून थोडया अंतरावर एक भस्माचा डोंगर आहे. यावरून तेथें पूर्वीं ज्वालामुखी डोंगर असावा. चिमाजीअप्पा उत्तरेकडून वसईच्या मोहिमेवर यावयाला निघाले तेव्हां मार्गांत त्यांची वज्रेश्वरीला छावणी पडली. मोहिमेंत यश मिळण्याविषयीं त्यांनीं वज्रेश्वरीला नवस केला. पुढें मोहीम यशस्वी झाल्यावर त्यांनीं वज्रेश्वरीचें सध्यांचें भव्य मंदिर बांधलें. तें देवस्थान एका गोसावी पंथाच्या इनामदाराच्या ताब्यांत आहे. सालीना सध्यां सुमारें बाराशे रुपयांची नेमणूक देवस्थानाला आहे. नाईक वगैरे त्या प्रांतींच्या पुरातन वतनदारांकडून देवीला लहान-मोठया नेमणुका सुरू आहेत. चैत्र महिन्यांत अमावास्येला येथें मोठी यात्रा भरते.

जाऊन काय करणार ? प्रतिनिधी, फत्तेसिंगबाबा भोसले वगैरे मंडळी आमच्याशीं मनमोकळेपणानें वागणार नाहींत; दाभाडे, गायकवाड तर सेनापति त्रिंबकराव दाभाडयांच्या मृत्यूपासून आम्हांला उघड उघड पाण्यांत पाहूं लागले आहेत; अशी एकंदरींत दैना आहे."× बाजीराव म्हणाले.

"ते सारें खरें; पण इतकी रंगाला आलेली मोहीम आतां एकाएकीं मध्येंच अर्धवट सोडणे कसें शोभेल ? आज जीं कामें नखानें होतील, त्याच कामांना उद्यां कुऱ्हाडी लागतील. रोज कानीं येणाऱ्या शत्रूकडील बातम्यांवरून शत्रु आतां फार दिवस टिकाव धरील असें आम्हांला वाटत नाहीं. आम्हांला तर अशी जबरदस्त आशा आहे कीं, आमच्या शब्दाला मान देऊन शत्रूला आमच्याशीं तह करणे भागच पडेल. तह झाला व रक्तपात न होतां वसईचा किल्ला शत्रूने खालीं करून दिला तर सोन्याहून पिवळें झालें. मग किल्ल्याची व्यवस्था लावून आम्ही सारेजण आपल्या मागोमाग उत्तरेकडे येऊं." चिमाजीअप्पा उद्गारले.

"पण तह झाला नाहीं तर ? " बाजिरावांनीं सर्व मंडळीकडे वळून तोच प्रश्न पुन्हा केला, "सांगा; तह झाला नाहीं तर ? "

"तह होईल; नव्याण्णव हिश्शांनीं तह होईल. फिरंग्यांनीं आज सूर्यास्तापर्यंतची मुदत मागून घेतलेली आहे. तोंपर्यंत नारायणराव व बुवाजी ही मंडळी फिरंगी तहाला राजी असल्याची शुभवार्ता घेऊन येतील असें आमची मनोदेवता आम्हांला स्पष्ट सांगत आहे" चिमाजीअप्पा म्हणाले.

बाजीराव यावर उद्गारले, "आतांपर्यंतची वेळ गेली तशीच सूर्यास्तापर्यंतची वेळ जाईल व अखेर ह्या चालढकलींतून आम्ही म्हणतों तोच निष्कर्ष बाहेर पडेल. मनुष्याने आशावादी असावें; पण अशक्यप्राय गोष्टींविषयीं आशा बाळगणें परिणामीं फारसें दूरदर्शीपणाचें ठरणार नाहीं." ते लगेच गंगाजी नाईक वगैरे इतर मंडळीकडे वळून म्हणाले, "खरें कीं खोटें ? "

---

× छत्रपतींच्या दरबारांतील फाटाफुटीचा व आपसांतील चुरशीचा वृत्तान्त या पूर्वी 'कादंबरीमय पेशवाई'मधून अनेक वेळां आला आहे. सेनापति दाभाड्यांच्या पारिपत्याचा वृत्तान्त 'पेशवाईतील दुर्जन' ह्या आठव्या कादंबरींत साकल्यें करून देण्यांत आला आहे.

बाजिरावांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ नाईक वगैरे मंडळीकडे पाहून 'खरें कीं खोटें' असें विचारतांच मल्हारराव होळकर, अंताजी रघुनाथ वगैरे मंडळीनें एकमेकांकडे सूचक दृष्टीनें पाहिलें व लगेच नाईक बाजिरावांना म्हणाले, "श्रीमंत म्हणतात तें एका अर्थी खरें; पण धाकटे श्रीमंत म्हणतात तें देखील खोटें नाहीं. अविचारानें एखाद्या गोष्टीचा निर्णय ठरवून टाकण्यापेक्षां अशा प्रसंगीं आशावादी बनणेंही वाईट नाहीं."

अंताजी रघुनाथ म्हणाले, "मलादेखील तसेंच वाटतें. धाईघाईनें एखादी अशुभ गोष्ट आपल्या हातून घडण्याचा संभव असतो, तेव्हां कालहरण करणेंच शहाणपणाचें ठरतें."

चिमाजीअप्पा पुन्हा म्हणाले, "त्यांत अशुभ तें काय आहे? आमचें मन आम्हांला स्पष्ट ग्वाही देत आहे की, फिरंगी कौलाला येणार व तह होणार."

चिमाजीअप्पांच्या तोंडून हे शब्द निघतात न निघतात तोंच दरवाजाबाहेरून कोणीतरी खड्या सुरांत उद्गारलें, "नाहीं, नाहीं. तह होत नाहीं."

प्रकरण तिसरें

# मराठमंडळाचा निर्धार

चिमाजीअप्पांच्या तोंडून हे आशावादीपणाचे उद्गार निघावयाला व बुबाजी नाईक दिवाणाखान्यांत यावयाला एकच गांठ पडली. बुबाजीनें अप्पांचे उद्गार आंत येतां येतां ऐकले व कोणीं प्रश्न विचारण्याची वाट न पहातां सर्वांना एक अशुभ वार्ता निवेदन केली. "तह होत नाहीं. तहाची आशा बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. सेनापति सिल्व्हेरा तह करण्याला मुळींच तयार नाहीं. तो पक्का दगेखोर माणूस आहे."

"पण नारायणराव कुठे आहे?" मल्हारराव होळकरांनीं विस्मयपूर्वक विचारलें. सेनापतीच्या दगेखोरपणाची वार्ता ऐकतांच त्यांना प्रथमच संशय आला कीं, सेनापतीने नारायणरावाला कांहीं दगाफटका तर केला नसेल!

मल्हाररावांची ती शंका बरोबर होती. बुबाजी त्यांच्या प्रश्नावर उत्तरला, "नारायणराव किल्ल्यावर कैदेंत आहेत व उद्ईक त्यांना बाटवून मग ठार करण्याचा सेनापतीचा दुष्टपणाचा बेत ठरलेला आहे."

एकूण इतके दिवस तुम्हांला फिरंग्यांनी किल्ल्यावर ठेवून घेतलें, तें केवळ हुलकावण्या दाखविण्यासाठींच म्हणावयाचें!" बाजीराव म्हणाले.

"असेंच केवळ नाहीं." बुबाजी म्हणाला. "आम्हांला केवळ हुलकावण्या दाखविण्याचाच त्यांचा बेत आहे असें आमच्या निदर्शनाला आलें असतें तर आम्ही केव्हांच इकडे आलों असतों; पण प्रथम आम्हांला तसें वाटलें नाहीं. उलट किल्ल्यावरील जबाबदार अधिकारी आमच्याशीं तह करण्याला उत्सुक आहेत असेंच आम्हांला प्रथम वाटलें. पण सेनापति सिल्व्हेरा किल्ल्यावर आला व आमच्यांतल्याच कांहीं घरभेद्यांशीं त्याचें कांहीं खलबत झालें, तेव्हांपासून परिस्थितीचा रंग एकदम पालटला."

"हें कसें काय झालें!" बाजिरावांनीं विचारलें.

बाजिरावांनीं विचारल्यावरून बुबाजी वसईच्या किल्ल्यावरील वृत्तान्त निवेदन करूं लागला. मी व नारायणराव बरोबरच्या मंडळीसह वसईच्या किल्ल्यावर जाऊन पोंचलों, तेव्हां किल्लेदार पेरीरा व सेनापति सिल्व्हेरा हे दोघेही तेथें नव्हते,

कोठें बाहेर गेले होते. त्यांच्या एवजीं किल्लेदाराचा मुलगा डोमिंगो ह्यानें आमचा योग्य आदरसत्कार करून आम्हांला ठेवून घेतलें. त्यानें आमच्या आगमनाचें कारण विचारून घेतले, व तहाचें बोलणें करण्यासाठीं आम्ही आलों आहों असे कळतांच त्यानें संतोष व्यक्त केला. त्यानें आपल्या आईशींही आमची ओळख करून दिली. तीही फार भली बाई दिसली. तिलाही, तहाची योजना मानवली. त्या दोघांच्या बोलण्यांत असें आलें कीं, किल्लेदारही मुकाटपणें मराठ्यांशीं तह करून रक्तपात थांबवावा अशाच मताचा आहे. मात्र सेनापति तहाला कितपत तयार होईल याविषयीं त्यांनाही शंका होतीच. तरीही त्यांनीं त्याची शक्यतों समजूत घालण्याचें कबूल केलें होतें. डोमिंगोनेच तेथला दुसरा एक त्याच्याच दर्जाचा अधिकारी आल्काकोव्हा याच्या संगनमतानें तहाच्या वाटाघाटींसाठीं मुदत मागून घेतली. आम्हांलाही परवांपावेतों आशा होती कीं, आमच्या खटपटीला यश येईल. पण परवां सेनापति किल्ल्यावर आला. त्याच्याशीं आमची पहिली भेट काल दोनप्रहरीं झाली; तेव्हांच्या त्याच्या एकंदर वर्तनावरून आमची अर्धी आशा लयाला गेली. डोमिंगो तेव्हां हजर होताच. त्यानें सेनापति निघून गेल्यावर आम्हांला पुन्हा सेनापतीशीं वाटाघाट करून त्याचें मन वळविण्याचें अभिवचन दिलें. किल्लेदार अजून बाहेरून आला नसल्यानें डोमिंगोचाही कांहींसा नाइलाज होता. त्याच दिवशीं बाटगा सरदार ॲंटोनिओ, धोंडशास्त्री व भय्याशास्त्री हे किल्ल्यावर येऊन सेनापतीला भेटले. त्यांचें सेनापतीशीं काय खलबत झालें हें जरी आम्हांला नक्की कळलें नाहीं, तरी त्यांची मुख्य फिर्याद रामानंदस्वामी व शुद्धिसंघटणाच्या चळवळीला अनुकूल असलेली त्यांच्याच मताची आणखी कांहीं मंडळी यांच्या विरुद्ध होती; पेशव्यांच्या प्रोत्साहनानें हे चळवळे फार शेफारून गेले आहेत, असा आगलावेपणा करण्यालाही त्या तिघांनीं कमी केलें नाहीं असें कळलें."

"पहा श्रीमंत! मीं जे आतांच आपणांला सांगितलें, त्याचा हा पडताळा पहा."

"असू द्या." बाजीराव बुबाजीला म्हणाले, "पुढें काय झालें!"

"पुढें काय! त्या मंडळीचीं काय खलबतें झालीं हें कांहीं आम्हांला कळलें नाहीं; पण त्याच रात्रीं आमच्या वसतिस्थानासभोंवार पहारा बसला. दुसऱ्या दिवशीं सूर्यास्तापर्यंत सेनापति आमच्याकडे मुळींच आला नाहीं. पण पहारेकऱ्यांकडून आम्हांला बातमी कळली कीं, सेनापति पेशव्यांवर व साऱ्या मराठ-

मंडळावर फारच रुष्ट झाला असून तह करण्याचा त्याचा मानस नाहीं. चुळणें गांवांत भगवानजी व भैरव नाईक ह्या बापलेकांनीं शुद्धीची चळवळ करून तेथल्या लोकांना आपल्या बाजूला ओढण्याची खटपट चालविली आहे ही बातमी त्या निघाकडन सेनापतीला मिळाल्यामुळें तो फार चिडला होता. ती बातमीच अखेर खरी झाली. सूर्यास्ताच्या सुमाराला सेनापतीने आम्हांला आपल्या वाड्यांत बोलावून घेतलें व आमची खूप निर्भर्त्सना केली. तो केवळ आमचीच निर्भर्त्सना करून थांबला नाहीं, त्यानें उभयतां श्रीमंतांना व साऱ्या मराठमंडळाला कानानीं ऐकवणार नाहीत असे अपशब्द उच्चारले, व नारायण-रावाना म्हटलें, 'दोन्ही पेशवे व त्यांचे सारे बडे बडे हस्तक मला शरण येऊन खिस्ती व्हावयाला तयार असतील तर मी त्यांना क्षमा करून त्यांच्याशीं तह करावयाला तयार आहें'. हा खाशांचा अपमान नारायणरावांना सहन झाला नाहीं. ते एकदम रागानें बेभान झाले व अरेतुरेवर येऊन सेनापतीला अद्वातद्वा बोलले! त्याबरोबर सेनापतीने चिडून नारायणरावांना तेथल्या तेथें शिक्षा ठोठावली, 'याला उद्यां बाटवून याचें मुंडण करा व किल्ल्यावर सभोंवार याची गाढवावरून धिंड काढून मग याचा शिरच्छेद करा'. त्याप्रमाणेच आम्हां मंडळीलाही बाटवून श्रीमंतांना नजराण्यादाखल नारायणरावांचें मुंडकें आमच्या हातीं देऊन आम्हांला किल्ल्याबाहेर हांकलून लावण्याचा हुकूम त्यानें सोडला. डोमिंगो, आल्काकोव्हा, ऍन्टोनिओ, फादर पोर्टो, भय्याशास्त्री, धोंडशास्त्री व किल्ल्यावरील आणखी बरीच मंडळी तिथे हजर होती. डोमिंगोनें 'किल्लेदार येईपावेतों तरी थांबा' अशी सेनापतीची समजूत घालून पाहिली; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. आमच्या देखतच ऍंटोनिओ व फादर पोर्टो यांना चुळणें येथील बंदोबस्ताला पाठविण्याचें ठरलें व भय्याशास्त्री आणि धोंडशास्त्री यांनीं निर्मळ येथील पुढें होणारा शुद्धि-समारंभ मोडण्याचें तेथेंच कबूल केलें. लगेच आम्हांला तुरुंगांत नेण्यांत आलें व स्वतंत्र अशा घाणेरड्या खोल्यांतून कोंडून ठेवण्यांत आलें आम्हांला कोणाला कोठें ठेवलें याचा एकमेकांना पत्ता नव्हता. रात्रभर मी तर उपाशीच होतों. मध्यरात्रीच्या सुमाराला कोणीतरी येऊन माझ्या खोलीचें कुलूप काढलें. त्या आवाजानें मी झोंपेंतून जागा झालो. मला प्रथम वाटलें कीं, हा नुसता भास झाला. पुन्हा वाटलें कीं, ही भुताटकी तर नसेल; म्हणून भीत भीत दरवाजापाशीं जाऊन दरवाजा लोटून पाहिला तों तो उघडा होता व एक पहारेकरी दरवाजा-

आहे ... ... . तो हळूच माझ्या कानांत म्हणाला, 'भिऊ नकोस मुकाट्यानें या तुरुंगाच्या मागील बाजूने दोन उंच भितींच्या मधून चिंचोळी वाट जाते. त्या वाटेनें जा म्हणजे बाहेरील मोठ्या दरवाजांत जाऊन पोंचशील. तेथें पहारा आहे. तेथला पहारेकरी 'परवल' असा प्रश्न तुला करील, त्याला 'जुना करार' असें उत्तर दे व हा बिल्ला त्याला दाखव म्हणजे तो तुला बाहेर सोडील'. असें म्हणून त्यानें हा बिल्ला माझ्या हातीं दिला." क्रुसावर येशू ख्रिस्ताला सर्वांगांत खिळे ठोकून जखडून ठार करण्यांत आले आहे असा ठसा वर उमटविलेला एक पितळेचा बिल्ला बाजिरावांपुढे ठेवून तुबाजी पुढे म्हणाला, "अशा मोठ्या चमत्कारानें माझी सुटका झाली, व मी आतां हा आपणाला दिसतो आहे."

"तुमची सुटका एकट्याचीच झाली, कीं तुझ्याबरोबरच्या इतर मंडळींचीही झाली?" चिमाजीअप्पांनीं प्रश्न केला.

"मला कांहीं माहीत नाहीं. तो पहारेकरी त्याविषयीं माझ्यापाशीं कांहींच बोलला नाहीं" तुबाजी उत्तरला.

"तो पहारेकरी कोण बरें असावा?"

"तें कळलें नाहीं."

"हें तर मोठेंच आश्चर्य आहे!" चिमाजीअप्पा बाजिरावाकडे वळून म्हणाले "यावरून आपणाला असें अनुमान करावयाला हरकत नाहीं, कीं आमच्या म्हणजे पर्यायानें हिंदवीच्या हितासाठीं कायावाचामनानें झटणारे कांहीं लोक किल्ल्यावर आहेत. मग ते आमच्या हेरांपैकीं असोत, किंवा नोकरी फिरंग्यांची करावयाची पण मन मराठ्यांकडे अशा हार्दिक सहानुभूतीनें वागणारे फिरंग्यांच्या नोकरांपैकीं कोणी असोत. श्रीगजाननानें त्यांना अशीच सद्‌बुद्धि व असेच सामर्थ्य द्यावे व नारायणराव आणि त्यांच्या बरोबरची इतर नोकरमंडळी यांचीही तुबाजीप्रमाणेच सुखरूपपणें सुटका व्हावी."

"सुटका! आतां कसली सुटका! आतां नारायणरावाच्या सुटकेची आशाच नको. देवानें माझा उजवा हातच तोडण्याचें ठरविलें. तेथें कोणाचा काय इलाज!—"

असे शब्द मल्हाररावांच्या मुखावाटे निघावयाला व त्यांच्या मागे बसलेले गंगाजी नाईक धाडकन् शिकावयाला एकच गांठ पडली. लगेच मल्हाररावांनीं राणोजीरावांकडे वळून पाहिलें. तोंच राणोजीराव हास्यमुद्रेनें म्हणाले, "सुभेदार!

तुम्ही नारायणरावांविषयीं मुळींच चिंता करूं नका. शिंकेचा शुभशकून सांगतो की नारायणराव सुखरूप परत येईल."

गंगाजी नाईक निग्रहपूर्वक उद्गारले, "शकून आणि अपशकून कसले पहात बसलां ! असली संकटे शकून पाहून निवारण होत नसतात, तीं निवारण करण्याला सूडाबद्दल प्रतिसूड घेण्याची शपथ वाहून मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें प्रयत्न-वादी बनावें लागतें. दैवावर हवाला ठेवणारे रड्ये, त्यांच्या हातून पराक्रम होणे शक्य नाहीं. मी माझ्या आजवरच्या पन्नास वर्षांच्या अनुभवाने सांगतों कीं, मनुष्याने दैववादी बनण्यासारखा दुबळेपणा दुसरा कोणताही नाही."

गंगाजी नाइकांच्या ह्या निर्मल वृत्तीच्या बोलांचा मल्हाररावांच्या हळुवार बनलेल्या मनावर किंचित् विपरीत परिणाम आला. आधींच त्यांचे अंतःकरण नारायणरावावरील संकटाची वार्ता ऐकून भाजलेले होते, त्यामुळे त्यांना गंगाजी नाइकांच्या बोलांनीं जास्त इजा झाली. ते विमनस्कतेने नाइकांना म्हणाले. "नाईक ! परदुःख शीतळ असे म्हणतात ते खोटें नाही ! जो प्रसंग आज नारायण-रावावर आला आहे, तोच जर तुमच्या बुबाजीवर आला असता, तर तुम्हांला काय बरें वाटले असते ?"

"काय वाटले असतें अशी तुमची कल्पना आहे ! मी रडत किंवा हळ-हळत बसलों असतो असें तुम्हांला वाटतें काय ! सुभेदार ! बुबाजी तर माझा भाऊ आहे. पाठीराख्या भावंडांच्या प्रेमापेक्षां पोटजाळाचें प्रेम थोर असतें, हा जगाचा न्याय तर तुम्हांला माहीत आहे ना ? पण मी भावांविषयीं तसाच त्यांच्या मुलांविषयीं व तसाच माझ्या स्वतःच्या एकुलत्या एका मुलाविषयींही मोहाला बळी पडण्याला तयार नाहीं. तुम्हांला काय वाटतें ? बुबाजीदेखील जर किल्ल्यांत अडकून पडला असता व जो प्रसंग आज नारायणरावावर आला आहे तोच प्रसंग त्याजवर आला असता, तर माझ्या मनानें कच खाल्ली असती का ?—"

गंगाजी नाइकांचे पुरतेपणी बोलून होण्यापूर्वीच बुबाजी नाईक मध्यंतरीं उद्गारले, "आणखी असे पहा सुभेदार ! दादा जे बोलले, तें तुम्हांला अथवा कोणालाही दूषण देण्यासाठी बोलले नाहीत, सर्वांना धैर्याचा नवा नेटावा देण्यासाठीं बोलले."

बाहेर उभा होता. तो हळूच माझ्या कानांत म्हणाला, 'भिऊं नकोस. मुकाट्यानें ह्या तुरुंगाच्या मागील बाजूने दोन उंच भिंतींच्या मधून चिंचोळी वाट जाते. त्या वाटेनें जा म्हणजे बाहेरील मोठ्या दरवाजांत जाऊन पोंचशील. तेथें पहारा आहे. तेथला पहारेकरी 'परवल' असा प्रश्न तुला करील, त्याला 'जुना करार' असें उत्तर दे व हा बिल्ला त्याला दाखव म्हणजे तो तुला बाहेर सोडील'. असें म्हणून त्यानें हा बिल्ला माझ्या हातीं दिला." क्रुसावर येशू ख्रिस्ताला सर्वांगांत खिळे ठोकून जखडून ठार करण्यांत आले आहे असा ठसा वर उमटविलेला एक पितळेचा बिल्ला बाजिरावांपुढें ठेवून बुबाजी पुढे म्हणाला, "अशी मोठ्या चमत्कारानें माझी सुटका झाली, व मी आतां हा आपणाला दिसतो आहे."

'सुटका तुझी एकट्याचीच झाली, कीं तुझ्याबरोबरच्या इतर माणसांचीही झाली ?' चिमाजीअप्पांनीं प्रश्न केला.

"तें मला कांहीं माहीत नाही. तो पहारेकरी त्याविषयीं माझ्यापाशीं कांहींच बोलला नाहीं." बुबाजी उत्तरला.

"तो पहारेकरी कोण बरें असावा ?"

"तेंहि कळलें नाहीं."

"हे तर मोठेंच आश्चर्य आहे!" चिमाजीअप्पा बाजिरावांकडे वळून म्हणाले, "यावरून आपणाला असे अनुमान करावयाला हरकत नाहीं, कीं आमच्या म्हणजे पर्यायानें हिंदवीच्या हितासाठीं कायावाचामनानें झटणारे कांहीं लोक किल्ल्यावर आहेत. मग ते आमच्या हेरांपैकीं असोत, किंवा नोकरी फिरंग्यांची करावयाची पण मन मराठ्यांकडे अशा हार्दिक सहानुभूतीनें वागणारे फिरंग्यांच्या नोकरांपैकीं कोणी असोत. श्रीगजाननानें त्यांना अशीच सद्‌बुद्धि व असेंच सामर्थ्य द्यावे व नारायणराव आणि त्यांच्या बरोबरची इतर नोकरमंडळी यांचीही बुबाजीप्रमाणेंच सुखरूपपणें सुटका व्हावी."

"सुटका ! आतां कसली सुटका ? आतां नारायणरावाच्या सुटकेची आशाच नको. देवानें माझा उजवा हातच तोडण्याचें ठरविलें, तेथें कोणाचा काय इलाज !—"

असे उद्गार मल्हाररावांच्या मुखावाटे निघावयाला व त्यांच्या मागें बसलेले गंगाजी नाईक धाडकन् शिंकावयाला एकच गांठ पडली. लगेच मल्हाररावांनीं राणोजीरावांकडे वळून पाहिलें. तोंच राणोजीराव हास्यमुद्रेनें म्हणाले, "सुभेदार !

तुम्ही नारायणरावांविषयीं मुळींच चिंता करूं नका. शिकेचा शुभशकुन सांगतो, की नारायणराव सुखरूप परत येईल.''

गंगाजी नाईक निग्रहपूर्वक उद्गारले, "शकून आणि अपशकून कसले पहात बसलां ! असलीं संकटें शकून पाहून निवारण होत नसतात, तीं निवारण करण्याला सूडाबद्दल प्रतिसूड घेण्याची शपथ वाहून मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें प्रयत्नवादी बनावें लागतें. दैवावर हवाला ठेवणारे रज्जे, त्यांच्या हातून पराक्रम होणें शक्य नाहीं. मी माझ्या आजवरच्या पन्नास वर्षांच्या अनुभवानें सांगतों कीं, मनुष्यानें दैववादी बनण्यासारखा दुबळेपणा दुसरा कोणताही नाहीं.''

गंगाजी नाइकांच्या ह्या निर्मल वृत्तीच्या बोलांचा मल्हाररावांच्या हळुवार बनलेल्या मनावर किंचित् विपरीत परिणाम झाला. आधींच त्यांचें अंतःकरण नारायणरावावरील संकटाची वार्ता ऐकून भाजलेलें होतें, त्यामुळें त्यांना गंगाजी नाइकांच्या बोलांनीं जास्त इजा झाली. ते विमनस्कतेनें नाइकांना म्हणाले. "नाईक ! परदुःख शीतळ असे म्हणतात तें खोटें नाहीं ! जो प्रसंग आज नारायणरावावर आला आहे, तोच जर तुमच्या बुबाजीवर आला असता, तर तुम्हांला काय बरें वाटलें असतें ? ''

"काय वाटले असतें अशी तुमची कल्पना आहे ? मी रडत किंवा हळहळत बसलो असतों असें तुम्हांला वाटतें काय ? सुभेदार ! बुबाजी तर माझा भाऊ आहे. पाठीराख्या भावंडांच्या प्रेमापेक्षां पोटजाळाचें प्रेम थोर असतें, हा जगाचा न्याय तर तुम्हांला माहीत आहे ना ? पण मी भावांविषयीं तसाच त्यांच्या मुलांविषयीं व तसाच माझ्या स्वतःच्या एकुलत्या एका मुलाविषयींही मोहाला बळी पडण्याला तयार नाहीं. तुम्हांला काय वाटतें ? बुबाजीदेखील जर किल्ल्यांत अडकून पडला असता व जो प्रसंग आज नारायणरावावर आला आहे तोच प्रसंग त्याजवर आला असता, तर माझ्या मनानें कच खाल्ली असती का ?—''

गंगाजी नाइकांचें पुरतेपणीं बोलून होण्यापूर्वींच बुबाजी नाईक मध्यंतरीं उद्गारले, "आणखी असें पहा सुभेदार ! दादा जे बोलले, तें तुम्हांला अथवा कोणालाही दूषण देण्यासाठीं बोलले नाहींत, सर्वांना धैर्याचा नवा नेटावा देण्यासाठीं बोलले.''

" कोणाला दूषण ? हरेराम ! सुभेदार ! तुम्हांला ही शंका आली का ? " गंगाजी नाईक स्मितहास्यपूर्वक म्हणाले, " वा: ! सुभेदार ! प्रत्यक्ष हाताखालच्या नोकरावरदेखील इतकी ममता करणाऱ्या तुमच्यासारख्या रणसारंगाला दूषण आणि तें मी देईन ? अशी शंकादेखील कोणाच्या मनांत येतां कामा नये होती. आणि नारायणरावाची योग्यता मला कळत नाहीं अशी तुमची कल्पना असेल तर तीही चुकीची आहे. खरोखर नारायणराव तुम्हांला साजेसा सेवक आहे."*

" नारायणराव मला माझ्या पोटच्या पोराहूनही जास्त प्रिय आहे." मल्हारराव चिमाजीअप्पा व बाजीराव यांच्याकडे पाहून म्हणाले. " श्रीमंतांनीं जेव्हां खलिता घेऊन किल्ल्यावर जाण्याची गोष्ट काढली तेव्हां किल्ल्यावर जाणें म्हणजे काळाच्या जबड्यांत चालून जाणें होय हें माहीत असूनही नारायणराव निधड्या

---

* पृष्ठ ४५ मराठशाहींत बरींच ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणांचीं घराणीं उदयाला आलीं; त्यांतच दाणी या उपनांवाचें खेड–सासवड भागांतील एक ब्राह्मण घराणे उदयाला आलें. दाणी कुटुंबाच्या पुढें दोन शाखा झाल्या. त्यांपैकीं वडील शाखा मालेगांव येथें राजेबहाद्दर या नांवानें उदयाला आली; तिचे मूळ पुरुष नारो शंकर हे होत. धाकटी शाखा विंचूरकर या नांवानें उदयाला आली; तिचे मूळ-पुरुष विठ्ठल शिवदेव विंचूरकर हे होत. विठ्ठल शिवदेवांनीं पेशव्यांच्या उजव्या हाताप्रमाणें पराक्रम गाजाविले व अमूप मान धन वैभव संपादन केलें. विठ्ठल शिवदेवांचा जन्म इ०सन १६७५मध्यें व मृत्यु इ०सन १७६७ मध्यें झाला. थोरल्या दाणी शाखेचे मूळ पुरुष नारो शंकर हेही अत्यंत स्वाभिमानी, पराक्रमी व स्वामिनिष्ठ होते. नारो शंकर प्रथम उदाजी पवारांच्या दिमतीला होते ( मंडलोई दप्तर ). नंतर त्यांना मल्हारराव होळकरांच्या दिमतीला देण्यांत आलें. नारो शंकर हे महावीर गोविंदपंत बुंदेल्यांप्रमाणें बहुधा प्रारंभापासूनच उत्तरेकडे उद्योग करण्यांत गढून गेलेले असत. नारो शंकरांवर नानासाहेब पेशव्यांनीं उत्तरेकडील मोठमोठीं जबाबदारीचीं कामें टाकलीं व त्यांनीं तीं योग्य रीतीनें पार पाडलीं. माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत नारो शंकर एकदां प्रतिनिधि-देखील झाले होते ( इ. सन १७६२ ). नारो शंकर व विठ्ठल शिवदेव हे दोन्ही पुरुष जसे पट्टीचे मुत्सद्दी तसेच पट्टीचे योद्धेही होते. त्यांच्या मुत्सद्देगिरीचा व पराक्रमांचा परिचय वाचकांना 'कादंबरीमय पेशवाई'मधून पुढें वेळोवेळीं होईलच.

छातीनें ती पंचप्राणांच्या मोलाची कामगिरी पार पाडण्यासाठीं प्रसन्नतापूर्वक पुढें आला आणि तो किती निर्भय, बाणेदार व धन्यांचा निःसीम अभिमानी आहे हें सर्व मंडळीनें आतांच बुबाजी नाइकांच्या तोंडून ऐकलें आहे. अशा एकनिष्ठ व धीर-वीर-गंभीर सेवकाचा अभिमान मला वाटला व त्याच्यावर परम संकट कोसळलेले ऐकून विषाद वाटला तर त्यांत माणुसकीला सोडून कांहीं झाले असें मुळींच नाहीं."

"मुळींच नाहीं." चिमाजीअप्पा उद्गारले. "सुभेदार, सुभेदार! तुमच्या दुःखांत आम्ही सर्वजण सारखेच वांटेकरी आहों."

राणोजी शिंदे उद्गारले, "सेनापति सिल्व्हेरानें मराठ्यांच्या एखाद्या यःकश्चित् शिपाईप्याद्याचा अपमान केला, तरी देखील तो साऱ्या मराठमंडळाचा अपमान झाला असें समजून आम्हीं त्या अपमानाचा बदला घेण्यासाठीं एकजुटीनें झटलें पाहिजे. आणि या ठिकाणीं तर प्रत्यक्ष श्रीमंतांचा अपमान त्यानें केला आहे. हा अपमान आपणाला सव्याज फेडतां आला नाहीं, तर आपण खरे मराठेच नाहीं असें ठरेल. मराठा तोच कीं, कोणत्याही जुलुमाचा, अन्यायाचा किंवा अपमानाचा प्रतिकार करण्यासाठीं नेटानें पुढें चालून जाऊन प्रसंगीं मरेल पण मागें हटणार नाहीं."

"बरोबर. अगदीं बरोबर! राणोजी बाबा! तुम्ही अगदीं लाखांतली गोष्ट बोललां तुमचे बोल मला तंतोतंत पटले." गंगाजी नाईक बाजीराव व चिमाजी-अप्पा ह्या उभयतांकडे पाहून म्हणाले, "मी तर म्हणतों कीं वेळीं आमचा अपमान क्षम्य आहे; पण उभयतां श्रीमंतांचा अपमान तो एकट्या श्रीमंतांचाच अपमान नसून तो साऱ्या मराठमंडळाचा अपमान व तोच छत्रपतींचाही अपमान." ते सर्व मंडळीकडे पाहून उद्गारले, "असला अपमान निमूटपणें सहन करणारा महाराष्ट्राचा–मराठा–असो, परभू असो, ब्राह्मण असो किंवा आणखी कोणी असो. हिंदूच्या अस्सल अवलादीचा नाहीं असेंच समजलें पाहिजे." एवढे शब्द त्यांच्या तोंडून निघाले मात्र; पण लगेच त्यांनीं जीभ चावली व बाजिरावांचे पाय धरून उद्गार काढले, "श्रीमंत! आवेशाच्या भरांत येऊं नये तो शब्द तोंडावाटे येऊन गेला, याबद्दल मला क्षमा असावी."

बाजीराव गंगाजी नाइकांना आपल्या हातांनीं धरून वर उठवीत म्हणाले, "कांहीं हरकत नाहीं. तुम्ही यथायोग्य बोललां; त्यांत कांहींच वावगें नाहीं.

अशा प्रसंगींदेखील माणसाला इतकी चीड आली नाहीं तर तो मनुष्य कसला ? अप्पा म्हणाले तेंच खरें. आतां वसई जिंकून तेथून पोर्तुगीजांचें निर्मूळ केल्या शिवाय मागें पाय घ्यावयाचा नाहीं. मात्र तुम्हीं सर्व मंडळीनें कंबरा कसून शक्य तितक्या निकरानें तेथला कार्यभाग आटोपला पाहिजे. पावसाळ्यानंतर मोहीम लांबली तर शेतवाडीच्या काळजीनें राउतांचें लक्ष्य द्विधा होतें."*

"पण आपली उत्तरेकडील कामगिरी ?" मल्हाररावांनीं विचारलें.

"तूर्त उदईक आम्ही त्या कामगिरीवर जातों. जरूरच भासली तर तुम्ही सर्व ही मोहीम आटोपून यावं." बाजीराव बाहेर जावयाला उठतां उठतां म्हणाले. "आतां मोहिमेची घडी कशी काय बसवावयाची ती तुमची तुम्ही एक-विचारानें बसवा. मदांध फिरंग्यांचा निःपात करीतों मागें पाऊल घेऊं नका."

बाजीराव बाहेर निघून गेले. मल्हारराव हळूच राणोजी शिंद्यांना म्हणाले, 'राणोजीबाबा ! नारायण सुटून आला तर ठीकच; नाहींपेक्षां त्याचा जन्म सार्थकीं लागला. थोरल्या श्रीमंतांना थोड्या वेळापूर्वी ह्या मोहिमेच्या बाबतीत हरएक अडचणी सुचत होत्या, त्या आतां हरएक सोई सुचूं लागल्या. नारायणा च्या बलिदानानें ही इष्ट क्रान्ति घडून आली."

"बरें; आपण सर्वांनीं ही अवाढव्य जबाबदारी नव्या जोमानें शिरावर घेतली व बाजीरावसाहेबांनींही कबुली दिली. पण आतां ह्या अवघड कार्याचा उरक कसा करावयाचा ? वसईच्या किल्ल्यांत दडी मारून बसलेला फिरंगी म्हणजे यमुनेच्या डोहांत बुडी मारून बसलेला कालिया होय. त्याचें मर्दन कसें करावयाचें याचा कांहीं निश्चित विचार करावयाला नको काय ?"

मानाजी आंग्रे म्हणाले, "धाकटे श्रीमंत ! फिरंगी कालिया असेल, तर आपण त्याचें मर्दन करण्याला समर्थ असे श्रीकृष्ण आहां, व आम्ही सारे आपले गोप संवगडी आहों. आपणांला त्याचा एवढा बाऊ वाटण्याचें कारण नाहीं. आरमारी सामर्थ्यावर फिरंग्याची भिस्त असेल तर समुद्राच्या बाजूने त्याची ती रग मी एकट्यानें जिरवितों. फिरंग्यांची एक तरी नाव आंत जाऊं

---

* मराठे सैनिक वर्षातून आठ महिने–दसऱ्यापासून मृगापर्यंत–मुलुखगिरी-वर असत. साधारणतः पावसाळ्यांत मुलुखगिरी बंद असे; तेव्हां मराठ्यांना शेती करतां येई. शेतकी हेंच त्यांचें उपजीविकेचे मुख्य साधन होतें.

दिली किंवा बाहेर येऊं दिली तर मला विचारा. मी समुद्रांत त्याला बुडवून मारीन तरी, किंवा—"

"छे, छे! मानाजीबाबा! 'किंवा', 'अथवा', 'जर', 'तर' असले शब्दच तोंडावाटे कोणीं उच्चारावयाचे नाहींत. प्रयत्न करणें आपल्या हातीं व यश देणें परमेश्वराच्या हातीं. तुम्ही समुद्राकडून किल्ल्याला वेढा द्या व जमिनीकडून वेढा शंकराजी नारायणांनीं घातलाच आहे, तो आम्ही जास्त बळकट करतों." मल्हारराव होळकर चिमाजीअप्पांकडे वळून म्हणाले, "धाकट्या श्रीमंतांनीं आतां चपळाई करून हा धर्मसंग्राम निकरानें झुंजविण्यासाठीं सर्व सेनानींना आज्ञा केली पाहिजे."

चिमाजीअप्पा म्हणाले, "ते होईल. बाहेरील प्रांतांतील कामगिरी बहुतेक आटोपलीच आहे, आतां आपणां सर्वांना वेढ्याच्या एकाच बाबतींत मन घालावयाला मुळींच जड जाणार नाहीं. पण मल्हारीबाबा! नुसत्या वेढ्याने काम भागेल असें लक्षण आम्हांला दिसत नाहीं. बाहेरून व आंतून असा दोन्ही बाजूंनीं फिरंगी जेरीला आणतां आला तर कांहीं तरणोपाय आहे व हें सारें पावसाळा सुरू होण्याच्या पूर्वी झालें पाहिजे. आपणाला किल्ल्यांतील फिरंग्यांच्या सामर्थ्याचा कांहीच अंदाज नाहीं. तो अंदाज मिळेपावेतों आपला वेढा फुकट आहे."

"तो अंदाज आम्हांला आणतां येईल." गंगाजी नाईक म्हणाले. "किल्ल्यांतील सर्व बित्तंबातमी वारंवार बाहेर कळविण्याचें काम आमचें. खंडूजी, मी, दुल्लभजी मोहे, ह्या तीनचार मंडळींवर आपण किल्ल्याचा भेद आणण्याची जबाबदारी टाका. आंत जाऊन काय कारस्थानें करावयाचीं तीं आम्ही करतों; फक्त बाहेरचा बंदोबस्त इतरांनीं पहावा."

"पण किल्ल्यांत तुमचा प्रवेश कसा होणार? किल्ल्यांत कीड-मुंगीला देखील जाण्यायेण्याला वाव नाहीं इतका बंदोबस्त फिरंग्यांनीं केला आहे." चिमाजी-अप्पा म्हणाले.

"आपणांला काय त्याचें? आपण मौज पहा तर खरी! किल्ल्यावर डागडुजी करण्यासाठीं सुतार, लोहार वगैरे कामकरी लोक अजून पुष्कळच पाहिजे आहेत. त्याप्रमाणेच किल्ल्यांत सारे फिरंगी कोंडून घेऊन बसले आहेत, त्यांना भाजीपाला, फळफळावळ, कपडालत्ता, कोंबडींबकरीं रोज लागणारच. मराठ्यांसारखे

त्यांचें नाहीं. मराठे मोहिमेवर निघाले कीं वाटेंत हुरडा तर हुरडा, शेंगा तर शेंगा, जे काय दौडीच्या सपाट्यांत हातीं सांपडेल तें हिरवें कच्चें अन्न खाऊन देखील दिवसांचे दिवस–आठवड्यांचे आठवडे कंठितात. पण असला काटकपणा फिरंगड्यांच्या अंगीं मुळींच नाहीं. त्यांचीं बायकापोरें तर चैनबाजीच्या पदार्थांसाठीं प्राण सोडतील. तसें पाहूं गेलें तर ह्या भागांतल्या बाजारपेठा फिरंग्यांच्या रोजच्या चैनबाज बाजारहाटीमुळे भरभराटीला आल्या आहेत. सभोंवारच्या मोठमोठ्या भागांतील भाजीपाला, फळफळावळ, कोंबडीं, यांचा सारा खप फिरंग्यांत. फिरंगी सारे आपलीं घरेंदारें व बागबगीचे सोडून किल्ल्याच्या आश्रयाला गेल्यामुळें इकडे सर्व बाजारपेठा ओस पडत चालल्या आहेत व भाजीपाल्याचे, फळफळावळीचे ढीगच्या ढीग रोज कुजून सडून वायां चालले आहेत. बाहेरून ह्या माल किल्ल्यावर जाईल तितका थोडा आहे. लोकांनीं असा हरजिनसी माल किल्ल्यांत विकावयाला आणावा, बाहेरचे कारागीर मिळावे, म्हणून किल्ल्यावरील अधिकाऱ्यांचे कोण प्रयत्न चालले आहेत ! पण ह्या धुमश्चक्रींत तिकडे मरावयाला जातो कोण ? ह्या संधीचा आम्हांला पुरेपूर फायदा घेतां येईल.'' गंगाजी नाईक म्हणाले.

“ शिवाय ह्या खुणेचा बिल्ला आपणापाशीं आहेच.'' बुबाजी चिमाजीअप्पांसमोरचा बिल्ला उचलून घेऊन सर्वांना दाखवीत म्हणाला, “ ह्या बिल्ल्याचा अस्सल बरहुकूम ठसा करून पाहिजे तेवढे बिल्ले मी पाडून देतों. असा एकेक बिल्ला घेऊन व ‘जुन्या करारा’चा परवल वदून आपणांपैकीं कितीएकांना किल्ल्यावर जातां येईल. मीं किल्ल्यावरचीं एकंदर लक्षणें पाहिलीं, त्यांवरून असा गोंधळ माजविण्याला तिथें भरपूर अवसर आहे अशी माझी खात्री झाली आहे.''

चिमाजीअप्पांना मंडळीच्या ह्या कल्पकतेचें फार कौतुक वाटलें. ते प्रफुल्लवदनानें म्हणाले, “ ही युक्ति मात्र फार नामी आहे. अशा गनिमी काव्यानें आपण शत्रूला खचित जेरीला आणूं.''

याप्रमाणें पुढील कार्याची निश्चिति झाल्यावर तिची संगतवार घडी बसविण्याला वेळ कसला ! आजूबाजूच्या परिस्थितीचा अचूक अंदाज सर्व मराठे वीरांना गरुडाप्रमाणें भराऱ्या मारणाऱ्या त्यांच्या हेरांमार्फत पूर्वीच कळला होता. किल्ल्यासभोंवार वेढा घालून किल्ल्यावर जोराचा मारा करावयाचा, किल्ल्यांतील भेद आणून त्याप्रमाणें बाहेरील मारगिरीचें धोरण ठरवावयाचें व बाहेरून गोव्याकडून

किंवा मुंबईकर इंग्रजांकडून शत्रूचें साह्य होऊं लागल्यास तें किल्ल्यापर्यंत पोहोंचूं न देतां मधल्यामध्यें लुटून जाळून पोळून फस्त करावयाचं, शत्रूपक्षाचे लोक जे किल्ल्याबाहेरच्या प्रांतात धुडघूस घालीत असतील त्यांना बाहेरच्या-बाहेर गांठून त्यांचा निकाल लावावयाचा, व याप्रमाणें सर्व बाजूंनीं किल्ल्यांतील शत्रूंचा कोंडमारा करून त्याला दांतीं तृण धरून शरण आणावयाचें, असा सर्व मराठमंडळाचा कार्यक्रम त्या बैठकींत ठरला. बाजीराव पेशवे तेवढ्यांत तेथें आले. त्यांना ह्या बेत ऐकून समाधान वाटले. ह्या नव्या योजनेंतील कामाची वांटणी अशी करावयाची बाकी नव्हतीच. शंकराजी नारायण फडके व मानाजी आंग्रे यांनीं किल्ल्याला वेढा देण्याचें काम पूर्वींच आरंभिलें होतें; त्यांना चिमाजीअप्पा, मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनीं साह्य करून, वेढा मुंगीलाही आंत-बाहेर रीग मिळूं नये इतका पक्का करावा असें ठरलें. गंगाजी नाईक, बुवाजी नाईक, खंडूजी माणकर, अंताजी रघुनाथ वगैरे जी मंडळी त्या प्रांतांतील रहिवासी व माहितगार होती, त्यांनीं वसई भोंवतालच्या टापूंत फिरंग्यांचा उद्योग बंद पाडावा, ॲन्टोनिओ, धोंडशास्त्री, भय्याशास्त्री वगैरे जे घरभेदे कार्यनाश करणारे असतील त्यांचें पारिपत्य करावें व किल्ल्यांतील भेद आणून मारगिरीच्या वर्मी जागांची खाशांना माहिती पुरविण्याचें पत्करलें. इतर मंडळी ठिकठिकाणीं शत्रूच्या नसा धरून बसली होती त्यांनीं आपल्या जागा सोडूं नयेत अशीं आज्ञापत्रें रवाना करण्याला चिमाजीअप्पांनीं आपल्या चिटणिसांना फर्माविलें. मुंबईकर इंग्रज मुंबईला नवा गव्हर्नर आल्यापासून फिरंग्यांच्या वतीनें चुळबूळ करीत असल्याचा बोभाटा कानीं आला होता; त्याचा योग्य बंदोबस्त करून त्याच्या हालचालीवर करडी नजर ठेवण्याचें काम अंताजी रघुनाथ हे त्या बाबतींत माहितगार म्हणून त्यांच्यावर सोंपविण्यांत आलें.

चिमाजीअप्पा म्हणाले, "आपणाला आणखी द्रव्यबळ व मनुष्यबळ पाहिजे असल्यास आपण बाजीरावसाहेबांना सांगूं, म्हणजे ते पुणें–साताऱ्याहून तशी तजवीज होण्याची खटपट करतील."

गंगाजी नाईक उतरले, "छेः! तशी कांहींच आवश्यकता नाहीं. मनुष्य-बळाची आम्हांला मुळींच वाण नाहीं."

"पण द्रव्यबळ पाहिजेना!" चिमाजीअप्पा म्हणाले. "त्याप्रमाणेंच युद्ध-

सामुग्री व अन्नसामुग्रीही पाहिजेच. कारण हा संग्राम किती दिवस चालेल याचा कांहीं नेम सांगतां येणार नाहीं."

अंताजीपंत उत्तरले, " संग्राम कितीही दिवस चालला तरी आपणाला भिण्याचें कारण नाहीं. किल्ल्यांत फिरंगडे किती दिवस कोंडी करून बसतात तें पाहूं तर खरें! आज इतके दिवस आपण त्यांची हैराणगत केली, त्यानंतर त्यांच्यापाशीं सामुग्री असून असून कितीशी असणार? किल्ल्यांत कांहीं शेतें पिकलीं नाहींत, कीं तीं ओरबाडून खाऊन व नवीन पिकवून त्यांना गुजराण करतां येईल? बोलून चालून ते सांठवणी पाणी, तें पुरून किती दिवस पुरणार? बाहेरच्या प्रांतांतून मूठभर तरी दाणागोटा किल्ल्यावर कसा जातो तें आम्ही पाहूं. सर्व शेतकरी आमचे आहेत, सर्व पेठा आमच्या आहेत, सर्व नाकीं आमच्या स्वाधीन आहेत. गोंव्याकडून पुरवठा होण्याची फारशी आशा नाहींच. कारण तिकडे व्यंकटराव गोंवेकरांच्या छाताडावर पाय देऊन उभे आहेत. येऊन जाऊन मुंबईकर इंग्रज त्यांना दाणागोटा पुरवितात. तो पाळत राखून मधल्यामध्यें लुटून फस्त केला कीं काम झालें! फिरंग्यांच्या गांठीचा पैसाही बहुतेक खलास होत आला आहे. एरव्हीं त्यांचे दागदागिने व प्रार्थनामंदिरांतील सोन्यारुप्याच्या घांटा जागोजागीं गहाण पडण्याला सुरवात झालीच नसती. आतां आपणाकडे द्रव्यबळ बेताचें आहे हें खरें. पण आमच्याच रक्तशोषणानें गबर झालेल्या फिरंग्यांच्या भव्य वाड्यांत व मंडपेश्वरसारख्या प्रार्थनामंदिरांतील सोन्यारुप्याचे अलंकार, त्याप्रमाणेंच ॲन्टोनिओसारखे जे देशकंटक दगलबाजीनें गबर झाले आहेत त्यांच्या धनंतर दौलती, ही सारी आम्ही समजतों कीं, आमच्याच बापाची मत्ता आहे. आपणाला काय कमी आहे!"

चिमाजीअप्पांना हा विचार रुचला नाहीं, असा त्यांच्या चर्येवरून संशय आल्यामुळें अंताजीपंत पुन्हा म्हणाले, " हें पहा धाकटे श्रीमंत! क्रियेची प्रतिक्रिया जगांत नेहमींच ठेवलेली असते. आज दोन शतकें पिढ्यान्‌पिढ्या आम्ही जे अनर्थ सोसले, जो जुलूम सहन केला, त्याची आपणाला कल्पनाच असणें शक्य नाहीं. आम्हांला सर्वस्वी नागवूनच हे गोरे कृष्णकर्मे एवढ्या वैभवाला चढले ना? आमच्या बायका-लेकी-सुनांना बलात्कारानें ओढून नेऊनच यांनीं आपले संसार थाटले ना; आणि त्यांच्या पोटीं जन्म पावलेली अर्धबाटगी प्रजा आज आमच्या विरुद्ध ते लढवीत आहेत ना? आम्ही ही इतकी मंडळी इथें जमलों आहों,-यांतला

कोणी एक देखील असा नाहीं–कीं ज्याच्या घरांत त्या महानष्टांनीं जीवित–वित्त-कलत्राची लूट केली नाहीं! इतर कोणाला कांहींही वाटो, निदान मी तरी माझ्या बाबतींत झालेल्या अनर्थांचा सूड घेतल्याशिवाय स्वस्थ राहाणार नाहीं. दाशरथी रामासारखे सच्छील, बृहस्पतीसारखे विद्वान् व कर्णासारखे शूर माझे वडील बंधु रामचंद्रपंत त्यांना ह्या चांडाळांनीं काय समुद्रांत बुडवून ठार करावें! आणि अन्याय काय तर मीं पुण्याला जाऊन पेशव्यांपाशीं गाऱ्हाणें गाइलें! आठवण झाली कीं सर्वांगाचा कसा तिळपापड होतो!"

खंडूजी माणकर संतापानें दांतओंठ खात मुठी आंवळून उद्गारला; "आमच्या घराण्यांत एकुलतीएक नक्षत्रासारखी मुलगी मिरा, मला एकुलतीएक बहीण ती व तिला एकुलता एक भाऊ मी! मी भवानजी देशपांडे, गंगाजीबाबा वगैरे मंडळीबरोबर जनतेच्या वतीनें धन्यांच्या कानीं गाऱ्हाणीं घालण्यासाठीं गेलों म्हणून त्या हलकट पाद्र्यानें–त्या फादर पोर्टोनें माझ्या बाबांना ते ठाण्याला कांहीं कामानिमित्त गेले असतांना पकडून काय ठाण्याच्या किल्ल्याच्या बुरुजांत चिणून मारावें!"

"आणि ती तुझी बहीण आतां कुठें आहे बरें!" नाइकांनीं विचारलें.

"भगवान जाणे! त्या दिवसापासून तिचा पत्ता नाहीं. कदाचित् तिला बाटवून तिचें एखाद्या फिरंग्याशीं लग्न लावून देण्यांत आलें असेल; काय झालें असेल तें असो. मी तर समजतों कीं, ती ज्या दिवशीं नापत्ता झाली त्याच दिवशीं मेली! मात्र मीं तेव्हांच अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, माझ्या एका बहिणीऐवजीं हातीं सांपडतील तेवढ्या फिरंग्यांच्या बायकामुलींना मी आमच्या लोकांच्या बटकी–कुळंबिणी करून सोडीन."

"हां! तेवढें मात्र करूं नका." चिमाजीअप्पा खंडूजीला हातानें गप्प करीत म्हणाले, "मराठ्यांच्या नांवाला तेवढा कलंक मात्र लावूं नका. शत्रूचीं घरें लुटा, त्यांना कैद करा, ठार करा; तो कांहीं जुलूम नव्हे. तुमच्या देवदेवालयांचा त्यांनीं विध्वंस केला, त्यांचें पुनरुजीवन करा, धर्माचें पुनरुज्जीवन करा; तो कांहीं धार्मिक जुलूम होणार नाहीं. पण शत्रूंशीं झगडतांना देखील माणुसकीचें तोंड काळें करणारे अत्याचार कराल तर खबरदार! स्त्रियांवर सूड उगविणें हा कांहीं मर्दपणा नव्हे." ते सर्वांना उद्देशून म्हणाले, "सर्वांनीं आपापल्या सैन्यांतील लोकांना

सक्त ताकीद द्या कीं, शत्रूच्या बायकामुलांशीं जो निष्ठुरपणाचें किंवा असभ्य वर्तन करील त्याला कडक शासन करण्यांत येईल. तो मग कोणीही असो."

चिमाजीअप्पांचा हा करडा हुकूम ऐकून सर्वांनीं स्तिमित होऊन तोंडांत बोटें घातलीं, व प्रत्येकजण दुसऱ्याच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागला. त्यावर कोणी कांहीं बोललें नाहीं व चिमाजीअप्पांनींही तो विषय तेवढ्यावरच थांबविला.

इतक्यांत बाजीराव बैठकखान्यांत आले व म्हणाले, "आपल्या मंडळीनें फिरंग्यांचें एक जहाज पकडून आणलें वाटतें!"

## प्रकरण चवथें

# 'दुस्मान खरा; पण दाणा' !

ही आनंदाची वार्ता कानीं पडतांच सर्व मंडळी बैठकखान्यांतून उठून समुद्राच्या बाजूकडील किल्ल्याच्या बुरुजाकडे निघाली. त्यांतल्या त्यांत मानाजी आंग्रे विशेष उत्सुकतेनें सर्वांच्यापुढें होऊन पाहूं लागले. त्यांना विशेष उत्सुकता वाटण्याचें कारण आरमारी विजय म्हटला, कीं तो आपल्याच लोकांनीं मिळविलेला असला पाहिजे अशी त्यांची खात्री होती, व ती वावगी नव्हती. चिमाजीअप्पांच्या संमतीनें मानाजीरावांनीं वसईसभोंवार समुद्रांतून आरमारी वेढा देण्याचा उद्योग तीन चार दिवसांपूर्वीच आरंभिला होता व शत्रूच्या हालचालींवर टेहळणी ठेवण्यासाठीं त्यांचीं कांहीं जहाजे वसई आणि मुंबई या दरम्यानच्या टापूंत मुद्दाम फेऱ्या करीत होतीं. सर्व मंडळी बुरुजावरून पाहूं लागली, त्या वेळीं समुद्रांत नजरेच्या टोऱ्यांत अशीं फक्त तीनच जहाजे थोड्या अंतरावरून किल्ल्याकडे येत असलेलीं दिसत होतीं. त्यांपैकीं दोन जहाजांवर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकत होता व त्या दोन जहाजांच्या मधून चालणाऱ्या तिसऱ्या जहाजावर पोर्तुगीजांचें निशाण फडकत होतें. अर्थात् मराठ्यांच्या त्या दोन जहाजांनीं पोर्तुगीज जहाजाला पकडून आणलें असल्याबद्दल मुळींच संशय नव्हता. त्या वेळीं समुद्राचा देखावा फारच नयनमनोहर दिसत होता व त्या मनोहारित्वांत त्या तीन जहाजांची भर पडली होती. वसईच्या वेढ्यांत पहिला विजय मिळविण्याचा मान सर्व मराठमंडळांत प्रथम आपल्या वांट्याला आला असें पाहून मानाजीरावांना जितका अभिमानपूर्ण संतोष वाटला, तितकाच सर्व मराठमंडळालाही वाटला. चिमाजीअप्पा मानाजीरावांना म्हणाले, "वजारतमाब ! वसईच्या वेढ्यांतील भावी विजयांत अग्रपूजेचा मान तुम्हीं मिळविला. आपल्या कार्याला शकून तर फारच नामी झाला."

"ही आपणां उभयतांच्या पायांची कृपा." मानाजीराव प्रसन्न चित्तानें उद्गारले. त्यांच्या ह्या उद्गारांत बराच खोल पण तितकाच स्पष्ट अर्थ भरलेला होता. तो तेथल्या सर्व मंडळांपेक्षां बाजीराव व चिमाजीअप्पा यांच्या विशेषेंकरून ध्यानीं आला. मानाजीराव व संभाजीराव ह्या दोघां भावांच्या भाऊबंदकींत

पेशव्यांनीं मानाजीरावाचा पक्ष धरून संभाजीरावांना जवळजवळ नामोहरम केलें होतें व आंग्र्यांच्या दौलतीचे मुख्य धनी म्हणून मानाजीराव गाजूं लागले होते.* त्याला अनुलक्षून मानाजीरावांनीं पूर्वोक्त उद्गार काढले होते.

हां हां म्हणतां तीं तीनही जहाजें बंदरांत आलीं. त्याबरोबर पोर्तुगीज जहाजावरील निशाण खालीं उतरलें गेलें. बुरुजावरील सर्व मंडळी तो प्रकार कौतुकानें पहात होती. अर्नाळा किल्ल्यावर अभिमानानें फडकणाऱ्या मराठ्यांच्या भगव्या झेंड्याला मान देण्यासाठीं पोर्तुगीज जहाजावरील निशाण खालीं उतरविलें गेलें हें उघड होतें. पोर्तुगीजांनीं मराठ्यांच्या भगव्या झेंड्याला इतका मान दिला असा वसईची मोहीम सुरू झाल्यापासूनचा पहिलाच प्रसंग होता. एवढा अभूतपूर्व मान मराठमंडळाला मिळवून देण्याचें श्रेय आंग्र्यांच्या आरमाराला संपादन करतां आलें असें पाहून बाजिरावांनीं मानाजीरावांपाशीं जाऊन त्यांची पाठ थोपटली.

"ह्या जहाजांत कोणीतरी खाशी पोर्तुगीज मंडळी असावी असें वाटतें." मानाजीराव म्हणाले. ती मंडळी कोण असावी याविषयीं बुरुजावरील मराठमंडळांत तर्कवितर्क सुरू असतांनाच तीं तीनही जहाजें बंदरांत शिरल्यामुळें बुरुजाआड होऊन दिसेनाशीं झालीं.

"चला; आपण बैठकखान्यांत जाऊं. आतां ती मंडळी कोण असेल ती आपणांसमोर आणली जाईलच." असें म्हणून मानाजीराव आंत जावयाला निघाले. त्यांच्या बरोबर सर्व मंडळी बैठकखान्यांत गेली. तेथेंही त्यांच्या गप्पा चालल्याच होत्या.

थोड्याच वेळांत आंग्र्यांच्या दोन जहाजांवरील मुख्य दर्यावर्दी बहिर्जी तांडेल व हिरोजी तांडेल हे दोन पोर्तुगीज स्त्रियांना घेऊन बैठकखान्यांत आले. त्या दोन्ही स्त्रिया रूपानें सुंदर व तरुण होत्या; पण त्यांतल्यात्यांत एक तर विशेष सुंदर, तेजस्वी व वयानें केवळ सोळासत्रा वर्षांची होती. दुसरी सुमारें बावीस वर्षांच्या वयाची व पहिलीपेक्षां सौंदर्यांत दोन कस कमी होती; पण हे दोन कस कमी पहिल्या मुलीच्या सौंदर्याशीं तुलना करतां; एरव्हीं तिची गणना रूपवती स्त्रियांत निःसंशय होण्यासारखी होती. दोघींच्याही अंगावर बहुमोल अलंकार

* आंग्र्यांची भाऊबंदकी व पेशव्यांनीं त्या भाऊबंदकींत केलेली मध्यस्थी 'पेशवाईंतील पश्चिमदिग्विजय' ह्या पूर्वींच्या कादंबरींत पहावयास मिळेल.

होते व त्यांचा पोशाकही भारी किंमतीचा होता. भीतीनें त्या दोघींचीही वावरलेल्या हरिणींसारखी अवस्था झाली होती.

" ह्या स्त्रिया तुम्हांला कोठें सांपडल्या ? " मानाजीरावांनीं बहिर्जीला प्रश्न केला.

बहिर्जी, उत्तरला, " सरकार ! आम्हीं जें जहाज पकडून आणलें आहे तें फिरंग्यांचें आहे. मुंबईहून इंग्रजांकडून शस्त्रसामुग्री व बरेंच धन घेऊन तें वसईकडे येत असतांना मनोरीपाशीं आम्हीं तें पकडलें. त्या जहाजावर ह्या दोन स्त्रिया आम्हांला सांपडल्या."

" एवढ्या दोन स्त्रियाच फक्त जहाजावर होत्या का ? " चिमाजीअप्पांनीं विचारलें.

" नाहीं सरकार ! आणखीही कांहीं मंडळी त्या जहाजावर आहे. त्या सर्वांना आम्हीं बंदोबस्तानें कैद केलें आहे. आपली आज्ञा असेल तर त्यांनाही आपणासमोर आणून हजर करतों." हिरोजी उत्तरला.

" मग ह्या दोन स्त्रियांना तेवढ्या आमच्यासमोर कशाला आणल्या ? " चिमाजीअप्पांनीं प्रश्न केला.

" सरकार ! ह्या दोन्ही स्त्रिया सेनापति सिल्व्हेराच्या परिवारांतील आहेत. ही मोठी स्त्री सेनापतीच्या वडील बंधूंची मुलगी असून धाकटी खुद्द सेनापतींची मुलगी आहे." हिरोजी उद्गारला.

" असतील ! मग ! इतर सर्व कैद्यांना मागे ठेवून प्रथम ह्या दोन स्त्रियांनाच पुढें आणण्याची तुम्हांला एवढी काय गरज भासली ? "

चिमाजीअप्पांच्या ह्या कड्या प्रश्नावर काय उत्तर द्यावें हें त्या दोघांही तांडेलांना सुचेना. ते अगदी गोंधळून गेले. ते इतके गोंधळून जाण्याचें कारण त्या दोन स्त्रियांना पुढें आणण्यांत त्यांचा उद्देश अगदीं निराळा होता. प्रत्यक्ष त्यांचे धनी मानाजीराव आंग्रे व बाजीराव पेशवे ही दोन रंगेल खाशी मंडळी किल्ल्यावर असल्याचें त्यांना माहीत असल्यानें त्या दोघांना प्रसन्न करून आपलें नशीब उदयाला आणण्यासाठीं त्यांनीं एवढी दक्षता बाळगिली होती. ह्या लोभाच्या जोडीला फिरंग्यांवर आजवरच्या अत्याचारांबद्दल सूड घेण्याची भावनाही होती आणि चिमाजीअप्पा जर त्या बैठकींत नसते, तर त्या शिपायांची अपेक्षा कदाचित् पूर्ण झालीही असती; निरुपायास्तव त्या दोन्ही तरुणी पेशवे किंवा आंग्रे यांच्या विलासमंदिरांतील विलासललना बनून राहाण्याचें पत्करून आपला

बचाव करण्याला राजी झाल्या असत्या. पेशवे आणि आंग्रे यांनींही त्यांचा स्वीकार कदाचित् केला असता व त्या शिपायांना त्या कामगिरीबद्दल योग्य पारितोषिकही मिळालें असतें; पण चिमाजीअप्पा तेथें असल्यामुळें सारा बेत फिसकटला.

चिमाजीअप्पांनीं इतर कैद्यांना घेऊन येण्याला त्या दोन्ही तांडेलांना हुकूम केला. त्याप्रमाणे ते दोघेही निघून गेल्यावर अप्पांनीं त्या दोन्ही स्त्रियांना एका कोचावर बसावयाला सांगून म्हटलें, " बाई! हा पेशव्यांचा दरबार आहे; येथें तुम्हांला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. येथें तुमच्या केसालाही धक्का लागणार नाहीं. तुम्ही आम्हांला आमच्या वहिणींप्रमाणे आहां." त्या दोन्ही तरुणी कोंचावर बसल्यावर चिमाजीअप्पांनीं त्यांना विचारलें, " तुम्ही कोठून आलां ? "

त्या पोर्तुगीज तरुणींना मराठी बोली चांगली कळे; पण चांगलें मराठी बोलतां मात्र येत नसे. त्या धेडगुजरी मराठींतून बोलत. ( त्यांचें बोलणें ह्या कादंबरींत शुद्ध मराठींतच देण्यांत आलें आहे.) ती धाकटी तरुणी म्हणाली, " आम्ही मनोरीहून आलों. माझे वडील मनोरीला मठ बांधून राहिले आहेत. त्यांच्या भेटीला आम्ही गेलों होतों. आम्हांला तिकडे जाऊन आठ दिवस झाले. आंग्र्यां-च्या आरमारानें हा समुद्र व्यापण्याला सुरुवात केली आहे असें आम्हांला कळलें व त्यामुळें आमची कुचंबणा झाली होती. अखेर आम्ही ज्या जहाजांतून गेलों तें जहाज मुंबईहून माघारें येईपावेतों आम्ही थांबलों. जातांना माझे वडील सेनापति सिल्व्हेरा आमच्यावरोबर होते. ते तांतडीनें पुढें निघून गेले व आम्ही आमच्या जहाजांतून वसईला यावयाला निघालों, तों आपल्या यांचे लोकांनीं आमच्या जहाजावर हल्ला करून तें पकडलें."

" पहा धाकटे श्रीमंत ! ही सेनापतीची पोरही किती उद्दामपणानें बोलते पहा ! " अंताजी रघुनाथ उद्गारले.

" बाई ! खरें, तुमचीं दोघींचीं नांवें काय ? " चिमाजीअप्पांनीं प्रश्न केला.

धाकटी तरुणी उत्तरली, " माझें नांव पोर्शिया व हिचें नांव बार्बारा."

" पोर्शिया ! " बुबाजी गंगाजी नाइकांच्या कानाशीं लागून एकीकडे म्हणाला. " दादा ! हिच्याशींच किल्लेदाराचा मुलगा डोमिंगो याचें लग्न ठरलेलें आहे असें मीं काल ऐकलें."

चिमाजीअप्पा पोर्शियाला म्हणाले, "पोर्शियाबाई ! आमच्या लोकांना अशी उपमर्दकारक भाषा वापरणें बरें नाहीं. ज्यांनीं तुमचें जहाज पकडलें, ते चांचे नसून आमचे नेकजात दर्यावर्दी आहेत. त्यांनीं तुमचें जहाज पकडलें तें यथा-योग्यच केलें. ही लढाई आहे हें तुम्ही जाणतांच."

"पण आपल्या लोकांनीं आमची बरीच विटंबना केली." बार्बारा म्हणाली.

"आणि तुमच्या लोकांनीं आजवर आमच्या बायका लेंकी-सुना-बहिणींची काय थोडी विटंबना केली !" नाइकांनीं रागारागानें विचारलें.

चिमाजीअप्पा नाइकांना गप्प राहण्यासाठीं हातानें खूण करून त्या दोन तरुणींकडे वळून म्हणाले, "त्या लोकांनीं तुमची विटंबना केली असेल तर मात्र तो त्यांचा अक्षम्य गुन्हा झाला; त्याबद्दल त्यांना योग्य शासन करण्यांत आम्ही कसूर करणार नाहीं. सांगा, त्यांनीं काय केलें ?"

पोर्शिया उत्तरली, "त्यांनीं आमची चेष्टा केली. 'तुम्हीं आमच्या धन्याच्या रंगमहालांतील विलासदासी होऊन राहिलें पाहिजे, नाहींपेक्षां तुम्हांला समुद्रांत बुडवून ठार करूं' अशी धमकी त्यांनीं आम्हांला घातली."

"एवढेंच ना ! असो. ती त्यांची चूक झाली. त्या लोकांनीं 'जशास तसें' हा न्याय अंमलांत आणण्याचें योजिलें. तुमच्या लोकांनीं आजवर आमच्या हिंदु-स्त्रियांची जी विटंबना चालविली आहे, त्यामुळें चिडून ते लोक तसें बोलले असतील; पण आतां तुम्हांला भिण्याचें कांहीं कारण नाहीं." बाजीराव म्हणाले.

"तुम्हांला आतां कोठें जावयाचें आहे ?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

"वसईला." पोर्शिया उत्तरली.

"ठीक आहे. तुमची वसईकडे सुखरूपपणे रवानगी करून देण्यांत येईल." चिमाजीअप्पा म्हणाले.

इतक्यांत आंग्र्यांचे लोक बाकीच्या पोर्तुगीज कैद्यांना घेऊन तेथें आले. त्यांच्याबरोबर एक इंग्रज तरुणही होता. बाजीरावांनीं त्या इंग्रज तरुणाकडे बोट करून प्रथम विचारलें, "हा इसम ह्या पोर्तुगीज लोकांहून निराळा दिसतो. हा कोण ?"

"पेशवे सरकार ! मी त्यांच्यापासून निराळाच आहें. मी इंग्रज आहें. रॉबर्ट-सन् माझें नांव. इकडील कांहीं महत्त्वाच्या कामगिरीवर माझी नेमणूक झाली आहे. माझ्या नांवावरून आपल्या कांहीं मंडळीला तरी माझी ओळख पटलीच असेल.

माजी पोर्तुगीज सेनापति पेड्रो डिमे लो ठार झाला तो माझ्याच हातून. मराठ्यांना साह्य करण्यासाठीं इंग्रज गोलंदाजांची एक तुकडी ठाण्याच्या वेढ्याच्या वेळीं इकडे आली, त्यांत मी होतों. त्याच्याही पूर्वी मीं आमच्या सरकारच्या हुकुमावरून पोर्तुगीजांच्या वतीनें ठाणें, तारापूर, वसई वगैरे ठिकाणीं तोफखान्यावर काम केलें असल्यानें पोर्तुगीजांचीं बरींच गुह्यें मला माहीत आहेत." रॉबर्टसन् म्हणाला.

" असें काय ? मग रॉबर्टसन् ! तूं हकनाहक ह्या संकटांत सांपडलास. तुझी नोकरी आमच्याकडे रुजू आहे व तुझी आम्हांला अजून गरजही आहे; पण–"

रॉबर्टसन् चिमाजीअप्पांचें पुरतेपणीं बोलून होण्यापूर्वीच म्हणाला, " आणि माझ्याही मनांतून आपल्या आश्रयाला रहावयाचें आहे. मुंबईकर इंग्रजांचा मी नोकर पडल्यामुळें मला ही कामागिरी पत्करावी लागली हे जरी खरें, तरी ज्या जहाजावरून मी आलों, तें जहाज आपल्या लोकांच्या स्वाधीन होण्याच्या कामीं माझी बरीच मदत झाली आहे. पाहिजे तर आपल्या लोकांना विचारून पहा."

" गोष्ट खरी आहे सरकार !" मानाजीरावांनीं आपल्या वहिर्जी तांडेलाकडे वळून पहातांच वहिर्जी म्हणाला.

रॉबर्टसन् हा सोफियाचा प्रियकर होता हे वाचकांना माहीत आहेच. त्या दोघांच्या प्रेमसंबंधांत पोर्तुगीजांनीं विष कालविल्यामुळें तो चिडून पोर्तुगीजांवर उलटला होता. पेड्रो डि मेलोला ठार करून त्यानें अर्धवट सूड घेतला होता; पण तेवढ्यानें त्याचें समाधान झालें नव्हतें. आणखी सूड घेण्याचा त्याचा विचार होता व शिवाय त्याला सोफियाची प्राप्ति करून घ्यावयाची होती. ठाण्याचा किल्ला मराठ्यांच्या हातीं आल्यावर सोफियाला भेटून पुढील बेत पार पाडण्याचा त्याचा विचार होता; पण तेवढ्यांत मुंबईचें सरकार बदलून मराठ्यांच्या मदतीला आलेल्या गोलंदाजांच्या तुकडीला माघारें मुंबईला येण्याचा हुकूम सुटल्या-कारणानें सर्वांबरोबर रॉबर्टसनलाही माघारें जाणें भाग पडलें होतें. तेव्हांपासून पुन्हा वसईकडे येण्याचा रॉबर्टसनचा प्रयत्न सुरू होता. तोंच सेनापति सिल्व्हेरा इंग्रजांची मदत मागण्यासाठीं व कर्ज मागण्यासाठीं मुंबईला जाऊन पोंचला, तेव्हां रॉबर्टसनला संधि सांपडली. पण वसईला गेल्यावर तेथले लोक आपणांला ओळखतील व आपलें जीवित धोक्यांत पडेल हें त्याला माहीत होतें. म्हणूनच तो मध्येंच निसटण्याची वाट पहात होता. त्याच्या सुदैवानें त्याला तशी संधि लौकरच मिळाली. आंग्र्यांच्या जहाजांनीं मार्गांत त्या पोर्तुगीज जहाजाला

गांठलें तेव्हां रॉबर्टसननें तें जहाज पाडाव होईल अशी खबरदारी घेतली. त्यानें कसून गोलंदाजी चालविली असती तरी बहिर्जी तांडेल व हिरोजी तांडेल यांनीं तें जहाज हातचें सोडलें असतें असें मुळींच नाहीं; पण पोर्तुगीज जहाजावर फितूर झाल्यामुळें त्यांना उभयपक्षीं रक्तपात टाळतां येऊन जहाज पाडाव करतां आलें इतकेंच.

ठाण्याच्या वेढ्यांत मल्हारराव होळकरांनीं रॉबर्टसनची अप्रतिम गोलंदाजी पदरीं असणें श्रेयस्कर आहे असें त्यांना वाटून त्यांनीं बाजीराव, चिमाजीअप्पा यांना बाजूला घेऊन त्यांच्याशीं त्या बाबतींत वाटाघाट केली. सर्वानुमतें रॉबर्ट-सनला आपल्या पदरीं आश्रय द्यावा असे ठरलें. त्याप्रमाणें चिमाजीअप्पांनीं रॉबर्टसनला सांगितलें, "ठीक आहे, तुला आम्हीं आमच्या पदरीं आश्रय दिला आहे. तुझा तनखा वगैरे ठरवावयाचा तो मागाहून ठरवूं."

"कबूल आहे." रॉबर्टसन् उद्गारला. तो मराठ्यांना सामील झालेला पाहून साऱ्या मराठमंडळाला जितका संतोष वाटला, तितकाच तेथें कैद करून आणण्यांत आलेल्या पोर्तुगीज लोकांना व विशेषतः बार्बारा आणि पोर्शिया यांना विषाद वाटला; पण त्यांना विषाद वाटून उपयोग काय!

हिरोजी तांडेलानें चिमाजीअप्पांना विचारलें, "सरकार! आतां ह्या इतर कैद्यांची काय व्यवस्था करावयाची?"

चिमाजीअप्पा त्यावर कांहीं बोलण्यापूर्वीच त्या पोर्तुगीज कैद्यांपैकीं प्रमुख –त्या पोर्तुगीज जहाजाचा कप्तान फ्रॅन्सिस आतां आपणांपैकीं कोणाचीच धडगत नाहीं असा रंग पाहून निदान सर्वांचा जीव तरी बचावावा ह्या उद्देशानें बाजीराव व चिमाजीअप्पा यांना हात जोडून गयांपयां करून उद्गारला, "मेहेरबान सरकारांनीं आम्हांला जीवदान देऊन आपल्या पदरीं आश्रय दिल्यास आम्ही इमानेंइतबारें सरकारांची सेवा करण्याला तयार आहों. पण आमची बायकामुलें वसईच्या किल्ल्यावर अडकून पडल्यामुळें त्यांच्या जिवाला धोका पोंचणार नाहीं अशी हमी सरकारांनीं आम्हांला द्यावी."

मल्हारराव होळकर म्हणाले, "धाकटे श्रीमंत! आपला नारायण वसईच्या किल्ल्यावर कोंडला गेला आहे; यास्तव ह्या मंडळीपैकीं एकजणाला किल्ल्यावर पाठवून सेनापतीपाशीं नारायणाची मागणी करावी; नारायण सुखरूपपणें आमच्यांत येऊन पोंचेपर्यंत ह्या सर्व मंडळीला ओलीस धरलें आहे व नारायण

उद्यांच्या दिवसांत सुखरूपपणें आमच्याकडे येऊन पोंचला नाहीं तर ह्या सर्व मंडळीचा शिरच्छेद करण्यांत येईल असें सेनापतीला कळवावें."

बुबाजी म्हणाला, "नारायणराव ताबडतोब सुखरूपपणें आले नाहींत तर ह्या सर्व मंडळींचा शिरच्छेद करून त्यांचीं मुंडकीं नजराण्यादाखल पाठविण्यांत येतील असें सेनापतीला लिहावें. जशास तसें!"

ह्या भयंकर बेतांनीं सर्व पोर्तुगीज कैदी घाबरून भीतीनें लटलटा कांपूं लागले. बार्बारा व पोर्शिया ह्या दोघींनाही भीतीने कांपरें भरलें. पोर्शिया चिमाजीअप्पांना हात जोडून काकुळतीला येऊन विनवूं लागली, "मेहेरबान सरकारांनीं आम्हां दोघींना सुखरूपपणें किल्ल्यावर जाऊं द्यावें, म्हणजे आम्ही सरकारच्या माणसाची ताबडतोब मोकळीक होईल अशी व्यवस्था करण्याची हमी घेतों."

"आणि इतरांच्या बायकापोरांची काय वाट?" फ्रॅन्सीसनें पोर्शियाला विचारलें. त्याला व त्याच्याबरोबरच्या इतर पोर्तुगीज कैद्यांना पोर्शियाचा स्वार्थसाधूपणा मुळींच रुचला नाहीं.

पोर्शिया आपण सेनापतीची कन्या ही जाणीव मनांत ठेवून तोऱ्यांत उत्तरली. "तुम्ही सर्वजण आपण होऊन सरकारबहादुरांना शरण आलां आहां व आपल्या कामांत कुचराई करून आमच्या सरकारचें अपरिमित नुकसान केलें आहे. तुमच्या बायकांमुलांची हमी आम्हांला कशी घेतां येईल?"

"तर मग तुम्हां दोघींनाही तोंवर आमच्या कैदेंत रहावें लागेल." बाजीराव कठोर स्वरांत उद्गारले.

आतां हा प्रसंग कसा टाळावा याविषयीं पोर्शिया व बार्बारा यांचें आपसांत पोर्तुगीज भाषेंत कांहीं संभाषण झालें. तेवढ्यांत फ्रॅन्सिसनें बार्बाराला मध्येंच विचारलें, "बार्बारा! प्रिय बार्बारा! माझ्यावर तुझें जें प्रेम आहे तें खरें असेल तर तूं सर्वांची काळजी घेतली पाहिजे."

बार्बारा ही विधवा असून तिचें फ्रॅन्सिसवर व फ्रॅन्सिसचें तिच्यावर प्रेम होतें. फ्रॅन्सिसनें आपल्या पहिल्या बायकोशीं काडीमोड करून बार्बाराशीं लग्न करावयाचें फार दिवसांपासून ठरविलें होतें; व ती गोष्ट लौकरच अंमलांत यावयाची होती. फ्रॅन्सिसला स्वतःला कांहींच मूलबाळ नव्हतें व त्याच्या पहिल्या बायकोची तिकडे कांहींही गत झाली असती तरी त्याला तिची पर्वा नव्हती. पण असें असतांही तो आपल्या हाताखालच्या लोकांच्या बायकामुलांसाठीं कर्तव्य म्हणून अशा प्रसंगीं

काळजी वाहत होता. पण पोर्शियाला तें काय होय. तिला बार्बारा व फ्रॅन्सिस यांचा प्रेमसंबंध माहीत होता. पण ती केवळ स्वतःपुरतें पहाणारी मुलगी. ती फ्रॅन्सिसला म्हणाली, "फ्रॅन्सिस ! सर्वांच्या उठाठेवी तुम्हांला कशाला पाहिजेत ? तुम्ही तुमच्यापुरतें पहा व मीही वसईला गेल्यावर तुमच्या सुटकेची तेवढी खटपट जरूर करीन."

फ्रॅन्सिस पोर्शियावर रागावून म्हणाला, "पोर्शिया ! इतका स्वार्थी मी अजून बनलों नाहीं. माझ्या हाताखालच्या नोकरांची काळजी मी वाहिली नाहीं तर दुसरा कोण वाहील ?"

बार्बारालाही पोर्शियाचा स्वार्थसाधूपणा आवडला नाहीं. ती तिला म्हणाली' "पोर्शिया ! आज माझ्या प्रियकरावर प्रसंग आला आहे, तसाच जर डोमिंगोवर आला असता, तर तुला कसें वाटलें असतें ? तूं सेनापतींची एकुलती एक लाडकी मुलगी आहेस, तूं मनावर घेशील तर आपल्या पित्याकडून कोणतीही गोष्ट घडवून आणशील."

बार्बारानें केलेल्या मनधरणीचा पोर्शियाच्या मनावर बराच इष्ट परिणाम झाला. निदान तिनें बाह्यात्कारीं तरी पेशव्यांच्या दोन्ही अटी सेनापतीकडून तंतोतंत पाळल्या जाण्याविषयीं शक्य तेवढी खटपट करण्याचें कबूल केले. लगेच चिमाजीअप्पांनीं त्या दोघींनाही साडी-चोळी देऊन नंतर हिरोजीला आज्ञा केली, "हिरोजी ! ह्या दोन्ही बायांना आपल्या जहाजावरून सुखरूपपणे वसईच्या किल्ल्यावर नेऊन पावत्या कर. यांना कोणत्याही प्रकारचा त्रास होतां कामा नये, याद राख !" ते तसेच त्या दोघींकडे वळून म्हणाले, "तुम्ही सेनापतीला समजावून सांगा कीं, मराठ्यांचें सिंहासन धर्माच्या भक्कम पायावर उभारलेलें आहे, त्यामुळें त्या धर्म-सिंहासनासमोर तुमच्यासारख्या अधर्मकर्म्यांचा पाड मुळींच लागावयाचा नाहीं. मराठ्यांच्या अंगीं सामर्थ्य पुरेसें नव्हतें म्हणून ते तहाला तयार झाले होते असा जर सेनापतीच्या डोळ्यावर धूर आला असेल, तर त्याच्या बायकामुलांना देखील बंदिवान करून आणण्याइतकें चातुर्य व सामर्थ्य मराठ्यांच्या अंगीं असलेलें पाहून तो धूर कमी होईल व त्याचे डोळे उघडतील."

याप्रमाणें त्या दोन पोर्तुगीज तरुणींची चिमाजीअप्पांनीं गौरवपूर्वक पाठवणी केली, तें पाहून सर्वांना त्यांच्या औदार्याचें व दानतीचें अपरंपार कौतुक वाटणें

साहजिक होतें. इतका सज्जन धनी आपणाला लाभला असें पाहून त्या पोर्तुगीज कैद्यांनाही संतोष वाटला.

त्या दोघी तरुणी जावयाला निघाल्या तेव्हां बार्बारानें फ्रॅन्सिसचा अश्रुपूर्ण नयनांनीं निरोप घेतला, व 'परमेश्वर तुला सुखी ठेवो' अशी त्याच्याविषयीं तिनें परमेश्वराची करुणा भाकली. ती नंतर पोर्शियाबरोबर बंदरावर गेली व वसईकडे जाण्यासाठीं योजिलेल्या लहानशा जहाजावर चढतां चढतां पोर्शियाला म्हणाली, " हा चिमाजीअप्पा पेशवा दुस्मान खरा; पण दाणा आहे. अशा पुण्यपुरुषाशीं झगडून आम्हां पोर्तुगीजांना कधींच जय मिळायचा नाहीं."

पोर्शिया आंतल्या गांठीची होती; ती यावर कांहींच बोलली नाही.

त्या दोघीजणी वसईकडे रवाना झाल्यावर चिमाजीअप्पांनीं बाकीच्या सर्व पोर्तुगीज कैद्यांना बंधमुक्त करून त्यांच्या त्यांच्या दर्जाला साजेल अशी त्यांची व्यवस्था लावून दिली व ते पळून जाऊं नयेत म्हणून त्यांच्यावर फक्त नजरकैद ठेविली. नंतर पकडलेल्या पोर्तुगीज जहाजावरील सामानाची मोजदाद करण्यांत आली, तेव्हां कांही लांब पल्ल्याच्या तोफा, बऱ्याच सुधारलेल्या इंग्रजी बंदुका, बराच दारूगोळा, पुष्कळसें धान्य व कांही रोकड एवढा माल हातीं लागला. त्यामुळे मराठ्यांच्या पूर्वनियोजित बेतांना विशेष बळकटी आली. त्या पोर्तुगीज मुलींच्या मध्यस्थीने नारायणरावाची सुटका होईल किंवा अन्य कांहीं कार्यभाग साधेल अशी फारशी आशा कोणालाही नव्हतीच. त्यामुळें प्रत्येक जण त्याच दिवशीं आपापल्या उद्योगाला लागला. त्या खटपटींत सर्वांना विशेषतः खंडूजी माणकर, नाईक वगैरे स्थानिक मंडळीला भवानजी, त्याचा मुलगा भैरव व दुल्लभजी यांची वाण भासत होती. पण ते तिघेही त्या वेळीं कोणत्या प्राणघातक संकटांत सांपडले होते याची कोणाला काय कल्पना असणार!

प्रकरण पांचवें

## फादर पोर्टोच्या न्यायासनासमोर

आतां आपणाला पोर्तुगीज अंमलांतील धर्मशासनाचें भेसूर नाटक पहाण्यासाठीं पुन्हा पूर्वस्थळीं—चुळणें येथील देवीच्या देवालयासमोर गेलें पाहिजे.

सोफियाबरोबर आलेल्या त्या दोन तरुण व सुंदर मुलींपैकीं जिच्यावर त्या अधिकाऱ्याची पापी दृष्टि खिळून बसली होती, ती सुमारें अठरा वर्षांची होती. तिचा वर्ण गोरा होता व त्या गोरेपणांत गुलाबी रंगाची लाली मधून मधून मिसळली होती. नाजूक तर ती इतकी होती कीं, सूर्योदयाच्या बालकिरणांच्या तिरपींतून चालल्यामुळे देखील तिच्या मूळच्या गुलाबी गालांवर लालिमा पसरली होती. तिचे डोळे विशाल व पाणीदार होते, तरी पापवासना मनांत धरून तिच्याकडे पहाणाऱ्या कोणाही पापात्म्याला भय दाखविणारे निदान 'मी त्या गांवची नाहीं' असें दाखविणारे होते. तिचें नाक अणकुचीदार होतें. व तें तिच्या नाकावर राग असल्याची साक्ष देत होतें. तिचा बांधा मध्यम उंचीचा व फार स्थूलही नाहीं व फार कृशही नाही असा सडपातळ होता. तिचा कटिभाग इतर शरीराच्या मानानें किंचित् निमूळता होता, त्यामुळें तिच्या लावण्यांत विशेष भर पडली होती. तिनें आपल्या लांबलचक सडक काळ्याभोर केंसांची वेणी वळून आपल्या पृष्ठभागावर मोकळी सोडली होती, व त्या वेणीच्या अग्राला फुलें गुंफलेलीं होतीं. तिचा पेहराव अगदीं साधा होता. तिनें एक साधी साडी परिधान केली होती व अंगांत साधी चोळी घातली होती. तिचे पाय मोकळेच होते. मात्र तिच्या अंगावर एकही अलंकार नव्हता व तिच्या भालप्रदेशावर कुंकुमतिलक नव्हता. त्यामुळे दोन भुंवयांच्यामध्यें गोंदलेली चंद्रकोर स्पष्टपणें उमटून दिसत होती. ती मुलगी कोणी उच्चवर्णीय हिंदु असावी अशी साक्ष तिला पहातांच सकृद्दर्शनींच कोणाच्याही मनाला पटण्याजोगी होती. विशुद्ध वृत्तीच्या माणसाला तिच्याकडे पाहून तिच्या ललाटीं कुंकुमतिलक नाहीं हें अवलोकन करून ती कोणी हिंदु बालविधवा तरी असावी किंवा बाटून ख्रिस्ती झाली असावी असें वाटून तिची कींव आली असती; पण त्या अधिकाऱ्याचें मन पापी असल्यानें त्याला त्याच एका कारणामुळें किंचित् धिटाईनें तिच्याकडे पहातां येत होतें. त्या मुलीबरोबरची दुसरी

मुलगीही बरीच रूपवान होती; पण तिनें रूपापेक्षां नखरा बराच केला होता. ती वयानें पहिलीपेक्षां थोडी मोठी होती. ती जरी चर्येवरून जन्मतः हिंदु असावीसें दिसत होतें, तरी तिचा एकंदर पेहराव बाटग्या मुलीला साजेसा होता. तिच्या पायांत बऱ्याच उंच टांचेचा मखमालीचा विदेशी थाटाचा जोडा होता व तिनें धारण केलेले अलंकार–पेहराव यांतही विदेशीपणाची स्पष्ट झांक मारत होती. तिच्याही ललाटीं कुंकुमतिलक नव्हता; पण तिचें उघडें कपाळ तिच्या पेहरावाला तसेंच साजेसें होतें. ती एकटीच कोठें गेली असती, तर तिनें कोणाचेंही विशेषतः रंगेल व चिछोर वृत्तीच्या समाजकंटकांचें चित्त आपणांकडे खास वेधून घेतलें असतें; पण त्या दुसऱ्या स्वरूपसुंदर मुलीशेजारीं ती उभी असल्यानें गुलाबाच्या फुलाशेजारीं कण्हेरीचें फूल ठेवल्याप्रमाणें तिच्या नखरेबाज सौंदर्याचा नूर अगदीं उतरून गेला होता.

त्या दोन मुलींच्या रूपांत व वेशभूषणांत जसें अंतर होतें, तसेंच त्यांच्या वृत्तींतही अंतर होतें. पहिली मुलगी नेहमीं अंतर्मुख दृष्टीनें आत्मनिरीक्षण करण्यांत अथवा आणखी कसल्या तरी गूढ परिस्थितीचा विचार करण्यांत गढून गेली आहे व तिचें सभोंवारच्या जगाकडे फारसें लक्ष्य नाहीं असें दिसे; तर दुसरी मुलगी लोलुपतेनें डंवरलेल्या चंचल दृष्टीने सभोंवारच्या जगाकडे पहात असलेली दिसे; पण याचा परिणाम मात्र कांहींसा उलट होई. एखादी वस्तु जितकी दुष्प्राप्य तितका त्या वस्तूचा हव्यास मनुष्यमात्राला जास्त, ही जगाची रीत असल्यानें त्या दोन मुलींना एकत्र पहातांच दुसऱ्या उत्सुक मुलीकडे पहाण्यापेक्षां पहिल्या अनुत्सुक मुलीकडे पहाण्यालाच जो तो उत्सुकलेला असे.

आजदेखील त्या दोन मुली देवालयाच्या आवारांत प्रविष्ट होतांच तसेंच झालें. आतां देवालयासमोरचा एकंदर देखावा भयाण व भविष्यकाळाविषयीं अनर्थसूचक असा असल्यानें इतर चित्तवेधक गोष्टींकडे चित्त वेधलें जाण्याइतकी तेथल्या जनसमाजाची चित्तवृत्ति प्रसन्न नव्हती हें खरें. तरी पण त्या अधिकाऱ्याची दृष्टि त्याच एका मुलीकडे प्रथम वळतांच सर्वांना कल्पना करतां आली कीं, ही त्या स्वारीची दृष्टि पापी आहे. त्या अधिकाऱ्यानें समोर आलेल्या दोन मुलींपैकीं जिच्याकडे पाहिलें, तिनें त्याच्याकडे मुळींच पाहिलें नाहीं; पण जिच्याकडे त्यानें पाहिलें नाहीं, ती मात्र लुब्रेपणानें त्याच्याकडे पहात होती.

तो अधिकारी पालखी पहातांच त्या पहिल्या मुलीकडे नेत्रकटाक्ष फेंकीत

पालखीकडे गेला. तोंच पालखीचा पडदा अंमळ बाजूला सरकला जाऊन त्यांतून एक गोंडस गोरापान हात अर्धवट बाहेर आला. त्या अधिकाऱ्यानें अधीरपणें पुढें जाऊन तो हात आपल्या हातीं धरून त्याचें चुंबन घेण्याकरितां तो आपल्या ओंठापाशीं नेतां नेतां हांक मारली, "सोफियाबाई !"

त्या अधिकाऱ्यानें चुंबन घेण्यापूर्वींच तो हात एकदम एका नाजुकशा हिसड्यासरसा आंत ओढला गेला. तो सोफियाचाच हात होता. सोफियानें दोन्ही हातांनीं पालखीचे पडदे बाजूला सारून बाहेर डोकावून पाहिलें, तों त्या अधिकाऱ्याची चर्या ओशाळलेली तिला दिसून आली.

सोफियानें प्रथम भोयांना पालखी खालीं उतरण्याला सांगितलें. पालखी खालीं उतरलेली पहातांच पहिल्याप्रथम पुढें आलेल्या त्या दोन मुली पालखीपाशीं धांवत गेल्या व त्यांनीं सोफियाला आधार देऊन पालखींतून उतरवून घेतलें. त्या दोघींच्या मानेभोंवतीं एकेक हात ठेवून पालखीबाहेर पदार्पण करतां करतां सोफिया अधिकाऱ्याकडे आपले विषारी नेत्रकटाक्ष फेंकीत स्मित हास्यपूर्वक उद्गारली, "कोण ? अँन्टोनिओ ! तुम्ही का ते ? मला वाटलें हा कोणी तरी भलताच चव्हाटळ काळा अदमी आहे !"

"एकूण तुझी अशी फसवणूक झाली म्हणावयाची तर !" असें म्हणून त्या अधिकाऱ्यानें–सोफियाच्या तोंडून आपणांला माहीत झालेल्या अँटोनिओनें–पुन्हा एकवार सोफियाचा हात आपल्या हातीं घेऊन त्याचें चुंबन घेण्याचा प्रयत्न केला. पहिल्या वेळीं सोफियानें नजरचुकीनें आपणांला न ओळखल्यामुळे हात मागें घेतला, तसें आतां तरी ती खास करणार नाहीं अशी अँटोनिओला आशा होती.

पण याही वेळीं त्याची ती आशा निर्फळ झाली. सोफियानें पुन्हा किंचित् हंसून हलकेच आपला हात आंखडता घेऊन म्हटलें, "छे, छे ! अँटोनिओ ! हें काय ?"

"कां ? काय झालें ?" अँटोनिओनें विषण्ण चित्तानें विचारलें.

"काय झालें म्हणून काय विचारतां ? हे इथें इतके लोक जमले आहेत; इतक्यांच्या देखत तुमच्यासारख्या नेटिव्हाला मीं माझ्याशीं इतकी सलगी करूं दिली तर हे लोक मला काय म्हणतील ?"

सोफियानें 'नेटिव्ह' हा शब्द 'काळा हिंदी माणूस' ह्या अर्थानें तुच्छतापूर्वक

उच्चारला होता. तो अर्थ अँन्टोनिओच्या तेव्हांच ध्यानीं आला. तो तेव्हां सोफियाविषयीं 'काय ही गोरी भिकारीण माजोरी आहे ! एवढा मोठा मान्यतेचा सरदार व लष्करांतील एक बडा अधिकारी मी आहें हें हिला माहीत असूनही ही मला नेटिव्ह म्हणून माझा उपमर्द करते' असें मनांत म्हणाला. पण तें मनांत म्हणाला, जनांत उघडपणें तसें बोलण्याची त्याची छाती झाली नाहीं. उलट त्यानें तो प्रश्नच अजिबात सोडून देऊन तिला विचारलें, "आज तुम्हीं आमच्या-कडेच पाहुणचार घ्यावा."

"वा: ! अँटोनिओ ! तुम्ही बडे माणूस माझ्यासारख्या भिक्षेकरिणीला तुम्हीं शब्दानें एवढा मान दिला हाच पुष्कळ झाला. पण मी आज इथें पाहुणचार घेण्यासाठीं आलेली नाहीं; भिक्षा म्हणा–देणगी म्हणा–खंडणी म्हणा–जें काय म्हणाल तें गोळा करण्यासाठीं आलें आहें. ह्या गांवांत मी आज पहिल्यानेंच आलें आहें व तीही केवळ तुमचें थोर नांव ऐकून. तुमच्यासारखा कोणी एखादा माहितीचा व मान्यतेचा सज्जन माणूस ज्या गांवीं नाहीं त्या गांवीं मी कधींच जात नाहीं. हो ! नेम काय ! हे काळे लोक म्हणजे अगदीं रानटी–निव्वळ पशु असतात. मदतीसाठीं यांच्या दारीं येण्यांत मला कमीपणा वाटतो. तेव्हां मला तुम्ही तुमच्या गांवांतून घरटीप देणगी वसूल करून दिली पाहिजे."

"ठीक आहे. पण त्यासाठीं तुम्हांला आज दोनप्रहरपर्यंत तरी इथें रहावें लागेल. कारण सध्यां मी कांहीं गुन्हेगारांची चौकशी करण्यांत गुंतलेला आहें. आतां इतक्यांतच पोर्टोसाहेब येतील, ते गुन्हेगारांना शिक्षा ठोठावतील, त्या शिक्षेची अंमलबजावणी एकवार माझ्या डोळ्यांदेखत झाली कीं माझें काम झालें. मग माझा मार्ग निष्कंटक झाला." अँन्टोनिओ म्हणाला.

"एकूण आजचे आरोपी तुमच्या वाटेंतील कांटे आहेत म्हणायचे !" सोफिया म्हणाली.

"होय." अँन्टोनिओ उद्गारला. "ते माझ्या मार्गांतील कांटे आहेत, इतकेंच काय पण ते आपल्या पोर्तुगीज सत्तेचे जबरदस्त शत्रु आहेत. ते मराठ्यांचे कट्टे पक्षपाती आहेत."

"काय ? ते आपले शत्रु आहेत ?"

"होय."

"आणि ते मराठ्यांना सामील आहेत ?"

" होय."

" तर मग त्यांना जरूर शासन झालें पाहिजे. चांगलें देहान्त शासन झालें पाहिजे."

" त्यांना देहान्त शासन व्हावयाचें हें तर ठरलेलेंच आहे."

" तो देखावा मला आतां पाहायला मिळेल का ? "

" अलबत ! "

" तर मग मी थांबतें. मीं आजवर आमचें धर्मशासनमंडळ अपराध्यांना कसें शासन करतें याविषयींच्या अनेक गोष्टी ऐकल्या आहेत; पण प्रत्यक्ष शासन होतांना पाहिलेलें नाहीं. तो देखावा आज अनायासें पाहायला मिळणार म्हणायचा तर ! "

" तर मग चला ना ! " थोडा वेळ तेथेंच बसा; म्हणजे तुमच्या डोळ्यांचें पारणें फिटेल."

" चला."

लगेच ॲन्टोनिओ पुढें चालूं लागला व त्याच्या मागोमाग सोफिया आपल्या दोन दासींच्या आधारानें मंद मंद पावलें टाकीत चालूं लागली. तिला देवालया-समोर मांडलेल्या उच्चासनापर्यंत पोंचावयाला किती तरी वेळ लागला. तिच्या एकंदर डामडौलावरून तिला भिकारीण म्हणण्याचें धैर्य कोणालाही झालें नसतें. तिचा वेष, तिचे अलंकार, तो पालखीचा थाट, असलें राजवैभवाशीं टक्कर देणारें वैभव जिच्या चरणीं लोटांगण घेत होतें, तिला भिकारीण कोण म्हणेल ! मात्र तिचा प्रत्येक अलंकार खोटा होता, फार काय, तिच्या हातांतील आंगठ्या-देखील खोट्या खड्यांच्या होत्या, हें मार्मिक दृष्टीनें पहाणाराला तेव्हांच कळून आलें असतें.

ही वेषभूषणांची गोष्ट झाली; पण स्वतः सोफिया तरी कुठें खरी होती ! मऊ मखमालीच्या भरगच्ची म्यानाच्या पोटीं तिखट पात्याची तरवार असते, त्याप्रमाणें तिच्या मऊ गोऱ्या कातडीखालीं झांकलें गेलेलें तिचें अंतःकरण कठोर व काळें-कुट्ट होतें. ती मुद्दाम अपराध्यांना देहान्त शासन कसें देतात हें पाहून आपल्या जिवाची करमणूक करून घेण्यासाठीं सभास्थानीं आली व कोणते अपराधी लोक आतां धर्मशासनाच्या खेळखंडोबाला बळी पडावयाचे हें पाहून पोट धर-

धरून हंसूं लागली, तेव्हां सर्व लोकांना वाटलें कीं, ही माणूस आहे कीं राक्षसीण आहे! ती एक मानवी राक्षसीण आहे, हें तेथल्या लोकांना काय माहीत!

धर्मशासन-मंडळाच्या न्यायदानाचें नाटक कसें असतें हें तेथें जमलेल्या लोकांना माहीत नव्हतें असें नाहीं; पण तरीही न्यायकचेरी म्हटली कीं, अपराध्याला आपला बचाव करण्याची संधी मिळेल अशी भ्रामक आशा तरी असते. कधीं ती आशा फलद्रूप होते; कधीं होत नाहीं. निदान तेव्हांच्या धर्मशासन-मंडळाच्या न्यायदानांत अपराध्याला शीलभ्रष्टतेचा व धर्मभ्रष्टतेचा डाग आपल्या चारित्र्याला लावून घेऊन जीव बचावण्याची तरी आशा असे. पण ॲन्टोनिओचें सोफियाशीं आतांच झालेलें संभाषण ऐकून तेथल्या सर्व मंडळीला कळून चुकलें कीं, आजच्या धर्मशासनांत चौकशीपूर्वीच अपराध्याला प्राणदंडाची शिक्षा ठोठावण्यांत आली आहे!

सोफिया जी सभास्थानीं आली, ती एकदम ॲन्टोनिओ शेजारच्या उच्चासनावर बसली. तें उच्चासन धर्मगुरु फादर पोर्टो यांच्यासाठीं मांडून ठेवण्यांत आलें होतें व सोफियासाठीं ॲन्टोनिओनें तेथे आणखी एक उच्चासन मांडविलें होतें; पण सोफिया त्या आसनावर बसावयाचें सोडून धर्मगुरूच्या परमोच्च आसनावरच बसलेली पहातांच ॲन्टोनिओ तिला म्हणाला, "सोफियाबाई! तें उच्चासन फादर पोर्टोसाठीं मांडण्यांत आलें आहे."

सोफिया बेफिकीरपणें म्हणाली, "मग त्यांत काय झालें? फादर पोर्टो आले तर त्या आसनावर बसतील. त्यांना कांहीं यांत अपमान वाटायचा नाहीं. फादर पोर्टोच तुमचे धर्मगुरु आहेत का?"

"होय."

"तर मग त्यांना 'फादर' मींच केलें आहे. त्यांचा अधिकार व मान मोठा तुम्हां काळ्या लोकांत; माझ्याशीं ते नम्रतेनेंच वागतील. पाहिजे तर आतांच प्रत्यंतर पहा." सोफिया समोरच्या चौघां बंदिवानांकडे पाहून बेफिकीरपणानें ॲन्टोनिओला म्हणाली. "तें राहो; पण ॲन्टोनिओ, हेच तुमचे आरोपी काय?"

ॲन्टोनिओ उत्तरला, "होय, हे मुख्य आरोपी."

सोफिया त्या चार अभागी बंदिवानांपैकीं त्या स्त्रीकडे पाहून लगेच ॲन्टोनिओकडे वळून म्हणाली, "तर मग तुम्ही असें का करीत नाहीं? ती स्त्री तुम्ही मला का देऊन टाकीत नाहीं?"

" तुम्हाला तिचा काय उपयोग आहे ? "

" माझ्या व्यवसायांत तिचा मला चांगला उपयोग होईल; कारण ती सुंदर आहे, तरुणही आहे. अशा दासी सहसा मिळत नाहींत. तुम्ही पाहिजे तर ती दासी मला विकत द्या. बोला, तिची काय किंमत ? "

" तिची विक्री करण्याचा अधिकार मला नाहीं. फादर पोर्टो तिचा काय न्याय करतील तो खरा."

सोफिया हंसून म्हणाली, " फादर पोर्टोच न्याय करणार ना ? मग ते माझ्या शब्दाबाहेर कधींच जायचे नाहींत. बरें; पण केव्हांसे येणार आहेत ते ? "

इतक्यांत जॉन या नांवाचा एक शिपाई फादर पोर्टोच्या शोधार्थ गेला होता, तो फादर पोर्टोसह माघारा आला. फादर पोर्टो देवालयाच्या प्रवेशद्वारापाशीं आलेला पाहून अँन्टोनिओ त्याला सामोरा गेला. इतर लोक तेथें बसले होते, त्यांना तेथल्या बंदोबस्ताच्या शिपायांनीं लाथा मारून फादर पोर्टोच्या सन्मानार्थ उभें रहावयाला लावलें. सोफिया मात्र आपल्या आसनावरून मुळींच उठली नाहीं व शिपायांनींही तिला उठविलें नाहीं. नाहीं म्हणावयाला एका शिपायानें तिच्या उच्चासनापाशीं जाऊन 'मेमसाहेब ! फादर पोर्टोसाहेब आले', असे सूचक शब्द उच्चारले; पण सोफियानें 'मला माहीत आहे', असें उडवाउडवीचें उत्तर देऊन त्याची बोळवण केली.

फादर पोर्टो हा ऐन तिशीच्या उमरीचा तरणाबांड उमदा पोर्तुगीज गडी होता. दोन वर्षांपूर्वी तो गोव्याहून लष्करांत भरती होऊन वसईकडे आला तेव्हां एक अगदीं सामान्य शिपाईगडी होता. तेव्हां अँन्टोनिओच्या हुकमतींत कांहीं दिवस त्यानें सैनिकाचें काम केलें होतें. त्यानंतर तो मान्यतेला चढतां चढतां अवघ्या दोन वर्षांत ख्रिस्त्यांचा एक धर्मगुरु व मंडपेश्वरच्या धर्मशासन-मंडळाचा एक सदस्य झाला होता आणि त्याच्या अधिकाराशीं तुलना करतां अँन्टोनिओचा अधिकार आतां दुय्यम प्रतीचा ठरून अँन्टोनिओ त्याच्यापुढें आज्ञाधारक सेवकाप्रमाणें नमून वागूं लागला होता. इतक्या जलदीनें पोर्टोचें भाग्य उदयाला कसें आलें हें पुढें कळेलच.

कां नकळे; पण आज फादर पोर्टोची चर्या पिसाळलेल्या हिंस्र पशूसारखी क्रुद्ध दिसत होती. त्याला इतकें पिसाळण्याला काय कारण झालें असावें याविषयींचे तर्कवितर्क अँन्टोनिओच्या डोक्यांत धिंगाणा घालीत आहेत तोंच तो अँन्टो-

निओच्या अंगावर वसकन् ओरडून म्हणाला, "ॲन्टोनिओ ! तुम्ही दगलबाज आहां असें माझ्या प्रत्ययाला आलें आहे. कां कीं, तुम्हीं माझ्या आज्ञेप्रमाणें रात्रीं एथल्या बंडखोरांचा बंदोबस्त नीट केला नाहीं. त्यावरून तुम्हीही बंड-वाल्यांना सामील आहां असें माझें मत झालें आहे. मीं धर्मशासन-मंडळासमोर तुमची चौकशी कां करूं नये ?"

"साहेब ! मीं बंदोबस्त नीट केला होता."

"तर मग कळीचा कांटा दुल्लभजी मोरे तुमच्या बंदोबस्तांतून कसा निसटला ? शंभर सशस्त्र सैनिक उभी रात्र ह्या गांवकऱ्यांच्या छाताडांवर नाचत असतां तेवढा एक अस्सल बेरड कसा मोकळा सुटला ?"

जी शंका थोड्या वेळापूर्वी ॲन्टोनिओला आली होती, तीच अखेर खरी झाली; नेमकी दुल्लभजी मोऱ्याविषयींची ओरडच त्याच्या कानीं आली. त्यानें जॉनकडे वळून दरडावून विचारलें, "हरामखोरा ! हा तुझ्या हलगर्जीपणाचा परिणाम !" लगेच तो पोर्टोकडे वळून म्हणाला, "साहेब ! हा कामचुकारू शिपायी दुल्लभजीच्या सुटकेबद्दल जबाबदार आहे. हा रात्रभर त्या घरावर पहाऱ्यासाठीं होता. हा पहारा करतां करतां झोंपला असेल, म्हणून गुन्हेगार निसटला."

जॉन दीनवाण्या मुद्रेनें दोन्ही हात जोडून उद्गारला, "नाहीं सरकार ! मी झोंपलों नव्हतों; मी जागाच होतों."

"तर मग हा पट्टीचा लुच्चा असला पाहिजे. त्याच्या जागेपणीं ज्या अर्थी दुल्लभजी निसटला, त्या अर्थी ह्यानें त्याच्यापासून लांच खाल्ली असली पाहिजे. त्याला त्याच्या अपराधाबद्दल कडक शासन होणें अवश्य आहे."

फादर पोर्टो जॉनला म्हणाला, "ए बेवकूब ! चल नीघ, व दोन प्रहरच्या आंत त्या हरामखोराला पकडून माझ्यासमोर घेऊन ये. त्याला मीं लोहस्तंभाशीं बांधून जिवंत जाळण्याची शिक्षा फर्माविली आहे. याद राख, दोनप्रहरपर्यंत जर त्याला आणून माझ्यासमोर हजर केलें नाहींस, तर त्याच्याऐवजीं तुला ती शिक्षा देण्यांत येईल. कां कीं, तुझ्या हलगर्जीपणामुळें तो सैतानाचा पोर मोकळा सुटला आहे. लगेच तो ॲन्टोनिओकडे वळून म्हणाला, "त्याप्रमाणेंच आतां भैरवेश्वरापाशीं त्या काफराच्या पुढारीपणाखालीं ज्या पांच माणसांनीं माझ्यावर हल्ला करून तेथल्या प्रार्थनामंदिरांतील क्रूस उपटून बाहेर फेंकून दिला, त्यांनाही

पकडून माझ्यासमोर आणण्यांत आलें पाहिजे. त्यांना मीं ह्या अग्निकुंडांत जाळून ठार मारण्याची शिक्षा दिली आहे, त्या शिक्षेची अंमलबजावणी आतांच्या आतां झाली पाहिजे."

"काय, साहेब ! आपणावर कोणा बदमाषांनीं हल्ला केला ?" ॲन्टोनिओनें विचारलें.

"होय." फादर पोर्टो उत्तरला.

"ते कोण होते ? ते माझ्या माहितीचे नाहींत. पण ते दुळूभजीचे साथीदार असावे."

"ते त्याचे साथीदार असतील; पण आतां त्यांना कसे ओळखावयाचे ?"

"कसे ओळखावयाचे हें काय विचारतां ? ते लोक तेथेंच आजूबाजूला रहाणारे असले पाहिजेत. तेथल्या सर्व लोकांना पकडून आणून चौकशी करा, व त्यांनीं जर खऱ्या गुन्हेगारांचीं नांवें सांगितलीं नाहींत तर त्या सर्वांना अग्निकुंडांत लोटा. बस्स ! माझी अशी आज्ञा आहे कीं, ह्या गांवच्या सर्व लोकांना कठोर शासन करण्यांत येऊन त्यांच्या अंगचा सैतान गाडला पाहिजे. कां कीं, त्यांच्या अंतःकरणांत सैतानानें घर केलें आहे. त्यांच्या मनाचा ताबा सैतानानें घेतलेला आहे. आज इतकीं वर्षे आमच्या प्रभूचा पवित्र धर्म ह्या गांवीं प्रचलित असतां देखील हे लोक आमच्या धर्माज्ञा मोडून आमच्या शत्रूंना—सैतानांच्या कैवाऱ्यांना—मराठ्यांना सामील आहेत, त्यांची गय करून उपयोगाची नाहीं."

"पण साहेब ! आपल्या हुकुमाची अमान्यता करून कालू गांवांत गुढ्या उभारण्याचा अपराध ज्यांनीं ज्यांनीं केला, त्यांना सर्वांना आज येथें पकडून आणण्यांत आलें आहेच; व ज्यांच्या आगलाव्या उपदेशामुळें एवढी बजबजपुरी गांवांत गेले तीन-चार दिवस माजली आहे, त्या दोघांना त्याच्या परिवारासह सांखळदंडांनीं बांधून येथें आणण्यांत आलें आहे. त्यांना आपण कठोर शासन केल्यानें आपला कार्यभाग होईल असें मला वाटतें. त्यासाठीं इतर निरपराधी लोकांना छळण्यांत काय अर्थ ?" ॲन्टोनिओनें विचारलें.

"निरपराधी व अपराधी ! ॲन्टोनिओ, इतर लोक निरपराधी आहेत असें तरी तुम्ही कशावरून म्हणतां ? चार-दोन गुंडांनीं आता दिवसांढवळ्या माझ्यावर हल्ला केला तेव्हां कोणीच लोक माझ्या साह्यासाठीं धांवून आले नाहींत,

ह्या काय त्यांचा लहानसान अपराध झाला ? तें कांहीं नाहीं. तुम्हीं माझ्या धर्मशासनाची अंमलबजावणी केलीच पाहिजे, नाहींपेक्षां तुम्ही देखील शत्रूला फितूर आहां असें समजून तुमच्याविरुद्ध कडक उपाययोजना करण्यासाठीं मला सेनापतीला सांगावें लागेल." अशी निर्वाणीची आज्ञा करून फादर पोर्टो आपल्या बैठकीच्या जागेकडे वळतो, तोंच सोफियाला त्यानें पाहिले, व सोफियानें त्याला पाहिलें. त्याबरोबर दोघेंही मनापासून हंसलीं.

फादर पोर्टोनें सोफियाच्या उच्चासनापाशीं जाऊन तिचा हात आपल्या हातीं घेऊन त्याचे चुंबन घेतां घेतां विचारलें, "ओहो ! सोफिया ! तूं इकडे कुठें ?"

सोफिया फादर पोर्टोला संतोषानें आपल्या हाताचें चुंबन घेऊं देतां देतां उद्गारली, "माझें काय ? 'जिकडे घोडा तिकडे मुलूख थोडा'. आज तुमचें वास्तव्य ह्या गांवी आहे असें मला कळलें म्हणून इकडे आले. आपल्याच जातीचा पाठीराखा कोणी जवळ असल्याशिवाय मी अशा खेडेगांवीं कधींही येत नाहीं."

"तें बरोबर ! आपल्या लोकांनीं इतकी सावधगिरी बाळगलीच पाहिजे. कारण हे काळे लोक मोठे विश्वासघातकी असतात. हेंच पहाना, मी येवढा मोठा धर्माधिकारी, एवढी सत्ता माझी पाठीराखी, तरी त्या एका बंडखोर हरामखोरानें माझा जीव घेण्याचा प्रयत्न करण्याला कमी केलें नाहीं." फादर पोर्टो सोफियाजवळच्या दुसऱ्या उच्चासनावर अधिष्ठित होऊन म्हणाला.

"ते सारे मी आतां ऐकत होतेंच. अशा लोकांना तुम्हीं देऊं केले आहे तेंच शासन योग्य आहे. एरव्हीं हे लोक वठणीला यायचे नाहींत. बरें;—" असें म्हणून सोफियानें आपल्या बरोबरच्या त्या अत्यंत सुंदर मुलीकडे एकवार नजर फेकून जीभ चावली व ती क्षणभर थांबून पुन्हा म्हणाली, "पण इतक्यांत नको."

फादर पोर्टोचेंही त्या सुंदर मुलीकडे लक्ष्य गेलें व त्यानें सोफियाला विचारलें, "ओहो ! सोफिया ! ही परी तूं कुठें पैदा केलीस ?"

सोफिया म्हणाली, "तिच्याविषयींच मी बोलणार होतें. तुमचें व माझें एका बाबतींत आठ दिवसांपूर्वी मंडपेश्वरीं मेरी नांवाच्या एका मुलीविषयीं बोलणें झाले होतें; आठवतें का तुम्हांला ?"

"होय, आठवतें. तीच का ही मुलगी ?"

" होय, पण प्रथम तुमचें धर्मशासन‡ आटोपूं दे, मग आपण त्या बाबतींत बोलूं. एक गोष्ट मात्र मी तुम्हांला प्रथमच सुचविणार आहें." सोफिया आपणा-

‡ ख्रिस्ती धर्मांत रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट हे दोन पंथ सध्यां आहेत. रोमन कॅथॉलिक पंथ हा जुना व प्रॉटेस्टंट हा नवा पंथ होय. इ० सनाच्या सोळा-व्या शतकांत युरोपांत धर्मसुधारणेची प्रचंड लाट उसळून रोमन कॅथॉलिक पंथ मागें पडूं लागला; तेव्हां तिकडील राजे व धर्माधिकारी हे जुन्या पंथाचे असल्या-नें त्यांनीं नवीन पंथाचा उच्छेद करण्यासाठीं 'Inquisition' या नांवाचें एक धर्मशासनमंडळ स्थापन केलें होतें. या संस्थेचा मूळ उद्देश विधर्मी लोकांना शासन करण्याचा होता; पण युरोपांत त्याचा प्रयोग भिन्नभिन्न पंथांच्या लोकांवर सर्रास करण्यांत येत असे. हीच धर्मशासनमंडळाची संस्था पोर्तुगीज लोकांनीं हिंदुस्थानांतील आपल्या राज्यांत सुरू केल्यामुळें एथेंही अनंत घोर अनर्थ ओढवले. ह्या धर्मशासन-मंडळाचा कारभार जसा युरोपांत तसाच हिंदुस्थानांतही सुरू होता व दोन्ही ठिकाणची शासनप्रणालिही एकच होती. यास्तव युरोपांत ह्या मंडळाचा कारभार कसा असे हें थोडक्यांत सांगितल्यानें युरोपाहून अगदीं परक्या अशा हिंदुस्थानांत त्या कारभाराची काय अवस्था होती हे आपोआप कळण्याजोगें आहे. ह्या अपूर्व न्यायपीठावर कोणाचेंही अपील चालत नसे. त्यांचे हेर प्रत्येक कुटुंबांत राहून कोणाचीं काय मतें आहेत याची वातमी काढून शासन-मंडळाला कळवीत व मग न्यायाधीश मंडळी लोकांना त्यांच्या मतांबद्दल शासन करी. प्रत्यक्ष कृत्यांबद्दल शासन करावयाचें,मतांबद्दल शासन करावयाचें नाहीं,हा कायद्याचा मुख्य उद्देश मंडळानें प्रथमपासूनच गुंडाळून ठेविला होता. केवळ संशयावरून कोणालाही पकडून तो आपला धर्म स्वीकारण्याचें कबूल करीपावेतों ते त्याला नाना प्रकारच्या यातना करीत व केव्हां केव्हां जिवंतही जाळीत. यातना सोसल्यावर मनुष्य धर्मांतर करण्याला तयार झाला तर त्याची मालमत्ता हिरावून घेऊन त्याच्या अंगांत कफनी चढवून बाटवून सोडून देत. अंधारकोठडी, उपासमार वगैरे यातनांनीं आरोपी वठणीवर न आल्यास त्यांना मध्यरात्रीं अंधारकोठडींत कोंडून त्यांच्या पायांत खिळ्यांचे खोडे घालीत. आरोपीला वकील देत नसत, किंवा साक्षीदाराच्या साक्षी त्यांच्यासमक्ष घेत नसत. पुरुष असो, स्त्री असो, विधवा असो, कुमारिका असो, त्या आरोपीला नग्न करून लांकडी माचेवर निजवून जीव न जाईल अशा बेतानें शरीराला अमानुष यातना देणें असले

समोर उभ्या असलेल्या चौघां बंदीवान् कैद्यांपैकीं त्या तरुण स्त्रीकडे बोट दाखवून म्हणाली, "ती पोरगी जर तुम्हीं मला फुकट किंवा विकत मिळवून दिली, तर मला तिचा फार उपयोग होईल."

"हो हो! जरूर! त्यांत एवढें मोठें अवघड तें काय आहे?" असें म्हणून फादर पोर्टोनें त्या चार बंदीवानांना आपणासमोर आणून उभें करण्याला अल्बुकर्कला फर्माविलें.

फादर पोर्टो व सोफिया यांचें हा वेळपर्यंतचें सारे संभाषण पोर्तुगीज भाषेंत चाललें असल्यानें तेथें जमलेल्या फारच थोड्या लोकांना तें कळलें. तें ज्यांना कळलें नाहीं, त्यांतीलच एक ती सुंदर मुलगी होती. फादर पोर्टोनें दुल्लभजी मोऱ्याला प्राणदंडाची शिक्षा ठोठावून त्याच्या शोधार्थ जॉनला पाठविलें, ते सारे संभाषण त्याने धेडगुजरी मराठींतून केल्यामुळें तें मात्र त्या सुंदर मुलीला कळलें होतें. तें संभाषण ऐकतांच तिच्या चर्येंत एकदम फरक पडून तिचे डोळे पाण्यानें भरून आले होते. तिची सोबतीण ॲनी हिचें तिच्याकडे लक्ष्य होतें. तिनें तिला ताबड-तोब विचारलें, "मेरी! त्या बंडखोराला पाद्रीसाहेबांनीं शिक्षा ठोठावली, त्या-बद्दल तला वाईट वाटण्याचें काय कारण?" यावर ती सुंदर मुलगी—मेरी 'मला वाईट वाटलें असें नाहीं कांहीं' असें टाळाटाळीचें गुळमुळीत उत्तर देऊन स्वस्थ राहिली होती. अमळशानें फादर पोर्टोनें सोफियापाशीं मेरीविषयीं चौकशी केली. तेव्हां पुन्हा ॲनीने मेरीच्या कानाशीं लागून 'तुझी पाद्रीसाहेब सोफियाबाईशीं चौकशी करीत आहेत. तूं मोठी नशीबवान आहेस' असे उद्गार काढले. तेव्हां मेरीनें 'ते चौकशी करूंदेत; तुला त्याच्याशीं काय करावयाचें आहे' असें तुसडेपणाचें उत्तर देऊन ॲनीला खजील केलें होतें.

---

प्रकार हरहमेष चालत. सतत पंधरा वर्षे अशा यमयातना सोसावयाला लावून शेवटीं त्या जीवाला अग्निकुंडांत लोटल्याचीं उदाहरणेंही धर्मशासनमंडळाच्या इतिहासांत नमूद आहेत. कित्येक प्रसंगीं शिक्षा झालेल्या अनेक कैद्यांना पुष्कळ दिवस खितपत ठेवून मग एकदम त्यांची धिंड काढून त्यांना अग्निकुंडांत लोटीत. अशा प्रसंगीं राजा, सरदार व धर्माधिकारी हा देखावा पाहून करमणूक करून घेण्यासाठीं मुद्दाम तेथें हजर असत. कित्येक वेळां आरोपीची जीभ तोंड उघडतां मिटतां येऊं नये अशा बेतानें बांधून त्याच्यापुढें उत्तम पक्वान्नांचें ताट वाढून आणून ठेवीत व त्याचे हाल पाहून तेथें जमलेले लोक आनंद मानीत!

त्या बंदीवानांना प्राणदंडाची शिक्षा देण्याचा आपला विचार अॅन्टोनिओनें चौकशीपूर्वीच बोलून दाखविला होता. अर्थात् आतां चौकशीचें नुसतें नाटक व्हावयाचें होतें. फादर पोर्टोनें त्या बंदीवानांना आपणासमोर बोलावतांच सोफियानें त्याला विचारलें, " कशाला उगाच चौकशी करण्यांत वेळ दवडतां ? ते गुन्हेगार आहेत हें तुम्हांला माहीत आहे व त्या गुन्ह्याला काय शिक्षा द्यायची हेंही ठरल्यासारखें आहे, मग व्हाना एकदांचे शिक्षा देऊन मोकळे ! "

फादर पोर्टो स्मितहास्यपूर्वक म्हणाला, " तें खरें; पण सोफिया ! हें चौकशीचें नाटक आम्हीं केलें नाहीं, तर मी धर्मशासन-मंडळाचा न्यायाधीश न ठरतां सामान्य खुनी ठरेन; तसें उपयोगाचें नाहीं. मरणाला मृत्यु हें कारण खरें; पण मृत्युदेखील ती जबाबदारी आपणावर पडूं नये म्हणून एखादा अपघात, एखादा आजार किंवा अशाच आणखी एखाद्या निमित्ताचा बुरखा घेऊन जिवाच्या जीवितावर झडप घालतो. केलेलें कृत्य कितीही अनन्वित असलें तरी तें न्यायाच्या आवरणाखालीं आपोआप सोज्वळ ठरतें. खरोखर, धर्मशासन मंडळ ही अमोघ शक्ति पोपमहाराजांनीं निर्माण करून आमच्या हातीं दिली आहे, त्यामुळें आमची इतकी सोय झालेली आहे कीं, सांगण्याची सोय नाहीं. हेंच पहा, काल आम्हांला धर्माच्या नांवावर 'कोणींही गुढ्या उभारूं नये' अशी आज्ञा जाहीर करतां आली व त्या आज्ञेच्या जोरावर धर्मशासनाचें अवडंबर माजवून आम्हांला आमच्या मार्गातील कांटे वेंचून टाकण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे."

एवढें त्या दोघांचें संभाषण होत आहे तोंच अॅन्टोनिओ, दुर्लभजी व त्याचे साथीदार कोणी असतील ते, व ते न सांपडल्यास फादर पोर्टोनें सांगितल्या-प्रमाणें भैरवनाथाच्या आसपासचे लोक यांना कैद करून आणण्यासाठीं शिपायांना रवाना करून तेथें आला. फादर पोर्टो आतां न्यायदानाला सुरुवात करणार असे पाहून अॅन्टोनिओनें आपल्या शिपायांना तेथें जमलेल्या सर्व मंडळीसभोंवार दक्षतेनें पहारा करण्याला सांगून त्यांतल्याच दोन शिपायांना अग्निकुंडांत लांकडें लोटून तें प्रज्वलित करण्याला सांगितलें.

" सरदारसाहेब ! ह्या बंदीवानांना मोकळें करून पुढें आणावयाचें का ? " अल्बुकर्कनें विचारलें. त्याला हा प्रश्न पडण्याचें कारण असें कीं, त्या चारी बंदीवानांच्या शृंखलाबद्ध पायांमधून लोखंडी सांखळी ओंवून घेऊन तिचीं दोन टोंकें दोन बाजूंच्या भरभक्कम दगडाला बांधून टाकण्यांत आलीं होतीं. ती

सांखळी हातीं धरून त्यांना पुढें चालवीत आणणें बरेंच जिकिरीचें काम होतें. बरें; सांखळी सोडली व त्यांतला एखादा बंदीवान पळाला तर निष्कारण आपणांवर तोहमत यावयाची हें भय त्याला होतें.

ॲन्टोनिओनें ती अडचण ओळखून आज्ञा केली, "त्यांची पायांतील दावण सोडून त्यांना पुढें घेऊन ये."

अल्बुकर्कनें हुकुमाप्रमाणें त्या बंदीवानांच्या पायांतील लोखंडी दावण सोडून त्यांना हुकूम केला, "चला."

"कुठें चला ?" तरुण बंदीवानानें विचारलें.

"न्यायासनासमोर," अल्बुकर्क उत्तरला.

"न्यायासन ! कोणतें न्यायासन ?" म्हाताऱ्या बंदीवानानें एकदम खवळून विचारलें.

अल्बुकर्क म्हणाला, "असें पहा भगवानजी ! हुकुम म्हणजे हुकूम. हुकुमाची अमान्यता करणें हा गुन्हा आहे. माझें तुम्ही सारींजणें ऐका, मुकाटपणें न्यायासनासमोर चला. पाद्रीसाहेब फार कनवाळू आहेत; त्यांना तुमची दया येऊन तुम्हांला तुमच्या गुन्ह्याची माफी मिळण्याचाही संभव आहे."

फादर पोर्टो व सोफिया पोर्तुगीज भाषेंत कांहीं गुजगोष्टी बोलण्यांत दंग होऊन गेल्यामुळे त्यांना अल्बुकर्क व तो म्हातारा बंदीवान यांच्यांतील संभाषण ऐकूं गेलें नाहीं; पण ॲन्टोनिओ तें संभाषण दुरून लक्ष्यपूर्वक ऐकत होता. त्यानें आपल्या मागच्या आणखी दोघां शिपायांना आज्ञा केली, "जा. त्या बेमुर्वतखोर हरामखोरांना लाथाबुक्क्यांनीं तुडवीत इकडे घेऊन या."

प्रकरण सहावें

# चुळणें गांवाची कहाणी

चुळणें* गांव हा एका काळीं बराच वैभवसंपन्न होता. तेथील दरोबस्त वस्ती हिंदूंची होती; पण आजला तो गांव दरोबस्त ख्रिस्ती लोकांचा आहे. तो गांव बाटला केव्हां व कसा हें पहाण्यासाठीं आपणांला कथानकाच्या मागें नऊ वर्षें काळाच्या उदरांत डोकावून पहाणें अवश्य आहे. तेव्हां एके दिवशीं एका ख्रिस्ती मिशनऱ्यानें त्या गांवीं येऊन 'कुऱ्हाडीचा गोताला दांडा काळ' शोभणाऱ्या एका बाटग्या गांवकऱ्याच्या साह्यानें भाकरीचे तुकडे, गाईचें मांस वगैरे रात्रीं सर्व गांवकरी झोंपीं गेले आहेत अशा वेळीं गांवांतील दरोबस्त विहिरींतून फेंकले. देवीच्या देवालयाजवळील तळ्यांतही थोडेंसें रक्त शिंपडून तें भ्रष्ट केलें व सकाळींच गांवकऱ्यांनीं उठून तें पाणी प्राशन करतांच 'गांवचे सर्व लोक गोमांस व ख्रिस्ती लोकांच्या हातचे भाकरीचे तुकडे टाकलेल्या विहिरींतील पाणी प्याले, त्या अर्थी ते सारे लोक बाटून आजपासून ख्रिस्ती झाले' अशी उभ्या गांवांत दवंडी पिटण्यांत आली. लोकांनीं आपापल्या विहिरी शोधून पाहिल्या, तों आंत खरोखरीच भाकरींचे व मांसाचे तुकडे आढळून आले! त्याबरोबर त्या दरोबस्त लोकांना वाटलें कीं, आपण बाटलों, ख्रिस्ती झालों. लगेच त्याच दिवशीं त्या गांवांतील देवीच्या देवालयाचेंच ख्रिस्ती प्रार्थनामंदिर बनविल्याचें दवंडी पिटवून जाहीर करण्यांत आलें, व त्या दिवशीं रविवार

---

* चुळणें हा गांव वसईरोड रेल्वेस्टेशनाशेजारीं, वसई गांवापासून सुमारें पांच–सात मैलांच्या अंतरावर आहे. एथें सर्व वस्ती ख्रिस्ती लोकांची आहे. ख्रिस्त्यांशिवाय इतर धर्मांचे लोक आतां त्या गांवांत मुळींच नाहींत. एथले ख्रिस्ती लोक इमारती लांकडाचा व्यापार करितात. एथे गांवांत एक तळें असून त्या तळ्याजवळ हिंदूंच्या देवीचें स्थान आहे. तें देवस्थान जागृत आहे. गांवांत कोणीं डुकरें बाळगिल्यास देवी बाधते असा तेथील रहिवाशांचा फार दिवसांपासूनचा अनुभव असल्यानें येथील लोक डुकरें पाळणें हा सर्व ख्रिस्ती लोकांचा रूढिधर्म असूनही गांवांत डुकरें पाळीत नाहींत. ज्यांना डुकरें पाळावयाचीं असतील ते शेजारच्या इतर गांवीं नेऊन पाळतात.

असल्यानें सर्व गांवकऱ्यांना त्या देवालयांत सक्तीनें बोलावून आणून ख्रिस्ती धर्मानुसार त्या प्रार्थनामंदिरांत प्रार्थना करण्यांत आली. झालें, तेव्हांपासून त्या गांवीं दर रविवारीं सक्तीनें सर्व लोकांना त्या देवालयांत ओढून आणावयाचें व प्रार्थना करावयाची असा क्रम सर्रास सुरू झाला. ह्या ख्रिस्तीकरणाला प्रथम प्रथम कांहीं लोकांनीं विरोध केला; पण त्यांचा ख्रिस्ती धर्ममंडळाच्या आज्ञेनुसार अमानुष छळ करून त्यांचा नायनाट करण्यांत आला. पहिल्या पहिल्यानें सुमारें पांच पन्नास लोक असे विरोधक निपजले; पण त्या सर्वांना लोहस्तंभाशीं बांधून जिवंत जाळ, कोणाला—स्त्री किंवा पुरुष याचा विचार न करितां नग्न करून लांकडी माचेवर बांधून शरिरांत खिळे ठोकून, शरीराच्या नाजुक भागांना चाप लावून हाडें ठेंचून हाल हाल करून ठार कर, कोणाला धडाडलेल्या अग्निकुंडांत फेकून जाळून मार, अशा राक्षसी शिक्षा फर्मावण्यांत येऊन त्यांचा वेळींच समूळ उच्छेद करण्यांत आला. त्या छळांतून एक भवानजी नाईक व दुसरा त्याचा मुलगा भैरव असे दोन—फक्त दोनच जीव बचावले म्हणजे तरी काय, विहिरींतून गोमांस वगैरे टाकून त्या गांवाला बाटविल्याची दवंडी गांवांत पिटली गेली त्याबरोबर त्या दोघांनीं आपल्या घरादाराची व धनदौलतीची पर्वा न करतां त्या गांवांतून पाय काढला, म्हणून ते बचावले असें म्हणावयाचें. त्यांचा पुढें पुष्कळ शोध करण्यांत आला; पण तपास लागला नाहीं. तेव्हां त्यांच्या वाडयांत ख्रिस्ती प्रार्थनामंदिर उभारून व त्यांची जिंदगी जप्त करूनच पोर्तुगीज अधिकाऱ्यांना आपल्या मनाचा विरंगुळा करून घ्यावा लागला. ते दोघे जर त्यानंतर पोर्तुगीज अधिकाऱ्यांच्या हातीं लागले असते, तर त्यांनाही त्या देवालयासमोरील लोहस्तंभाला बांधून अथवा त्या लोहस्तंभाजवळच आज धडाडत असलेल्या अग्निकुंडांत लोटून जिवंत जाळण्यांत आलें असतें, किंवा अन्य अमानुष उपायांनीं त्यांचा वध करण्यांत आला असता. आणखी एक गांवकरी मनुष्य त्या अरिष्टांतून बचावला होता, तो दुल्लभजी मोरे होय. गांवावर हें अरिष्ट कोसळण्यापूर्वींच तो पोरका झाल्यामुळें दूर गांवीं मालाड येथें आपल्या धन्याच्या म्हणजे अंताजी रघुनाथ कावळे यांच्या आश्रयाला जाऊन राहिला होता. दुल्लभजीचा बाप अंताजीपाशींच नोकर होता. तें स्मरून अंताजीनें दुल्लभजीला आश्रय दिला होता. तेव्हां दुल्लभजी सारा बारा वर्षांचा होता. भगवानजीचा तो शेजारी होता.

चुळणें गांवची सारी हिंदु रयत अशी एकजात बाटून ख्रिस्ती झाल्याला आज

सुमारें आठ नऊ वर्षें झालीं होतीं. वसईचा किल्ला म्हणजे पोर्तुगीज लोकांचें त्या वसई साष्टी प्रांतांतील राजधानीवजा महत्त्वाचें ठिकाण होतें व चुळणें गांव वसईच्या अगदीं लगत म्हणजे सुमारें तीन चार कोसांच्या अंतरावर आहे. असें असतां त्या प्रांतीं पोर्तुगीजांनीं येशू ख्रिस्ताच्या नांवावर चालविलेल्या अमानुष धार्मिक जुलुमाच्या वणव्यांत तो गांव कसा सांपडला नाहीं यांचें कोणालाही आश्चर्य वाटणें साहजिक आहे. वसई प्रांतांत व खुद्द वसई गांवांतही हा ख्रिस्ती जुलुमाचा वणवा आपल्या कथानकाच्या दोन शतकें अगोदर पेटला होता; पण त्या वणव्यांत हें लहानसें चुळणें गांव शाबूत राहिलें, त्याचें एक कारण असें कीं, असलीं गांवेचीं गांवें बाटवून सोडणें तेव्हांच्या पोर्तुगीज अधिकाऱ्यांना व धर्मगुरूंना तळहाताच्या मळाप्रमाणें वाटे व प्रथम तोच गांव बाटविण्याची भुरळ पाडण्याइतकी कोणतीच मोहकता त्या गांवांत नव्हती; उलट त्या गांवची देवी अत्यंत जाज्वल्य असून ती लोकांना धर्मांतर करावयाला भाग पाडणारे लोक आणि धर्मांतराला बळी पडणारे लोक अशा उभयतांचाही समूळ उच्छेद करते, असा जनप्रवाद रूढ होता. असा जनप्रवाद रूढ होण्याला कारणेंही घडलीं होतीं. बऱ्याच वर्षांपूर्वी एका ख्रिस्ती धर्मगुरूनें त्या गांवच्या लोकांना बाटविण्याच्या इराद्यानें त्या गांवीं येऊन तळ दिला व कांहीं लोकांना बाटविलें, तों लगेच दुसऱ्या दिवशीं त्याला अकस्मात् डुकरानें ठार मारलें. आणखी कांहीं दिवसांनीं मरोळहून एक पाद्री त्या गांवीं येऊन लोकांना बाटविण्याचा कारभार करूं लागला. त्याचा गांवच्या लोकांनींच खून केला. हा प्रकार भगवानजीचा बाप भवानजी व त्याचाच दुसरा एक दोस्त गजाबा ह्या दोन मातबर व स्वाभिमानी लोकांच्या मर्दुमकीमुळें झाला. भवानजी नाईक व गजाबा देशपांडे हे दोघेही त्या गांवचे बुद्रुक असामी होते. त्यांची जिंदगी मोठी, त्यांची दातृत्वबुद्धि वाखाणण्यासारखी, त्यांचा दरारा विलक्षण व त्यांचा स्वाभिमान तर अनुपमेय ! वैभव, दानत, मर्दुमकी व स्वाभिमान अशा गुणसमुच्चयाच्या जोरावर दोघांनींही सारा गांव आपलासा करून ठेविला होता व खुद्द त्या दोघांचा एकोपा. एकाला ठेंच लागली तर दुसऱ्याला कळ झोंबावी इतके ते दोघेही अभिन्न हृदयी होते. त्यामुळें ते दोघे गांवांत करतील ती पूर्वदिशा होती. सर्व गांवकऱ्यांत त्यांनीं प्रशंसनीय एकोपा राखला होता. त्यामुळें एखाद्या परचक्रापासून त्या गांवाला तेव्हां आपलें रक्षण करतां येई, इतकेंच काय, पण आजूबाजूच्या गांवांना देखील

त्या गांवाचा मोठाच आधार होता. भवानजी किंवा गजाबा यांच्या तोंडून शब्द निघण्याचा अवकाश, कीं सारा गांव शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन धांवून यावयाचा. बरें, तेव्हां त्या दोन पुण्य पुरुषांच्या पुण्याईनें गांवांत धडधाकट वज्रदेही तरुणांचीही वाण नव्हती. हांक मारतांच वीस ते तीस वर्षांच्या दरम्यानच्या पांचशें तरुणांची फौज खडी होई. त्यामुळें पोर्तुगीज अधिकाऱ्यांना त्या गांवाला बाटविण्याचा डाव मांडतांना बराच विचार पडे. ही चुळणें गांवची प्रशंसनीय एकी व भरभराट गजाबा व भवानजी यांच्या हयातीपर्यंतच खरी टिकली व त्या दोघांच्या पश्चात् त्या गांवाला उतरती कळा लागली. भवानजीच्या पश्चात् त्याचा मुलगा भगवानजी व गजाबाच्या पश्चात् त्याचा मुलगा गुणाजी हेही आपल्या जन्मदात्यांप्रमाणेच कर्ते पुरुष निपजले; पण दोघांचे कर्तेपण परस्परविरुद्ध दिशांना वाहूं लागलें. भवानजीच्या वंशावर पोर्तुगीजांचा पापी डोळा फार दिवसांपूर्वीपासून होता. याचें मुख्य कारण असें कीं, फार पूर्वीपासून विशाल वटवृक्षाप्रमाणें वसई-साष्टीप्रांतीं ठायींठायीं विखुरलेल्या प्रचंड नाईक वंशांतीलच भवानजीचा वंश ही एक प्रशाखा होती. वसईच्या पोर्तुगीज अधिकाऱ्यांनीं गजाबा व भवानजी यांच्या हयातींतच त्या दोघांत फूट पाडण्याचा प्रयत्न चालविला होता व तोच प्रयत्न त्यांच्या पश्चात् देखील सुरूच होता. पण त्या प्रयत्नांना गजाबा व भवानजी यांच्या हयातींत जें यश लाभलें नाहीं, तें त्यांच्या मुलांच्या हयातींत लाभलें. गुणाजी हा हाडाचाच स्वार्थी व मत्सरी निपजला. त्यानें जिंदगीवरून भगवानजीशीं वैर मांडलें. ही संधि साधून वसईच्या तेव्हांच्या पोर्तुगीज किल्लेदारानें गुणाजीला पाठीशीं घालून तो वैराग्नि चेतविला. त्यांत परिणामीं दोघांचाही तोटा झाला व त्यांच्याबरोबरच गांवाचाही अपरिमित तोटा होऊन गांव रसातळाला जाऊं लागला. गांवांतील कांहीं लोक जसे गुणाजीला वश होते तसे कांहीं लोक भगवानजीला वश होते. ते दोन परस्परविरोधी गट बनून कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहींसा झाला.

एवढ्यावरच निभावलें नाहीं. तेव्हांच्या वसईच्या किल्लेदारानें आपल्या धर्मगुरूंना चुळणें गांवांत धर्मप्रसार करण्यासाठीं पाठविलें, तेव्हां गुणाजी व त्याच्या बाजूचे लोक यांनीं भगवानजीच्या पक्षाचा खास छळ करण्याचें योजून ख्रिस्ती पाद्र्यांना भगवानजीच्या पक्षांतील वेंचक लोकांचीं नांवें सांगून त्यांना बाटविण्याला प्रोत्साहन दिलें. पोर्तुगीजांना तरी तेंच पाहिजे होतें व तेवढ्यासाठींच

तर त्यांनीं गुणाजीला पाठीशीं घातलें होतें. त्यांनीं भगवानजीच्या पक्षांतील कांहीं लोकांना मधून मधून बाटवावें, बाटविण्यासाठीं गांजावें, त्या वेळीं भगवानजीनें त्या धर्मछलाचा प्रतिकार करण्याला झटावें; पण गुणाजीच्या पक्षाचा त्या बाटविणाऱ्या ख्रिस्ती लोकांना पाठिंबा मिळाल्यामुळें भगवानजीचा तेथें कांहीं इलाज चालूं नये, असा प्रकार वारंवार घडून येऊं लागला. गुणाजी व त्याच्या पक्षांतील लोक यांना वसईच्या पोर्तुगीज अधिकाऱ्यांनीं आपल्या सैन्यांत मान्यतेला चढविलें. गुणाजीला तर त्या प्रांतांतील सरदार बनवून सोडलें; त्यामुळें चुळणें गांवांत पोर्तुगीज सत्तेचा पाय हळुहळू चांगलाच रुजूं लागला. भगवानजीची बाजू दिवसेंदिवस लंगडी बनत चालली. त्याच्या पक्षांतील तेजस्वी लोक एकेक असे पोर्तुगीजांच्या अत्याचारांना बळी पडूं लागले. बाकीचे लोकही आपलें रक्षण करण्याचें त्राण भगवानजीच्या अंगीं उरलें नाहीं असें पाहून हळुहळू त्याचा पक्ष सोडून गुणाजीच्या पक्षाला मिळूं लागले व एका काळीं ज्या भगवानजीचा त्या गांवांत आणि गांवाच्या आसमंतांतील पंचक्रोशींत वाघासारखा दरारा होता, तो वाघ जणुं पिंजऱ्यांत कोंडला जाऊन अगदीं दीनवाणा बनला. आणखी थोडया दिवसांनीं गुणाजी, गुणाजीचा दत्तकपुत्र अंताजी आणि भगवानजीचा मुलगा भैरव हे दोघे समवयस्क तरुण आपल्या आयुष्याच्या ऐन ज्वानींत येऊन कर्तेपणा गाजवूं लागले. त्यांच्या कारकीर्दींत तर त्या दोन घराण्यांतील वैमनस्यानें आणखी पुढचा पल्ला गांठला. 'बापसे बेटा सवाई' या नात्यानें अंताजी पोर्तुगीजांना फितूर होऊन स्वदेशद्रोह, स्वजनद्रोह, स्वधर्मद्रोह ही पापत्रयी पुजण्याच्या कामीं फार पुढें गेला. त्याच दरम्यान् म्हणजे अंताजी सुमारें वीस-एकवीस वर्षांच्या वयाचा असतांना गुणाजीचा अंत होऊन अंताजी त्याच्या सर्व दौलतीचा मालक झाला. अंताजी हा स्वामिद्रोही व देशद्रोही कायस्थाधम दादजीप्रभु देशपांडे याच्या वंशांतील होता. तो त्याच्या नातवंडांपैकीं कोणी एक होता. अर्थात् स्वाभिमानशून्यता, फितुरी वगैरे पाशवी दुर्गुण आनुवंशिकतेनेंच वसत होते. त्यांना आणखी जोड गुणाजीच्या दुर्गुणांची मिळाली. पोर्तुगीज सरकारनें गुणाजीची सरदारकी अंताजीला बहाल केली व त्याचा नादानपणा ध्यानीं घेऊन आणखी एक मोहजाल त्याच्यावर फेंकलें. वसईच्या किल्ल्यावरील एका पोर्तुगीज अधिकाऱ्याला हिंदु स्त्रीपासून झालेली जेन ह्या नांवाची पंधरा वर्षें वयाची सुंदर व चुणचुणीत कन्या होती. हा अधिकारी अंताजीला मेजवानीच्या

निमित्तानें वारंवार आपल्या वाड्यांत बोलावून नेई. तेथें जेनला मुद्दाम अंताजी-सभोंवार मोहजाल पसरविण्यासाठीं अंताजीच्या तैनातीला ठेवण्यांत येत असे. कांहीं दिवस असा कार्यक्रम चालू होता व त्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. अंताजी पूर्णपणें जेनच्या प्रेमपाशांत अडकला गेला व अखेर तिच्या प्राप्तीसाठीं एके दिवशीं तो बाटून ख्रिस्ती झाला !

झालें. त्या दिवसापासून चुळणें गांवांतील लोकांना बाटवून ख्रिस्ती करण्याचा राजमार्ग मोकळा झाला. अंताजीचा अँटोनी झाला व त्याचें जेनशीं मोठया थाटानें लग्न झालें. त्या वधूवरांची हत्तीवरून मिरवणूक काढण्यांत आली व तीही भगवानजी आणि भैरव ह्या प्रतिस्पर्धी पितापुत्रांच्या नाकावर टिचवून ! त्या दोघांनीं प्रथमच अंताजीला बाटूं न देण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर त्यांनीं गांवांत अंताजीवर बहिष्कार पुकारला; पण तो मानण्याला गांवकरी धजावेनात ! याच्या उलट अंताजीनें नव्हे,–अँन्टोनिओनें आपणाप्रमाणेंच गांवांतील सर्व लोकांना बाटवून आपली प्रतिष्ठा वाढविण्याचा विडा उचलला. त्यानें गांवांतील भैरवनाथाचें देवालय भ्रष्ट करून त्याचें ख्रिस्ती प्रार्थनामंदिर बनविलें व एका पाद्र्याच्या साह्यानें तेथें ख्रिस्ती धर्मानुसार प्रार्थना करण्याला सुरुवात केली. त्याप्रमाणेंच त्यानें आपल्या घरीं कोणत्याना कोणत्या निमित्तानें मेजवानीचा बेत करून गांवांतील शिष्टांना मेज-वानीला बोलावण्याचा क्रम ठेवला. बाटल्यानें नशीब कसें उदयाला येतें, या-विषयीं अँटोनिओचें मूर्तिमंत उदाहरण गांवकऱ्यांच्या डोळ्यांसमोर होतेंच; तें पाहून कांहीं गांवकरी आपलेंही नशीब असेंच उदयाला येईल ह्या आशेनें मेज-वानीला व प्रार्थनेला जाऊं लागले. कांहीं लोक आपणांवर अँटोनिओचा आणि त्याला साह्य करणाऱ्या जुलमी पोर्तुगीज सत्ताधाऱ्यांचा रोष होऊं नये म्हणून त्या प्रार्थनेंत व मेजवानींत मिसळूं लागले आणि जे ह्या गोष्टींना विरोध करण्याइतके धीट आणि स्वाभिमानी होते, त्यांचा अँन्टोनिओच्या खास देखरेखीखालीं अमानुष-पणें छळ होऊं लागला. भगवानजी व भैरव यांना जरी गांवावरील ही सार्वत्रिक आपत्ति टाळतां आली नाहीं, तरी त्यांच्यावर मात्र हा छळाचा प्रसंग बरेच दिवसपर्यंत प्रत्यक्षपणें ओढवला नाहीं.

पण तो प्रसंग पुढें ओढवण्यालाही एक कारण घडून आलें. भगवानजीनें भैरवासाठीं अर्नाळ्याच्या तानाजी पाटलाच्या गजरा नांवाच्या नातीशीं सोयरीक

ठरविली होती. गजरा तेव्हां वयानें चौदा वर्षांची होती; ती गुणी व रूपाने सुंदर, एखाद्या पापी माणसाच्या विषारी दृष्टींत सलण्याइतकी सुंदर होती; म्हणूनच तानाजीची घरची गरिबी असतां व शिवाय तानाजी एकदां नजरचुकीनें एका बाटग्या नातलगाच्या घरीं पाणी प्याल्यामुळें बाटून बहिष्कृत ठरलेला असतांही भगवानजीनें त्याच्या नातीला आपली सून करून घेण्याचें ठरविलें होतें. त्याच सुमाराला अँन्टोनिओची बायको जेन ही अँन्टोनिओशीं भांडून त्याच्याशीं काडीमोड करून एका पोर्तुगीज शिपायाचा हात धरून गोव्याकडे निघून गेली असल्यानें अँन्टोनिओला दुसरें लग्न करावयाचें होतें. त्यानें आपल्या अधिकाराच्या जोरावर तानाजीपाशीं गजरेला मागणी घातली व तानाजीच्या खुषी-नाखुषीचा विचार न करतां गजरेला त्याच्या घरांतून बळजबरीनें ओढून नेण्याचा घाट घातला. तानाजीनें अगोदरच भैरवाशीं गजरेची सोयरीक ठरविली असल्यानें त्याला अँन्टोनिओचा शब्द मानतां येईना. सामोपचारांनीं ही बाब मिटत नाहीं असें पाहून अँन्टोनिओनें एके दिवशीं अर्नाळ्याच्या किल्लेदाराच्या साह्यानें तानाजी व गजरा ह्या दोघांनाही कैद करून तुरुंगांत डांबलें व तानाजीचा नाना तऱ्हांनीं छळ करून त्याला ठार मारून गजरेशीं लग्न केलें. ह्या लग्नाला भगवानजी व भैरव यांनीं शक्य तेवढा विरोध केला; पण त्या विरोधाला कोण जुमानतो! उलट त्यामुळें अँन्टोनिओ त्यांचा जास्त हाडवैरी बनला व त्यांचा निःपात करण्याच्या उद्योगाला तो लागला. अखेर एके दिवशीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें अँन्टोनिओला हाताशीं धरून एका ख्रिस्ती पाद्र्यानें उभा चुळणें गांव एका रात्रींत बाटविला. त्या वेळीं पुढच्या अनर्थाला भिऊन भगवानजी व भैरव यांनीं ताबडतोब तो गांव सोडला. ह्या गोष्टीला आज नऊ वर्षें लोटलीं होतीं. ह्या नऊ वर्षांच्या अवधींत सारा चुळणें गांव अँन्टोनिओनें ख्रिस्ती पाद्र्याच्या साह्यानें समूळ ख्रिस्ती बनवून सोडला होता. त्या लोकांना काबूंत आणण्यासाठीं पोर्तुगीजांच्या धर्मशासन मंडळामार्फत कैक दिवसपर्यंत त्या गांवांत एक पाद्री वास्तव्य करून राहिला होता. त्यानें तेथील देवीच्या देवालयाचें ख्रिस्ती प्रार्थनामंदिर बनवून तेथें धर्मशास्त्रासाठीं म्हणून लोहस्तंभ, अग्निकुंड वगैरे जीं आसुरी साधनें तेव्हां उपयोगांत आणलीं, त्यांचा कार्यभाग संपल्यावर तीं जीं आजवर तेथें तुसतींच पडून होतीं, त्याचा उपयोग करण्याची वेळ पुन्हा प्राप्त झाली होती. तोच कुलांगार अँन्टोनिओ पोर्तुगीजांचा एक लष्करी

अधिकारी म्हणून त्या देवीच्या देवालयासमोर आपल्या लवाजम्यानिशीं उच्चासनावर बसला होता व भगवानजी आणि भैरव हे त्याचे हाडवैरी आपल्या परिवारासह समोर बंदीवान होऊन त्या चांडाळासमोर मृत्यूच्या जबड्यांत उभे होते.

भगवानजी व भैरव यांनीं अँन्टोनिओ व त्याचे पोर्तुगीज साथीदार यांच्या अत्याचारांना भिऊन देशत्याग केल्याला आज नऊ वर्षें लोटलीं होतीं. एवढा दीर्घकाल त्या पितापुत्रांनीं पोर्तुगीज सत्तेपासून फार दूर अशा महाड तालुक्यांतील कुसगांव नांवाच्या खेड्यांत त्यांची थोडीशी वडिलार्जित वतनदारी होती तेथें काढला होता. तेथल्याच एका अब्रूदार स्वजातीयाच्या अंबिका नांवाच्या सुंदर व तरुण मुलीशीं भैरवाचें लग्न होऊन आजला पांच सहा वर्षें लोटलीं होतीं. लग्नांत भैरव सुमारें तेवीस चोवीस वर्षांचा असून अंबिका पंधरा सोळा वर्षांची होती. कुसगांवांत त्यांनीं एवढ्या थोड्याशा काळांत आपला संसार पुन्हा चांगल्यापैकीं थाटला होता. तेथेंच भैरवाचें लग्न झालें व तेथूनच त्याला मानाजी आंग्र्याच्या पदरीं शिलेदारी मिळाली होती; त्यामुळें त्याचा चुळणें गांवाविषयींचा ओढाही बराच कमी झाला होता; म्हणून त्या पितापुत्रांना वसई प्रांतांतील पोर्तुगीजांच्या अत्याचारांचा विसर पडला होता असें मात्र नाहीं. स्वतः भगवानजीनें मुद्दाम पुण्याला जाऊन एकवार आपलीं गाऱ्हाणीं पेशव्यांच्या कानांवर घातलीं होतीं व चिमाजीअप्पा सिद्दीसाताच्या पारिपत्यासाठीं ¶सागरगडच्या मोहिमेचा बेत ठरवून कोंकणांत उतरल्यावर ते माघारे जाईपर्यंतच्या काळांत वसई प्रांतांतील अनेक शिष्ट लोकांनीं एकत्र जमून सर्वांनीं मिळून त्यांच्याकडे फिरंग्यांविरुद्ध गाऱ्हाणीं नेलीं. त्या प्रयत्नांत भगवानजीनें चांगलाच पुढाकार घेतला होता. तात्पर्य, चिमाजीअप्पांनीं वसईच्या मोहिमेचें कार्य निकडीनें हातीं घेण्याला भगवानजीचे प्रयत्न बरेच कारणीभूत झाले होते, व पेशव्यांनीं हें पुण्यकार्य हातीं घेतल्यावर त्यांना वसई प्रांतांतील गडकोट, मारगिरीच्या जागा, ठिकठिकाणचे गुप्त मार्ग वगैरे माहिती देण्याचें कार्य मालाडकर सरदेसाई, अंताजी रघुनाथ कामळे, खंडूजी माणकर, गंगाजी नाईक, अणजूरकर वगैरे मंडळींनीं स्वखुषीनें आपल्या शिरावर घेतलें होतें. त्यांतच त्या सर्वांच्या संगनमतानें भगवानजीनेही कामगिरीचा योग्य वांटा उचलला होता. त्याच

¶ 'पेशवाईंतील पश्चिम दिग्विजय' पहा.

दरम्यान् त्यानें आपला वंशवृक्ष वाढीला कां लागत नाहीं याविषयीं देवर्षीमार्फत देवधर्मापाशीं चौकशी केली; तेव्हां त्याला ग्रामदेवतेची चूक लागलेली आढळून आली. त्याबरोबर त्यानें 'माझ्या मुलाला मुलगा होऊं दे, कीं, त्या मुलाला मी माझ्या गांवच्या देवीच्या पायांवर घालण्यासाठीं घेऊन जाईन व पुढें तेथेंच कायमचें वास्तव्य करून देवसेवा करीन' असा नवस बोलून देवापाशीं गाऱ्हाणे घातलें होतें.

नवस केल्यापासून एका वर्षाच्या आंत भगवानजीला नातू झाला. अंबिका पुत्रवती झाली. अर्थात् आतां नवस फेडण्याची जबाबदारी भगवानजीच्या शिरावर येऊन पडली. त्याच सुमाराला चिमाजीअप्पांनीं बाजीराव पेशव्यांच्या संमतीनें वसईच्या मोहिमेचें काम निश्चयपूर्वक हातीं घेतलें व खंडूजी माणकर, अंताजी रघुनाथ, गंगाजी नाईक वगैरे मंडळींबरोबरच भगवानजीलाही चिमाजी-अप्पा व इतर मराठे सरदार यांचा हरएक बाबतींत पाठपुरावा करण्यापायीं घडीचीही फुरसत मिळेनाशी झाली. भैरवदेखील मानाजी आंग्र्यांच्या झेंड्याखालीं ठायीं ठायीं शत्रूचें पारिपत्य करण्यासाठीं लढत होताच! पण मानाजी आंग्र्याला आपल्या प्रांतांतील बंदोबस्ताचें कामच फार डोईजड होऊन गेल्यामुळें वसईच्या मोहिमेत पूर्णपणें लक्ष्य घालण्याला मुळींच अवसर मिळत नव्हता. त्यामुळें भगवानजी व भैरव ह्या पितापुत्रांची गेलीं तीन वर्षें भेटदेखील झाली नव्हती. फार काय, अंबिका चार महिन्यांची गरोदर असतांना एकदां भैरव घरीं आला होता, तेव्हांपासून आजवर त्याला आपल्या प्रिय पत्नीचें व नवससायासांनीं झालेल्या प्रिय पुत्राचें मुखावलोकन करण्यालाही संधी मिळाली नव्हती. अखेर चिमाजीअप्पांनीं फिरंग्यांच्या पारिपत्याचा प्रश्न पूर्णपणें सोडविण्याच्या निश्चयानें हातीं घेतला. मानाजी आंग्रे कांहीं कारणामुळें रुसला होता, त्याचा रुसवा बाजीराव पेशव्यांच्या मध्यस्थीनें काढून त्याला आपल्या पाठीशीं घेतलें. सार्‍या वसई प्रांतांत ठायीं ठायीं फिरंग्यांवर विजय मिळविण्यांत गुंतून पडलेल्या मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, गंगाजी नाईक, अंताजी रघुनाथ, भगवानजी देशपांडे वगैरे मराठे वीरांना आपापली कामगिरी निकडीनें पण यशस्वितेनें आटोपून वसईला वेढा घालण्यासाठीं एकत्र होण्याला पाचारण केलें. तेव्हां त्या निमित्तानें भगवानजी आणि भैरव ह्या पितापुत्रांची भेट झाली व अंबिका आणि तिचा लहानगा भवानजी हीं दोघेंही भगवानजीबरोबरच असल्यानें तींही

भैरवाला भेटलीं. आपल्या जन्मगांवीं जाऊन देवीच्या पायांवर मुलाला घालून नवसाची फेड करावयाची व या उप्पर तेथेंच कायम वास्तव्य करावयाचें, असा भगवानजीचा फार दिवसांपूर्वीचा मानस होता; पण तो सिद्धीला जाण्याला इतका अवकाश लागला. वसईजवळ अर्नाळ्याच्या किल्ल्यावर सर्व प्रमुख मराठे वीरांनीं होळीच्या सणासाठीं जमावयाचें असें चिमाजीअप्पा व बाजीराव यांनीं ठरविलें होतें व त्याप्रमाणें सर्वांना आमंत्रणेंही गेलीं होतीं. तेवढ्यासाठीं बाजीराव पेशवे उत्तर हिंदुस्थानांत जावयाची निकड असूनही मुद्दाम अर्नाळ्याला थांबले होते; पण जो तो माणूस कोणत्याना कोणत्या महत्त्वाच्या कामावर गुंतून पडल्या-मुळें हातची कामगिरी आटोपून सर्वांना एकत्र होण्याला थोडा अवकाश लागला. विशेषतः मानाजीराव आंग्रे सर्वांच्या मागाहून आले. मात्र मानाजीराव नक्की येणार व तेही तांतडीनें येणार यांत संशय नव्हता. म्हणूनच भगवानजी आपल्या सुनेला व नातवाला बरोबर घेऊन अगोदर चुळणें गांवीं गेला आणि पाडव्याच्या सणासाठीं भैरवानें तिकडे यावें अशी व्यवस्था करून ठेवली. पेशवे व सर्व मराठे सरदार यांची अर्नाळ्यावर एकत्र भेटण्याची वेळा थोडी पुढें ढकलली गेली. निमंत्रितांनीं आपापल्या मुक्कामावर गुढीपाडव्याचा सण साजरा करून दुसऱ्या दिवशीं अर्नाळ्याला यावें असें सर्वानुमतें ठरलें.

भगवानजी गांवीं जाऊन पहातो तों घर जाग्यावर कुठें आहे ? त्याच्या घराच्या मुख्य भागाचें ख्रिस्ती प्रार्थनामंदिर उभारलेलें त्याला आढळलें. त्यामुळें त्याला निरुपायास्तव जवळच्या एका शेजाऱ्याच्या घरांत बिऱ्हाड करणें प्राप्त झालें. इतक्या वर्षांनीं भगवानजी आपल्या परिवारासह गांवीं आला आहे हें पाहून बहुतेक सर्व गांवकऱ्यांना समाधान वाटलें. त्याचे चहाते अनुयायी जे होते ते तर त्याच्या सभोंवार हां हां म्हणतां जमा होऊन त्याच्यापाशीं आपल्या सुखदुःखाचीं गाऱ्हाणीं सांगूं लागलेच; पण मध्यंतरीं त्याचा पडता काळ पाहून जे लोक त्याला सोडून त्याचा प्रतिस्पर्धी ॲन्टोनिओ याला जाऊन मिळाले होते, त्यांतले बहुतेक लोकही आतां पश्चात्तापपूर्वक त्याला चाहूं लागले. ॲन्टोनिओ व इतर फिरंगी अंमलदार यांनीं सारा गांव जुलुमानें कसा बाटविला, त्यासाठीं गांवांत कसकसे अत्याचार गेल्या नऊ वर्षांत केले, वगैरे गाऱ्हाणीं ऐकतां ऐकतां भगवानजीचे कान किटून गेले.

इतक्यांत भैरवही उद्यां गुढीपाडवा तों आज रामानंदस्वामींसह सकाळीं तेथें

येऊन दाखल झाला. त्यालादेखील गांवाची ती दुर्दशा झालेली पाहून अत्यंत विषाद वाटला व त्यानें भगवानजीच्या अनुमतीनें पुन्हा गांवाचें पुढारीपण पत्करून गांवाला फिरंग्यांच्या जाचांतून सोडविण्याचें ठरविलें. याच वेळीं हा प्रश्न हातीं घेण्यांत त्याचा आणखी एक उद्देश होता. आपल्या सत्पक्षाच्या बाजूनें वसईच्या धर्मसंग्रामांत लढण्याला त्याला गांवांतून पूर्ववत् शेंपांचशें उमदे सैनिक सहज मिळण्याजोगे होते. हा प्रयत्न त्यानें मानाजी आंग्रे व त्रिमाजीअप्पा यांच्या संमतीनेंच आरंभिला होता. त्याची पूर्वतयारी म्हणून गांवांत प्रथम पूर्ववत् एकी करावयाची असा त्याचा मानस होता. एकी करण्यासाठींच त्याला ग्रामस्थ पतितांचें प्रथम शुद्धीकरण करावयाचें होतें व तेवढ्याचसाठीं रामानंदस्वामी त्या गांवीं आले होते. हा त्याचा हेतु कांहीं वाईट नव्हता व तो बहुतेकांना पटलाही. मात्र ही योजना कशी पार पाडावयाची एवढाच काय तो प्रश्न होता, पण भैरव आणि भगवानजी यांनीं तो प्रश्नही कसा समाधानकारक रीतीनें सोडवितां येईल, हें सर्व गांवकऱ्यांना पटवून दिलें. पेशव्यांनीं सर्व मराठे सरदारांच्या साह्यानें फिरंग्यांच्या पारिपत्याचें महत्कार्य शिरावर घेतल्यापासून आजतागायत फिरंग्यांच्या ताब्यांतील वसई-साष्टी भागांतील बहुतेक महत्त्वाचीं ठाणीं मराठ्यांच्या ताब्यांत आलीं होतीं व फक्त वसईचा किल्ला एवढेंच महत्त्वाचें ठिकाण काय तें फिरंग्यांच्या ताब्यांत राहिलें होतें. तो किल्लादेखील जिंकण्याची मराठ्यांनीं कशी कडेकोट तयारी चालविली आहे, हें भगवानजी व भैरव यांच्या तोंडून ऐकतांच सर्व गांवकऱ्यांना मोठा धीर आला व ते ह्या महत्त्वाच्या धर्मसंग्रामांत भगवानजी आणि भैरव यांच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांना सर्वतोपरी साह्य करण्याला तयार झाले. त्या सर्व मंडळीनें ह्या धर्मसंग्रामाची मुहूर्तमेढ गुढीपाडव्याच्या दिवशीं रोंवण्याचें ठरविलें. फिरंग्यांनीं भैरवनाथाचें देवालय व देवीचें देवालय हीं भ्रष्ट केलीं होतीं, तीं पुन्हा पावन करून घ्यावयाचीं व सर्व ग्रामस्थांनाही पावन करून घ्यावयाचें असेंही ठरलें. खुद्द भगवानजीच्या वाड्याचें जें प्रार्थनामंदिर बनविण्यांत आलें होतें. तें तर त्या पितापुत्रांनीं त्याच दिवशीं तेथून उखडून टाकलें. खिस्ताचा क्रूस वगैरे जें साहित्य तेथें होतें, तें सारें उचलून बाहेर फेंकून देऊन आंत पंचगव्याचा सडा घालून तेथें भगवानजीनें आपलें वास्तव्य केलें.

तोंच उद्यां गुढीपाडवा म्हणतांच आज सकाळीं मंडपेश्वराहून तेथल्या मुख्य ख्रिस्ती धर्मगुरूचें आज्ञापत्र येऊन थडकलें. स्वतः अँटोनिओ आपल्या दोनशें हत्यारबंद

सैनिकांसह तें आज्ञापत्र घेऊन सायंकाळीं त्या गांवीं आला. त्यानें त्या आज्ञापत्रकाच्या प्रती गांवांत ठिकठिकाणीं प्रमुख जागीं चिकटविल्या व त्याच आशयाची उभ्या गांवांत दवंडी पिटविण्यांत आली. एवढ्याशा कामासाठीं ॲन्टोनिओ तेथें एवढया कडेकोट तयारीसह कां व कसा आला याचें गांवकऱ्यांना मोठें आश्चर्य वाटलें. कारण भगवानजी व भैरव यांचें जरी गुढीपाडव्याच्या दिवशीं गुढी उभारण्याचे व त्याच सुमुहूर्तावर देवीच्या देवालयांत गांवांतील लोकांना पावन करून पुन्हा हिंदु धर्मांत समाविष्ट करून घेण्याचे बेत चालले होते ते अत्यंत गुप्तपणें चालले होते. ही बातमी बाहेर फोडणार नाहीं अशाविषयीं सर्व गांवकऱ्यांकडून त्याच देवीच्या व भैरवनाथाच्या देवालयांत शपथा घेवविण्यांत आल्या होत्या. तरीही ती बातमी ताबडतोब बाहेर गेली. ती कशी व केव्हां बाहेर गेली याची ह्या वेळपर्यंत गांवांत कोणालाही दाद लागली नव्हती; पण बातमी बाहेर गेली एवढें मात्र खरें. म्हणूनच तर गुढीपाडव्याच्या पूर्व दिवशीं जाहीरनामा येऊन धडकला व दवंडी पिटण्यांत आली. तरीही त्या दिवशीं लोकांना—भगवानजी व भैरव यांनाही—त्या जाहीरनाम्याचें जास्त महत्त्व वाटलें नाहीं. पोर्तुगीज लोकांची ही दडपशाहीची पद्धत सर्वांच्या पूर्ण परिचयाची होती. लोक तो जाहीरनामा वाचून व दवंडी ऐकून थोडेसे बिचकूं लागले; पण भगवानजीनें त्यावर ताबडतोब रामबाण उपाययोजना केली. त्यानें ताबडतोब दुल्लभजी मोऱ्याला पेशव्यांचा मुक्काम त्या दिवशीं जंजिरे-अर्नाळ्यावर होता तिकडे पाठवून गांवांतील शुद्धीकृतांना व जे कोणी लोक हिंदुधर्माप्रमाणें गुढीपाडव्याचा सण साजरा करतील त्यांना जाहीर अभयपत्र आणण्याची खटपट केली. पण काय असेल तें असो, पाडव्याच्या दिवशीं पहांटेपर्यंत अभयपत्र कांहीं आलें नाहीं; आणि पोर्तुगीजांच्या जाहीरनाम्यानें बिचकून गेलेले लोक तर तशा पेशव्यांच्या तर्फेच्या जाहीर अभयपत्राशिवाय निर्भयपणें शुद्धीकरणाला व गुढीपाडव्याचा सण साजरा करण्याला उभे रहाणें शक्य नव्हतें. अखेर भगवानजी, भैरव व रामानंद यांनीं खासगी रीतीनें एकत्र बसून पुढें काय करावयाचें याविषयीं विचारविनिमय केला.

रामानंदांनीं सुचविलें, "दुल्लभजी ज्या अर्थी अजून आला नाहीं, त्याअर्थी त्याला वाटेंत कांहींतरी दगा-फटका झाला असला पाहिजे."

"हो! मलाही असेंच वाटतें; पण आतां पुढें काय करावयाचें? ह्या

बिचकलेल्या लोकांना पुन्हा कसें ताळ्यावर आणावयाचें!" भगवानजीनें विचारलें.

"त्यांना ताळ्यावर आणण्याचा एक उपाय आहे." रामानंद म्हणाले.

"तो कोणता?" भैरवानें विचारलें.

"पेशवेसरकार आपल्या शुद्धीकरणाच्या चळवळीविरुद्ध नाहींत हें तर आपणां सर्वांना माहीत आहेच." रामानंद म्हणाले.

"होय" भैरव उद्गारला.

"झालें तर आणि मलाही त्यांनीं बाटलेल्या हिंदुजनांना पुन्हा शुद्ध करून हिंदु धर्मांत घेण्याची निरंतरची परवानगी देऊन ठेविलेली आहे. त्या परवानगीच्या आधारावर आपणच आपल्या अधिकारांत पेशवेसरकारांचें अभयपत्र आल्याची दवंडी पिटवूं व जाहीरनामा प्रसिद्ध करूं म्हणजे झालें." रामानंद म्हणाले.

रामानंदांची ही योजना त्या पितापुत्रांना मानवली व ताबडतोब त्या योजनेप्रमाणें अंमलबजावणीही झाली. लोकांचा भगवानजी व भैरव यांच्यावर अढळ विश्वास होताच व रामानंद स्वामींच्या ठायींही त्यांची अनन्यसामान्य श्रद्धा होती. त्यांच्यावर त्या पेशवेसरकारच्या अभयाचा अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. ताबडतोब लोकांनीं ठायीं ठायीं चिकटविलेले पोर्तुगीजांचे जाहीरनामे जाहीर रीतीनें फाडून पायांखालीं तुडविले व पूर्वयोजनेप्रमाणें सूर्योदयाला देवीच्या देवालयासमोर बहुतेक सर्व गांवकरी जमा होऊन तेथें रामानंदस्वामींच्या पुरोहितत्वाखालीं टोलेजंग शुद्धिसमारंभ साजरा झाला. तो समारंभ अर्थात् 'जशास तसें' याच न्यायाचा होता. प्रथम एक गाय देवालयासमोर आणण्यांत आली. थोडें पंचगव्य देवालयासमोरच्या तळ्यांत शिंपडण्यांत आलें. नंतर त्या तळ्यांतील पाण्यानें पूर्वी बाटलेल्या सर्व लोकांनीं स्नान केलें, पूजा केली, देवालय व देवालयापुढील पटांगण अगोदरच गोमयानें सारवून पवित्र करण्यांत आलें होतें. नंतर रामानंदांनीं देवीची पूजा करून तिला समंत्राभिषेक केला. त्यानंतर सर्व लोकांनीं गाईची, देवीची व भगवद्गीतेची पूजा केली आणि त्यांना रामानंदांनीं पंचगव्य आणि देवीचें तीर्थ प्राशन करावयाला दिलें. अगदीं लहान मुलें व अगदीं वृद्ध किंवा आजारी माणसें जीं देवालयापाशीं इतक्या दूरवर येऊं शकलीं नाहीं, त्यांच्यासाठीं घरीं तीर्थोदक पाठविण्यांत आलें. सर्व मंडळीनें जातांना

आपल्याबरोबर देवाच्या पवित्र तळ्यांतील एकेक तांब्या पाणी नेऊन तें आपल्या विहिरींत ओतलें. त्यामुळें सर्व विहिरी शुद्ध झाल्या व सर्वांचीं घरेंदारें, कपडालत्ता आणि चीजवस्तु हीं त्या शुद्धोदकाच्या मार्जनानेंच पावन करून घेण्यांत आलीं.

याप्रमाणें शुद्धीचा विधि आटोपतांच त्या शुद्धीकृत हिंदूंनीं आपापल्या घरांवर त्या गुढीपाडव्याच्या दिवशीं गुढ्यातोरणें उभारून तो नवसंवत्सराच्या प्रथम दिवशींचा सण आनंदानें साजरा केला. आपला मायधर्म पुन्हा आपणाला प्राप्त झाला म्हणून त्या गांवकऱ्यांना त्या दिवशीं जो आनंद झाला, तो अपूर्व होता.

पण ह्या सर्व गोष्टी जितक्या निर्विघ्नपणें पार पडल्या, तितक्या त्या खरोखर निर्विघ्न नव्हत्या. त्या गांवांत स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान यांनीं प्रेरित होऊन आत्मोद्धारासाठीं मनःपूर्वक झटणाऱ्या लोकांचीच बहुतेक संख्या होती हें जरी खरें; तरी तेथें मुळींच कोणी देशकंटक-धर्मकंटक-समाजकंटक-ग्रामकंटक नव्हता असें मात्र नाहीं. प्रथमपासूनच ॲन्टोनिओच्या उपद्व्यापामुळें त्या गांवांत दुफळी उत्पन्न झाली होती व भगवानजी आणि भैरव तेथें बऱ्याच वर्षांनंतर पुन्हा आले ते अगदीं नवीन असल्यानें त्यांचाही गांवांत अजून बसावा तसा जम बसला नव्हता. बरें; ॲन्टोनिओ आणि भगवानजी-भैरव यांच्या-तील वितुष्टांत ॲन्टोनिओची बाजू घेऊन वागणारे लोक गांवांत कोणीच नव्हते असें नाहीं. त्यांना भगवानजी व भैरव हे ॲन्टोनिओचे प्रतिस्पर्धी पुन्हा गांवांत रहावयाला आलेले पाहून असूया उत्पन्न झाली. भगवानजी व भैरव हे दोघे गांवांतून पळून गेल्यामुळें पोर्तुगीज अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें ते गुन्हेगारच होते. शिवाय पोर्तुगीजांविरुद्ध पेशव्यांना शस्त्रग्रहण करावयाला लावण्यांत भगवानजी प्रामुख्यानें सामील होता ही गोष्टही आतां त्या भागांत सर्वत्र महशूर झाली होती. अर्थात् भगवानजी व भैरव हे पितापुत्र पोर्तुगीज सत्तेचे कट्टे वैरी आहेत याविषयीं वादच नव्हता. अशा वहिमी लोकांना पकडून दिल्यास पोर्तुगीज दरबारांत आपली मोठी चहा होईल व आपणाला मानधन-वैभवाचाही लाभ होईल, अशा आशेनें कोणींतरी गांवकऱ्यानें पाडव्याच्याच दिवशीं वसईला ॲन्टोनिओकडे भगवानजी व स्वामी रामानंद यांच्या चळवळीची वर्दी पोंचविली, त्याबरोबर ॲन्टोनिओनें आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना सांगून पाडव्याच्या दिवशीं गुढया उभारण्याला व धर्मांतर करण्याला बंदी करण्याचा जाहीरनामा चुळणें गांवांत फडकविण्याची तांतडी केली होती; पण त्या जाहीरनाम्यालाही न

जुमानतां भगवानजी, भैरव व रामानंद यांनीं गांवांत शुद्धिकार्य आरंभिलें व गुढया-तोरणें उभीं करून त्या गांवांतून ख्रिस्ती धर्माचें उच्चाटण केलें, ही बातमीही ताबडतोब ॲन्टोनिओला पोंचविण्यांत आली. त्यापूर्वीच ॲन्टोनिओ आपणाबरोबर थोडे शिपायी घेऊन गांवांतील बंडाळीचा मोड करण्यासाठीं व भगवानजी, भैरव आणि रामानंद यांना शासन करण्यासाठीं वसईच्या किल्लेदाराच्या हुकुमावरून चुळण्याकडेच यावयाला निघाला होता.त्याला गांवांतील शुद्धि-समारंभाची व सार्वत्रिक ध्वजारोपणाची वार्ता मार्गांतच कळली. तेव्हां अर्थात् हा झगडा आतां केवळ धार्मिक स्वरूपाचा उरला नसून त्याला राजकीय स्वरूप प्राप्त झालें आहे अशी ॲन्टोनिओची खात्री होऊन पुढें कसें करावयाचें याबद्दल वरिष्ठांची गांठ घेण्यासाठीं तो तसाच माघारा वसईला गेला, व तेथें खलबत होऊन अखेर निर्णय ठरल्याप्रमाणें तो आपणाबरोबर फादर पोर्टो व शंभर हत्यार-बंद गोऱ्या सैनिकांची एक तुकडी घेऊन चुळणें गांवीं आला. ॲन्टोनिओ हा त्या गांवचाच असल्यानें त्याला गांवांतील कोण मनुष्य कसा आहे, कोण आपल्या बाजूचा आहे व कोण भगवानजीच्या बाजूचा आहे हें पूर्णपणें माहीत होतें. शिवाय त्याचे हस्तक गांवांत कोणी होते ते त्याला सर्व माहिती पुरविण्याला सज्ज होतेच. ॲन्टोनिओनें गांवांत येतांच प्रथम त्या हस्तकांच्या साह्यानें वहिमी व गुन्हेगार लोकांची यादी ठरवून त्यांच्या त्यांच्या घरांवर पहारे बसविले व गांवांतील एकंदर रागरंग पाहून शंभर सैनिकांनीं कार्यभाग व्हावयाचा नाहीं हें ओळखून वसईहून ताबडतोब आणखी शंभर सैनिकांची तुकडी रातोरात मागविली.

हें जादा सैन्य उजाडण्यापूर्वीच चुळणें गांवीं येऊन पोंचतांच त्या सैन्याकडे गांवांतील बंदोबस्ताचें काम सोंपविण्यांत आलें व नंतर पूर्वींच्या सैनिकांना वहिमी लोकांना कैद करून देवीच्या देवालयासमोर धर्मशासनासमोर हजर करण्याची आज्ञा करण्यांत आली. सर्व वहिमी लोकांना कैद करण्यांत आलें, ते केवळ दराऱ्यासाठीं; पण ॲन्टोनिओचा खरा दांत असा भगवानजी, भैरव, त्याचा स्नेही दुल्लभजी मोरे व रामानंदस्वामी यांच्यावर होता. तीं चारही माणसें पेशव्यांचे विश्वासू हस्तक असून त्यांच्याच चिथावणीनें गांव ख्रिस्तीधर्म झुगारून देऊन हिंदुधर्माचा अंगीकार करण्याइतका धीट झाला, हें ॲन्टोनिओ व फादर पोर्टो ह्या दोघांनाही माहीत होतें. त्यांतही रामानंद स्वामींविषयीं ॲन्टोनिओ व

फादर पोर्टो यांना मनस्वी संताप येण्याचें कारण तेव्हां वसई भागांत शुद्धीची चळवळ अतिशय जोमानें चालविण्यांत जे धर्मवीर प्रामुख्यानें भाग घेत होते, त्यांत रामानंदस्वामींची प्रामुख्यानें गणना होत होती. किंबहुना बाटलेल्या लोकांच्या शुद्धीकरणाचा इतका सोपा मार्ग रामानंदांनींच अलीकडे जारीनें रूढ केला होता. 'ज्याची हिंदुधर्मावर श्रद्धा आहे व जो आपणाला हिंदु म्हणवितो, तो हिंदु' अशी हिंदुत्वाची सर्वव्यापक व्याख्या त्या काळांत प्रथम रामानंद स्वामींनींच ठरविली व त्याप्रमाणें जन्मतः हिंदु असून बाटून ख्रिस्ती झालेल्या लोकांनाच ते शुद्ध करून घेत असें नसून हिंदु होण्याला इच्छिणाऱ्या कोणालाही ते हिंदु करून घेत असत. त्यामुळें कांहीं पिढ्यांपूर्वी जे हिंदु मुसलमानांकडून किंवा ख्रिस्ती पाद्र्यांकडून बाटविले जाऊन मुसलमान किंवा ख्रिस्ती बनले, पण ज्यांची अजूनही हिंदुधर्म, हिंदु देव व हिंदु चालीरीति यांच्यावरील श्रद्धा कायम होती, त्यांना आपल्या आवडत्या हिंदुधर्मांत प्रवेश करण्याचा मार्ग मोकळा झाला होता व त्या संधीचा ठिकठिकाणच्या अनेक लोकांनीं फायदाही घेतला होता. अशा लोकांना त्रास व्हावयाचा तो पोर्तुगीज अधिकारी व समाज यांच्याकडून. पण चिमाजीअप्पांनीं वसईच्या मोहिमेचें काम हातीं घेतल्यापासून आज तीन वर्षांच्या अवधींत सर्वत्र मराठ्यांचाच विजय होऊन पोर्तुगीजांची सत्ता संपुष्टांत आल्यामुळें तोही प्रश्न बहुशः मिटल्यासारखा झाला होता. पोर्तुगीजांच्या निष्प्रभ सत्तेला आतां कोणी फारसें भीत नव्हतें. शिवाय पेशव्यांच्या वतीनें ठिकठिकाणच्या मराठा सरदारांनीं जाहीरनामे काढून शुद्धीकृतांच्या रक्षणाची जबाबदारी छत्रपतींच्या सरकारानें आपल्या शिरावर घेतल्याचें जाहीर केलें होतें व 'अशा शुद्धीकृतांना समाजांत कोणीही पतित किंवा बहिष्कृत मानूं नये, त्यांना ज्यांनीं त्यांनीं स्वजातीय समजून त्यांच्याशीं रोटी-बेटी-व्यवहार करण्याला मुळींच हरकत नाहीं', अशा आशयाचीं आज्ञापत्रेंही पेशव्यांकडून जागोजागच्या समस्त ब्रह्मवृंदांना व बहुजनसमाजाला निघालीं होतीं. हिंदुधर्माचें क्षेत्र त्या प्रांतीं इतकें सर्वव्यापी व विशाल करण्यांत रामानंदांनींच विशेष पुढाकार घेतला होता. म्हणूनच त्यांच्यावर पोर्तुगीजांचा विशेष दांत होता.

पण ॲन्टोनिओची सारी खबरदारी रामानंद व दुळभजी या दोघांच्या बाबतींत मात्र साफ फसली. त्याच दिवशीं-पाडव्याच्या सुमुहूर्तावर निर्मळ एथेंही टोलेजंग शुद्धिसमारंभ रामानंदांच्याच हातून पार पडावयाचा असल्यानें ते चुळणें येथील

शुद्धिकार्य आटोपून ताबडतोब तिकडे निघून गेले होते व दुल्लभजीला पूर्व दिवशींच त्या मंडळीनें पेशव्यांकडे पाठविलें होतें. ॲन्टोनिओ आपल्या सैन्यासह गांवीं येऊन पोंचण्यापूर्वींच ते दोघे तेथून निघून गेले असल्यानें ते अचानक बचावले. मात्र ते निघून गेले हें भगवानजी व भैरव ह्या दोघांखेरीज इतर कोणालाही माहीत नसल्यानें ते गांवांतच कोठें तरी असतील अशा समजुतीनें ॲन्टोनिओनें त्यांचा शोध चालविला होता.

दुल्लभजी आतां येईल, मग येईल अशी भगवानजी व भैरव यांनीं पाडव्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळपावेतों वाट पाहिली; पण तो कांहीं आला नाहीं. दुल्लभजी यावयाचा होता तो अर्थात् बरोबर जरूर तेवढें सैन्य घेऊन यावयाचा होता. सैन्याशिवाय ॲन्टोनिओशीं टक्कर देणें भगवानजी व भैरव यांना शक्यच नव्हतें. त्यांतूनही त्यांनीं सर्व गांवकऱ्यांना पाठीशीं घालून ॲन्टोनिओशीं सामना दिला असता; पण तेवढी तयारी करण्याला त्यांना मोकळीक कोठें होती ! पूर्वदिवशींच्या सूर्यास्तापासूनच त्यांच्या घरासभोंवार ॲन्टोनिओच्या सशस्त्र सैन्यानें गराडा दिला होता आणि ॲन्टोनिओनें इतक्या सफाईनें ती सारी व्यवस्था केली होती कीं, ॲन्टोनिओ त्याच्या मुळाशीं आहे याची भगवानजी व भैरव यांना परिवारासह दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाच्या सुमाराला कैद होऊन देवीच्या देवालयासमोर येईपावेतों दाददेखील लागली नाहीं ! पण देवालयापाशीं येतांच त्यांना सर्व गोष्टींचा उलगडा झाला. ॲन्टोनिओची सूडबुद्धि ह्या अनार्थांच्या मुळाशीं आहे हें त्यांना तेव्हांच कळून आलें. त्याबरोबर त्यांनीं आपल्या जीविताची आशा सोडली.

दरम्यान् ॲन्टोनिओनें दुल्लभजी व रामानंद यांचा तपास चालविला, तेव्हां मात्र भगवानजी व भैरव यांना आपल्या जिवलग साथीदारांपैकीं दोघेजण तरी अजून शत्रूच्या कक्षेबाहेर आहेत त्यांना तरी परमेश्वरानें गांवावरील संकट निवारण्याची कांहीं तजवीज करण्याची शक्ति द्यावी अशी त्या बापलेकांनीं भगवंताची मनोमन करुणा भाकली. आणखी अंमळशानें फादर पोर्टो आला व त्यानें आपणावर दुल्लभजीनें हल्ला केल्याचें सांगितलें, तें ऐकून त्या बापलेकांना वाटलें कीं, भगवंताला आपली करुणा आली; दुल्लभजी ज्या अर्थी पुन्हा गांवीं आला आहे त्या अर्थी तो शत्रूशीं सामना देण्याच्या तयारीनेंच आला असला पाहिजे. पण रात्र अमावास्येची, ऐन पावसाळ्याचे दिवस, आकाश काळ्याकुट्ट

मेघांनीं व्यापून गेलें आहे व त्यामुळें आपण आपलीं बोटें तोंडांत घातलीं कीं, डोळ्यांत घातलीं हेंदेखील कळण्याची पंचाईत, अशा वेळीं मध्येंच एकदां विद्युल्लता चमकून क्षणभर डोळ्यांसमोर लख्ख प्रकाश दिसावा व लगेच दुसऱ्या क्षणाला काळोखाची भीषणता पूर्वीपेक्षां अनेकपटींनीं वाढावी, तशी भगवानजो व भैरव यांच्या आशेची गत झाली. दुल्लभजींचें नांव ऐकतांच त्यांना धीर आला खरा; पण पुढें काय ?

  

पुढें काय ? तें आपणांला आतां ओघाओघानें कळेलच; पण तो लोहस्तंभ–कीं ज्याला बांधून आजवर शेंकडों निरपराधी माणसांना जिवंत जाळण्यांत आलें होतें, तें प्रज्वलित अग्निकुंड–कीं ज्यांत आजवर कैक अभागी जीवांच्या आहुती देण्यांत आल्या होत्या; ती लांकडी माच–कीं आरोपी ठरविण्यांत आलेला अभागी जीव पुरुष किंवा स्त्री कोणीही असला तरी त्या जीवाला निर्लज्जपणें नग्न करून ज्या माचेवर जखडून बांधण्यांत येई व त्याच्या देहांत खिळे ठोकून, देहाला अग्नीचे चटके देऊन नाना प्रकारच्या यंत्रांनीं शिरा ताणून, हाडें ठेंचून फक्त जीव जाणार नाहीं अशा बेतानें सतत महिनेच्या महिने, वर्षेंच्या वर्षें त्या जीवाचे हाल हाल करण्यांत येत असत; असल्या साहित्यानें सजलेल्या त्या यमपुरींत डाम्बून पडलेल्या त्या असहाय जीवांना दारुण यमयातना व अंतीं मरण यापेक्षां निराळें पुढे काय दिसणार ?

## प्रकरण सातवें

# धर्मशासन !

ॲन्टोनिओनें भगवानजी वगैरे मंडळीला ओढून आणण्यासाठीं अल्बुकर्कला हुकूम सोडला, तो कांहीं अगदीं हळू सोडला नाहीं. तो हुकूम ऐकून तेथें तारेच्या कुंपणांत डाम्बून ठेवण्यांत आलेले लोक हादरून गेले व सोफिया-बरोबरच्या दोन्ही दासी कावऱ्याबावऱ्या नजरेनें तिकडे पाहूं लागल्या. त्यांतल्या-त्यांत मेरीच्या मनाला तर ती गोष्ट इतकी लागली कीं, तिच्या नेत्रांत दुःखाश्रु उभे राहिले. त्या दुःखाश्रूंनीं डबडबलेल्या दीनवाण्या दृष्टीनें ती त्या चार अभागी बंदीवानांकडे पहात होती. फादर पोर्टो आणि सोफिया यांचें तर तिकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. तीं दोघें अगदीं बेफिकीरपणें एकमेकांशीं बोलत होतीं. असले प्रसंग वारंवार पाहून त्यांचीं अंतःकरणें बधिर झाल्याचा तो परिणाम होता. ॲन्टोनिओनें दरडावून त्या कैद्यांना लाथाबुक्क्यांखालीं तुडवीत आणण्याचा हुकूम अल्बुकर्कला दिला, तरीही अल्बुकर्कला ते बंदीवान बधेनात म्हणून स्वतः ॲन्टोनिओ रागारागानें शिरा ताणीत तिकडे गेला, तेव्हां इकडे सोफिया व फादर पोर्टो यांच्या निराळ्याच गोष्टी चालल्या होत्या.

फादर पोर्टो सोफियाशीं बोलत होता, तरी त्याची चंचल नजर लोलुपतेनें मेरीकडे खिळली होती. मेरीचें चित्त त्या बंदीवानांच्या भावी दुर्दशेच्या कल्पनाज्वालांत होरपळत होतें. ती फादर पोर्टोकडे कशाला पाहील ! पण ॲनी मात्र शक्य तेवढी मुरडत मुरकत फादर पोर्टोकडे टक लावून उभी होती व फादर पोर्टो आपणाकडे न पहातां मेरीकडे पहातो म्हणून मत्सरग्रस्ततेनें मनांतल्या मनांत मेरीच्या नांवानें जळफळत होती.

फादर पोर्टोचें चित्त मेरीकडे वेधलेलें आहे असें पाहून सोफिया गालांतल्या गालांत किंचित् हंसून मिस्किलपणानें किंचित् ओंठ चावून म्हणाली, "पोर्टो ! धर्माधिकाऱ्याची पवित्र कफनी तुमच्या अंगावर चढल्यापासून तुमचा बाहेरचा वेष बदलला तरी तुमचें रंगेल अंतःकरण कांहीं बदललें नाहीं. मघांपासून मी पहातें आहें, मेरीवरून तुमची दृष्टि कांहीं ढळत नाहीं."

फादर पोर्टो यावर निर्लज्जपणें नुसता हंसला व म्हणाला, "सोफिया ! तूं फार मार्मिक बोलतेस."

" बरें; मग मेरीला तुमच्या स्वाधीन करण्यासंबंधाची माझी अट तुम्हांला मान्य आहे ना ? "

" कोणती ती ? सेनापति आणि आल्काकोव्हा—"

" होय. तीच अट. त्या दोघांचा निःपात अगोदर झाला पाहिजे, मग मेरी तुमचीच आहे."

" सोफिया ! ही अट फार भयंकर आहे. आल्काकोव्हाची गोष्ट परती निराळी; त्याला ह्या जगांतून नाहींसा करणें अवघडही नाहीं व धोक्याचेंही नाहीं. पण सेनापति—"

" मसणांत गेला तुमचा सेनापति ! त्याला नाहींसा करणें तुम्हांला एवढें अवघड व धोक्याचें कां वाटतें हेंच मला समजत नाहीं."

" सोफिया ! तें अवघड नाहीं, पण धोक्याचें आहे. आज आमचें एथलें भवितव्य सेनापति सिल्व्हेरावर सर्वस्वीं अवलंबून आहे. त्याला संकटांत ओढून मी माझ्या देशाशीं व धर्माशीं द्रोह कसा करूं ? "

" जळला तुमचा देश व पेटला तुमचा धर्म ! पोर्टो, देशाच्या व धर्माच्या असल्या थापा तुम्ही माझ्यापाशीं तरी मारूं नका. मला सारें माहीत आहे. ज्यानें त्यानें आपल्यापुरतें पहावें. तुमचा देश व तुमचा धर्म तुम्हांला मेरीसारखी अस्मानची परी थोडीच मिळवून देणार आहे ! बस्स ! मेरी तुम्हांला पाहिजे असेल तर मीं सांगितली ही तिची किंमत. एखादी दगड-धातूची मुकी देवता प्रसन्न होण्यासाठीं वेळीं बारा रेड्यांचाही बळी मागते; तिथें मी एवढ्या दोनच रेड्यांचा बळी घेऊन तुम्हांला प्रसन्न व्हायला तयार आहें हें तुमचें थोर भाग्य समजा."

" पण सोफिया ! तूं मेरीसाठीं मागतेस हें मोल फार जबर आहे."

" याचें कारण मेरीच त्या मोलाची आहे. तिच्या मानानें तुम्हांपाशीं मी मागतें हें मोल कांहींच नाहीं. तुम्हांला माहीत आहे ? पोर्तुगालच्या राजाला किंवा राजपुत्राला नजर म्हणून मेरीला मीं आमच्या व्हाइसरॉयांच्या स्वाधीन केली तर माझ्या नवऱ्याच्या पगाराइतकें दरमहा पेन्शन मला मिळेल; किंवा आणखी-ही एक नामी बेत माझ्या डोक्यांत आहे. तो मीं अमलांत आणला तर मग तुमचा देश व तुमचा धर्म कुठें रहातो तें मी पाहीन. पेशवे हे तुमचे कट्टे हाड-वैरी ना ? अशा सुंदर नारींची पेशव्यांपाशीं चांगली चहा असते असें मीं ऐकलें

आहे. त्यांना जर मीं मेरी नजर केली व त्यांजपाशीं एवढें मोल मागितलें, तर तें मला दामदुप्पटच काय पण दसपटीनें मिळेल. तुमच्या धर्मासह तुम्हांला वसई-च्या खाडींत बुडवून जमीनदोस्त करण्याची ताकद आज पेशव्यांच्या अंगीं आहे हें तुम्ही ओळखतांच—"

इतक्यांत ॲन्टोनिओ त्या चार बंदीवानांना ओढून आणण्यासाठीं पुढें गेला होता तिकडे एकाएकीं बरीच अस्वस्थता माजली व ॲन्टोनिओ मोठमोठ्यानें 'खून ! खून ! धांवा ! धांवा !' असें ओरडला. त्याच वेळीं 'हर हर महादेव' ह्या मराठ्यांचा संग्रामपरवल तेथल्या वातावरणांत एकसमयावच्छेदेंकरून दुमदुमूं लागून त्या ध्वन्याघातानें दशदिशा कंपित झाल्या. त्याबरोबर सोफियाचें संभाषण तेवढ्या-वरच खुंटलें व फादर पोर्टो तसाच लगबगीनें तेथून उठून तिकडे गेला. ॲन्टोनिओ मोठ्यानें ओरडला, याचें कारण त्या चार बंदीवानांपैकीं भैरव नांवाचा बंदीवान संता-पून ॲन्टोनिओवर तुटून पडला व त्याच वेळीं भगवानजीच्या हांकेसरसे तारेच्या कुंपणांत कोंडून ठेवण्यांत आलेले सर्व तरुण लोक उठून ॲन्टोनिओ, त्याचे साथीदार व शिपायी ह्या सर्वांचा निःपात करावयाला सज्ज झाले. त्यांतल्या कांहीं तरुणांनीं त्या बंदीवानांशीं मदोन्मत्तपणें लगट करणाऱ्या अल्बुकर्कला उचलून तेथें जवळच पेटलेल्या अग्निकुंडांत फेंकून दिलें व ॲन्टोनिओची देखील तीच दशा करण्याचा त्यांचा विचार होता. इतक्यांत ॲन्टोनिओ भीतीनें ओरडला. त्या ओरडीसरसे सभोंवारचे सारे हत्यारबंद शिपायी ॲन्टोनिओच्या रक्षणासाठीं आपापलीं हत्यारें सरसावून तिकडे धांवून गेले. तोंच फादर पोर्टोही तेथें जाऊन पोंचला होता. खवळलेल्या बंदीवान तरुणांनीं फादर पोर्टोवरही हल्ला केला. पण तेवढ्यांत त्या हत्यारबंद शिपायांनीं मध्यें पडून कांहीं तरुणांना जखमी केलें. एक दोघांना तेथल्या तेथें गोळ्या घालून ठार मारलें, दोघांना अग्निकुंडांत लोटलें. याप्रमाणें दंडुकेशाहीच्या जोरावर ती लाट तात्पुरती थोपवून ॲन्टोनिओ आणि फादर पोर्टो यांचा बचाव केला. एवढा अनर्थ तेथें गुदरलेला पाहून सोफिया अत्यंत घाबरली व सर्व मंडळीचा डोळा चुकवून देवालयाच्या मागील बाजूनें हळूच आपल्या दोन दासींसह एकदांची देवालयाच्या आवाराबाहेर पडून आपल्या पालखीकडे गेली.

मात्र जातां जातां मेरी किंचित् आंतल्या गांठीनें पण बाह्यतः भाबडेपणानें सोफियाला म्हणाली, " मेमसाहेब ! फादर गुन्हेगारांना प्राणदंडाच्या शिक्षा कशा

देतात हें आपणाला पाह्यायचें आहेना ? मग थोडा वेळ थांबा. ह्या मूठभर बंड-खोरांचें एवढें कसलें भय घेऊन बसलां ? एक तर ते निःशस्त्र आहेत व आपले शिपायी त्यांच्या दुप्पट असून शिवाय सशस्त्र आहेत, आपण जरा थांबा."

मेरीच्या ह्या सल्ल्यांतील खोंच जरी सोफियाच्या ध्यानीं आली नाहीं, तरी तिला मेरीचा सल्ला रुचलाही नाहीं. ती तिकडे कानाडोळा करून आपल्या पालखीच्या भोयांना म्हणाली, "चला."

ॲनीनें मेरीचें बोलणें लक्ष्यपूर्वक ऐकलें होतें. फार काय पण कांहीं क्षणांपूर्वी सोफिया व फादर पोर्टो मेरीविषयीं बोलत होतीं तेंही तिनें ऐकलें होतें. तीं दोघें पोर्तुगीज भाषेंत बोलत होतीं व ॲनीला पोर्तुगीज भाषा कोण काय बोलतें तें चांगलें समजण्यापुरती अवगत होती. मेरीला मात्र ती भाषा फारशी अवगत नव्हती. वारंवार सोफिया व फादर पोर्टो यांच्या संभाषणांत मेरीचें नांव निघे, तेवढयावरून व फादर पोर्टोच्या पापी दृष्टीवरून मेरीला तीं दोघें आपणाविषयींच कांहींतरी बोलत आहेत एवढें मात्र ओझरतें कळलें होतें. मेरी सोफियाला तेथें रहावयाला आग्रह करीत आहे असें पाहून ॲनीला वाटलें कीं, ती त्या संभाषणावरून फादर पोर्टोची प्रियतमा होण्यासाठींच तेथें थबकण्याचा प्रयत्न करीत आहे. ह्या संशयानें ॲनीच्या मत्सरग्रस्ततेला जास्त जोर चढून ती मेरीला हळूच म्हणाली, "मेरी, आपण सुंदर आहों म्हणून तुला कांहीं एवढें शेफारून जायला नको. मेमसाहेबांनीं फादरपाशीं तुझ्याबद्दल एवढें मोठें मोल मागितलें, तें वेळीं फादरनीं त्यांना देऊन तुला विकत घेतलें, तरी त्यापासून तुझ्या पदरात काय शिंपा पडणार आहेत तें मला माहीत आहे. एवढे मोठे रथी-महारथी तुझ्या प्रीत्यर्थ बळी पडले तरी तूं कांहीं कोणी सेनापतीण होत नाहींस कीं वसईची किल्लेदारीण होत नाहींस. त्यांची कुळंबीण म्हणूनच तुला सारा जन्म काढावा लागणार. त्या कुळंबीणपणासाठीं एवढी चढाओढ कशाला हवी ?"

ॲनीच्या बोलण्यांतील रथी-महारथी कोण व मोल कोणतें हें जरी मेरीला नीटसें कळलें नाहीं, तरी आपणावर फादर पोर्टोची मर्जी बहाल असल्याचा ॲनीला मत्सर वाटत आहे एवढें मात्र तिला कळलें. ती त्या रथी-महारथींच्या व मोलाच्या खोल पाण्यांत न शिरतां ॲनीला म्हणाली, "ॲनी, माझी चढा-ओढ नाहीं बरें ! मुळींच चढाओढ नाहीं. माझ्या ऐवजीं तूंच फादरची किंवा ॲन्टोनिओची कुळंबीण हो; मग तर झालें !"

यावर पुन्हा ॲनी मेरीला म्हणाली, माझ्या नशिबीं असलें तर मी होईनच. कुळंबीणचशी काय, ॲन्टोनिओची पट्टराणीदेखील होईन. तूं तुझ्या सुंदरपणाचा एवढा दिमाख दाखवूं नकोस."

" देव तुझे मनोरथ पूर्ण करो." एवढेंच यावर मेरी उत्तरली व त्या दोन दासींमधील तो गूढ विषय तेवढ्यांतच थांबला.

" मेमसाहेब ! पालखी कोठें न्यावयाची ? " भोयांनीं विचारलें.

" प्रथम गांवाबाहेर तर चला ! तेथून मग आपणांला थेट आपल्या मकाणाला जायचें आहे." सोफिया म्हणाली. इतक्यांत पालखीच्या पुढच्या भोयाला धाड्कन् शिंक आली. मेरीला शिंकेचा शकून-अपशकून माहीत होता. ती पालखीच्या अग्रभागीं चालत होती; ती आपणाशींच पुटपटली, " डावी तारी, उजवी मारी, समोर करी घात, पाठीं उभा जगन्नाथ' माझ्या पाठीशीं माझा जगन्नाथ उभा आहे; कारण शिंक माझ्यापाठीमागें झाली आहे; पण मेमसाहेबांच्या समोरची शिंक त्यांचा घात बोलते आहे. कांहीं हरकत नाहीं, देवा ! तूं त्या बिचाऱ्या अभागी बंदींचें रक्षण कर म्हणजे झालें."

  

तेथल्या सशस्त्र शिपायांनीं आपल्या शस्त्रांच्या जोरावर तेथें तात्पुरती स्थिरस्थावर केल्यावर व आपणासभोंवार आणि ॲन्टोनिओच्या सभोंवार आपल्या सशस्त्र सैनिकांचा मजबूत संरक्षक कोट निर्माण झाला आहे असें पाहून फादर पोर्टो तेथल्या सर्व कैद्यांना उद्देशून म्हणाला, " प्रभूच्या अभागी संतानांनो ! आकाशांतील बापाच्या पापी अपत्यांनो ! येशूच्या कळपांतील वेड्या कोंकरांनो ! तुम्हीं प्रभूची आज्ञा मोडून सैतानाच्या शिकवणीला बळी पडून पाप जोडलें; तुम्हांला हाय ! हाय ! कां कीं, त्या पापाचें प्रायश्चित्त आतां तुम्हांला भोगावें लागणार आहे. प्रभूच्या आज्ञेनुसार स्थापन झालेल्या धर्मशासन-मंडळाचा जाहीरनामा अव्हेरून काल तुम्हीं शुद्धीच्या चळवळींत स्वतःस बुडवून घेतलें व घरोघर गुढ्या उभारल्या." तो भगवानजी व भैरव यांच्याकडे बोट दाखवून इतर बंदींना म्हणाला, " ह्या देशद्रोही व धर्मद्रोही दुरात्म्यांच्या नादानें तुम्हीं हें पाप केलें हें मला माहीत आहे. ह्याबद्दल ह्या मुख्य गुन्हेगारांना देहान्त शासन होणें अवश्य आहे. यांच्याप्रमाणेंच तो दुल्लभजी व तो रामानंद यांनाही पकडून आणून देहान्त शासन देण्यांत येईल.—"

इतक्यांत भगवानजीनें आवेशानें विचारलें, " साहेबड्या ! किरिस्तांव भटुर्ड्या ! जरा जीभ आवरून बोल. तूं आम्हांला ठार मारणार तर खुशाल ठार मार; पण शासन करण्याचा आव आणूं नकोस. तुला जर शास्ता म्हणावयाचें तर जगांतील प्रत्येक खुनी माणसाला, हकनाहक जीवांना दंश करून ठार करणाऱ्या सर्पव्याघ्रादि हिंस्र पशूंनाही शास्ते म्हणावें लागेल, पाजी माणसा ! आम्हांला देशद्रोही म्हणतोस, तो आम्हीं देशाचा व धर्माचा द्रोह काय केला तें दाखवून दे; तरच तूं खरा शास्ता शोभशील."

फादर पोर्टो एखाद्या निर्ढावलेल्या बेरडाप्रमाणें शांत वृत्तीनें म्हणाला, " तुम्ही धर्मानें ख्रिस्ती असून हिंदूंच्या शुद्धिसंघटणाच्या चळवळींत पुढाकार घेऊन व गुढीपाडव्याचा हिंदूंचा सण पाळून आपल्या धर्माविरुद्ध आचरण केलें आहे; ह्या तुम्हीं धर्मद्रोह केला. त्याप्रमाणेंच ह्या देशांतील पोर्तुगीजांच्या सार्वभौम सत्तेचा पाडाव करण्यासाठीं चालून आलेल्या मराठ्यांचा पक्ष स्वीकारून एथल्या ख्रिस्ती प्रजेला बंडाला प्रोत्साहन देऊन देशद्रोह केला आहे."

" खासें ! 'यालाच चोरांच्या उलट्या बोम्बा' म्हणतात त्या ! आम्ही ख्रिस्ती ! म्हणे तुम्ही ख्रिस्ती ! आम्ही ख्रिस्ती कसे ? " भगवानजीनें विचारलें.

मध्येंच ॲन्टोनिओ उत्तरला, " जसे हे इतर लोक ख्रिस्ती, तसाच तूंही ख्रिस्ती."

" बेशरम, तुला असें बोलतांना कांहीं लाज वाटावयाला हवी ! तुझ्या-सारखा एक कुलांगार आमच्या गांवांत उत्पन्न झाला; पण त्या एकानेंच साऱ्या गांवाची दैना उडवून दिली." भगवानजी म्हणाला.

" मिठाचा एकच खडा असला तरी तो हंडाभर दूध नासूं शकतो." भैरव म्हणाला.

" पहा, पोर्टोसाहेब हें पहा ! तुम्ही पोर्तुगीज ह्या देशाचे राज्यकर्ते, तुमच्याशीं मी राजनिष्ठेनें वागतों व इमानदारीनें आपला धर्म पाळतों, म्हणून मला ह्या देशद्रोही–धर्मद्रोही चांडाळांकडून अशी विटंबना सहन करावी लागते व ती आपणांसारख्या धर्माधिकाऱ्यांसमोर !" ॲन्टोनिओ म्हणाला.

" पुन्हा तेंच ! कुळबुडव्या–घरबुडव्या–गांवबुडव्या–देशबुडव्या, कुलकलंका ! कोणालारे पुनः पुन्हा देशद्रोही व धर्मद्रोही म्हणतोस ? तुझी अवलाद एखाद्या फिरंगड्याची म्हणावी, तर त्या माउलीच्या नर्कांत पडावें लागेल, म्हणूनच केवळ

तसें म्हणावयाचें नाहीं. बाकी, असले खोडसाळपणाचे अपशब्द आमच्यासारख्यांना बेमुर्वतखोरपणें वापरणारा मनुष्य–पण तो मनुष्य तरी कसला ? पशूच तो !–तो फिरंग्यांच्या कमअस्सल अवलादीचाच असला पाहिजे." भगवानजी गर्जून म्हणाला.

"ऐका ! पोर्टोसाहेब ऐका ! ही शिवी आपणाला आहे बरें ! हा अहेर आपणाला आहे." ॲन्टोनिओ उद्गारला. ॲन्टोनिओच्या ह्या उद्गारांत फार खोल असा सत्यार्थ भरलेला होता. फादर पोर्टोचें जन्मस्थान खरोखरच असें संशयित होतें. संशयित तरी कसलें ? फादर पोर्टो हा खरोखरच मंडपेश्वराच्या एका धर्माध्यक्षाचा दासीपुत्र होता. आतां, तो दासीपुत्र झाला तरी एवढ्या बड्या माणसाचा दासीपुत्र असल्यानें त्याची जन्मापासूनच पाक जातकुळीच्या पोर्तुगीज लोकांत गणना होऊं लागली होती. पोर्टो वयानें वीस वर्षांचा झाला नाहीं, तोंच बापाच्या वशिल्यानेंच त्याला लुई बुथेलो–सोफियाचा शेवटचा पति याच्या अमदानींत ठाण्याच्या किल्ल्यावर मोठी मानाची सरकारी नोकरी मिळाली. पुढें थोड्याच दिवसांत तो सोफियांच्या प्रेमपाशांत सांपडला किंवा सोफिया त्याच्या प्रेमपाशांत सांपडली असें म्हणावें पाहिजे तर; व सोफियाच्या वशिल्यानें त्यानें प्रथम ठाण्याच्या धर्माधिकाऱ्याची जागा पटकावली. त्याच्या बापानें त्याचें पोर्टो हें नांवदेखील आपला हा मुलगा भविष्यकाळीं मंडपेश्वराचा धर्माध्यक्ष होईल ह्या आशेनें मंडपेश्वरच्या देवालयाचें प्रथम खिस्ती प्रार्थनामंदिर बनविणारा फादर ॲन्टोनिओ पोर्टो याचेंच ठेवलें होतें. आपला हा पुत्र पोर्टो, पूर्वीच्या ॲन्टोनिओ पोर्टोप्रमाणें किंबहुना त्याच्याहूनही कांकणभर सरस असा धर्माभिमानी निपजेल व तो वसई-साष्टी प्रांतांतील झाडून साऱ्या हिंदु देवालयांचीं खिस्ती प्रार्थनामंदिरें बनवून एकजात सारी रयत खिस्ती करून सोडील असा पोर्टोच्या बापाला भरंवसा होता. तो भरंवसा अगदीं अस्थानीं होता अशांतली गोष्ट नाहीं. मराठ्यांनीं वसईचा धर्मसंग्राम हळुहळू उभारण्याला व पोर्टो हा मंडपेश्वरचा धर्माध्यक्ष व्हावयाला एक गांठ पडल्यामुळें पोर्टोला धर्मप्रसाराचें काम मनावर घेण्याला भरपूर सवड मिळाली नव्हती. तरीही त्यानें आपल्या अमदानीचा प्रारंभ मोठ्या जोरांत आवेशांत केला होता. मराठ्यांनीं पोर्तुगीजांविरुद्ध चढाईचें धोरण स्वीकारलें तेव्हां ठाण्याच्या किल्ल्याचें बांधकाम पुरें झालें नव्हतें. त्या धर्मावर मराठे अचुक घाव घालतील हें ओळखून लुई बुथलेनें त्या किल्ल्याचें बांधकाम तांतडीनें पुरें करण्याचें योजिलें; पण एवढें प्रचंड काम पुरें करण्याला पुरेसे मजूर कोठून मिळवावे ही त्याला पंचाईत पडली.

ती त्याची अडचण फादर पोर्टोनें दूर केली. त्यानें त्या भागांतील लोकांना सक्तीनें 'बाटावयाला तरी तयार व्हा किंवा किल्ल्याच्या कामावर वेठीला तरी चला' असा पेंच घातला व त्याची सर्रास अंमलबजावणी सुरू केली. त्या वेळीं थोडे लोक बाटले, त्यांना नंतर 'तुम्ही ख्रिस्ती आहां; हें राज्य तुमचें आहे; मराठ्यांनीं तुमच्या राज्यावर संकट ओढवून आणलें आहे तें निवारण करण्या-साठीं तुम्ही आपल्या प्राणांची पर्वा न करितां झटलें पाहिजे' असें सांगून वेठीला धरलें. जे लोक बाटण्याचें टाळून वेठीला तयार झाले, त्यांना तसें वेठीला धरलें. आणि जे लोक दोन्ही गोष्टींना तयार होईनात त्यांना किल्ल्याच्या बांधकामांत जिवंत गाडण्यांत आलें.

फादर पोर्टोला सोफियाच्या वशिल्यानें पुढें मंडपेश्वरच्या धर्माध्यक्षाची जागा मिळण्याचें आणखी एक नाजुक कारण या ठिकाणीं नमूद करून ठेवणें अस्थानीं होणार नाहीं. बुथेलोची धर्मपत्नी या नात्यानें बुथेलोचा संसार करतांनाच सोफिया-चे मन रॉबर्टसन नांवाच्या एका इंग्रज गोलंदाजावर बसल्याचें पूर्वींच नमूद करण्यांत आलें आहे. रॉबर्टसन हा ख्रिस्तीच खरा; पण भिन्न व विरोधी अशा 'प्रॉटेस्टंट' पंथाचा असल्यानें तो जेव्हां सोफियाच्या फंदांत पडल्यामुळें गुन्हेगार ठरला तेव्हां त्याला सक्तीनें रोमन कॅथोलिक पंथाची दीक्षा देण्याचा हुकूम फादर पोर्टोनें धर्माधिकारी या नात्यानें सोडला. रॉबर्टसनचा प्रॉटेस्टंट पंथावर दृढ-विश्वास असल्यानें 'मी मरेन पण धर्म सोडणार नाहीं' असा हेका त्यानें धरिला. तेव्हां सोफियानें त्या आपल्या प्रियकराला वांचविण्यासाठीं फादर पोर्टोची मन-धरणी केली, त्याबद्दल त्याला पाहिजे असलेली मंडपेश्वराच्या मुख्य धर्माधिकाऱ्या-ची जागाही आपल्या खटपटीनें मिळवून दिली, व त्यामुळें रॉबर्टसनवर धर्मांतरा-चा जुलूम न होतां त्याला नुसती हद्दपारीची शिक्षा झाली. ॲन्टोनिओपाशीं बोलतांना 'फादर पोर्टोला मींच फादर केला आहे' असें जें सोफिया ठासून उद्गारली, त्यांतलें इंगित हें.

असो. भगवानजी जो 'पोर्तुगीजांची कमअस्सल अवलाद' असें रागाच्या सपाट्यांत बोलून गेला, तो सहज उपरोधानें बोलून गेला. त्याला खरोखर पाहूं गेल्या, फादर पोर्टोचें जन्मरहस्य माहीत नव्हतें. तें फक्त ॲन्टोनिओला माहीत झालें होतें. ॲन्टोनिओनें त्या माहितीचा ऐन वेळीं भगवानजी वगैरे मंडळीविरुद्ध फादर पोर्टोला चेतविण्यासाठीं प्रसंगावधान राखून उपयोग केला.

फादर पोर्टोला भगवानजीचे ते शब्द वर्मी झोंबले. त्यानें मनांतून चिडून संतापानें ओंठ चावून, पण बाह्यात्कारीं शांतपणाचा आव आणून भगवानजीला म्हटलें, "कमनशिबी म्हाताऱ्या ! तुला तुझ्या आयुष्याच्या अखेरच्या घटकेला काय पाहिजे तें बोलण्याला मुभा आहे. कां कीं, कोणाही अपराध्याला अतृप्त वासनेनें मरूं द्यावयाचें नाहीं हा धर्मदंड पाळणें मला अवश्य आहे."

"अहारे बेरडा ! हाच तुझा न्याय ! हेंच तुझें धर्मशासन ! पण तुला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे !" भगवानजी ॲन्टोनिओकडे वळून कडकडा दांत चावीत व आपले शृंखलाबद्ध दोन्ही हात—कारण नुसता अंगुलिनिर्देश त्याला करावयाचा असतांही हात मोकळा नसल्यानें तो आपले दोन्ही हात ॲन्टोनिओ-कडे दाखवून उद्गारला, "आमच्यांतच असले कुऱ्हाडीचे दांडे निपजले, तिथें इतरांना काय बोल लावावयाचा ! गुलामा ! आपला गांव बुडविलास, धर्म बुडविलास, देश बुडविलास, सरदारकी व एक चवचल पोर यांचा लाभ करून घेण्यासाठीं तूं आपल्या गांवावर, देशावर—धर्मावर निखारा ठेवून मोऱ्यांच्या—अस्सल मराठ्यांच्या—जातकुळीला बट्टा लावलास ! तुला सरदारकी मिळवा-वयाची होती, सुंदर बायको मिळवावयाची होती, तर मराठशाहीच्या उद्योगात तुझ्या मर्दुमकीला काय थोडाथोडका वाव होता ? मराठ्यांच्या अस्सल जात-कुळींत सुंदर बायकांना काय दुष्काळ होता ? आणि एवढें सर्व करून पुन्हा देशासाठीं व धर्मासाठीं मरणाच्या मोलानें झटणाऱ्या आम्हांला तूं देशद्रोही व धर्मद्रोही म्हणतोस ?"

"संपलें तुझें बोलून ! तुला तुझ्यावरील आरोपांविषयीं आणखी कांहीं सांगावयाचें आहे काय ? आपल्यावरील आरोपांची नाशाबिती करणारा कांहीं साक्षीपुरावा द्यावयाचा आहे काय ? व कां कीं, अपराध्याला शक्य तेवढ्या उपायांनीं आपला बचाव करण्याची संधि द्यावी असा धर्मदंड पाळणें हें माझें कर्तव्य आहे." फादर पोर्टो पूर्ववत् शांतपणे म्हणाला.

"तुझा न्याय व तुझा धर्म मला माहीत आहे. हा लोहस्तंभ, हें धडाडलेलें अग्निकुंड आणि आमचा बळी घेण्यासाठीं तुला झालेली घाई हीं तुझ्या न्याया-ची व धर्माची साक्ष देत आहेत. कसायाच्या सुरीखालीं सांपडलेला मुका जीव कसायापाशीं न्याय मागणार काय व त्याला न्याय मिळणार काय ?"

"झालें ! आटोपलें ?" फादर पोर्टोनें गंभीर व निश्चयी स्वरांत विचारलें.

यावर भगवानजी कांहीं बोलला नाहीं. फादर पोर्टो क्षणभर थांबून पुन्हा म्हणाला, "ठीक आहे. भगवानजी ! सैनाताच्या मगरमिठींत सांपडलेल्या अभागी कोकरा ! तूं प्रभूच्या धर्माविरुद्ध आचरण केलेंस व इतरांना करावयाला भाग पाडलेस, हा तूं धर्मद्रोह केलास. तूं प्रभू येशूच्या कृपेनें ह्या देशावर राज्य करणाऱ्या आम्हां राज्यकर्त्यांविरुद्ध मराठ्यांना फितूर होऊन राजद्रोह केलास. ह्या दोन भयंकर अपराधांबद्दल तुला आतां शासन करणें हें न्यायासनाचें कर्तव्य आहे. कां कीं, तुला तुझ्यावरील आरोपांचे निरसन करण्याची संधि न्यायासनाने दिली असतांही तूं आपली निर्दोषता सिद्ध करूं शकला नाहींस. या अपराधाबद्दल तुला न्याया-सनाकडून अग्निकुंडांत लोटून जाळण्याची शिक्षा देण्यांत येत आहे."

फादर पोर्टोच्या तोंडून त्या भयंकर शिक्षेचा उच्चार होतांच ॲन्टोनिओच्या अंतःकरणांत आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. त्याच्या हत्यारबंद शिपायांना दुःख किंवा आनंद कांहींच वाटलें नाहीं. कारण असले प्रसंग रोजच्या रोज पाहून त्यांची दृष्टि मेली होती व अंतःकरणें बधिर झालीं होतीं. ते शिक्षेची अंमल-बजावणी करण्यासाठीं पुढे सरसावून ॲन्टोनिओच्या आज्ञेची वाट पाहूं लागले. इतर मंडळीला मात्र ती भयंकर शिक्षा ऐकून अत्यंत हळहळ वाटली. भैरव व अंबिका यांच्या नेत्रांतून तर ढळढळां अश्रुधारा वाहूं लागल्या. आपलीं आईबापें रडूं लागलीं हें पाहून लहानग्या भवानजीनें हंबरडा फोडला. मात्र झाला तो प्रकार अपेक्षितच असल्यामुळें कोणाला त्याविषयीं आश्चर्य वाटलें नाहीं.

भैरव आपले शृंखलाबद्ध हात फादर पोर्टोसमोर जोडून उद्गारला, "साहेब ! आपण म्हणतां ते सारे अपराध एकट्या माझ्या हातून घडले आहेत. माझ्या बाबांचा त्यांत कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं. ते पूर्ण निर्दोषी आहेत. यास्तव आपण त्यांना सोडून द्या व प्राणदंडाची शिक्षा मला करा."

इतक्यांत भगवानजी डोळे वटारून भैरवाकडे वळून उद्गारला, "खबरदार ! भैरव ! असल्या अधर्मी, पापी चांडाळांसमोर हात जोडण्याला तुला लाज नाहीं वाटत ? तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. तूं माझ्या रक्ताचा असशील, तुझ्या आईच्या त्या माउलीच्या पातिव्रत्यावर तुझा विश्वास असेल,तर तूं अशा चांडाळांना ज्यांनीं आपल्या देवधर्माचें व देशाचें वाटोळें केलें, ज्यांनीं आज इतकीं वर्षें आपल्या गरीब हिंदु बांधवांना त्राहि भगवान् करून सोडलें,अशा सैतानांना हात जोडूं नकोस; त्यांच्यासमोर कोणत्याही कारणासाठीं मान वांकवूं नकोस. आपण सर्व मराठ्यांनीं

आपल्या देशावरून व आपल्या धर्मावरून आपल्या जीवनसर्वस्वाची कुरवंडी करून ह्या धर्मसंग्रामांत उडी घेतली आहे. मारूं किंवा मरूं, पण माघार घेणार नाहीं व मान वांकविणार नाहीं ह्या बाण्यानें हा धर्मसंग्राम खेळेल तोच अस्सल जातकुळीचा मराठा; बाकीचे सारे कमअस्सल ! आज आपण उभे आहों हीदेखील रणभूमीच आहे. ह्या रणभूमीवर मी बळी पडलों तर स्वर्गाचें महाद्वार मला मोकळें आहे. मला त्याबद्दल यत्किंचित् खेद वाटत नाहीं; यत्किंचित् भय वाटत नाहीं. माझ्यासाठीं तूं कष्टी होऊं नकोस, आपल्या ब्रीदाला बट्टा लावूं नकोस. माझी तर काय कथा, माझ्यासारखाच प्रसंग तुझ्यावर व तुझ्या बायकोमुलांवर आला तरीदेखील तूं न डगमगतां देशासाठीं, धर्मासाठीं व स्वतःच्या ब्रीदासाठीं हंसत-खेळत यातना भोगल्या पाहिजेत. जो प्रसंग या क्षणाला माझ्यावर कोसळला आहे, तोच पुढच्या क्षणाला तुम्हां सर्वांवर आहे, हे उघड उघड दिसत आहे. देवीला आमची सेवा मानवली नाहीं—पण देवीला तरी कां दोष द्यावा ? आम्ही आमचें कर्तव्य करतां करतां आमच्या मायभूमींत—आमच्या ग्रामदेवतेच्या चरणांपाशीं इहलोकची यात्रा आटोपीत आहों, ही तरी त्या देवीची आपणावर केवढी कृपा ! मरण कोणाला चुकलें आहे ? जन्माला आलेला प्राणी आज ना उद्यां मरावयाचाच. तें मरण अशा गौरवानें आपणांला आलें, तर आपल्या आयुष्याचें सोनें झालें. सारा गांव म्हणेल व धनीही म्हणतील कीं, शाबास ! भगवानजी मोऱ्याचा उभा वंश देशाकारणें—देवाकारणें—धर्माकारणें धारतीर्थीं मरून अजरामर झाला. आतां वसईच्या धर्मसंग्रामांत आपला विजय होऊन आपल्या शत्रूंचें समूळ निर्दालन झालेलें पहावयास आम्ही जगलों असतों तर फार बरें झालें असतें; पण तेवढी आमची पुण्याई नाहीं. परमेश्वर ! परमेश्वर ! " असें म्हणून भगवानजीनें समोरच्या देवीला हात जोडले. त्याच्यानें पुढें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला व चर्या गंभीर झाली. बोलतां बोलतां तो मधून मधून एकसारखा भैरव, अंबिका व भवानजी यांच्याकडे स्नेहार्द्र दृष्टीनें पहात होता; तींही त्याच्याकडे पहात होतीं.

ॲन्टोनिओनें आतुरतेनें फादर पोटोंला विचारलें, " साहेब ! शिक्षेची अंमलबजावणी करावयाची ना ! उगाच उशीर नको."

" हो ! करावयाची." असें उत्तर देऊन फादर पोटों लगेच भैरवाकडे वळला व म्हणाला, " भैरव ! एकाच्या अपराधाबद्दल दुसऱ्याला शासन करावें अशी

आमच्या प्रभूची आज्ञा नाहीं. भगवानजी अपराधी ठरला व त्याला शासन झालें, आतां तुझा न्याय करावयाचा—"

इतक्यांत ॲन्टोनिओचे शिपाई भगवानजीला अग्निकुंडाकडे ओढून नेऊं लागले, त्याबरोबर अंबिका व भवानजी यांनीं आकान्त मांडला. त्या गोंगाटामुळें फादर पोर्टोच्या भाषणाला अंमळ अडथळा झाला. शिपाई भगवानजीला ओढून नेऊं लागले तेव्हां त्यानें जरादेखील विरोध केला नाही. त्याने आपल्या परिवाराकडे पाहून 'येतों बरें!' एवढे दोनच शब्द मोठया कष्टाने उच्चारले. त्या वेळीं इतर लोक दंगा करतील तर त्यांच्या सभोंवारचे शिपायी आपलीं शस्त्रें सरसावून सावधगिरीने उभे होते व दोन शिपायांनीं भैरवाला जागच्या जागीं घट्ट आंवळून धरिले होते. लगेच शिपायांनीं भगवानजीला त्या धडाडलेल्या अग्निकुंडांत लोटून दिले. भैरव व अंबिका यांनीं डोळे मिटून घेतले. भगवानजी 'आजोबा! आजोबा!' असा हंबरडा फोडीत पुढें जाऊं लागला, तों पायांतील शृंखलांत अडखळून धाड्कन् खालीं पडला. एका शिपायाने त्याला मागें ओढले. गोंगाट होतो म्हणून फादर पोर्टो शिपायांवर कावूं लागला. तेव्हां त्यांनीं अंबिका व भवानजी यांना दरडावून गप्प केले. अग्निकुंडांतील आगीच्या डोंबांत भगवानजीचा देह ज्वालामय होऊन दिसेनासा झाला!

## प्रकरण आठवें

# हर ! हर ! ! महादेव ! ! !

सर्वत्र शांतता झाल्यावर फादर पोर्टो पुन्हा भैरवाकडे वळला व म्हणाला, " भैरव ! तूं तर अगोदरच सर्व अपराध कबूल केले आहेस; तेव्हां पुराव्याची गरजच नाहीं. तेव्हां तुझ्या अपराधाबद्दल न्यायासन तुला लोहस्तंभाशीं बांधून जाळण्याची शिक्षा देत आहे."

ही शिक्षा कानीं पडतांच भैरवानें एक दीर्घ उसासा सोडला ! अंबिका त्याच क्षणीं त्या शृंखलाबद्ध पायांनीं अडखळत पुढें येऊन फादर पोर्टोच्या पायांवर लोटांगण घालून उद्गारली, " नका हो नका ! त्यांना एवढी कठोर शिक्षा देऊं नका. त्यांच्या ऐवजीं मला ती शिक्षा द्या; मी ती भोगण्याला आनंदानें तयार आहें. माझ्या ह्या कोंवळ्या अर्भकाकडे तरी पहा ! "

अंबिकेचा टाहो खरोखरच पाषाणालाही पाझर फोडणारा होता. पण त्या दोघां पाषाणहृदयी माणसांच्या मनावर त्याचा काय परिणाम होणार ! फादर पोर्टो अगदीं शांतपणानें म्हणाला, " बाई ! असा शोक करूं नकोस, असा धीर सोडूं नकोस. तुझ्यासभोंवार व तुझ्या पतीच्या सभोंवार निराशेचा निबिड अंधार पसरलेला आहे ही गोष्ट जरी खरी, तरी मला त्या अंधारांतही प्रकाश दिसत आहे. कां कीं, मी प्रभूचा एकनिष्ठ सेवक आहें. तो आकाशांतील बाप आपल्या निष्ठावंत लेंकरांवर कधींच निष्ठुर होत नाहीं. जे कोणी त्याला भजतात, त्यांच्याविषयीं त्याच्या अंतःकरणांत सदैव दयेचा ओलावा असतो. कां कीं, तो परमदयाळु व परम सामर्थ्यवान् आहे."

" मग सांगा, मला सांगा ! मीं काय केलें म्हणजे तो प्रभु आम्हांला प्रसन्न होईल ? मीं काय केलें म्हणजे तो तुमचा आकाशांतील बाप आम्हांला आपलीं लेंकरें मानून आमचें संकट निवारण करील ? " अंबिकेनें आतुरतेनें फादर पोर्टोसमोर गुडघे टेंकून त्याला दोन्ही हात जोडून काकुळतीला येऊन विचारलें.

फादर पोर्टो आकाशाकडे पाहून दोन्ही हात जोडून क्षणभर डोळे मिटून विचार केल्यावर म्हणाला, " मला प्रकाश दिसतो आहे; पण अभागी स्त्रिये ! तुला तो दिसत नाहीं; तुझ्या सासऱ्यालाही तो दिसला नाहीं व तुझ्या नवऱ्यालाही तो दिसणार नाहीं. कां कीं, तुमची त्या प्रभूच्या परम कृपाळूपणावर श्रद्धा नाहीं. हे

आकाशांतील बापा ! कनवाळू हो; कनवाळू हो ! ह्या न्यायासनावर उभा राहून ह्या अज्ञानांधकारांत बुडून गेलेल्या वेड्या कोंकरांना प्रकाश दाखव. अश्रद्धेच्या डोहांत बुडणाऱ्या ह्या अजाण लेंकरांना हात देऊन त्यांचें तारण कर. माझ्या अंतःकरणांत उभा राहून तूं ह्या जीवांवर दया करूं पहात आहेस, त्याप्रमाणेंच ह्या दोघां स्त्रीपुरुषांना त्या दयेला पात्र ठरूं दे !" असें म्हणून फादर पोर्टोनें पुन्हा डोळे मिटून घेतले.

फादर पोर्टोच्या भाषणानें भैरव, अंबिका व तेथले इतर बंदी यांच्या अंतः-करणांत आशेचा उदय झाला; तेव्हांच ॲन्टोनिओच्या अंतःकरणांत आशेचा अंधार पडूं लागला. फादर पोर्टोला आपणांविषयीं दया उत्पन्न होत आहे या विषयींची भैरव, अंबिका वगैरे मंडळींची ती आशा होती, तर हा पाद्री आतां दयेची अस्थानीं खैरात करून आपल्या हाडवैऱ्याला जिवंत ठेवणार असें पाहून ॲन्टोनिओची जी आपल्या प्रतिस्पर्ध्याचें निर्मूलन आपल्या डोळ्यांसमोर झालेलें पहाण्याची आशा, त्या आशेची निराशा झाली होती. फादर पोर्टोची ही कृपाळु वृत्ति अशीच कायम टिकून सर्वांचा बचाव व्हावा म्हणून भैरव, अंबिका वगैरे सर्व मंडळी मनांतून परमेश्वराची करुणा भाकीत होती;—ख्रिस्त व ती देवी यांना सारख्याच पूज्य भावानें आळवीत होती; तर ॲन्टोनिओ मनांतल्या मनांत जळफळून बोलत होता, 'छे ! असें होतां उपयोगीं नाहीं. फादर पोर्टोला कांहींही करून चिडविलेंच पाहिजे'. ॲन्टोनिओ तेव्हां कोणत्याही देवाला आळविण्या-च्या भानगडींत पडला नाहीं याचें कारण देवावर त्याची श्रद्धा होती, तो ख्रिस्तालाही देव मानी, कृष्णालाही देव मानी, त्या ग्रामदेवतेलाही मानी; पण आपल्या दुर्वासनेला हटकून पाठबळ देण्याइतका देव हटकून पक्षपाती बनेल अशी त्याची खात्री नव्हती. तरीही अशा आसुरी वासनांना यश देणारे कांहीं झोटिंग, कांहीं पीर व आणखी असेच कांहीं आसुरी 'देव' त्याला माहीत होते; त्यांना कोणाला कोंबडी, तर कोणाला बकरीं, तर कोणाला रेडा, तर कोणाला नरबलि देण्याचें कबूल करून आपलें इच्छित साध्य होण्यासाठीं तो मनोमय त्यांना आळवीत होता.

इतक्यांत फादर पोर्टोने पुन्हा डोळे उघडले व भैरव आणि अंबिका यांच्या-कडे वळून म्हटलें, "भाग्यवान् जीवांनो ! प्रभूच्या हृदयांत तुमच्याविषयीं दया उत्पन्न झाली आहे. का कीं, तो अपराध्यांना पश्चात्तापानें पावन करून त्यांच्यावर

दया करणारा दयासागर आहे. त्याच्या पवित्र प्रेरणेनें दोन अटींवर मी तुमच्या-वर दया करण्याला तयार झालों आहें. प्रभूच्या धर्माचा अव्हेर तुम्हीं केला आहे, त्या अघोर पापाचें परिमार्जन होण्यासाठीं तुम्ही प्रभूच्या पवित्र धर्माचा अंगीकार केला पाहिजे—"

"काय ! आम्हीं बाटलें पाहिजे ?" भैरवानें मध्येंच विचारलें.

"ऐक ! माझें नीट ऐकून घे. तूं प्रभूच्या पवित्र धर्माचा स्वीकार केला पाहिजे व दुर्लभजी आणि रामानंद ह्या तुमच्या साथीदारांचा नक्की पत्ता लावून दिला पाहिजे." लगेच फादर पोर्टो अंबिकेकडे वळून म्हणाला, "त्याप्रमाणेंच हे प्रेमळ आणि सुंदर स्त्रिये ! तूं प्रभूच्या पवित्र धर्माचा स्वीकार करून यापुढें आपलें आयुष्य प्रभूच्या सेवेंत घालविण्याला तयार झालें पाहिजे."

"काय ? काय म्हणालां ? आम्हीं बाटावें ? आणि माझ्या बायकोनेंही बाटून एखाद्या मठांत जोगीण होऊन रहावें ?" भैरवानें एकदम चर्या गंभीर करून विचारलें.

भैरवाचें बोलणें संपण्यापूर्वीच फादर पोर्टो म्हणाला, "नाहीं. तिनें जोगीणच बनून राहिलें पाहिजे असें नाहीं. तिनें सोफियासारख्या प्रेमळ, सच्छील व वैभव शाली जोगिणीची सहचरी होऊन रहावें असें मी सुचवितों." असें म्हणून फादर पोर्टो मागें वळून पहातो तों सोफिया त्याला कुठें आढळेना. जवळ शिपायी उभे होते, त्यांनीं त्याच्या मागें पाहण्यांतील आशय ओळखून लगेच त्याला सांगितलें, "पाद्रीसाहेब ! आतांच मेमसाहेब एथून सुरक्षितपणें पालखींतून निघून गेल्या."

"सुरक्षितपणें गेल्याना ?" फादर पोर्टोनें विचारलें.

"होय." शिपायी उत्तरला.

"मग हरकत नाहीं." असें म्हणून फादर पोर्टो पुन्हा भैरव व अंबिका यांच्याकडे वळून म्हणाला, "कळलें का ?"

"कळलें." भैरव उत्तरला.

"मग तुमचा विचार काय ठरला ?" फादर पोर्टोनें प्रश्न केला.

"प्राण गेला तरी बेहत्तर,मी बाटावयाला तयार नाहीं."भैरव सडेतोडपणें उत्तरला.

"तर मग त्याला लोहस्तंभाशीं बांधून जिवंत जाळण्याची शिक्षा न्यायासन फर्मावीत आहे. शिक्षेची अंमलबजावणी आतांच्या आतां होऊं द्या." असें

ॲन्टोनिओला फर्मावून फादर पोर्टो अंबिकेकडे वळून म्हणाला, "तुला देखील मरावयाचें कीं माझी आज्ञा पाळावयाची आहे ?"

त्या प्रश्नाचें उत्तर अंबिकेनें देण्यापूर्वीच भैरव म्हणाला, "तिला काय विचारतोस ! मला विचार."

"तर मग तूं सांग,—तूं तर आपल्या वांटयाची शिक्षा भोगशीलच; पण मी तुझ्या बायकोमुलापुरतें विचारतों आहें. त्या दोघांचीही तुझ्यासारखीच गत व्हावी अशी तुझी इच्छा आहे, कीं तीं तरी आपल्या पश्चात् सुखी रहावीं अशी इच्छा आहे ?" फादर पोर्टोनें भैरवाला विचारलें. ॲन्टोनिओच्या हुकुमाप्रमाणें शिपायी त्याला लोहस्तंभाकडे नेत होते, ते जरा थबकले.

ॲन्टोनिओला भगवानजीप्रमाणेंच भैरवाचाही सर्व नाश झालेला पहाण्याची घाई झाली होती. तो त्या शिपायांना म्हणाला, तुम्ही थांबूं नका; ताबडतोब हुकुमाची अंमलबजावणी करा. आणखी शभर अपराध्यांचा न्याय होऊन त्यांना शासन व्हावयाचें आहे. काम लोकर आटोपलें तर पाहिजे."

ॲन्टोनिओच्या बोलण्याकडे भैरवानें लक्ष्य दिलें नाहीं. तो फादर पोर्टोला मात्र म्हणाला, "पापी माणसा ! आम्हां हिंदूंच्या पतिव्रतांना तूं काय समजतोस ? आपल्या पतींना दगलबाजीनें ठार मारून किंवा त्यांच्या डोळ्यांत धूळ फेकून तीनत्रिकाळ पापांनीं पाय धुणाऱ्या तुझ्या जातबहिणींप्रमाणेंच हिंदु स्त्रियाही वागतील असें तुला वाटतें काय ? तूं तिला बाटवून त्या बाजारबसवीची—त्या सोफियाची बटिक व्हावयाला सांगतोस; काय सांगूं ! माझे हात जर मोकळे असते; तर अंबिकेच्या बाबतींत असले अपवित्र शब्द उच्चारणारी तुझी जीभच तुझें नरडें दाबून तुझ्या जबड्यांत हात घालून मुळापासून खुडून काढली असती.—"

भैरव आवेशानें बोलत असतांनाच फादर पोर्टोनें ॲन्टोनिओला व ॲन्टोनिओनें आपल्या शिपायांना डोळ्यानें खूण केली. लगेच ते शिपायी भैरवाला लोहस्तंभाकडे ओढीत घेऊन गेले. सर्वांना जी फादर पोर्टोच्या दयाळुपणाबद्दल आशा वाटत होती ती विफल झाली. सर्वांच्या तोंडून 'हाय ! हाय !' असे कळवळ्याचे उद्गार निघूं लागले. अंबिका इतका वेळ फादर पोर्टोचे पाय धरून रडत बसली होती ती पूर्ण निराश होऊन उठून उभी राहिली. लहानगा भवानजी धांवत जाऊन तिच्या कमरेला मिठी मारूं लागला,

व अंबिकेनेंही त्याला उचलून घेण्यासाठीं वात्सल्यप्रेमाच्या भरांत हात पुढें केले. पण बिचारीं दोघेंही फसलीं. दोघांचेही हात शृंखलाबद्ध होते. त्यामुळें त्या मायलेकरांना जास्तच रडूं कोसळलें. बिचाऱ्या अंबिकेच्या मनाची तेव्हां काय अवस्था झाली असेल ! तिचा पितृस्थानीं ममता करणारा सासरा नुकताच नश्वर इहलोकचा त्याग करून गेला होता; त्याचें कलेवर अग्निकुंडांत भस्मसात् होतांना डोळ्यांसमोर दिसत होतें. तिचा जीवनाधार, तिचा सौभाग्येश्वर लोह-स्तंभाशीं जखडून बांधला जात होता; त्याची जिवंतपणीं चिता रचण्याची तयारी शिपायांकडून जारीनें चालली होती. जी गत त्या दोघांची झाली, तीच गत आपल्या लहानग्या अर्भकाचीही होणार ही कल्पना मातेच्या हृदयाला अत्यंत दुःसह खरी; पण ती कल्पनाही वास्तवतेचें भीषण स्वरूप धारण करण्यासाठीं आतुर होऊन त्या बिचारीच्या शतधाविदीर्ण हृदयांत थैमान घालीत होती. शिवाय तिचा स्वतःचाही प्रश्न होताच. अधःपात किंवा मरण यांपैकीं कोणतें तरी एक अरिष्ट पत्करण्याशिवाय तिला गत्यंतर नव्हतें; व अधःपातापेक्षां मरण बरें असें म्हणणाऱ्या तेजस्वी महाराष्ट्र पतिव्रतांपैकीं ती एक होती. ह्या अरिष्टांतून बचावण्याला कोणालाच कोणताच मार्ग मोकळा नाहीं अशी खात्री होतांच प्राप्त परिस्थितीला तोंड देण्याइतकी स्वतःच्या मनाची तयारी तिनें एका क्षणांत केली.

पण फादर पोर्टो व ॲन्टोनिओ यांना मात्र त्या वीररमणीच्या धैर्याची कल्पना नव्हती. तो अंबिकेची केविलवाणी स्थिति पाहून तिला म्हणाला, “ सुंदर स्त्रिये ! तुझा सासरा व तुझा पति ह्या दोघां माथेफिरू पापिष्टांची काय दशा झाली हें पाहून तरी तूं शुद्धीवर ये व माझ्या प्रश्नाचें सरळ उत्तर दे.”

“ तुमच्या प्रश्नाचें उत्तर तुम्हांला त्यांच्याकडून मिळालें आहे.” अंबिका उत्तरली.

“ तेंच का तुझें उत्तर ! ” फादर पोर्टोनें दोन पावलें पुढें जाऊन आश्चर्यपूर्वक विचारलें.

“ होय, तेंच माझें उत्तर.” अंबिका डोळ्यांना पदर लावून उत्तरली.

“ तेंच तिचें उत्तर.” भैरव लोहस्तंभाशीं उभा होता तो उत्तरला.

“ भैरव ! ” ॲन्टोनिओनें हांक मारली.

“ काय म्हणतोस ! ” भैरवानें विचारलें.

"तूं आणि मी हाडवैरी आहों हें तर खरेंच.—"

"तें सूर्य-चंद्रांइतकें अबाधित सत्य आहे. त्या हाडवैराचाच हा परिणाम आहे हेंही मी ओळखतों; पण अंताजी! याद राख, सारेच दिवस कांहीं सारखे नसतात. अघोर पातकांची परवड रचून त्या परवडीवर उभारलेल्या मानववैभवाच्या डोल्हाऱ्यांतून तूं आज मिरवलास, तरी तो डोल्हारा आज ना उद्यां कोसळेल व त्याखालीं तुझा चक्काचूर होऊन जाईल. सन्मार्गानें संपादन केलेलें वैभव देखील जेथें टिकतांना पंचाईत, तिथें दुर्मार्गाच्या खातेऱ्यांत अष्टौप्रहर लोळणाऱ्या तुझ्यासारख्याच्या वैभवाची गोष्ट कशाला? उभ्या गांवाचे शिव्याशाप पदरीं घेऊन उन्मत्तपणानें वागणाऱ्या सैताना! तुला पुढचा पाडवादेखील दिसणार नाहीं." भैरव फादर पोर्टोकडे वळून म्हणाला, "आणि साहेबड्या! तू देखील याद राखून ठेव कीं, तुझे दिवसही भरत आले आहेत. आज तूं जसा आम्हां निरपराधी हिंदूंचा छळ करण्यांत आनंद मानीत आहेस, तसाच उद्यां तुझा व तुझ्या जातभाईंचा छळ करून हें उसनें वाण आमचे जातभाई फेडल्याशिवाय रहाणार नाहींत. श्रीमंत अप्पासाहेब पेशवे, मानाजीबाबा आंग्रे यांना ही बातमी नुसती कळूं दे, कीं एकतरी गोरा फिरंगडा व त्याच्या नादानें वागणारा एकतरी देशद्रोही काळा बाटगा ह्या प्रांतीं औषधापुरता शिल्लक रहातोसा पहा!" तोंच शिपायी त्याला लोहस्तंभाशीं घट्ट बांधूं लागले, तेव्हां शरिराला वेदना होऊं लागल्यामुळें पुढें त्याच्याच्याने बोलवेना.

भैरवाला लोहस्तंभाशीं जखडून बांधण्यात आल्यावर अॅन्टोनिओनें शिपायांना त्या लोहस्तंभासभोंवार लांकडें रचण्याचा हुकूम देऊन हंसत हंसत भैरवाला म्हटलें, "भैरव! मूर्ख माणसा! बडबड, आणखीही खुशाल बडबड. तुमच्या-सारख्या चोहोंकडून दुबळ्या बनलेल्या नामर्दांनीं जिभेचा पट्टा चौफेर फिरविण्या-पेक्षां दुसरी कोणती मर्दुमकी गाजवावी? पण ज्यांच्या हातीं सत्ता व सामर्थ्य आहे, ते लोक असल्या शब्दाला प्रतिशब्द देऊन आपली वाणी शिणवीत नसतात. ते मनांत आणलेली गोष्ट तंतोतंत कृतींत उतरवून आपल्या सत्तेचा व सामर्थ्याचा प्रभाव तुझ्यासारख्या वाचाळांना देखतांडोळां पटवून देत असतात. कां, आतां कां थांबलास? त्या लांकडांना अग्नि मिळून जिवंतपणीं तुझी चिता पेटती होईतोंपर्यंत अजूनही तुला हवे तेवढे अपशब्द उच्चारतां येतील." लगेच तो अंबिकेला अनुलक्षून फादर पोर्टोला म्हणाला, "साहेब! त्या बाईचाही न्याय

एकदां लौकर करून टाका ना ? आपणाला आणखी ह्या इतक्या माणसांचा न्याय करावयाचा आहे."

"होय." असें म्हणून फादर पोर्टोनें अंबिकेकडे वळून विचारलें, "अभागी स्त्रिये ! तुला हाय हाय ! कां कीं, तुझा प्रत्यक्ष असा कांहीं अपराध नसतांनाही तूं प्रभूच्या रोषाला पात्र झालेल्या पापी पतीची संगति सोडण्याला तयार नाहींस म्हणून तुलाही त्या अग्निकुंडांत लोटून जाळून ठार मारण्याची शिक्षा न्यायासनाकडून देण्यांत येत आहे. आणि तुझ्या पश्चात् तुझ्या मुलाला सांभाळण्याला कोणी तयार नाहीं यामुळे त्यालाही तीच शिक्षा दिली जात आहे."

तोंच ॲन्टोनिओ फादर पोर्टोच्या कानीं लागून म्हणाला, "साहेब ! आपण आवेशाच्या भरांत चुकतां आहां. सोफियाबाईंनीं आपणापाशीं ह्या स्त्रीची मागणी केली आहे, माझ्यापाशींही त्या तिला मागत होत्या. तिला आपण दुसरी कांही तरी कठोर शिक्षा द्या, कीं जेणेकरून ती वठणीला येऊन सोफियाबाईचें दास्य पत्करावयाला तयार होईल."

फादर पोर्टो खरोखरच आवेशाच्या भरांत सोफियाची मागणी विसरला होता; पण वस्तुतः त्या गोष्टीचे त्याच्या दृष्टीनें फारच महत्त्व होतें. स्वरूपसुंदर मेरीवर तो लुब्ध झाला होता व मेरीची प्राप्ति होईतों तरी त्याला सोफियाची मनधरणी करणें प्राप्त होतें. ॲन्टोनिओनेंही वेळींच फादर पोर्टोला ही आठवण करून दिली याचें कारण त्याने थोड्या वेळापूर्वी—फादर पोर्टोच्याही पूर्वी मेरीला पाहिलें होतें. तो तिच्यावर लुब्ध झाला होता व आपण सोफियाचें लांगूलचालन केल्यानें ती आपणावर प्रसन्न होऊन मेरीला आपल्या स्वाधीन करील अशी त्याला अपेक्षा होती ! दरम्यान् तो तुळभजी व रामानंद यांना पकडून आणण्याच्या खटपटींत आणि नंतर भगवानजीशीं झगडण्यांत गुंतला असतांना फादर पोर्टो मेरीविषयींच सोफियाशीं लाडीगोडीची वाटाघाट करीत होता, हें ॲन्टोनिओला माहीत नव्हतें व एवढा मोठा धर्माधिकारी न्यायासनावर बसून देखील असल्या हलकटपणाच्या कारस्थानांत रंगून जाईल अशी त्याला कल्पनाही नव्हती !

ॲन्टोनिओची सूचना आपणाला अगदीं वेळेवर मिळाली असें फादर पोर्टोला वाटलें. त्या एका सूचनेबरोबर त्याला त्या घटकेपर्यंतच्या साऱ्या गोष्टी—आपण तारुण्यांत पदार्पण केल्यावर प्रथमच सोफियाला आपल्या अनीतिमय प्रेमपाशांत कसें गुरफटून टाकलें, तिच्या वजनाचा आपल्या मानवैभवाच्या वाढीकडे कसा

उपयोग करून घेतला, सोफियाशीं असलेला आपला अनीतिकारक संबंध आपणाला मंडपेश्वरचें धर्माधिकारित्व प्राप्त करून घेण्याच्या कामीं कसा उपयोगी पडला, आपण ठाण्याच्या किल्ल्याचें बांधकाम पुरें करून घेतांना कांहीं नरबलि दिले, त्यांतच बाबाजी माणकराचा त्याच्या एकुलत्या एका लावण्यवती उपवर कन्येच्या अभिलाषानें कसा बळी घेतला, इतके दिवस आपण जिच्या प्राप्तीसाठीं भगीरथ प्रयत्न करीत होतों, ती मेरी सोफियाच्या प्रयत्नांनीं आपणाला प्राप्त होण्याचा योग कसा आला आहे, वगैरे एकाहून एक रम्य–अर्थात् फादर पोर्टोच्या दृष्टीनें रम्य–स्मृतिचित्रें त्याच्या दृष्टीसमोर तरळूं लागलीं. मेरीच्या प्राप्तीसाठीं सोफियानें घातलेली भयंकर अट कशी पुरी करावी हाही विचार तेव्हां त्याच्या मनांत आला व ती अट पुरी करण्याचें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलेंही. त्याची पूर्वतयारी म्हणूनच त्याला सोफियाची मनधरणी करावयाची होती. त्यासाठींच सोफियानें केलेली अंबिकेची मागणी पुरवणें त्याला अवश्य वाटत होतें.

ॲन्टोनिओनें सूचना करतांच 'ठीक आहे' असें म्हणून फादर पोर्टोनें अंबिकेकडे वळून आपल्या अपवित्र विचाराची संपादणी केली. "अभागी स्त्रिये! तुला हाय हाय! कां कीं, प्रभूनें तुला प्रकाश दाखविला असतांही, त्या प्रकाशमय मार्गानें पवित्र जीवन कंठण्याची वासना तुझ्या अंतःकरणांत उद्गम पावत नाहीं; तरीही प्रभूच्या प्रेरणेवरून मी तुझ्यावर दया करूं इच्छितों. तुला दिलेली प्राणदंडाची शिक्षा मी माघारी घेतों व तुला फक्त आमच्या प्रभूच्या पवित्र धर्माची दीक्षा देऊन पावन करून घेतों."

"नका! मला पावन करून घेऊं नका; मजवर दयाही दाखवूं नका. त्या विटंबनेपेक्षां मला मरण पत्करलें. माझ्यावर तुम्ही एवढीच दया करा; मला या क्षणाला अग्निकुंडांत लोटून जीवन्मुक्त करा. माझ्या सौभाग्याचा–" अंबिकेनें रडत रडत भवानजीकडे पाहून आपल्या दुःखाश्रूंचा पाऊस त्याच्या मस्तकावर पाडून फादर पोर्टो व ॲन्टोनिओ यांना हात जोडतां जोडतां दीनवाणीनें उद्गार काढले, "तसेंच ह्या माझ्या एकुलत्या एका राजसाचा निर्दयपणें शेवट झालेला पहाण्याचें माझ्या नाशिबीं आणूं नका!"

"काय? अजूनही तूं धर्मांतर करून जोगीण व्हावयाला तयार नाहींस? तर मग तुला, हाय हाय! तुझ्या अभागी पतीला, हाय हाय! तुझ्या अभागी पुत्राला,

हाय हाय–! " फादर पोर्टो संतापून ॲन्टोनिओकडे वळून म्हणाला, " ॲन्टोनिओ ! ह्या कमनशिबी स्त्रीच्या अंगांत सैतानानें चांगलाच संचार केलेला दिसतो. तो सैतान सामोपचारांनीं गाडला जावयाचा नाहीं. यास्तव तिला आपल्या पद्धती-प्रमाणें त्या माचेवर बांधून योग्य ती उपाययोजना करा. तिच्या त्या अर्भकाला त्या रसरसलेल्या अग्निकुंडांत टाका व लोहस्तंभासभोंवार अग्नि पेटवून तिच्या पतीला ठार मारा. एवढा अनर्थ आपल्या डोळ्यांनीं पाहून तरी ती खास शुद्धीवर येईल; मग तिला सोफियाच्या मठांत पाठवा."

फादर पोर्टोंचा हुकूम होण्याचा अवकाश; त्याची अंमलबजावणी होण्याला कितीसा वेळ लागणार ! ॲन्टोनिओला तरी तेंच पाहिजे होतें. त्यानें ताबडतोब फादर पोर्टोंचा हुकूम आणण्याला प्रारंभ केला. तेथें तारेच्या कुंपणांत डाम्बून पडलेल्या लोकांना एथवरचा सारा अनन्वित प्रकार पाहून इतकें पराकाष्ठेचें दुःख झालें कीं, तीव्र उष्णतेनें बर्फ वितळून त्याचें अग्निवत् दाहकारी अशा वाफेंत रूपांतर व्हावें त्याप्रमाणें त्या लोकांच्या दुःखाचें अतिरेकानें तीव्र संतापांत रूपांतर झालें. ते लोक जरी असहाय होते, त्यांच्या हातीं जरी शस्त्रें नव्हतीं व त्यांना एकेलाला जागच्या जागीं डांबून ठेवण्यासाठीं जरी प्रत्येकाच्या मागें दोन दोन सशस्त्र शिपाई खडे होते, तरीदेखील ते लोक अनावर संतापानें बेभान होऊन दांतओंठ खाऊं लागले व मुठी आंवळूं लागले. तिकडे लोहस्तंभा-सभोंवार जाळ करण्यांत कांहीं शिपाई गुंतले होते व कांहीं इकडे आंबेकेची विटंबना करण्यांत गुंतून पडले होते. तेवढ्यांत ॲन्टोनिओ आपण होऊन लहान-ग्या भवानजीला उचलून अग्निकुंडात फेंकण्यासाठीं चालला. तेव्हां भैरव व अंबिका यांनीं जो टाहो फोडला, त्यानें दशदिशा हादरून गेल्या. अंबिका एखाद्या गाईसारखी हंबरडा फोडीत ॲन्टोनिओच्या हातांतून आपल्या अर्भकाला सोडवून घेण्यासाठीं धांवली. तिला शिपायांनीं अडविलें; चांगले सात आठ शिपाई तिला अडवीत होते. तरी ती तितक्या बेरडांनाही न आंवरतां व आपल्या पायांतील लोहशृंखलांच्या बंधनाचीही कांहीं तमा न बाळगतां सिंहिणीसारखी चवताळून पुढें गेली. ॲन्टोनिओ अग्निकुंडापाशीं जाऊन पोंचला व आतां भवानजीला आंत फेंकणार, तोंच अंबिकेनें त्याच्या हातांतील भवानजीवर झडप घातली. भवानजीनेंही 'आई ! आई !' असा टाहो फोडीत आपले चिमुकले दोन्ही हात आईकडे जाण्यासाठीं पुढें केले. पण तेवढयांत त्या काळांनीं त्या शिपायांनीं

अंबिकेचा पदर धरून तिला मागें ओढलें, त्यासरशी ती धरणीवर कोसळली. ॲन्टोनिओने तिला लाथेनें दूर लोटून आपल्या हातांतील तें गोजिरवाणे फूल तें जाईचें सुकुमार फूल अग्निकुंडांत फेकलें !*

" वेडे स्त्रिये ! अजून तरी तूं शुद्धीवर येशील का ? " फादर पोर्टोनें अंबिकेला विचारलें

पण अंबिकेला तो प्रश्न ऐकू गेला नाहीं तिचें हृदय आपल्या एकुलत्या एका मुलाचा तो भयंकर शेवट पाहून अगदीं भंगून गेलें. ती ओक्साबोक्शी रडत कढत हृदय पिळवटून ॲन्टोनिओला शापीत होती, " राक्षसा, चांडाळा ! मांगा! ह्या जगांत परमेश्वर असेल, तो मेला नसेल, तर तो तुझ्या ह्या अघोर कर्माबद्दल तुला पाहून घेईल.' ' ती देवीच्या देवालयाकडे तोंड करून देवीला दोन्ही हात जोडून उद्गारली, " जसा माझ्या कुळाचा, माझ्या सौभाग्याचा, माझ्या एकुलत्या एका राजसाचा व माझ्या अब्रूचा ह्या नरपशूनें विध्वंस मांडला आहे, तसा देवी माते ! तू याच्या सर्वस्वाचा विध्वंस केलास, तरच तूं देवी खरी. ती लगेच तारेच्या कुंपणांत डाम्बून पडलेल्या लोकांकडे वळून ओरडली, " अहो तुम्ही माझे गांवकरी ! अहो तुम्ही शेजारी ! तुम्ही जिवंत असूनही मेल्यासारखे नामर्द बनून स्वस्थ काय बसलां ! तुमच्या कल्याणासाठींच माझ्या पुरुषांनीं एवढी खटपट केली. तुमच्यापायींच त्यांची अशी दुर्दशा झाली व ती तुमच्या डोळ्यांदेखत ! तरीही तुम्ही स्वस्थ ! तुमच्या भाऊबंदांची, तुमच्या लेंकी-सुना बायकांची अशी विटंबना झाली, तुमच्या पोटच्या पोरांना हे लांडगे तुमच्यादेखत फाडून खाऊं लागले, तर तुम्ही काय असेच मेलेल्या मढ्यांप्रमाणें स्वस्थ बसाल ?—" एवढे बोलून तिला मूर्च्छा आली. त्यामुळे तिला विवस्त्र करून माचेवर बांधून तिचे हाल हाल करण्याचें त्या शिपायांचें—त्या यमदूतांचें काम सोपें झाले.

---

*पोर्तुगीजांच्या अशा प्रकारच्या अमानुषतेलाही पूर्वपरंपरा आहे. इ० सन १६१२ मध्यें अजडीव्हो हा गोव्याचा व्हाईसरॉय होता. त्यानें हिंदुस्थानांत असाच अमानुष दुष्टपणा केला होता. त्यानें सिलोनांत जय मिळविल्यावर आयांकडून त्यांचीं मुले जात्यांत घालून दळवावीं; शिपायांकडून मुलांना भाल्याच्या टोंकावर नाचवावें; समुद्रांत लोटून मगरींकडून खाववावें; व त्यांत आनंद मानावा ! ! !

अंबिकेला मूर्च्छा आली हें भैरवाला कळलें नाहीं. तो आपली मरणघटका कांठोकांठ भरून आतां बुडणार–शिपायी त्याच्या सभोंवार रचिलेल्या लांकडां-ना अग्नि देण्याची तयारी करूं लागले, आतां तीं लांकडें पेट घेऊन त्यांत तो जळून मरणार, अशा अखेरच्या घटकेला आपल्या ह्या जन्मींचे अखेरचे बोल बोलला, " अंबिके ! तुझा आक्रोश व्यर्थ आहे. आपण एवढा स्वार्थ-त्याग केला, एवढया यातायाती भोगल्या, आणि मरणही पत्करलें, हें सारें आपण देवाकारणें केलें व तें देवाचरणीं रुजू झाले असें मानून समाधानपूर्वक मरावें; यापेक्षां यांत कांहीं अर्थ नाहीं. हे लोक आपल्या देशाला–धर्माला–वित्ताला–अन्नाला महाग होऊन फिरंग्यांच्या लाथा खात कृमिकीटकांप्रमाणें चिरडले जाण्याच्याच लायकीचे आहेत." तो त्या लोकांकडे वळून उद्गारला, " शेणकिडे ते शेणकिडे ! शेषाशीं त्यांची बरोबरी कशी होणार ! यांच्या अंगीं कांहीं माणुसकी असेल, यांना अपमान–उपहास–विटंबना–परदास्य याची कांहीं चीड असेल अशा खोटया समजुतीनें आम्ही यांच्या उद्धारा-साठीं जिवावर उदार होऊन झटूं लागलों, त्याचें आम्हांला यथायोग्य प्रायश्चित मिळालें. परमेश्वर ! परमेश्वर ! ! "

शिपायांनीं लोहस्तंभासभोंवारच्या लांकडांना अग्नि देण्याला सुरुवात केली. इकडे अंबिकेलाही कांहीं शिपायांनीं माचेवर बांधून तिला विवस्त्र–अरेरे ! हे शब्द उच्चारणेंही जिवावर येतें !–अशी तिची विटंबना सुरू केली. ती पाहून भैरवानें डोळे मिटून घेतले. तो प्रहर दिवसाचा समय होता; पण तो भयंकर देखावा बघवेना म्हणून सूर्यानेंही आपल्या सहस्र नयनांवर निळ्याकाळ्या अभ्रांचें आवरण ओढलें. वास्तविक सकाळपासूनच मधून मधून सूर्यप्रकाश दिसावा व पुन्हा अभ्रांखालीं सूर्य झांकला जावा असा सृष्टीचा क्रम सुरू होता; पण आतां तर घनदाट अभ्रांखालीं सूर्याचा मागमूसही दिसेनासा झाला. देवालयासभोंवार घनदाट व सुंदर वृक्षराजी होती, त्या वृक्षांवर बसून रोज कोकिळा कर्णमधुर कूजन करीत; पण आज सकाळीं एथे एकही कोकिळा गात असलेली कोणाला ऐकूं आली नाहीं. इतर कांहीं पांखरांची किलबिल सकाळपासून थोडीफार सुरू होती तीही आतां थांबली. वारा वाहीनासा झाला, वृक्षांचीं पानें जरादेखील हलेनाशीं झालीं, जिकडे तिकडे अगदीं शांत–अगदीं भयाण ! !—अगदीं निस्तब्ध ! ! !

इतक्यांत अंबिकेला छळणाऱ्या शिपायांची हालचाल एकाएकीं मंदावली. त्यांतला एक शिपाई ॲन्टोनिओपाशीं येऊन म्हणाला, "सरदारसाहेब! ती बाई जिवंत नाहींसें दिसतें."

"कशावरून?" ॲन्टोनिओनें विचारलें.

"ती कांहींच हालचाल करीत नाहीं!" शिपाई उत्तरला.

"सुटली बिचारी!" तारेच्या कुंपणांत डांबून पडलेल्या कैद्यांपैकीं एकजण हळूच आपल्या जवळच्या दुसऱ्या माणसाच्या कानाशीं लागून उद्गारला. अंबिका खरोखरच ऐहिक यातनांतून कायमची मुक्त झाली होती. तिच्या वर्मी मार लागून तिचा अंत झाला होता.

"काय? ती स्त्री मेली?" फादर पोर्टोनें विस्मयपूर्वक विचारलें.

त्याच वेळीं आकाशांतील अभ्राच्छादन अंमळ विरल झालें.

लोहस्तंभासभोंवार भैरवाची जिवंतपणीं रचलेली चिता नीट पेट घेईना.

ॲन्टोनिओच्या तोंडून फादर पोर्टोच्या प्रश्नाला उत्तर मिळण्यापूर्वीच रामानंद व दुल्लभजी यांच्या शोधार्थ गेलेल्या शिपायांपैकीं जॉन एखाद्या पळपुट्यासारखा धांवत येऊन ॲन्टोनिओला म्हणाला, "सरदारसाहेब! घात झाला."

"काय झाले?" ॲन्टोनिओनें घोंटाळ्यांत पडून विचारलें.

"काय झालें?" फादर पोर्टोनेंही तोच प्रश्न केला.

"मराठ्यांचें प्रचंड सैन्य आपल्यावर चालून येत आहे. तुत्काच त्यांनीं गांवांत प्रवेश करून जागोजागीं नाकेबंदी चालविली आहे. गांवकरी त्यांना भराभर सामील होत आहेत. तें सैन्य इतक्यांतच इकडे चालून येईल." जॉन भीतीनें थरथर कांपत उत्तरला.

आकाशांतील अभ्रें दूर होऊन सूर्य आपल्या पूर्ण तेजानें प्रकाशूं लागला. मंदमंद वारा वाहूं लागला. वृक्षांचीं पानें सळसळूं लागलीं. पक्ष्यांची थोडथोडी किलबिल ऐकूं येऊं लागली. बंदीवान लोकांच्या चर्या प्रफुल्लित दिसूं लागल्या व बाहु स्फुरण पावूं लागले. त्यांतला एकजण उठून उभा राहून इतरांकडे चौकस दृष्टीनें पाहूं लागला. त्याबरोबर इतर सर्वजणही उठून उभे राहिले व एकमेकांच्या तोंडा कडे पाहूं लागले.

" सरदारसाहेब ! पहातां काय ? शत्रूंशीं तोंड दिलें पाहिजे. आपल्या सर्व सैन्याला एकत्र करा." फादर पोर्टो म्हणाला.

इतक्यांत देवालयाच्या बाहेरच्या बाजूला थोड्या अंतरावर 'हर ! हर !! महादेव' !!! अशी गर्जना झाली. भैरवाची चिता तुक्ती पेट घेऊं लागली होती; तरी त्याची पर्वा न करतां तशाच परिस्थितींत तो हर्षभरानें ओरडला, " हर ! हर !! महादेव !!! "

तारेच्या कुंपणांत डाम्बून पडलेल्या शंभर हिंदु जवानांनीं आपल्यावर पहारा करणाऱ्या शिपायांच्या हातून सांपडलें तें हत्यार बुचाडून घेऊन पटापट कुंपणा-बाहेर उड्या टाकून तशीच मेघगर्जना केली, 'हर ! हर !! महादेव !!!'

प्रकरण नववें

# निर्मळचा बोभाटा

इकडे अर्नाळ्यावर मोहिमेचा पुढील बेत ठरल्याप्रमाणें त्याची अंमलबजावणीही जारीनें सुरू झाली होती. बाजीराव पेशवे मोहिमेची सर्व जबाबदारी चिमाजी-अप्पांवर टाकून नादीरखानाच्या पारिपत्यासाठीं निघून गेले होते व इतर मंडळीही आपापल्या कामाला लागली होती. दुसऱ्या दिवसापर्यंत ठाण्यावर फक्त गंगाजी व बुवाजी नाईक, अंबाजी रघुनाथ व खंडूजी माणकर एवढी मंडळी होती; ती भगवानजी, भैरव व दुल्लभजी यांची वाट पहात होती. त्या मंडलीला भगवानजी वगैरे मंडळीवर तिकडे काय कहर गुदरला आहे याची कल्पनाच नव्हती.

वरील मंडळीशिवाय पोर्तुगीज कैदी व रॉबर्टसन ही मंडळीही अर्नाळ्यावरच किल्लेदाराच्या ताब्यांत होती. त्यांपैकीं फ्रॅन्सिस व रॉबर्टसन यांना चिमाजी-अप्पांनीं स्वतंत्रपणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपल्या खासगी बैठकखान्यांत एकेकट्याला बाजूला घेऊन व अभय देऊन इंग्रज व पोर्तुगीज यांचे बरेच गुप्त बेत व त्यांच्या कारभाराची खरी अंतःस्थिति समजावून घेतली. पैकीं फ्रॅन्सिस-कडून म्हणण्यासारखी महत्त्वाची माहिती चिमाजीअप्पांना मिळाली नाहीं, फक्त वसईच्या अधिकाऱ्यांपैकीं कोणाचा स्वभाव कसा आहे व कोणाचें कोणाशीं कोणत्या प्रकारचें नातें आहे, वसई-साष्टीच्या टापूंत मातबर पोर्तुगीज जमीन-दार, तसेच बाटून ख्रिस्ती होऊन मान्यतेला चढलेले लोक कोण कोण आहेत, वसईच्या किल्ल्यांत कैदी कोणकोणते आहेत, पोर्तुगीजांचें आरमार किती व कोणत्या स्थितींत आहे, अशी माहिती चिमाजीअप्पांनीं आपल्या मतें फ्रॅन्सिस-च्या पोटांत रिघून सहज गप्पा मारतां मारतां काढून घेतली.

रॉबर्टसनकडून मात्र मुंबईकर इंग्रजांच्या अंतस्थ बेतांविषयीं पुष्कळच महत्त्वाची माहिती त्या खाशा मंडळीला मिळाली. तो इंग्रज व पोर्तुगीज ह्या दोघांवरही चिडला असल्यानें त्या रागाच्या भरांत त्यानें स्वतःला माहीत होत्या तेवढ्या सर्व गोष्टी ओकून टाकल्या. तो पोर्तुगीजांवर सोफियाच्या पायीं चिडला होता हें वाचकांना पूर्वीच विदित झाले आहे; व तो इंग्रजांवर चिडण्याचें कारण मुंबईच्या

नव्या गव्हर्नरानें रॉबर्टसनच्या स्त्रैणपणाविषयीं कागाळ्या ऐकून त्याला दोष दिला होता आणि तोफखान्यांतील नोकरींत त्याला कमी प्रतीच्या अधिकारावर नेमून त्याचा अपमान केला होता. रॉबर्टसनचें सोफियाच्या बाबतींतील वर्तन अन्यायाचें मानलें तरी एरव्हीं तो पट्टीचा गोलंदाज होता, तसाच शूर व मानीही होता आणि त्याला बढती मिळण्याची ती वेळ होती; पण नव्या गव्हर्नरानें रॉबर्टसनच्या सर्व महत्त्वाकांक्षांवर पाणी ओतल्यामुळें रॉबर्टसनला तो मानभंग सहन झाला नाहीं. कोणत्याही इंग्रजाप्रमाणें रॉबर्टसन स्वदेशाभिमानी होता व स्वदेशासाठीं कोणतेंही बरें वाईट कृत्य करण्याची त्याची नेहमीं तयारी असे आणि सोफियाशीं त्याचें लग्न झालें असतें तर त्यामुळें त्याच्या स्वदेशाभिमानांत कांहीं वैगुण्य उत्पन्न झालें असतें असें नाहीं. त्यानें सोफियाबरोबर आपला सोन्याचा संसार थाटून स्वदेशसेवा पूर्ववत् केली असती. त्याला इंग्रज दरबारांत बढती मिळवावयाची होती तीही सोफियाला प्रसन्न करून भुरळ पाडण्यासाठींच. सोफिया त्याच्या प्रेमपाशांत गुरफटली होती, ती तो एक हुषार व देखणा गोलंदाज होता म्हणूनच केवळ नव्हे, तर तो लौकरच इंग्रजी दरबारांत मोठ्या मान-धन-वैभवाला चढेल व त्याच्या संसारांत आपणाला आपल्या गतवैभवाच्या तोडीचें वैभव पुन्हा उपभोगितां येईल अशी तिला बळकट आशा होती. रॉबर्टसननेंही आपण लौकरच एका मोठ्या इंग्रजी जहाजावरचा कॅप्टन होणार हें शुभवर्तमान सोफियाशीं झालेल्या पहिल्या भेटींतच सोफियाला निवेदन केलें होतें. ती रॉबर्टसनच्या नादीं लागून त्याच्या भावी उत्कर्षाच्या आशेवर आपल्या दैवाचा जुगार खेळावयाला तयार झाली ती तरी तिची तेव्हां स्वतःच्या समाजांत बरीच नाचक्की झाल्यामुळें सेनापति बुथेलोच्या ऐवजीं दुसरा कोणी सुंदर व कर्तबगार पोर्तुगीज अधिकारी तिच्याशीं लग्न करावयाला तयार होईना म्हणून!

तरीही सोफियानें रॉबर्टसनविषयीं मध्यंतरीं निराश झाल्यावर नवीन सेनापति सिल्व्हेरा याच्याशीं लग्न करण्यासाठीं खडा टाकून पाहिला होताच; व तेथेंही तिच्या दुर्दैवानें तिला दगा दिल्यामुळें ती बुडत्याला काडीचा आधार या न्यायानें रॉबर्टसनची मार्गप्रतीक्षा करीत होती. रॉबर्टसनचें मात्र सोफियावर प्रेम होतें तें वैषयिक प्रेम असेल, निःस्वार्थी प्रेमाचा बावन्नावा कस त्या प्रेमाला लागण्याजोगा नसेल, तरीही त्यानें शुद्ध भावनेनें सोफियाशीं लग्न करण्याचा विचार ठरविला होता; त्यांत लफंगेगिरी नव्हती. मात्र तो सोफियाच्या महत्त्वाकांक्षा पूर्णपणें जाणत होता,

व त्या पूर्ण करण्यासाठीं त्याची धडपड एकसारखी सुरू होती. सोफियाच्या महत्त्वाकांक्षा तिच्या मनोवृत्तींच्या कल पहातां हिणकस ठरण्यासारख्या असल्या तरी त्यांनीं रॉबर्टसनच्या मान-धन-वैभव-लालसेला फार उज्ज्वल स्वरूप दिले होतें. सोफियाला प्रसन्न करतांना त्यानें आपल्या उज्ज्वल भविष्यकाळाचें मनोहर शब्दचित्र तिच्यासमोर रंगविलें होतें व त्या चित्राला वास्तवतेचें विशेष मनोहर स्वरूप देण्याचा उद्योगही त्यानें प्रथमपासूनच आरंभिला होता. पण ईश्वराची इच्छा निराळीच असल्यानें साराच विपरीत प्रकार घडून आला व रॉबर्टसनच्या मनोरथांचा मनोरा ढांसळला. रॉबर्टसनच्या मनांत त्याच्या प्रेमसंबंधांत विष कालविणाऱ्या दोघांविषयीं सूडाची भावना उद्‌भूत झाली व त्या भावनेनें पेड्रो डि मेलोचा बळी घेतला. त्याच वेळीं सोफियाला भेटण्याचा त्याचा विचार होता; पण मुंबईहून त्या तुकडीला ताबडतोब माघारें बोलावण्यांत आल्यामुळें त्याला आपल्या प्रियकरिणीला न भेटतांच माघारे जाणें भाग पडलें. तेथें गेल्यावर तरी आपण एकदम कॅप्टनच्या हुद्द्याला चढूं, ती बातमी सोफियाला कळविल्यावर ती संतुष्ट होईल, मग आपण तिला मुंबईला आणवून थाटानें तिच्याशीं लग्न करूं, असे मनोरथांचे टोलेजंग मनोरे रॉबर्टसननें आपल्या मनोराज्यांत उठवून दिले होते; पण नव्या गव्हर्नरानें ते लेखणीच्या एका फटकाऱ्यासरसे ढांसळून पाडले. त्यामुळें त्याला सोफियाची भेट घेण्याला किंवा तिला पत्र पाठविण्यालाही तोंड उरलें नव्हतें. त्या मानखंडनेच्या खाईंत रॉबर्टसनचा स्वदेशाभिमान व कर्तव्यतत्परता पार जळून गेली व तो मोहरा कोणत्याही उपायांनीं आपण मान-धन-वैभव संपादन करून सोफियाला प्रसन्न करणार अशा इरेला पडला. आपल्या कर्तबगारीला आपल्या जातभाईंच्या कारभारांत वाव नाहीं, पोर्तुगीजांकडे जाण्याची तर सोयच नाहीं, अशा पेचांत रॉबर्टसन सांपडला, तेव्हां त्याला मराठ्यांच्या पदरीं जाऊन नशीब काढण्याचा आडमार्ग आठवला व त्यानें संधि साधून त्याच मार्गाचा अवलंब करण्याचा निश्चय केला. त्यानें हर प्रयत्नांनीं पोर्तुगीज जहाजावरून वसईकडे येण्याचा योग जुळवून आणला होता, त्याच्या मुळाशीं इतकीं खोल कारणें होतीं.

फ्रॅन्सिस व रॉबर्टसन यांच्याकडून मिळालेल्या माहितीच्या अनुरोधानें पुढील धोरण आंखण्यासाठीं चिमाजीअप्पांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं खंडूजी माणकर, गंगाजी व बुवाजी नाईक आणि अंताजीपंत ह्या मंडळीला जवळ बोलावून म्हटलें, " फ्रॅन्सिस व रॉबर्टसन यांनीं सांगितलेल्या माहितीचा आपणाला पुष्कळच

उपयोग होण्याजोगा आहे; तेव्हां तो वृत्तान्त आम्ही तुम्हांला आतां निवेदन करणार आहों. तुम्ही ह्या प्रांतींचे माहीतगार, तुम्हींच त्या माहितीचा खरा उपयोग करून घ्यावयाचा आहे."

गंगाजी नाईक हात जोडून उद्गारला, "धाकट्या श्रीमंतांनीं प्रथम आम्हां सर्व मंडळीला क्षमा करावी."

"क्षमा ! ती कशाबद्दल ?"

"आपण आतां आम्हांला जी माहिती सांगणार, ती आम्हांला पूर्वींच मिळाली आहे व त्यावरून आम्हीं आपसांत दरएकाची कामगिरीही निश्चित केली आहे." नाइकांनीं अंताजीपंतांपासून एक कागद मागून घेऊन तो चिमाजी-अप्पांपुढें ठेवून म्हटलें. "काल आपण त्या दोघांना एकान्तांत घेऊन माहिती विचारून घेत होतां, तेव्हां मी व अंताजीबाबा असे दोघे आपणाला न कळत आंतील बाजूला बसून सारें ऐकत होतों. अशी गोष्ट मीं करावयाची नव्हे; पण आपणापेक्षां आम्हांला ह्या भागांतील वातावरण जास्त माहीत, आमचा सारा जन्म ह्या भागांतील उलाढालींत गेलेला व अंताजीबाबा बरेच दिवस मुंबईला राहिल्यानें* मुंबईकर इंग्रजांच्या कावेबाजपणाचा त्यांना पूर्ण परिचय झालेला,

---

* अंताजी रघुनाथ कावळे हे शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण वसई वगैरे प्रांतांतील सर-देसाई व देशपांडे इनामदार होते. ते व त्यांचे बंधु रामचंद्रपंत यांनीं स्वधर्मरक्षणाचें महत्कार्य सिद्धीला नेण्याबद्दल इ० सन १७३० च्या पूर्वीपासून पेशव्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न चालविला होता. अंताजीपंत हे मोठे शूर, धर्मशील व हिंदुधर्माचे कट्टे अभिमानी होते. साष्टी प्रांतांत हिंदूनीं आपलीं धर्मकृत्यें प्रसिद्ध-पणें करूं नये असा फिरंग्यांनीं हुकूम काढला होता; तो अंताजीपंतांनीं धाब्या-वर बसवून स्वतः उघडपणें धर्मकृत्यें केलीं व इतरांकडूनही करविलीं. त्यावरून फिरंग्यांनीं अंताजीपंतांची इनामत जप्त केली व त्यांना पकडून गोव्याच्या धर्मशासनमंडळासमोर नेण्याचा हुकूम केला. तेथून अंताजीपंत पळून मुंबईला जाऊन राहिले व तेथून सर्व वृत्तान्त पेशव्यांना कळविला. मुंबई येथील खटपटीसंबंधानें बाजीराव व चिमाजीअप्पा यांनीं त्यांना अनुक्रमें ता. २७-५-३४ व ता. २३-१-१७३५ रोजीं कळकळीनें लिहिलेलीं पत्रें उपलब्ध आहेत. त्याप्रमाणेंच बाजिरावांनीं ता. ३-४-१७३४ रोजीं मुंबईचा गव्हर्नर जॉर्ज हॉर्न याला पत्र

त्यामुळें ते दोघे जें जें कांहीं सांगणार त्यांतील सत्यासत्याचा निर्णय करण्याला एकट्या आपणापेक्षां आम्हांला जास्त सुलभ जाईल अशा भरंवशानें आम्हांला तसें करणें भाग पडलें."

"पण आम्हीदेखील तुम्हांला चोरून वाटाघाटी करीत होतों असें मुळींच नाहीं. त्या दोघांची विशेषतः फ्रॅन्सिसची इच्छा गुप्तपणें एकट्या आमच्याशींच बोलण्याची दिसली, म्हणून आम्हीं तसें केलें; पण तुम्हां सर्वांच्या संमतीशिवाय आम्हांला कांहींच करावयाचें नव्हतें व नाहींही." चिमाजीअप्पा नाइकांनीं दिलेला कागद हातीं घेऊन त्यावरून नजर फिरवितां फिरवितां म्हणाले.

अंताजीपंत म्हणाले, "फ्रॅन्सिसनें एकान्तांत आपणाला सर्व माहिती सांगितली, यांतच काय ती गोम आहे."

नाईक म्हणाले, "पण झालें तेंही एकंदरींत चांगलें झालें. एरव्हीं आम्हांला त्या कावेबाज फिरंगड्याच्या अंतःकरणाची खरी ओळख झाली नसती."

चिमाजीअप्पा हातांतील कागदावरून अंताजीपंतांकडे दृष्टि वळवून म्हणाले, "हें काय? ह्या फुल्या कसल्या? कांहीं नांवांवर फुल्या आहेत व कांहीं नांवें कोरींच आहेत; याचा अर्थ काय?"

अंताजीपंत उत्तरले, "ज्यांच्या नांवांवर फुल्या आहेत, ते आमच्या माहितीप्रमाणें खरे गुन्हेगार आहेत; ज्यांचीं नांवें कोरीं आहेत, ते आपले हितचिंतक आहेत."

"पण यांत फ्रॅन्सिसच्या नांवाबरही फुली आहे!" चिमाजीअप्पा म्हणाले.

"होय, आहे." नाईक उत्तरले.

"मग तुमच्या मतें तोदेखील गुन्हेगार आहे कीं काय?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

"यांत काय संशय?" नाईक उद्गारले.

---

लिहून अंताजीपंतांचीं इनाम गांवें फिरंग्यांनीं अन्यायानें जप्त केलीं तीं चौकशी करून परत देवविण्याविषयीं लिहिलें; पण जॉर्ज हॉर्न यानें त्या भानगडींत पडण्याचें नाकारलें. तेव्हां अंताजीपंतांच्या सल्ल्यानें पेशवे फिरंग्यांवर स्वारी करण्याच्या खटपटीला लागले. (म. रि. मध्यविभाग–१). यावरून अंताजी रघुनाथ बरींच वर्षें मुंबईला राहून राजकारणाचे डाव खेळत होते हें उघड आहे.

" आम्हांला तरी त्याच्याशीं बोलतांना असें वाटलें नाहीं." चिमाजीअप्पा उद्गारले.

" पण आम्हांला वाटलें, वाटलें कसलें ? आमची बालंबाल खात्री झाली कीं, फ्रॅन्सिस हा आपल्या आश्रयाला आलेला सर्प आहे. तो नक्की आपल्या जातीवर जाणार. त्यानें आपणाला जी माहिती दिली, ती कांहीं खरी; पण बरीचशी खोटी आहे. त्यानें जे जे लोक मराठयांशीं शत्रुत्व करणारे म्हणून सांगितले, त्यांतले बरेचसे आमचे खरेखुरे हितचिंतक आहेत आणि जे सज्जन म्हणून सांगितले, त्यांतले आमच्या वाटेंतील खरेखुरे कांटे आहेत. त्याचा उद्देश आपणाला खोटी माहिती देऊन चकविण्याचा होता. मला तर वाटतें कीं, तो जर मोकळा राहिला तर आपणाला खास दगा देईल." नाईक उद्गारले.

" एकूण त्याला तूर्त मोकळा सोडावयाचा नाहीं ना ? "

" छे ! छे ! मुळींच नाहीं. धाकटे श्रीमंत ! आपणाला त्या माणसाची अजून यावी तशी कल्पना आलेली नाहीं. तो सध्या गायवर्णी बनला आहे, त्यावर आपण मुळींच जाऊं नका. त्याला मोकळा तर सोडावयाचा नाहींच; उलट त्याच्या व इतरांच्या हालचालींवर देखरेख ठेवण्याबद्दल किल्लेदाराला सक्त हुकूम झाला पाहिजे," नाईक म्हणाले.

" ठीक आहे." चिमाजीअप्पा अंताजीपंतांकडे वळून म्हणाले. " बरें अंताजी-बाबा ! रॉबर्टसनविषयीं तुमचें काय मत आहे ? तो देखील फ्रॅन्सिससारखाच लफंगा आहे कीं काय ? "

" नाहीं. तसें कांहीं मला वाटत नाहीं. त्यानें मुंबईकडील जी परिस्थिति निवेदन केली ती मला पटली."

" आणि आम्हांलादेखील बरीचशी पटली. तुम्हीं त्याचें सारें बोलणें ऐकलेंच आहे, तेव्हां पुन्हा सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. इंग्रजांना मराठशाहीचा उत्कर्ष बघवत नाहीं, याविषयीं आतां मुळींच संदेह उरलेला नाहीं."

" हें आमचें मत पूर्वीपासूनचें आहे. सिद्दी व आपल्या झगड्यांत त्यांनीं काय केलें ? तेंच ते याही वेळीं करणार; पण थोरल्या श्रीमंतांनीं त्यांना विश्वासांत घेतलें आहे—"

" विश्वासांत काय घेतलें ? साप मारण्यापुरता पाहुण्याचा हात आपल्या हातीं घेतला एवढेंच ना ? "

" होय. पण सापाला मारून सामर्थ्यवान् ठरलेला पाहुण्याचा हात शत्रूचा आहे हें कांहीं थोरल्या श्रीमंतांना तेव्हां कळलें नाहीं. दुसरें असें कीं, आपण आंग्र्यांना साप मानतां व इंग्रजांना पाहुणे मानतां, ही आपली विचारसरणीही चुकीची आहे असें मला वाटतें."

अंताजीपंतांनीं आंग्र्यांचा विषय काढला तो चिमाजीअप्पांना रुचला नाहीं. ते त्या विषयाला फांटा देण्याच्या उद्देशानें म्हणाले, " बरें; तो विषय आपण सवडीने पुन्हा केव्हां तरी बोलूं. तूर्त आपण इंग्रजांच्या ढालगजपणाला आळा घालण्यासाठीं काय केलें पाहिजे एवढें सांगा."

" तें आतां आपणच ठरवा."

" आम्हांला वाटते, इंग्रजांच्या ह्या कृत्याबद्दल त्यांना खाशी तंबी पोंचवावी व शिवाय मुंबईहून येणाऱ्या जहाजांवर आपली सक्त नजर आहेच."

" हा आपला विचार कांहीं वावगा नाहीं."

" मग हें काम कोण करील ! आम्हांला वाटतें कीं, अंताजीबाबा, हें काम तुमच्यासारख्या माहीतगाराशिवाय होणें नाहीं."

" आपली आज्ञा होईल तर मी तयार आहें." अंताजीपंत म्हणाले. इतक्यांत त्यांचे बैठकखान्याबाहेरच्या मोठ्या दिवाणखान्यांत कोणीतरी उभें असल्याचा भास झाला. त्याबरोबर त्यांनीं लगेच उठून दरवाजा उघडला, तों फ्रॅन्सिस तेथें उभा ! अंताजीपंतांनीं त्याला विचारले, " तुमचें इकडे काय काम ? "

" नाहीं; वसईहून सेनापतींचे उत्तर आलें किंवा कसें याबद्दल विचारपूस करण्यासाठीं मी आलों होतों." फ्रॅन्सिस किंचित् गोंधळून पण आपण गोंधळलों नाहीं असें दर्शवून उत्तरला.

अंताजीपंत व नाईक यांनीं चिमाजीअप्पांकडे पाहिलें. चिमाजीअप्पा फ्रॅन्सिसला म्हणाले, " तुम्ही आपल्या जागीं बसा जा. वसईहून उत्तर आलें, कीं तुम्हांला ताबडतोब कळविण्यांत येईल."

यावर 'जशी आज्ञा' असें म्हणून फ्रॅन्सिस निघून गेला.

" फ्रॅन्सिसनें आपले बेत ऐकले असावेत असें वाटतें." चिमाजीअप्पा म्हणाले.

" आतांच मीं त्याचें वर्णन केलें, त्याचा पडताळा हातोहात पहा ! " नाईक उद्गारले. " मला तर वाटतें कीं, आपण त्याला मोकळा ठेवला आहे हेंही धोक्याचें आहे. किल्लेदाराला सांगून त्याचा नीट बंदोबस्त केला पाहिजे."

चिमाजीअप्पांनाही ती सूचना पटली त्यांनीं ताबडतोब आपल्या एका हुजऱ्याला आज्ञा केली, " हैबती ! जा. आतांच्या आतां किल्लेदाराला बोलावून आण."

हैबती बाहेर जातो तोंच स्वत: किल्लेदार बाजीबा व त्याच्या मागोमाग आठ नऊ लोक हातांत पेटत्या मशाली घेऊन तेथें आले. ते लोक दिवसाढवळ्या मशाली पेटवून आलेले पाहून सर्व मंडळीला मोठा अचंबा वाटला. त्या मंडळींत दोन ब्राह्मणही होते. चिमाजीअप्पांनीं किल्लेदाराला विचारलें, " बाजीबा ! हा काय प्रकार आहे ? "

बाजीबा उत्तरला, " सरकार ! हे निर्मळचे रहिवासी सिद्धेश्वरशास्त्री आपल्या पायांपाशीं फिर्याद घेऊन आले आहेत."

" यांची काय फिर्याद आहे ? " चिमाजीअप्पांनीं सिद्धेश्वरशास्त्र्यांना विचारलें, " बोला, तुमची काय फिर्याद आहे ? "

साठीच्या उमरीचे सिद्धेश्वरशास्त्री हात जोडून म्हणाले, " सरकार ! आपल्या राज्यांत न्याय आहे किंवा नाहीं, कीं आपली पेशवाई म्हणजे झोटिंगपाच्छाहीच आहे, हें विचारण्यासाठीं आम्हीं आपल्या पायांपाशीं आलों आहों. आम्ही निर्मळचे रहिवासी. आपलें वास्तव्य इतकें शेजारीं असतांही फिरंग्यांकडून आमचा दिवसाढवळ्या छळ व्हावा ! त्या पवित्र क्षेत्रांत फिरंग्यांनीं भ्रष्टाचार मांडावा, इतका आपल्या पेशवाई अंमलांत अंधार माजला आहे. त्या अंधारांत मार्ग दिसेना, म्हणून आम्ही दिवसाढवळ्या मशाली पेटवून आपल्या पायांपाशीं आलों आहों. फिरंग्यांनीं बाटविलेल्या लोकांना शुद्ध करून घेण्याच्या कामीं पेशवेसरकारांचा पूर्ण पाठिंबा आहे, म्हणून आम्हीं धैर्यानें शुद्धीची चळवळ हातीं घेतली व आजूबाजूच्या गांवांतील लोकांचें शुद्धिकार्य निर्मळक्षेत्रीं आरंभिलें. रामानंदस्वामीही आमच्या सुदैवानें तें कार्य धडाडीनें पार पाडणारे आम्हांला भेटले. स्वामींच्या हस्तें आज तेथें आजूबाजूच्या सुमारें हजार लोकांना शुद्ध करून घ्यावयाची आमची सारी तयारी झाली; पण त्या तयारीला धोंडशास्त्री व भय्याशास्त्री यांच्यासारखे आमच्यांतलेच थोर पुरुष विघ्न करावयाला उभे राहिले आहेत व त्यांना साह्य फिरंग्यांचें आहे ! आज सकाळपासून गांवांत गोऱ्या सोजिरांनीं भय्याशास्त्र्यांच्या आज्ञेवरून वहिमी लोकांची गांजणूक चालविली आहे, आल्काकोव्हा या नांवाचा एक फिरंगी बरोबर आणखी सैन्य घेऊन आचार्यांच्या समाधीचा नाश करण्यासाठीं व शुद्धिकार्याला सामील असणाऱ्या सर्वांची

कत्तल करण्यासाठीं वसईहून चालून येत असल्याची दाट वदंता उठली आहे; व आम्हां सर्व मंडळींचा तर आग्रह कीं, आज शुद्धिकार्य कसेंही करून पार पाडावयाचें. आतां ह्या संकटांतून आपण आम्हांला तारणार, कीं आम्ही सर्व बाटून ख्रिस्ती झालेले आणि निर्मळच्या समाधीचें ख्रिस्ती प्रार्थनामंदिर झालेलें पहाणार ? "

नाईक मध्येंच म्हणाले, " धाकटे श्रीमंत ! धोंडशास्त्री व भयाशास्त्री हे 'कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ' कसे आहेत याचें हें प्रत्यंतर पहा ! "

" त्या दोघांचें म्हणणें तरी काय ? " चिमाजीअप्पांनीं सिद्धेश्वरशास्त्र्यांना विचारलें.

" त्यांचें म्हणणें कीं, एक तर आम्हांला शुद्धिकार्य करण्याचा धर्माधिकारच नाहीं. आम्ही हीन प्रतीचे ब्राह्मण आहों व दुसरें, एकदां बाटून ख्रिस्ती झालेल्या लोकांना पुन्हा हिंदुधर्मांत घेतांच येत नाहीं. पण ह्या त्यांच्या धर्माभिमानाच्या मुळाशीं निराळीच गोम आहे. भय्याशास्त्री तर बोलून चालून फिरंग्यांचे हस्तकच आहेत. त्यांच्याविषयीं वाद नाहीं. धोंडशास्त्री तसे असतीलच असें मी म्हणूं शकत नाहीं. एवढा नाणावलेला जटापाठीन्-घनपाठी विद्वान् धर्मशील ब्राह्मण तो; तो फिरंग्यांना सामील होऊन आपल्या धर्मावर घाला घालावयाला तयार झाला असेल असें कसें म्हणावें !—"

" त्यांच्या मनांत तेढ तरी कोणती आहे ? " चिमाजीअप्पांनीं विचारलें.

" दहाबारा वर्षांपूर्वीं त्याचा मालाडला एका यज्ञाच्या वेळीं कांहीं शुक्ल-यजुर्वेदी ब्राह्मणांकडून अपमान झाला होता. धोंडशास्त्री जे त्या वेळीं चिडले, तेव्हांपासून ह्या प्रांतांतील यजुर्वेदी ब्राह्मणांना 'पळशे' अशा निंदाव्यंजक नांवानें संबोधण्याचा प्रघात पाडण्यांत व त्यांच्या उच्च ब्राह्मणत्वाला हर उपायांनीं बट्टा लावण्यासाठीं शास्त्राधार शोधण्यांत त्यांच्या आयुष्याचा व्यय होत आहे."* सिद्धेश्वरशास्त्री म्हणाले.

---

* 'कोंकणांतील ब्राह्मण लोक मराठी साम्राज्यवृद्धीच्या पहिल्या साठ वर्षांत अगदींच पुढें आले नाहींत'. ( कै० जस्टिस् रानडेकृत 'मराठी सत्तेचा उत्कर्ष'). 'कोंकणस्थ ब्राह्मण हे प्रथमतः अगदीं मूढ असत व कोंकणांतून फारसे घाटावर येत नसत; आणि देशस्थ लोकही त्यांस अगदीं हलके समजत असत. या-

"हें मात्र खरें." अंताजीपंत उद्गारले.

"पण त्या वादाचा शुद्धीच्या चळवळीशीं काय संबंध ?"

सिद्धेश्वरशास्त्री म्हणाले, "वस्तुतः कांहीं संबंध नाहीं. पण धोंडशास्त्री असा त्या परस्परभिन्न वादाचा बादरायण संबंध जोडूं पहातात. मुळांत राग कांहीं शुक्ल-यजुर्वेदी ब्राह्मणांनीं त्यांना पंक्तीला घेण्याचें नाकारून त्यांचा अपमान केला हा; त्या रागाचें उट्टें त्यांच्यावर काढावयाचे व माझ्यासारखे कांहीं ब्राह्मण त्यांच्या बरोबरीनें शुद्धीच्या चळवळींत पुढाकार घेतात म्हणून 'इन्द्राय तक्षकाय स्वाहा' या न्यायानें आमच्यासकट शुद्धीची चळवळही भरडून काढावयाची. ते उघड उघड बोलूनही दाखवितात कीं, पेशवे व सुभेदार हे आमच्या स्नेहांतील असल्यानें आमच्याविरुद्ध कोणीं कितीही शंख केला तरी त्यामुळें आमचें काय वांकडें होणार आहे ! वस्तुतः धोंडशास्त्री माझे स्नेही आहेत; पण मी ह्या आपसांतील भेदभावांना मूठमाती देऊन एकीनें वागण्यासाठीं खटपट करूं लागल्यापासून त्यांनीं माझ्यावरही बहिष्कार घातला आहे. बरें; इतर बराचसा ब्राह्मणवर्ग त्यांचा शब्द वेदवाक्य समजून वागतो. तिथें आमचा काय इलाज चालणार ?"

---

मुळेंच शिवाजीपर्यंत कारभारांत जे मुत्सद्दी लोक होते ते परभू किंवा देशस्थ असत'. (लोकहितवादी.) 'The Peshwas were long excluded from eating at tables with any other Brahmins of high caste' (Ward's 'India and the Hindoos'). या व दुसऱ्या दस्तैवजी पुराव्यांवरून देशावरील देशस्थांचा व कोंकणस्थ ऊर्फ चित्पावन यांचा प्रारंभीं तरी बेबनाव होता हें उघड आहे. ह्या बेबनावाला मूळ कारण कोंकणस्थ मराठशाहींत देशस्थांना आपल्या अनेकविध कर्तबगारींनीं मागें सारून पुढें सरले हेंच असावें. जातिभेदात्मक उच्चनीचतेच्या भावनांनीं त्या तेढीचा परिपोष झाला एवढेंच. देशस्थ विरुद्ध कोंकणस्थ ह्या वादाचें राजकीय स्वरूप पेशवे-प्रतिनिधींच्या चुरशींत प्रातिबिंबित झालेलें 'पेशवाई'वरील पूर्वीच्या कादंबऱ्यांतून प्रसंगोपात्त विशद करण्यांत आलें आहेच व कोंकणस्थांशीं चुरस मांडणारे देशस्थ हे यजुर्वेदी देशस्थ होत हेंही तेव्हां स्पष्ट करण्यांत आलें आहे. वसई साष्टी प्रांतांत त्या काळीं कोंकणस्थांना हीन लेखण्याचा प्रयत्न झाला, तो तेव्हांच्या देश-काल-परिस्थित्यनुसार तेथल्या शुक्ल-यजुर्वेदी ब्राह्मणांकडूनच झाला

"एकूण पोरकट जात्यभिमानाच्या व धर्माभिमानाच्या नांवावर चाललेला ह्या गोंधळ प्रत्यक्ष आम्ही तेथें आल्याशिवाय मिटणार नाहीं असें दिसतें." चिमाजीअप्पा त्रासिक स्वरांत म्हणाले.

"अगदीं खरें. श्रीमंतांच्या थोर लौकिकाची ही उघड उघड बदनामी आहे; तिला वेळींच आळा घालण्यासाठीं देखील श्रीमतांनीं ह्या भानगडींत स्वतः जातीनें मन घालणें अत्यंत अवश्य आहे." अंताजीपंत म्हणाले.

"पण ही बाब सरकारांनीं दिरंगाईवर टाकण्यासारखी नाहीं. तूर्त आजचा निर्मळ येथील प्रळय थांबविण्यासाठीं तरी सरकारांनीं आतांच्या आतां तिकडे आलें पाहिजे." सिद्धेश्वरशास्त्री हात जोडून म्हणाले.

लगेच चिमाजीअप्पा आपणाबरोबर दोनशें सशस्त्र सैनिकांची तुकडी घेऊन गंगाजी नाइकासह निर्मळहून आलेल्या मंडळीबरोबर तिकडे जावयाला निघाले. अंताजीपंतांनीं बरोबर असावें असें नाइकांचें मत होतें; पण अंताजीपंतांवर चिमाजीअप्पांनीं इंग्रजांकडील कामगिरी सांगितली होती. तिकडे जावयाला ते आज

---

व पुढेंही साधारणतः पेशवाईच्या अखेरीपर्यंत ही चुरस कमीअधिक प्रकारांनीं सुरू असल्याची तेव्हांचीं ग्रामण्यप्रकरणें साक्ष देत आहेत. ह्या क्रियेची प्रतिक्रिया म्हणूनच कीं काय, तेव्हांच्या कांहीं दुराग्रही ब्राह्मणांकडून वसई-साष्टी भागांतील शुक्ल-यजुर्वेदी ब्राह्मणांना 'पळशे' हें उपमर्दकारक नांव देण्यांत आलें व त्यांचा दर्जा हीन ठरविण्याचा प्रयत्न सुरू झाला. आजलाही त्या चुरशीच्या छटा वर्तमान ब्राह्मणसमाजगंगेवर उमटलेल्या कांहींशा आढळतात; पण नवमतवादी तरुण ब्राह्मण पिढी ह्या भेदभावाला मूठमाती देण्याचा स्तुत्य प्रयत्न सध्यां करीत आहे व त्या प्रयत्नांना यशही येत आहे. मात्र 'पळशे' या उपेक्षापूर्ण संबोधनानें संबोधिली जाणारी ब्राह्मणजात इतर कांहीं जीर्णमतवादी ब्राह्मण म्हणतात त्याप्रमाणें हीन नसून निदान इतर दक्षिणी ब्राह्मणांइतकी संस्कृतीनें व जन्मतः उच्च आहे याला इतिहास स्पष्ट साक्ष आहे. एथें आणखी एक महत्त्वाची गोष्ट नमूद करून ठेवणें इष्ट आहे, ती ही कीं, स्वतः पेशव्यांनीं आपलें धोरण बहुशः ह्या ब्राह्मण-जातिभेद प्रकरणीं समतोल व उदारतेचें ठेवण्याचा प्रयत्न केला. त्या प्रयत्नांना कांहीं दुराग्रही व मूढमति ब्राह्मणांच्या उपद्व्यापांनीं यावें तितकें यश आलें नाहीं ही चूक पेशव्यांची अर्थात् नाहीं.

दुपारींच निघणार होते. गंगाजी नाईक बरोबर सैन्य घेऊन पुढें निघाले व चिमाजी-अप्पा त्यांच्या मागोमाग निघणार, तोंच रॉबर्टसन त्यांच्यापाशीं इतका वेळ उभा राहून सारा वृत्तान्त ऐकत होता तो पुढें होऊन म्हणाला, "सरकार मला जर निर्मळच्या कामगिरीवर पाठवितील, तर मी आल्काकोव्हाचा पराजय करून सर्व पोर्तुगीजांना तेथून पिटून काढीन व सरकारांच्या प्रजाजनांचें धर्मकार्य निर्विघ्नपणें पार पडेल असें करीन. असल्या क्षुल्लक कामगिरीवर स्वतः स्वाशांनीं जाण्याचें कारण नाहीं."

चिमाजीअप्पा यावर कांहींतरी उत्तर देणार, तोंच दुल्लभजी मोरे धापा टाकीत तेथें येऊन धडकला. त्याचे सर्व कपडे धुळीनें भरलेले होते व त्यावर कांहीं ठिकाणीं रक्ताचे डागही पडले होते. असा त्याचा अवतार पाहून सर्वांना प्रथम वाटलें कीं, तो निर्मळहूनच आला.

## प्रकरण दहावें

# बार्बाराचें मोहजाल

पण दुल्लभजी खरोखर निर्मळून आला नव्हता. त्यानें तेथें येतांच चिमाजी-अप्पांना दोन्ही हात जोडून विनाति केली, " सरकार ! मंडपेश्वरीं आपलें व फिरंग्यांचें खडाजंगीचें युद्ध जुंपलें आहे. तिकडे आपल्यापैकीं कोणा सरदाराकडून ताबडतोबीनें सैन्याचा उपराळा झाला नाहीं, तर आपल्या लोकांची मुळींच धडगत नाहीं. मंडपेश्वरीं गोऱ्या सोजिरांचा भरणा आमच्या कल्पनेपेक्षां पुष्कळच मोठा आहे. शिवाय तेथले सारे पाद्री व त्यांचे विद्यार्थी देखील युद्धांत सामील होण्याचा फार संभव आहे."

" पण हें मंडपेश्वरचें युद्ध जुंपविलें केव्हां व कोणीं ? " चिमाजीअप्पांनीं आश्चर्य-पूर्वक विचारलें. " इतकी तुमची तयारी अपुरी होती, तर तुम्हांला पूर्ण तयारी केल्याशिवाय मंडपेश्वरावर चालून जावयाला सांगितलें होतें कोणीं ? "

चिमाजीअप्पांना अंमळ राग आला असें पाहून दुल्लभजी उद्गारला, " सरकार परिस्थितीनें आम्हांला तसें करणें भाग पाडलें. आपणाला चुळण्याकडील प्रळया-ची बातमी अजून कळली नसेल, म्हणून आपण असें म्हणतां."

" आम्हांला येथून भगवानजी गेल्यापासून तिकडील कांहींच खबर कळली नाहीं." बुवाजी म्हणाला.

" तरीच ! मला तसें वाटलेंच." दुल्लभजी उद्गारला. त्यानें तो वृत्तान्त निवेदन केला, " आम्ही येथून गेल्यावर रामानंदांना गांठून चुळणें येथील शुद्धिकार्याची सर्व सिद्धता केली. गांवही बहुतेक आम्हांला वश झाला; पण तेवढ्यांत ॲन्टो-निओकडे कोणीं चहाडी केली नकळे, त्यानें आमच्या कार्यांत विघ्न आणण्याचा चंग बांधला. पाडव्याच्या पूर्वदिवशींच आमच्या कार्याला उघड उघड विरोध करणारा जाहीरनामा गांवांत फडकूं लागला. त्यामुळें लोक बिचकले. त्यांना धीर देण्यासाठीं सरकारांच्या अनुमतीचें अभयपत्र मिळवून गांवांत जाहीर करावें म्हणून मी ताबडतोब इकडे यावयाला निघालों; पण वाटेंत मला शत्रूच्या शिपायांनीं गांठून कैद केलें. चांगला दीड दिवस मी कैदेंत होतों. पाडव्याच्या दिवशीं मला ॲन्टोनिओकडे चुळण्याला रवाना करण्यांत आलें; पण माझें

नशीब थोर म्हणून मार्गांतच विठ्ठल शिवदेव सरकारांच्या निमंत्रणावरून धारावी-कडील आपली कामगिरी आवरून इकडे येत होते ते भेटले. त्यांच्याबरोबर दहा घोडेस्वार होते व मला पकडून नेणारे लोक अवघे चार होते, त्यामुळें उभयतांची खडाजंगी होऊन माझी मुक्तता झाली. मीं विठ्ठलपंतांना सारा वृत्तान्त निवेदन केला. त्यानंतर इकडे बातमी पोंचवून कुमक न्यावयाला मुळींच अवसर नव्हता, म्हणून विठ्ठलपंतांनीं धारावीकडील आपलें सैन्य तांतडीनें चुळण्याला बोलावण्याचें ठरविलें व तिकडे एक स्वार रवाना झाला. तिकडून सैन्य येण्या-पूर्वीच आम्हीं चुळणें गांवीं जाऊन तेथील आमच्या मंडळीला धीर देण्याचे ठरविलें. पण गांवाच्या वेशीपाशीं जातों तों सारा गांव पूर्वीच ॲन्टोनिओच्या सैन्यानें व्यापून टाकला आहे व गांवांत ज्यांनीं ज्यांनीं पाडव्याच्या दिवशीं गुढ्या उभारल्या आणि शुद्धिकार्यांत भाग घेतला, त्या सर्वांचें शासन करण्या-साठीं धर्मशासन-मंडळाची बैठक उद्यींक तेथे बसणार आहे असें आम्हांला कळून आलें. अशा स्थितींत सड्यानें गांवीं जाण्याची सोय नाहीं असें पाहून आम्ही धारावीहून सैन्यबळ येईतों जवळच्या एका पडक्या घरांत दडून बसलों. दुसऱ्या दिवशीं सकाळींच मी हरयुक्तीनें गांवांत गेलों. विठ्ठलपंतांचें सैन्य अजून आलें नव्हतें. तें येण्यावर आमची सारी भिस्त अवलंबून होती. गांवांत जाऊन पहातों तों त्यापूर्वीच धरपकडीला जोमांत सुरुवात झाली होती."

"पण धरपकड कशासाठीं ?" चिमाजीअप्पांनीं प्रश्न केला.

"पोर्तुगीज सरकारचा हुकूम मोडून गुढ्या उभारल्यासाठीं व शुद्धिकार्यांत सामील झाल्याबद्दल." दुल्लभजी उत्तरला.

"एकूण भगवानजी व भैरव यांनीं शुद्धिकार्य शत्रूच्या विरोधाला न जुमानतां पार पाडलेंच तर !"

"होय. त्यांनीं तें मोठ्या युक्तीनें पार पाडलें. रामानंदस्वामींनीं त्यांना युक्ति सांगितली. मलादेखील गांवीं जाईतों खबर नव्हती. मी इकडे आपणाकडे येण्यासाठीं म्हणून निघालों तो वेळींच परत गेलों नाहीं असें पहातांच त्या मंडळीनें सरकारांच्या नांवचें अभयपत्र गांवांत आपण होऊनच जाहीर केलें व त्यामुळें सर्व लोकांना धीर येऊन त्यांनीं शुद्धिकार्यांत उघडपणें भाग घेऊन पाडव्याचा सणही राजरोसपणें साजरा केला. त्या दिवशीं त्या गांवावर सुखकर पेशवाई अंमल सुरू झाला असेंच सर्वांनीं भासविलें. मात्र अभयपत्र त्या

मंडळीनें आपल्या परवानगीशिवाय आपल्या नांवानें जाहीर केलें ही चूक केली; पण त्या मंडळीचा पवित्र हेतु लक्षांत घेऊन आपण ह्याबद्दल सर्वांना क्षमा केली पाहिजे."

"ही चूकच नव्हे, मग क्षमा कसली करावयाची ?"

"माझ्या वाटेंत विघ्न आलें असेल अशी त्यांना कल्पनाही नव्हती. मी इकडे येऊन आपणाला भेटून योग्य कुमक घेऊन वेळींच हजर होईन असा त्या मंडळीला भरंवसा होता. त्या भरंवशावर त्यांनीं पुढील कामें साजरीं केलीं."

"त्यांनीं उचित तेंच केलें. आमची त्याला पूर्ण मान्यता आहे. बरें पुढें ?"

पुढें कसकसा अनर्थ घडला, तो निवेदन करून दुल्लभजी उद्गारला, "विठ्ठल-पंतांचें सैन्य गांवीं येऊन दाखल होतांच आम्हीं कांहीं गांवकऱ्यांना बरोबर घेऊन देवीच्या देवालयाकडे चाल केली व शत्रूवर छापा घालून त्या लोकांची पूर्ण दाणादाण उडवून दिली; पण आम्ही तेथें जाऊन पोंचण्यापूर्वीच त्या राक्षसांनीं भगवानजी, भैरवाची बायको व लहानगें अर्भक ह्या तिघांचेही बळी घेतले होते."

"अरेरे ! इतके ते लोक उरफाट्या काळजाचे होते एकूण !"

"तर ! भैरवदेखील तेव्हांच बळी पडावयाचा. त्याला लोहस्तंभाशीं बांधून जाळण्याला प्रारंभ झाला होता. तोंच आम्ही तेथें जाऊन थडकलों, त्यामुळें तो बचावला. त्याला आम्हीं चितेवरूनच ओढून काढला असें म्हणावयाला हरकत नाहीं. आमची व शत्रूच्या लोकांची चांगली सायंकाळपर्यंत लढाई चालली होती. ॲन्टोनिओ आमच्याशीं निकरानें लढत होता.—"

"कुलांगार ! गुलामानें धर्मापरी धर्म बुडविला, देशापरी देश बुडविला, कुळापरी कुळ बुडविलें, स्वतःचें तोंड काळें करून बेचाळीस पूर्वज नरकांत लोटले ते लोटले व कायस्थ जातीच्या थोर नांवाला काळोखी फांसली !" बुबाजी मध्येंच जळफळून उद्गारला.

"आणि फादर पोर्टोचें काय झालें ?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

दुल्लभजी उत्तरला, "आमची व ॲन्टोनिओच्या लोकांची लढाई जुंपतांच फादर पोर्टो केव्हां पळाला याची आम्हांला दाददेखील लागली नाहीं. आणि अखेर ॲन्टोनिओदेखील त्याचा पूर्ण पराजय झाल्यावर गुपचूपपणें पळाला.

आम्हीं सारा गांव धुंडाळला, पण शोध लागला नाहीं. तोंच सायंकाळीं आम्हांला बातमी लागली कीं, दोघेही मंडपेश्वराकडे पळाले. लगेच आम्हीं मंडपेश्वराकडे मोर्चा वळविला. मध्यरात्रीच्या सुमाराला आम्ही मंडपेश्वरीं जाऊन पोंचलों. आमचा विचार रातोरात तेथल्या धर्मपीठावर छापा घालून फादर पोर्टो व ॲन्टोनिओ ह्या दोघांनाही कैद करण्याचा होता; पण आम्ही तेथें जाऊन पोंचण्यापूर्वींच तेथले पांचशें गोरे सोजीर शस्त्रास्त्रें सज्ज करून धर्मपीठाच्या रक्षणार्थ सज्ज होते. त्यांचें इतकें सैन्य त्या ठिकाणीं असेल अशी आमची कल्पना नव्हती. आम्हीं जर छापा घातला असता तर आमचा हां हां म्हणतां फडशा उडाला असता; पण आमचें भाग्य थोर, म्हणून अकल्पितपणें तो प्रसंग तात्पुरता टळला. सोफिया या नांवाची एक स्त्री फादर पोर्टोचें प्रिय-पात्र आहे.—"

"सोफिया! पूर्वीच्या सेनापतीची छाकटी बायको सोफिया, तीच ना?" बुबाजीनें मध्येंच विचारलें. रॉबर्टसन कान टवकारून ऐकूं लागला.

"होय, तीच." दुल्लभजी उत्तरला. "तिच्यापाशीं मेरी ह्या नांवाची एक सुंदर दासी आहे. तिनें रातोरात गुप्तपणें आमच्याकडे येऊन भैरवाला भेटून तिकडील सर्व खरा प्रकार सांगितला. त्यावरून आम्हांला कळलें कीं, ॲन्टोनिओ कांहीं तिथें आलेला नाहीं; मात्र त्याच दिवशीं सोफिया चुळण्याला फादर पोर्टोलाच भेटावयाला गेली होती ती माघारीं येत असतां फादर पोर्टो पळून येतांना तिला भेटला व स्त्रीवेष घेऊन सोफियाबरोबरच तिच्या पालखींतून सायंकाळपूर्वींच मंडपेश्वरीं येऊन पोंचला. आम्ही मंडपेश्वरावर चालून गेलों ही खबर त्यांना अगोदरच मिळाली होती व म्हणूनच ते आमच्याशीं टक्कर देण्याच्या जय्यत तयारींत होते. त्यांचें मनुष्यबळ फार मोठें आहे; पांचशें सैनिक त्या धर्मपीठाच्या रक्षणार्थ खडे असून शिवाय तेथले इतर पाद्री आणि विद्यार्थी मिळून सुमारें हजार लोक जरूर तर आमच्याशीं सामना देण्याच्या जय्यत तयारींत आहेत असें आम्हांला त्या दासीकडून कळलें; त्यामुळें आम्ही ताबडतोब मंडपेश्वरावर हल्ला करण्याचा बेत रहित करून जवळच एक सुरक्षित व गुप्त जागा पाहून तिथें तळ दिला आहे व मी जास्त कुमक मागण्यासाठीं इकडे धांवत आलों आहें. आतां आपण उपराळा केला, तर आम्हांला मंडपेश्वरचें ठाणें हस्तगत करतां येण्याजोगें आहे. तें ठाणें हस्तगत केल्यानें आपला फारच मोठा कार्यभाग होण्या-

जोगा आहे. त्या ठाण्यांत फिरंग्यांचा फार मोठा जमाव आहे व शिवाय तें त्यांचें त्या प्रांतांतील अत्यंत महत्त्वाचें धर्मपीठ आहे. तेथें संपत्तिही अमूप आहे व धर्माच्या नांवावर गरीब हिंदु रयतेला पिळून काढणारे फादर पोर्टोसारखे कैक सत्ताधारी पाद्री तेथें वस्ती करून बसलेले आहेत. त्या सर्वांचा संहार केल्या-खेरीज त्या प्रांतांत खरें स्वास्थ्य प्रस्थापित व्हावयाचें नाहीं."

"तुमच्या यादीतदेखील मंडपेश्वरावर फुली पडलेली आहेच!" चिमाजी-अप्पा बुबाजीकडे वळून म्हणाले.

"होय." बुबाजी उत्तरला.

"तर मग हे काम ताबडतोब हातीं घेतले पाहिजे. आम्हांला तर निर्मळ एथें आतां गेलेंच पाहिजे. तेव्हां ही कामगिरी—"

"मी पत्करतों." चिमाजीअप्पांच्या तोंडचें वाक्य पुरें करून बुबाजी म्हणाला, "मला त्या भागाची चांगली माहितीही आहे व वेळींवखतीं अधिक उणे मनुष्यबळ मला तिकडे मिळवितां येईल."

रॉबर्टसन इतका वेळ स्तब्धपणें सर्व गोष्टी ऐकत होता. सोफियाचें तेथें वास्तव्य आहे हें कळल्यापासून तर त्याला तो विजय जास्त जिव्हाळ्याचा वाटूं लागला होता व फादर पोर्टोचा सोफियाशीं इतका निकट संबंध आलेला ऐकून त्याला संशयाच्या पिशाच्चानें पछाडण्याला सुरुवात केली होती. फादर पोर्टोच्या लीला रॉबर्टसनला पूर्वी ऐकून माहीत होत्या, त्यामुळें त्याच्या संशयाला जास्त बळकटी आली व आपल्या संसारसुखांत बिघाड घालण्याला सिद्ध झालेल्या त्या ढोंगी, दुराचारी धर्मगुरूला केव्हां एकदां लोळवीन असें त्याला होऊन गेलें. तो लगेच चिमाजीअप्पांना म्हणाला, "मेहेरबान सरकारांनीं मला मंडपेश्वरीं जाऊन पराक्रम दाखविण्याची संधि दिल्यास चांगलें होईल. माझ्या निष्णात गोलंदाजी-चा अनुभव सरकारच्या लोकांना पूर्वी ठाण्याच्या वेढ्यांत आलाच आहे. माझ्या स्वामिनिष्ठेविषयींही सरकारांना शंका येण्याजोगी परिस्थिति मुळींच नाहीं."

"हा कोण ? रॉबर्टसन तर नव्हे ?" दुल्लभजीनें विचारलें.

"होय." बुबाजी उत्तरला.

"आतां आलें सारें माझ्या ध्यानीं. रॉबर्टसन आपल्या आश्रयाला आला आहे का ?" दुल्लभजीनें चिमाजीअप्पांकडे वळून विचारलें.

" होय. मुंबईकर इंग्रजांशीं त्याचें पटत नाहीं व वसईकर फिरंग्यांशीं तर त्याचा पूर्वीपासूनच उभा दावा जुंपला आहे. त्याला आमच्या पदरीं नोकरी करून नशीब काढावयाचें आहे. तुला मंडपेश्वराकडे त्याचा उपयोग होईल का ? "

" हो ! अवश्य उपयोग होईल आणि त्यालाही मनाजोगें नशीब काढण्याला मंडपेश्वरीं चांगली संधि आहे. त्याच्या सुखाचा ठेवा तिथें आहे, व त्याच्या सुखाच्या मार्गांतील कांटाही त्याला तेथें ठेंचून नाहींसा करतां येण्याजोगा आहे. त्याला आपण जरूर माझ्याबरोबर द्यावें." दुल्लभजी रॉबर्टसनकडे पहात म्हणाला.

रॉबर्टसननेंही आश्चर्यपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें व म्हटलें, " तूं म्हणालास तें अक्षरशः खरें आहे."

ही त्या दोघांची सांकेतिक भाषा चिमाजीअप्पा व बुबाजी यांना कळली नाहीं. चिमाजीअप्पांनीं दुल्लभजीला विचारलें, " याचा अर्थ आम्हांला कळला नाहीं."

" तो आपणांला योग्य वेळीं कळेल." रॉबर्टसन म्हणाला. " मी अप्रामाणिक नाहीं एवढी आपली दुल्लभजीच्या बोलण्यावरून खात्री झाली म्हणजे तूर्त पुरे आहे असें मला वाटतें."

दुल्लभजी रॉबर्टसनकडे पाहून किंचित् स्मित करून चिमाजीअप्पा व बुबाजी यांच्याकडे वळून म्हणाला, " कुणाच्या कांहीं खासगी जिव्हाळ्याच्या गोष्टी असतात; तितक्या खोलांत न जातांही आपलें चालण्याजोगें आहे."

'ता' म्हणतांच 'ताकभात' ओळखण्याइतकें चातुर्य चिमाजीअप्पांच्या व बुबाजीच्याही अंगीं खास होतें. त्यांनींही ती गोष्ट जास्त धसाला लावली नाहीं. चिमाजीअप्पांच्या अनुमतीनें बुबाजी व रॉबर्टसन ह्या दोघांनीं दुल्लभजीबरोबर मंडपेश्वराकडे जावें असें ठरलें. नुकत्याच इंग्रजांकडून पोर्तुगीजांसाठीं आलेल्या तोफा जहाजाच्या लुटींत मराठ्यांच्या हातीं लागलेल्या होत्याच; व इतर युद्ध साहित्यही भरपूर हातीं लागलें होतें. तें जहाजच मंडपेश्वराकडे पाठवावयाचें ठरून रॉबर्टसनला त्या जहाजाचा मुख्य कप्तान नेमण्यांत आलें. त्याच्या मदतीला आणखी कांहीं विश्वासू हिंदु गोलंदाज देण्यांत आले. कांहीं सैन्य त्या जहाजावर चढविण्यांत आलें व कांहीं घोडेस्वार आणि पायदळ बुबाजीच्या नेतृत्वाखालीं खुष्कीनें निघालें. दुल्लभजी दोन दिवसांच्या दगदगीनें फार श्रमला असल्यामुळें त्यानें जहाजावरूनच जावयाचें ठरविलें. आज चार दिवसांत त्याला

आंघोळदेखील नव्हती, धड जेवणखाणही नव्हतें; पण तेवढ्यासाठीं देखील तो घटकाभर थांबावयाला तयार होईना; इतकी त्याला मंडपेश्वराकडील कार्याची उत्कंठा लागली होती.

पोर्तुगीजांच्या त्या पाडाव केलेल्या जहाजावरील पोर्तुगीजांचें निशाण उतरून त्या जागीं मराठ्यांचा भगवा झेंडा फडकविण्याचा मंगल संस्कार अगदीं थोड्या वेळांत चिमाजीअप्पांच्या हातून साजरा करण्यांत आला. तें जहाज मार्गाला लागतांच लगेच बुबाजीचीही सैन्यासह रवानगी करून देऊन लगेच चिमाजी-अप्पा निर्मळकडे जावयाला निघाले. तो मराठ्यांचा अव्वलींचा मोहरा नव्या निश्चयानें धर्मसंग्रामांत प्रविष्ट होतांना मध्यान्हींच्या मार्गी सूर्य तेजानें प्रकाशत आकाशांत उभा राहून त्याला शुभाशीर्वाद देत होता.

  

त्याच दिवशीं चिमाजीअप्पा निर्मळच्या अर्ध्या वाटेवर जाऊन पोंचले असतील किंवा नसतील, अशा वेळीं एक सुंदर व सुशृंगारित नौका अर्नाळा बंदरांत येऊन उभी राहिली. त्या नौकेवर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकत असल्यानें प्रथम किल्ल्यावरील लोकांना दुरून पहातांना वाटलें कीं, मराठ्यांपैकीं कोणा तरी खाशांची स्वारी आली; पण तीच नौका बंदरांत येऊन किनाऱ्याला लागतांच ती फिरंग्यांची आहे असें बंदरावरील लोकांना आढळून आलें. त्या नौकेंतून एक सुदर, तरुण व श्रीमंती थाटाची पोर्तुगीज स्त्री खालीं उतरली. बंदरावरील लोकांनीं तिला ताबडतोब ओळखलें. ती बार्बारा होती.

बंदरावरील लोकांत कुजबुज सुरू झालेली ऐकून त्यांतील एकाला पोर्तुगीज भाषा येते असें पाहून बार्बारा त्यालाच म्हणाली, "परवां पेशव्यांपाशीं कबूल केल्याप्रमाणें मी त्यांच्या आश्रयाला आलें आहें."

"पण थोरले श्रीमंत पुण्याकडे निघून गेले व धाकटे श्रीमंतही आतांच निर्मळकडे गेले आहेत." तो मनुष्य उत्तरला.

"असें का ? मग किल्ल्यावर किल्लेदार तरी आहेत ना ?" बार्बारानें विचारलें.

"होय, ते आहेत." तो मनुष्य उत्तरला.

"तर मग मला त्यांच्याकडेच घेऊन चल." असें म्हणून बार्बारानें नौकेंतून आपणांबरोबर एका सुंदर पिंजऱ्यांत घालून आणलेलीं चार सुंदर कबुतरें व

कांहीं तऱ्हतऱ्हेचें नक्षीदार सुंदर सामान व दोन पेटया आपल्या नोकरांकरवीं बाहेर काढविल्या व त्या मनुष्याला म्हटलें, "खासे स्वारीला नजराणा देण्या-साठीं ह्या वस्तु मीं आणल्या आहेत; त्या किल्लेदाराकडे माझ्याबरोबरच पोंचत्या कर."

थोड्याच वेळांत बार्बारा आपल्या बरोबरच्या सामानासह किल्लेदार बाजीबा याच्या वाड्यांत जाऊन पोंचली. बाजीबाला बार्बारा व पोर्शिया यांच्या सुटके-विषयींचा प्रकार माहीत असल्यानें त्यानें बार्बाराला विचारलें, "आमच्या माणसाची सुटका झाली का ?"

बार्बारा बाजीबावर आपल्या चंचलनेत्रकटाक्षांचें अचूक शरसंधान करीत म्हणाली, "तुमच्या माणसाची सुटका होण्यासाठीं मीं खटपट केली तीच मला भोंवली. मी मराठ्यांना फितूर आहें असा सेनापतीनें माझ्या तरफदारीचा अर्थ करून मला हद्दपारीची शिक्षा ठोठावली; म्हणूनच मला ताबडतोब वसई सोडून तुमच्या आश्रयाला यावें लागलें. सेनापतीनें फॅन्सिसवरदेखील फितुरीचा आरोप ठेवून त्यालाही प्राणदंडाची शिक्षा ठोठावली आहे. अर्थात् आतां आम्ही उभयतांही तुमचे दास आहों. आम्हां दोघांचेंही रक्षण करण्याचें काम आतां तुमचें आहे."

"पण नारायणरावाच्या सुटकेची काय वाट ?" बाजीबानें पुन्हा विचारलें.

"त्याच्या सुटकेचें मीं खासें कारस्थान रचिलें आहे; व आज पहांटेच्या सुमाराला बहुधा त्याची सुटका झालीही असेल. तो बहुधा सायंकाळपर्यंत तुम्हांला येऊन भेटेल. ज्या गोष्टीसाठीं मला हद्दपारीची शिक्षा भोगावी लागली, ती गोष्ट मी अर्धवट हातची सोडीन अशी शंकादेखील तुमच्या मनांत यायला नको. नुसती तुमच्या नारायणरावाची सुटका होण्यानें माझें समाधान व्हायचें नाहीं; ज्यांनीं मला हद्दपार केलें ते लोक ह्या प्रांतांतून हद्दपार झालेले पाहिल्याशिवाय माझे डोळे शांत व्हायचे नाहींत. माझ्या नौकेवर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकवून मी तुमच्या आश्रयाला आलें आहें, आतां त्या झेंड्याचा विजय सर्वत्र जेणेंकरून होईल अशासाठीं तन-मन-धनाच्या मोबदल्यांत झटणें हें आमचें–माझें व फॅन्सिस यांचें–कर्तव्य आहे."

बाजीबाला बार्बाराच्या हावभावांनीं व ज्वलज्जहाल भाषणानें भुरळ पाडली. त्यांतच आणखी बार्बारानें खाशांना नजराणा देण्यासाठीं आणलेल्या सुंदर वस्तु

बाजीबालाच अर्पण केल्या. त्यामुळें तर त्या दोघांची दोस्ती जमली. त्यानें तिची किल्ल्यावर रहाण्याची उत्तम प्रकारची व्यवस्था लावून दिली. फ्रॅन्सिसची नजरकैदही त्या वेळेपासून अगदीं ढिली होऊन त्याला बार्बाराच्या संगतींत रहाण्याची मुभा मिळाली. त्या अवध्या अर्ध्या दिवसाच्या बैठकींत बार्बारानें बाजीबावर इतकी छाप पाडली कीं, रात्रीं फ्रॅन्सिस, बार्बारा व बाजीबा चांदण्यांत एकत्र बसून गोष्टी बोलत असतां बार्बारानें बरोबर आणलेल्या उंची मद्याचा पेला भरून आपल्या हातानें बाजीबाच्या ओंठांना लावला व बाजीबा सरावलेला मद्यपी नसतांही तें मद्य बार्बारासारख्या सुंदर तरुणीचा मान राखण्यासाठीं प्याला! बार्बारा मोहजाल पसरण्यासाठीं आली आहे असा त्याला जरानेखील संशय आला नाहीं!

प्रकरण अकरावें

## निर्मळक्षेत्रीं

त्या दिवशीं निर्मळक्षेत्र§ जनसंमर्दानें नुसतें फुलून गेलें होतें. पोर्तुगीजांच्या जुलुमाला बळी पडून बाटलेले हजारों हिंदुजन तेथें जमा झाले होते. त्या क्षेत्रीं वर्षांतून कार्तिक वद्य एकादशीला फार मोठी यात्रा जमते; त्या दिवशीं देखील जें वैभव त्या क्षेत्राला लाभत नसेल, तें वैभव आज लाभलें होतें यात्रेच्या दिवशीं तेथें फक्त भाविक यात्रेकरूंचीच गर्दी असावयाची; पण आज तेथें आचार्यांच्या समाधीसभोंवार जमलेली गर्दी आपल्या धर्ममातेपासून कैक वर्षें ताटातूट झालेल्या लेंकरांची होती. शिवाय आजूबाजूच्या पंचक्रोशींतील विद्वद्रत्नें जीं सहसा कधींच यात्रेला यावयाचीं नाहींत, तीं आज तेथें जमा झालीं होतीं व तीं कशासाठीं ? तर मायलेंकरांची ताटातूट करण्यासाठीं ज्यांच्या घरीं विद्वत्ता पाणी भरीत आहे, ज्यांनीं हिंदुधर्माचा सर्वांगीण अभ्यास करून धर्मज्ञान करतलामलकवत् केलें आहे, ज्यांचा शब्द वेदवाक्य समजून सारी हिंदु रयत वागे, काशी-रामेश्वरापासूनचे महा-पंडितदेखील कोणत्याही महत्त्वाच्या धर्मनिर्णयाच्या कामीं ज्यांच्या मताची अत्यंत

---

§ निर्मळ हें स्थान ठाणें जिल्ह्यांत वसईपासून सहा मैलांवर आहे. या तीर्थासंबंधानें महाभारतांत अशी कथा आहे. प्राचीन काळीं ह्या स्थळीं विमलासुर नांवाचा राक्षस रहात असे. त्याला परशुरामानें ठार मारिलें. त्याच्या रक्ताचें एक तळें बनलें; त्याला विमल हें नांव मिळालें. परशुरामाने जवळच आणखी एक तळें खणलें; त्याचें निर्मळ असें नांव ठेवलें. ह्या तीर्थाच्या कांठीं टेंकडीवर निर्मळगांवानजीकच शृंगेरीमठाचे शंकराचार्य श्रीविद्याशंकरभारती यांची समाधि आहे. ह्या तीर्थाच्या कांठीं शंकराचें स्वयंभू देवस्थान होतें. पोर्तुगीज लोकांनीं तीं तीर्थें भ्रष्ट करून देवळांतील मूर्ति फोडल्या असें सांगतात. चिमाजीअप्पांनीं वसई काबीज केल्यानंतर पेशव्यांचे वसई प्रांताचे सरसुभेदार शंकराजी केशव फडके ह्यांनीं पुन्हा तीर्थें शुद्ध करून त्यांच्या कांठीं घाट बांधले व बरींच देवळेंही बांधलीं. त्यांपैकींच शंकराचार्यांच्या समाधीवरील देऊळ हें एक आहे. दरसाल कार्तिक वद्य एकादशीच्या दिवशीं एथें मोठी यात्रा भरते. समाधीपासून थोड्या अंतरावर ख्रिस्ती लोकांचें जुनें प्रार्थनामंदिरही आहे.

आस्था बाळगीत, असे सनातन धर्ममार्तंड वेदशास्त्रसंपन्न धोंडशास्त्री–ज्यांची पात्रता प्रतिशंकराचार्य होण्याची होती व विद्वज्जनसभांतून ज्यांना नेहमीं अग्रपूजेचा मान मिळे, असे धोंडशास्त्री हिंदुधर्म मातेपासून तिच्या सहस्रावधि बालकांची ताटातूट करण्यासाठीं तेथें अनेक विद्वज्जनांच्या प्रभावळींत अग्रस्थानीं चमकत होते. त्यांना जबरदस्त साह्य वंशपरंपरेच्या हक्कानें वेदशास्त्रसंपन्न, धर्माधिकारी व विद्वान् बनलेल्या त्यांच्या नूतन जामातांचें–भय्याशास्त्र्यांचें–होतें. भय्याशास्त्र्यांचें अध्ययन जरी रामरक्षा-महिम्न-पुरुषसूक्त-रुद्र व तांत्रिक देवपूजाविधि यापेक्षां जास्त झालेलें नव्हतें, तरीही त्यांनीं आपल्या आयुष्यांत जो एक पराक्रम गाजविला होता, त्यामुळें त्यांना तत्कालीन विद्वद्रत्नांत फार मान मिळत होता व निर्मळक्षेत्रीं तर कोणत्याही विद्वज्जनसभेंत किंवा कोणत्याही धर्मकार्यांत त्यांना क्षेत्राधिकारी म्हणून अग्रपूजेचा मान मिळत होता. भय्याशास्त्र्यांनीं गाजविलेला पराक्रम एवढाच कीं, ते निर्मळचे इनामदार मार्तंडशास्त्री यांच्या पत्नीच्या मांडीवर दत्तक बसले होते. मार्तंडशास्त्र्यांच्या घरीं देवपूजा करून पोट भरणारा हा पुजारी मार्तंडशास्त्र्यांचा दत्तकपुत्र झाला, तो देखील एका अबलेच्या जिवावर ! मार्तंडशास्त्री हेही त्यांच्या अमदानींत धोंडशास्त्र्यांप्रमाणेंच विद्वान् म्हणून सर्वत्र गाजलेले होते. मरणसमयीं त्यांचें वय पंचायशीं वर्षांचें होतें. त्यांची तिसरी बायको त्यांच्या वयाच्या बहात्तराव्या वर्षी मृत्युमुखीं पडल्यावर त्यांना अग्निहोत्राच्या सांगतेसाठीं चौथें लग्न करणें प्राप्त झालें. आजूबाजूच्या ब्रह्मवृंदानें त्यांना त्या वेळीं तीव्र विरोध केला; पण त्या विरोधाला त्यांनीं पैसा व विद्वत्ता या दुहेरी बळावर बाजूला सारून एका आठ वर्षांच्या कुमारिकेला वरून वैधव्यपंथ मोकळा करून दिला. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यांनीं हा विवाह शास्त्राधारानुसार केला ! मार्तंडशास्त्र्यांची ती वधू भय्याच्या नात्यांतील असल्यानें तिच्या लग्नानंतर पांच सहा वर्षांनीं ती वयांत आल्यावर भय्याला तिच्या वशिल्यानें मार्तंडशास्त्र्यांच्या घरीं पुजारी या नात्यानें आश्रय मिळाला. भय्याच्या अंगीं आर्जवशक्ति जबरदस्त असल्यानें तो रूपानें बावळट व बुद्धीनें मंद आणि मनानें हलका असतांही मार्तंडशास्त्री व त्यांचें नवें कुटुंब यांची मर्जी संपादन करण्याला त्याला फारसा अवधि लागला नाहीं. थोड्याच दिवसांत भय्याचें प्रस्थ मार्तंडशास्त्र्यांच्या घरांत चांगलेंच माजून राहिलें व मार्तंडशास्त्र्यांच्या पश्चात् त्यांच्या कुटुंबानें सत्तावीस वर्षे वया-

च्या भय्यालाच दत्तक घेऊन मार्तंडशास्त्र्यांचा वंशवृक्ष वाढीला लावला. तेव्हां-पासून भय्याचे भय्याशास्त्री बनले. नंतर एका जहागीरदाराच्या मुलीशीं त्यांचें लग्नही झालें. ती बायको मेली म्हणून पुन्हा दुसरें व दुसरी बायकोही मृत्युमुखीं पडली म्हणून त्यांनीं तिसरें लग्न रईशीं करून धोंडशास्त्र्यांच्या सर्वांत धाकट्या आठ वर्षांच्या सुंदर मुलीशीं चौथें लग्न केलें होतें. ह्या लग्नाच्या वेळीं भय्या-शास्त्र्यांचें वय अवघें एकुणपन्नास वर्षांचें होतें. आज त्यांच्या लग्नाला सात वर्षें लोटलीं होतीं.

भय्याशास्त्र्यांच्या व धोंडशास्त्र्यांच्या संबंधाविषयीं एक विशेष गोष्ट येथें सांगावयाची ती ही कीं, भय्या वयानें बावीस वर्षांचा असतांना धोंडशास्त्र्यांची सर्वांत मोठी मुलगी जी तेव्हां वयानें आठ वर्षांची होती व जी रूपानें टाकाऊ असून साधारणपणें वेडगळांतच जमा होती ती त्यांनीं भय्याला द्यावी असा मार्तंडशास्त्र्यांनीं त्यांना आग्रह केला होता. पण भय्या वयानें मोठा व भिकारी असून शिवाय एक सामान्य पुजारी म्हणून आपली मुलगी धोंडशास्त्र्यांनीं त्याला देण्याचें नाकारून तिचें लग्न 'करतलभिक्षा तरुतलवासं' अशा एका गरजू विद्वान् ब्राह्मणाच्या मुलाला दिली होती; पण पुढें तोच भय्या मार्तंडशास्त्र्यांचा दत्तक-पुत्र होऊन एकदम भय्याशास्त्री व मोठ्या जिंदगीचा धनी होतांच त्याच धोंड-शास्त्र्यांनीं भय्याशास्त्र्यांच्या वयाच्या एकूणपन्नासाव्या वर्षी त्यांना आपली शेवटची सुंदर मुलगी आग्रहानें दिली होती! भय्या बावीस वर्षांचा अविवाहित असतांची त्याची स्थिति व शेवटच्या लग्नाच्या वेळची त्याची स्थिति यांत वयाचा फरक नैसर्गिकच होता, त्यांची ज्ञानलवदुर्विदग्धता पूर्ववत् कायमच होती व शिवाय त्यांच्या नैतिक वर्तनाच्या बाबतींत दुर्लौकिकाची बरीच भर पडली होती. असें असतांही धोंडशास्त्र्यांनीं त्यांना त्यांच्या वयाच्या एकूणपन्नासाव्या वर्षीं आपला जांवई केलें, तें अर्थात् त्यांच्या अफाट जिंदगीकडे व वंशपरंपरे-च्या थोरवीकडे पाहून! ह्या नव्या संबंधामुळें धोंडशास्त्र्यांना भय्याशास्त्र्यांच्या घरांत फार महत्त्व प्राप्त झालें होतें व भय्याशास्त्र्यांचे वंशपरंपरेचे धर्माधिकार आणि धोंडशास्त्र्यांची अगाध विद्वत्ता यांचा बेमालूम संगम होऊन त्या सासरे-जांवयांचें धर्मराज्य त्या टापूंत सुरू झालें होतें.

असे ते धर्ममूर्ति सासरे जांवई आज निर्मळ क्षेत्रीं आचार्यांच्या समाधीसमोर सनातन हिंदु धर्माचे कट्टे अभिमानी व अधिकारी म्हणून तेथें शुद्धिकार्य करून

हिंदुधर्माचें वैभव वाढवूं पहाणाऱ्या प्रगमनशील स्वामी रामानंदांना व त्यांच्या अनुयायांना विरोध करण्यासाठीं सज्ज झाले होते. गंगाजी नाईक निर्मळकडे बरोबरच्या ब्राह्मणांसह जाऊन पोंचले. ते निर्मळकडे जाण्यासाठीं अर्नाळ्याहून निघाले ते बरोबरच्या ग्रामस्थ मंडळीला आपल्या आगमनाची वार्ता गुप्त राखण्याला सांगून पुढें पाठवून ते चिमाजीअप्पांची वाट पहात निर्मळ गांवीं ज्या टेंकडीवर क्षेत्र आहे त्या टेंकडीच्या पायथ्याशीं थांबले होते. थोडयाच वेळांत चिमाजीअप्पा सडे घोडा फेंकीत तेथें येऊन पोंचतांच उभयतां मिळून पुढील बेत ठरवीत मुद्दाम वेषांतर करून व आपल्या सैनिकांनाही सामान्य शेतकरी बनावयाला लावून गुपचुपपणें टेंकडी चढून क्षेत्राच्या ठिकाणीं गेले. क्षेत्रस्थ मंडळीचा शुद्धिकार्यविषयक धर्माधर्मनिर्णयासंबंधींचा वाद ऐन रंगांत आला होता. रामानंदांच्या पक्षाचें आधिपत्य स्वतः रामानंदांनीं पत्करिलें होतें व प्रतिपक्षाच्या वतीनें भय्याशास्त्री आणि धोंडशास्त्री हे दोघेही बोलत होते. भय्याशास्त्र्यांनीं बंदोबस्तासाठीं आणविलेले कांहीं गोरे सोजीर रामानंदापाशीं व इतरत्रही उभे होते आणि ते रामानंदांना पकडण्याविषयीं भय्याशास्त्र्यांच्या अनुज्ञेची वाट पहात उभे होते. शुद्धिसमारंभांत पावन होऊन पुन्हा हिंदुधर्माचा स्वीकार करण्यासाठीं उत्सुक झालेले लोक त्या विद्वज्जनसभेसभोंवार, कांहीं आचार्यांच्या समाधीशेजारीं, कांहीं खालीं विमल तळ्याच्या कांठीं व कांहीं निर्मळ तळ्याच्या कांठीं बसले होते. त्या सर्व मंडळीच्या चर्येवर निराशेची छाया पसरलेली दिसत होती. ब्रह्मवृन्दांतील धर्मनिर्णयविषयक वादाला एवढा रंग चढला होता कीं, त्या भरांत चिमाजीअप्पा व नाईक तेथें केव्हां आले याचीही कोणाला दाद लागली नाहीं. चिमाजीअप्पांनीं आपल्या सैनिकांना मुद्दाम आजूबाजूला दबा धरून बसविल्यामुळें त्यांचीही कोणाला दाद लागली नाहीं. मराठे सैनिक आपलीं शस्त्रें लपवून एकेका गोऱ्या सोजिरामागें दोन दोन असे सावधगिरीनें उभे राहिले, तेव्हां अनेकांनीं त्यांना पाहिलें असेल; पण पहाणारांना वाटलें कीं, इतके लोक शुद्ध होण्यासाठीं एथे आले आहेत त्यांतलेच हे असतील. ब्रह्मवृन्दांच्या वादाला पक्कें तोंड लागलें आहे असें पाहून चिमाजीअप्पांनीं नाइकांना एका बाजूला बोलावून घेऊन दोघेही तशा सामान्य वेषांत त्या गर्दींतून एकेक पाऊल पुढें टाकीत विद्वज्जनसभेच्या अगदीं शेजारीं जाऊन उभे राहिले. त्यांच्याकडे तक्रार घेऊन गेलेले सिद्धेश्वरशास्त्री व त्यांचे इतर साथीदार अगोदरच तेथें पोंचले होते; पण

त्यांच्याकडेदेखील कोणाचें विशेष लक्ष वेधलें नाहीं व त्यांनींही कांहीं बोभाटा केला नाहीं.

आजच्या वादाचा प्रारंभ तसाच शेवटही दंडेलींतच व्हावयाचा हें जवळ जवळ ठरल्यासारखेंच होतें. सर्वांचा दांत कोणत्या ना कोणत्या कारणामुळें कां होईना, पण मुख्यतः रामानंदावर होता. पोर्तुगीजांना रामानंद नको होते ते आपल्या धर्मप्रसाराला विरोध करतात म्हणून, धोंडशास्त्र्यांना ते नको होते ते त्यांच्या धडाडीच्या धर्मकार्यामुळें आपलें महत्त्व कमी होऊं लागलें व त्यांच्या पुढारी-पणाखालीं आपल्या प्रतिस्पर्धी ब्राह्मणांना पुढारपणाला अवसर मिळूं लागला म्हणून, भय्याशास्त्र्यांना ते नको होते ते धोंडशास्त्र्यांना नकोत म्हणून व शिवाय त्यांना नामोहरम करण्यानें भय्याशास्त्र्यांची पोर्तुगीजांच्या पदरीं प्रतिष्ठा वाढणार होती म्हणून, आणि इतर बऱ्याच ब्राह्मणांना ते नको होते आपल्या अंगीं भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांच्याविरुद्ध ब्र काढण्याची ताकद नाहीं म्हणून ! सुवासिक व सुंदर कमलाच्या मुळाशीं दुर्गंधियुक्त कर्दमाची राड असावी, त्याप्रमाणे तेथे शुद्धि-कार्याला विरोध करण्यासाठीं कबरा बांधून धांवून आलेल्या सर्व शास्त्रीपंडितांच्या सनातन धर्माभिमानाला जो बहर आलेला दिसत होता, त्याच्या मुळाशीं वैय्यक्तिक स्वार्थाच्या दुर्गंधिमय कर्दमाची राड झाली होती ! आणि सर्वांत आश्चर्याची व तितकीच मौजेची गोष्ट ही कीं, रामानद कुठचे कोण याविषयीं तेथें कोणालाच कांहीं माहिती नव्हती. तरी पण एकटे रामानंद कैद झाल्यानें हा वाद सहज मिटण्याजोगा होता. कारण शरिरांतून आत्मा निघून गेल्यावर कलेवराला कसलें महत्त्व ? शुद्धिकार्याला अनुकूल असणाऱ्या ब्राह्मणांचे व शुद्धिकार्यानें पावन होण्यासाठीं तेथें जमलेल्या सहस्रावधि जीवांचे डोळे एकट्या रामानंदाकडे लागून राहिले होते.

पण रामानंदांना इतक्या अनुयायांतून कसें उचलावें हाच अवघड प्रश्न होता. एक तर रामानंदांच्या केंसाला नुसता धक्का लागतांच तेथे भयंकर रक्तपात झाला असता व त्यांत प्रत्यक्ष धोंडशास्त्री, भय्याशास्त्री व त्यांचे अनुयायी यांचीही वाताहात उडाली असती; पण भय्याशास्त्र्यांनीं साह्यार्थ मुद्दाम वसईहून आण-विलेल्या गोऱ्या सोजिरांनीं एकतर्फी रक्तपात करून रामानंदांना कैद किंवा ठार करून भय्याशास्त्र्यांच्या पक्षाचें रक्षण केलें असतें असें मानलें, तरी त्या ब्राह्मणांना कांहीं त्याच दिवशीं देशत्याग करून जावयाचें नव्हतें किंवा बाटून

ख्रिस्तीही व्हावयाचें नव्हतें; त्यांचा मग हिंदुसमाजांत कसा पल्ला आला असता ! त्या ब्राह्मणांनीं रामानंद किंवा त्यांचे प्रगमनशील अनुयायी यांचा छळ किंवा वध व तो फिरंग्यासारख्या अस्पृश्यांहूनही अस्पृश्य गणल्या गेलेल्या गोमांस भक्षकांच्या हातून करविणें म्हणजे पर्यायानें स्वतःच्या भूदेवत्वाच्या पुरातन रूढिसिद्ध हक्कांना चूड लावण्यासारखें, स्वतःच्या हातानें स्वतःच्या पायांवर दगड पाडून घेण्यासारखें होतें. भय्याशास्त्री एक संपन्न होते; धोंडशास्त्री बरेच सुखी होते; पण सामान्यतः भिक्षुक ब्राह्मण म्हटला कीं, पुरोहितपणाच्या वृत्तीवर त्याचा निर्वाह ! अशा भिक्षुकांचाच धोंडशास्त्री व भय्याशास्त्री यांच्या अनुयायांत मोठा भरणा होता, त्यामुळें आपल्या ब्राह्मणत्वाचा बोज राखण्यासाठीं म्हणून तरी रामानंद व त्यांचे अनुयायी यांना फिरंग्यांच्या हातून शासन करविणें इष्ट नव्हतें. म्हणूनच शक्य तों सामोपचारांनीं सारा कारभार चालला होता. ही धार्मिक बाब तितकी विकोपाला गेलीच तर पेशवे आपले जातभाई असल्यानें आपला पक्ष उचलून धरतील अशीही त्या विरोधी ब्राह्मणांना आशा होती.—नव्हे,निरु-पाय तर रामानंद वगैरे लोकांना पकडून आपण पेशव्यांसमोर नेऊं व धर्मबाह्य आच-रण केल्याबद्दल त्यांना योग्य शासन करवूं, असाही भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांना आत्मविश्वास वाटत होता. त्यांनीं पोर्तुगीजांची मदत घेतली होती ती रामानंदांनीं आरंभिलेलें शुद्धिकार्य हाणून पाडून आपल्या मतें सनातन हिंदुधर्माची उज्ज्वल-ता अभंग राखण्यापुरती; एरव्हीं त्यांना पेशवाईअंमल वसई-साष्टी प्रांतांत निर्वेध-पणें प्रस्थापित झाला तर तो पाहिजेच होता. असें असूनही भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांनीं ॲन्टोनिओच्या ओळखीनें वसईकर फिरंग्यांशीं संधान बांधले होतें, तें केवळ उगवत्या सूर्याला नमस्कार करावयाची जी जगाची रीत, त्या रीतीला अनुसरून बांधलें होतें. त्यांचें दुबळें मन त्यांना साक्ष देत होतें कीं, फिरंग्यांचे पाय आपल्या प्रांतीं फार खोल रुजले आहेत; त्यांचा निःपात पेशव्यांकडून होणें कदापि शक्य नाहीं. फिरंग्यांनीं तर सर्व हिंदूंना बाटवून ख्रिस्ती करण्याचा विडाच उचलला आहे. अशा स्थितींत फिरंग्यांशींच गोडी राखून आपले दिवस निभतील तेवढे निभतील !

बराच वेळ उभयपक्षीं कंठशोष होऊनही रामानंद आपला शुद्धीकरणाचा विचार सोडावयाला तयार नाहींत असें पाहून धोंडशास्त्री एकदम वर्दळीवर येऊन म्हणाले, " एकूण स्वामि ! तुम्ही हें अधार्मिक कृत्य करण्याचा हेका सोडावयाला तयार नाहीं ना ! "

रामानंद निश्चलतेनें उद्गारले, "शास्त्रीबुवा ! मी पुन्हा तुम्हांला सांगतों कीं हें कृत्य अधार्मिक नाहीं."

"काय ? हें कृत्य अधार्मिक नाहीं ? मी एवढा शास्त्री आणि मला तुम्ही ह्या धर्माच्या गोष्टी सांगतां ? बस्स ! बोला. शास्त्राधारानें बाटलेल्या लोकांना पळी पळी तीर्थोदक किंवा पंचगव्य पाजून पुन्हा हिंदु धर्मांत घेण्याचा तुम्हीं जो धुमाकूळ मांडला आहे, त्याला शास्त्राधार कुठें आहे तो दाखवा."

"पण शास्त्रीबुवा ! ख्रिस्ती माणसाच्या स्पर्शानें अपवित्र झालेलें जलप्राशन हिंदूनें चुकून केलें म्हणजे तो बाटला अशाविषयीं तरी शास्त्राधार कुठें आहे ?"

"जलप्राशन कसलें घेऊन बसलां ? फिरंग्यांनीं आपलें अन्न व गोमांसाचे तुकडेदेखील हिंदूंच्या तळ्यांत व विहिरींत टाकून हिंदूंना बाटविलें आहे. अशांना तुम्ही कसे पावन करणार ?"

"कबूल ! गोमांसाचे व अन्नाचे तुकडे तळ्या-विहिरींत टाकून त्यांनीं हिंदूंना बाटविलें; पण हे लोक खुषीनें बाटले असें थोडेंच आहे ? इतकेंच काय, पण मी याच्याही पुढें एक पाऊल जाऊन वादासाठीं कबूल करतों कीं, यांतले कांहीं लोक वेळीं कसल्या तरी मोहाला बळी पडून अथवा अज्ञानतः खुषीनेंही बाटले असतील; पण त्यांनादेखील जसा खुषीनें हिंदुधर्माचा त्याग करून ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करतां आला, तसाच पुन्हा ख्रिस्ती धर्माचा त्याग करून हिंदु धर्माचा स्वीकार कां करतां येऊं नये ? धर्म हा भावनेचा व श्रद्धेचा प्रश्न आहे; त्या भावनेला व श्रद्धेला खाण्यापिण्याच्या विशिष्ट देवप्रतीकांच्या उपासनेच्या किंवा वेशभूषणांच्या रूढिप्रणीत बाह्योपाधी कधींच बंधन घालूं शकत नाहींत. आपला हिंदु धर्म हा साऱ्या जगाचा धर्म असें आपण म्हणतों. आपले शंकराचार्य स्वतःला जगद्गुरु म्हणवितात, मग हे आपले बांधव जगाबाहेरचे थोडेच आहेत ? आणि हिंदु धर्म हा जर खरोखरच विश्वधर्म आहे, तर देशकालपरिस्थितीच्या वणव्यांत सांपडलेल्या हिंदुधर्माच्या संतानांना हिंदुधर्मांत स्थान नाहीं असें म्हणणें माणुसकीला शोभतें तरी का ? शास्त्रीबुवा ! परीस व लोखंड यांतील फरक हाच कीं, त्या दोहोंचा संयोग झाल्यानें परिसाचें लोखंड न बनतां लोखंडाचें सोनें होतें.—"

"मला तसल्या वायफळ गप्पा नकोत, शास्त्राधार बोला ! कोणत्या धर्मग्रंथांत तुम्हीं आरंभिलेल्या शुद्धिकार्याला आधार आहे तें सांगा."

" पुन्हा तेंच ! शास्त्राधार व ग्रंथाधार ! शास्त्रीबुवा ! शास्त्रग्रंथ कोणीं निर्माण केले ? "

" शास्त्रग्रंथ कोणीं निर्माण केले म्हणजे ? महान् धर्मवेत्त्या ऋषि-मुनींनीं-श्रीमदाद्यशंकराचार्यांसारख्या धर्मावतारांनीं निर्माण केले."

" नाहीं.—"

भय्याशास्त्री मध्येंच उसळून म्हणाले, " तर काय तुमच्यासारख्या धर्मलंड गोसावड्यांनीं निर्माण केले ? "

चिमाजीअप्पांकडे अनाचारावर तक्रार घेऊन गेलेल्या लोकांचा पुढारी वृद्ध ब्राह्मण रामानंदांच्या मागें उभा होता. त्याला भय्याशास्त्र्यांची लुडबूड ऐकून राग आला. तो तेव्हांच भय्याशास्त्र्यांना तरी कांहीं खरमरीत उत्तर देणार होता; पण तेवढ्यांत त्याला त्याच्या जवळच्या दुसऱ्या एका ब्राह्मणानें आंवरलें.

रामानंद शांतपणे म्हणाले, " शास्त्रग्रंथ शंकराचार्यांसारख्या धर्मावतारांनीं निर्माण केले खरे; पण त्यांनीं तरी ते देशकालपरिस्थितीचा विचार करूनच निर्माण केले नाहींत का ? श्रीमदाद्यशंकराचार्यांनीं निवृत्तिपर बौद्ध धर्माचा उच्छेद करून प्रवृत्तिपर हिंदुधर्माचा पुनरुद्धार केला, तो तरी देशकालपरिस्थिति पाहूनच ना ? फार दूर कशाला ? प्राचीन काळीं अनुलोम विवाहांना जें धर्माचें पाठबळ होतें, तें कलियुगांत पाराशरस्मृतीनें हिरावून घेतलें तें तरी देश-काल-परिस्थितीकडे पाहूनच ना ? शास्त्रीबुवा ! धर्म हा समाजधारणेसाठीं असतो; देश-काल-परिस्थित्यनुरूप सत्य, समता, सर्वांभूतीं प्रेम ह्या विश्वधर्माच्या चिरंतन तत्त्वांना बाध न आणतां जुन्या रूढि मोडाव्या लागतात, नव्या रूढि निर्माण कराव्या लागतात व त्यांना समाजांत मान्यता मिळण्यासाठीं धर्माज्ञा असें गंभीर नांव द्यावें लागतें. अशी धर्माज्ञा आज तुम्हीं काढून, चुकून भ्रष्ट झालेल्या लोकांना आपल्या धर्ममाउलीच्या मांडीवर बसविण्याचा आम्ही आचरितों हा सोपा मार्ग धर्मदंड म्हणून तुम्हीं सांगितला, कीं ही पिढी व पुढची पिढीही तुमचाच कित्ता गिरवील. शास्त्रीबुवा ! काळाचा ओघ कसा वहात आहे यावर नजर देऊन आपणासारख्या थोरांनीं इतर समाजबांधवांचें मार्गदर्शक बनलें पाहिजे. असें पहा, सत्य-समता, सर्वांभूतीं प्रेम हा परमेश्वराचा धर्म सृष्टींतील व्यक्तिमात्राच्या अंतःकरणांत स्वतः परमेश्वरानें लिहिलेला असतो. त्या महत्तम धर्माची अवहेलना करण्याला शिकवणारा तो काय धर्म ? हेंच पहा,

तुम्ही आम्ही ब्राह्मणत्वाचें–जन्मजात ब्राह्मणत्वाचें–एवढे स्तोम माजवून बसतों; पण राम-कृष्णादि ज्या महात्म्यांना आपण परमेश्वर मानून भजतों, ज्या भगवान् श्रीकृष्णांना जगद्गुरु मानून त्यांनीं निरूपिलेल्या गीतेला पांचवा वेद गणून चतुर्वेदांच्या बरोबरीनें मान्यता देतों, ते राम-कृष्ण जन्मजात ब्राह्मण थोडेच होते ? नामदेव-तुकारामादि हिंदु संतांना व¶ हजरत बाबा मलंगादि यवन संतांना आपण देवस्वरूप मानून त्यांच्या स्मृतिचिन्हांसमोर भक्तिभावानें मान नमवितों, ते साधुसंत ब्राह्मण थोडेच होते !—"

पुन्हा भय्याशास्त्र्यांना उकळी फुटली. कारण हजरत बाबा मलंगांना परमेश्वर मानून भजणाऱ्या भाविकांपैकीं ते एक होते. ते आवेशानें म्हणाले, "हं ! स्वामी ! बाबा मलंगांचें नांव काढाल तर खबरदार ! ते माझे गुरु आहेत; ते मला वंद्य आहेत."

"म्हणूनच मी विचारतों, बाबा मलंगांच्या कबरेसमोर झालेला भंडारा जाणून-

¶ 'ठाणें जिल्ह्यांत कल्याणच्या दक्षिणेला दहा मैलांवर मलगड नांवाचा एक डोंगरी किल्ला आहे. डोंगराचा बराच भाग चढून गेल्यावर किल्ल्याखालीं एके ठिकाणीं दाट झाडींत बरीच सपाट जागा लागते. तेथें हजरत बाबा मलंग या नांवाच्या मुसलमान अवलियाची कबर आहे. येथें दरसाल माघ शुद्ध पौर्णिमेला फारच मोठा उरूस भरतो. ह्या कबरीचा मुजावर ब्राह्मण आहे व येथील उरुसास मुसलमानांप्रमाणें हिंदूही जातात. सुमारें ७०० वर्षांपूर्वी मलंगड येथें नळ नांवाचा एक हिंदु राजा राज्य करीत असतां अरबस्तानांतून हाजी अब्दुर्रहमान या नांवाचा एक मुसलमान अवलिया येऊन तो मलंगडच्या एका भागावर राहूं लागला. राजानें त्याच्या साधुत्वाची परीक्षा पाहिली व तो राजाच्या कसोटीला उतरतांच त्याला हजरत बाबा मलंग हें नांव राजानें दिलें. तेव्हांपासून तेंच नांव रूढ झालें. गडावर त्या अवलियाच्या कबरीच्या शेजारीं त्याच्या पत्नीचीही कबर आहे. हा किल्ला मराठ्यांच्या ताब्यांत असतांना इंग्रजांनीं जिंकला; पण दोन वर्षांच्या अवधींत इंग्रजांना तो ओकावा लागला. हा त्या अवलियाचा प्रभाव असें पेशव्यांना वाटून त्यांनीं काशीनाथपंत केतकर ह्या ब्राह्मणाच्या हातीं कबरीवर घालण्यासाठीं एक बहुमूल्य वस्त्र पाठविलें. तेव्हांपासून कबरीची व्यवस्था त्या केतकर घराण्याकडे चालू आहे. उरुसाच्या वेळीं येणाऱ्या साधुपुरुषांना व इतर यात्रेकरूंना खिचडीचा शिधा देण्याचें काम तेच करितात'.

बुजून सेवन करणारे तुमच्यासारखे लोक जर भ्रष्ट होत नाहींत, तर फिरंग्यांच्या कावेबाजपणाला फसून अपवित्र जलप्राशन करणारे हिंदु लोक तरी कसे भ्रष्ट होतात ? जसा रोग तसें त्याला औषध; जसा देव तशी त्याची पूजा. जशास तसें ह्या न्यायाशिवाय ह्या जगांत कोणाचा कधींच पल्ला यावयाचा नाहीं. असें पहा, फिरंग्यांनीं हिंदूंना बाटविण्याच्या व छळण्याच्या ज्या अभिनव युक्त्या-शोधून काढल्या, त्यांना त्यांच्या पवित्र धर्मग्रंथांत थोडाच आधार आहे ! "

"तुम्हीं ख्रिस्ती लोकांचा धर्मग्रंथ वाचला आहे एकूण !" धोंडशास्त्र्यांनीं विचारलें.

"होय. मीं ख्रिस्ती लोकांचें बायबल व यवनांचें पवित्र कुराणदेखील नीट समजावून घेतलें आहे." रामानंद म्हणाले.

"अब्रह्मण्यम् ! अब्रह्मण्यम् ! !" धोंडशास्त्री कळवळ्यानें आपल्या कानांवर हात ठेवीत उद्गारले.

"शान्तं पापं ! शान्तं पापं !" भय्याशास्त्री आपल्या सासऱ्यांचें अनुकरण करीत म्हणाले.

"भ्रष्टाकार ! भ्रष्टाकार ! !" धोंडशास्त्री व भय्याशास्त्री यांच्या सभोंवार कोंडी करून बसलेले ब्राह्मण एकदम कोलाहल करूं लागले.

धोंडशास्त्री पुन्हा म्हणाले, "स्वामि ! तुम्हीं यावनी भाषा वदून आपली जिव्हा विटाळली व यावनी धर्मग्रंथ पठण करून हृदय विटाळलें. अशा अंतर्बाह्य भ्रष्ट झालेल्या माणसाची वाणी श्रवण करणें, त्याचें मुखावलोकन करणें हेंदेखील पाप आहे." असें म्हणून त्यांनीं आपल्या कानांत बोटें घातलीं व डोळे मिटून घेतले.

भय्याशास्त्र्यांना आतां जास्तच अवसान आलें. तेदेखील आपल्या सासऱ्यां-प्रमाणेंच कानांवर हात ठेवून डोळे मिटून घेऊन उद्गारले, "हर ! हर ! अंतर्बाह्य म्लेंच्छमय झालेल्या ह्या जोगड्यानें आचार्यांच्या पवित्र समाधीसमोर येऊन भ्रष्टाकार कीं हो केला ! बस्स ! ह्या भ्रष्टाकाराला आळा घातलाच पाहिजे. मी एथला सर्वधर्माधिकारी, आचार्यांचा प्रतिनिधि मी समस्त ब्रह्मवृन्दांना अशी आज्ञा करतों कीं, ह्या बाटग्या स्वामीला कोणींही आपल्या गांवीं आश्रय देऊं नये. धर्मबाबतींत याचा शब्द कोणींही मानूं नये. हा ब्राह्मण नव्हे व याचे अनुयायी कोणी असतील तेही ब्राह्मण नव्हेत. त्या सर्वांवर आज बहिष्कार जाहीर करण्यात

येत आहे. यांनीं आजवर आरंभिलेलें शुद्धिकार्य हिंदुधर्माला संमत नसल्यानें जे लोक अशा शुद्धीकरणद्वारा हिंदुधर्मांत येतील ते आपल्या बेचाळीस पूर्वजांसह रौरव नरकांत पडतील." ह्या पातकापासून त्यांना स्वतःचा बचाव करावयाचा असेल तर महिम्नाचें पारायण करून निर्मळ तळ्यांत स्नान करून त्यांनीं पावन व्हावें. 'महेशानां परो देवो, महिम्नो ना परास्तुतिः। अघोरां ना परो मंत्रो। नास्ति तत्त्वं गुरोः परं ॥ दीक्षा दानं तपः तीर्थं ज्ञानं यागादिकाः क्रियाः। महिम्नस्तव पाठस्य कलान्हार्हन्ति षोडशीम् ॥' असा महिम्नपठणाचा अगाध महिमा आहे."

इतक्या गंभीर स्वरूपाचा धर्मविवाद तेथें चालला होता. वेद-ब्राह्मणें-उपनिषदें जिव्हाग्रावर नाचविणाऱ्या घोंडशास्त्र्यांनाही रामानंदाच्या युक्तिवादानें चकित करून सोडलें होतें. सहा शास्त्रें अठरा पुराणें ज्यांना पारंगत आहेत असे बरेच ब्रह्मवृन्द तेथें तोंडांत बोटें घालून बसले होते, तरी तेथें भय्याशास्त्र्यांनीं आपला धर्माधिकार अशा विचित्र तऱ्हेनें गाजविण्याला प्रारंभ करतांच व महिम्नाचा आधार देतांच सर्वांना हंसूं कोसळल्याशिवाय राहिलें नाहीं.

रामानंदांच्या बाजूला उभा असलेला एक तरुण ब्राह्मण खोंचिकपणानें भय्याशास्त्र्यांना म्हणाला, "भय्याशास्त्री! घोंडशास्त्र्यांच्या विद्वत्तेला देखील लाजेनें खालीं पहावयाला लावणारा महिम्नाचा आधार घेऊन तुम्हीं सर्वांना जो हा प्रायश्चित्तविधि सांगितला, तो जपून तरी कोणीं काय साध्य करावयाचें ? शुद्धीकरणद्वारा हिंदुधर्मांत येणारे लोक आपल्या बेचाळीस पूर्वजांसह रौरव नरकांत पडतील असें तुम्ही म्हणतां, यांत तुम्ही तुमच्या तोंडानें सनातन हिंदुधर्माची व आपल्या बेचाळीस पूर्वजांची केवढी जबरदस्त निंदा करीत आहां, याची तरी तुम्हांला जाणीव आहे काय ?"

भय्याशास्त्री जास्त घुश्शांत येऊन त्या तरुण ब्राह्मणाच्या कुत्सित युक्तिवादाकडे वळेंच दुर्लक्ष्य करून म्हणाले, "बस्स! मी धर्माधिकारी आहें. मी आज ह्या सर्व पाखंडी ब्राह्मणांवर बहिष्कार जाहीर करीत आहें हें ध्यानीं घेऊन यापुढें समस्त ब्रह्मवृन्दांनीं व हिंदु जनांनीं वर्तावें. मी जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्यांचा प्रतिनिधि या नात्यानें हा निर्णय देत आहें.—"

रामानंद शांतपणानें मनांतल्या मनांत भय्याशास्त्र्यांच्या अज्ञानाची कींव करून हंसत हंसत उघडपणें म्हणाले, "भय्याशास्त्री! तुम्ही अशी जगद्गुरूची बदनामी कशाला करतां ? त्यांची योग्यता कुठें व तुमची आमची योग्यता कुठें!—"

" हं, रामानंद ! हा योग्यतेचा प्रश्न काढून तुम्ही माझा उपमर्द कराल तर याद राखा ! तुम्हांला माहीत नसेल तर सांगतों, हे धर्माधिकार वंशपरंपरेनें माझ्या घराण्याकडे चालत आलेले आहेत; धार्मिक बाबतींत आमच्या वंशांतील अधिकारी पुरुषाच्या मुखांतून स्रवलेला निर्णय सर्व ब्रह्मवृंद शिरसावंद्य मानीत आले आहेत. मी माझ्या अधिकारक्षेत्रांत तुमच्यासारख्या उपऱ्यांचे भलभलते चाळे मुळींच चालूं देणार नाहीं; स्पष्ट सांगतों."

धोंडशास्त्री मध्येंच म्हणाले, " भय्याशास्त्री हे सर्व धर्माधिकारी आहेत. त्यांची धर्माज्ञा प्रत्यक्ष जगद्गुरु शंकराचार्यांच्या आज्ञेप्रमाणें सर्वांनीं शिरोधार्य मानलीच पाहिजे."

रामानंद किंचित संतापून म्हणाले, " धोंडशास्त्री ! तुमच्यासारखे विद्वच्छिरोमणिदेखील भय्याशास्त्र्यांसारख्या मूढमति अपंडितांच्या वाचाळतेला दुराग्रहानें आचार्यांच्या आज्ञेइतकी किंमत देऊं लागले तर त्याचा परिणाम काय होईल याची तुम्हांला जाणीव आहे का ?"

" काय परिणाम होईल ? " धोंडशास्त्र्यांनीं आवेशानें दांतओठ खात विचारलें.

" काय परिणाम होईल ? " रामानंदांनीं तितक्याच कणखरपणानें उत्तर दिलें, " अशानें तुमच्यासारख्या विद्वानांची योग्यता तर कमी होईलच; पण आचार्यपीठांचीही योग्यता कमी होईल व हिन्दुधर्माच्या खऱ्या कैवाऱ्यांना आचार्यपीठाचें अस्तित्व विसरून स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर हिंदुधर्माच्या धारणेची तजवीज करावी लागेल. आचार्यांचीं पीठें आजवर कोणीं अभंग राखलीं ? आचार्यांचें श्रेष्ठत्व आजवर कोणीं जिवंत राखिलें ? भय्याशास्त्र्यांसारख्यांच्या विद्वान् पूर्वजांचे धर्माधिकार आजवर मान्यतापूर्वक कोणीं रक्षण केले ? आम्हीं खऱ्या कळकळीच्या हिंदूंनी. मृत्तिकेची मूर्ति बनवून तिची पूजाअर्चा करून तिला देवपणा प्राप्त करून देणाऱ्या भाविकांनाच जर ती मूर्ति जाचूं लागली, व देवपणाच्या कसोटीला उतरेनाशी झाली, तर त्या मूर्तीला मातीमोल म्हणून मोडून टाकण्याचें सामर्थ्य त्या मूर्तीच्या उपासकांच्या अंगीं असतें; त्याप्रमाणेंच हिंदुधर्मधारणेसाठीं निर्माण झालेल्या आचार्यपीठांचा व धर्माधिकाऱ्यांचा जर धर्मविध्वंसाकडे व हिंदुधर्माच्या खऱ्या अनुयायांना गांजण्याकडे दुरुपयोग होऊं लागला, तर माझ्यासारख्या खऱ्या हिन्दुधर्माभिमान्यांना हिन्दुधर्मावर घाला घालणाऱ्या परशत्रूंचें पारिपत्य करण्यापूर्वी ह्या हिंदुधर्मकंटक धर्माभिमान्यांवर व

त्यांना नसत्या मान्यतेला चढविणाऱ्या आचार्यपीठांवरच 'मूले कुठारः' या न्यायानें हल्ला चढवावा लागेल."

"काय ? आचार्यांच्या पीठांची देखील निंदा ? आणि ती माझ्यासारख्या धर्माधिकाऱ्यासमोर ? बस्स !—"

भय्याशास्त्र्यांना तोंडचें वाक्य पुरें करूं न देतां रामानंदांच्या मागें उभा असलेला वृद्ध ब्राह्मण अनावर क्रोधाविष्ट होऊन एखाद्या खवळलेल्या वाघासारखा पुढें होऊन उद्गारला, "कसला रे तूं धर्माधिकारी ! देवपूजा करून घंटा बडविण्यांत तुझा सारा जन्म गेला, रामरक्षा महिम्न-पुरुषसूक्तदेखील तुला धड म्हणतां येत नाहीं, धर्मशास्त्र कशाशीं खातात हेंदेखील तुला माहीत नाहीं, असला अडणीवरचा शंख तूं आयत्या बिळांत नागोबासा मार्तंडशास्त्र्यांच्या भोळ्या विधवेला भुरळ पाडून तिच्या मांडीवर बसून वैभवशिखराला पोंचलास, म्हणजे मोठेंच शतकृत्य केलेंस कीं नाहीं ? आणि तेवढ्यावर तूं धर्माधिकार गाजवूं पहातोस, तुला लाज नाहीं वाटत ? तुला धर्माधिकारी मानण्याचें दूरच राहो, मी तर म्हणतो कीं, तूं ब्राह्मणदेखील नसून चांडाळ आहेस. तुझ्या वावदूकपणाच्या बडबडीला धर्माज्ञा मानून हातचें पवित्र शुद्धिकार्य सोडून देण्याला येथें जमलेले सारे लोक मेलेल्या आतेचें दूध प्यालेले आहेत अशी तुझी कल्पना आहे काय ? बस्स ! आम्ही शुद्धिकार्य करणार; आम्हांला कोण कसा अडथळा करतो तें पाहूं दे. याद राखून ठेवा, जे कोणी आम्हांला विरोध करावयाला पुढें येतील, त्यांना आचार्यांच्या समाधीपुढें मोक्ष मिळेल."

त्या वृद्ध ब्राह्मणाचे सडेतोड बोल ऐकून सर्वांनाच मोठा अचबा वाटला. भय्याशास्त्री म्हणजे केवढी जबरदस्त असामी ! तेथल्या ब्रह्मवृंदांत त्यांचा अग्रपूजेचा मान ! त्यांची अशी संभावना झाल्यावर इतरांची तेथें काय प्रतिष्ठा ! त्यांतूनही भय्याशास्त्र्यांच्या बाजूच्या इतर ब्राह्मणांनीं उसनें अवसान आणून कोलाहल करण्याला कमी केलें नसतें. पण रामानंदांच्या बाजूची मंडळी बरीच जोमांत असलेली त्यांना आढळली, व तेथें शुद्ध होण्यासाठीं एकत्र झालेले हजारों अपवादभ्रष्ट हिंदुजनही रामानंदांच्या बाजूनेंच कोणत्याही प्रसंगाला तोंड देण्याला तयार असल्याचें त्यांना स्पष्ट दिसून आलें, तेव्हां त्यांनीं हळुहळू मागें पाय घेण्याला प्रारंभ केला. कांहीं ब्राह्मण पट्टीचे भित्रे होते, ते मुकाट्यानें मागच्या पायीं मागें पसार होऊं लागले; कांहीं अंमळ कमी भित्रे होते, ते धोंड-

शास्त्र्यांच्या कानाशीं लागून 'शास्त्रीबुवा ! अशा वेळीं अतिप्रसंग करण्यांत अर्थ नाहीं. येथें धर्मलंडांचाच जमाव मोठा आहे, त्यांच्यासमोर आपणांसारख्यांची अशी अप्रतिष्ठा झालेली पहाणें आम्हांला इष्ट वाटत नाहीं. तुम्ही भय्याशास्त्र्यांना तूर्त गप्प रहावयाला सांगा. आपण रामाजी महादेव सुभेदारांच्या वशिल्यानें पेशव्यांकडे फिर्याद घेऊन जाऊं; मग ते ह्या रामानंदांचें व त्यांच्या हस्तकांचें खासें पारिपत्य करतील' अशी पोक्त सल्ला देऊं लागले.

तोंच इकडे भय्याशास्त्र्यांनीं चिडून सभोंवारच्या पोर्तुगीज शिपायांना आज्ञा केली, "तो स्वामी, त्याचा कैवारी तो थेरडा व त्यांचे इतर हस्तक ह्या सर्वांना एकदम कैद करून वसईला घेऊन चला."

चिमाजीअप्पा वगैरे मंडळी तेथें जरी गुप्त रूपानें उभी होती, तरी ज्यांच्या शब्दाला मान देऊन ती मंडळी तेथें आली होती, त्यांनीं त्या मंडळीच्या आगमनाची गुप्त वार्ता कितिएकांच्या कानांत सांगितली होती व ती कर्णोपकर्णी षट्कर्णी होतां होतां रामानंदांच्या बाजूचे सारे ब्राह्मण आणि पावन होण्यासाठीं तेथें आलेले सर्व लोक यांना कळली होती. ज्यामुळें त्या सर्व लोकांच्या अंगीं नवचैतन्य उत्पन्न होऊन ते उत्साहभरानें भय्याशास्त्र्यांच्या पक्षाची खोड मोडण्याला आतुर झाले होते. रामानंद व इतर मंडळी यांना कैद करण्याचा हुकूम भय्याशास्त्र्यांच्या तोंडून सुटलेला ऐकतांच ते लोक एकदम उठून उभे राहिले. प्रत्येक गोऱ्या सोजिरामागें एकेक मराठा शिपायी उभा होताच; ते सर्वजण चिमाजीअप्पा व गंगाजी नाईक यांच्या तोंडाकडे पाहून हुकुमाची अपेक्षा करूं लागले. त्याच क्षणाला गोरे सोजीर भय्याशास्त्र्यांच्या हुकुमाप्रमाणें रामानंद व त्यांचे अनुयायी यांना कैद करण्यासाठीं पुढें पाऊल टाकूं लागतांच चिमाजीअप्पा व गंगाजी नाईक यांनीं आपल्या सैनिकांना नुसती डोळ्यांनीं खूण केली मात्र, त्याबरोबर मराठे शिपायांनीं एकेका गोऱ्या सोजिराच्या मानगुटीला धरून दरडावून बजावलें, "खबरदार ! पुढें पाऊल टाकशील तर इथल्या इथें तुझी गर्दन छाटली जाईल !"

तो आकस्मिक प्रकार पाहून तर भय्याशास्त्री, धोंडशास्त्री वगैरे मंडळीचें धाबें दणाणून गेलें. धोंडशास्त्री एकदम नरम येऊन सामोपचाराची भाषा बोलूं लागले, "रामानंद ! मी एक तोड सुचवितों, ती तुम्हीं सौजन्यानें मान्य केल्यास हा

अतिप्रसंग टळूं शकेल. आपण अर्नाळ्यावर चिमाजीअप्पा पेशव्यांना जाऊन भेटूं व त्यांच्या मध्यस्थीनें ह्या वादाचा निकाल करूं."

लगेच चिमाजीअप्पा पुढें होऊन म्हणाले, "मग त्यासाठीं अर्नाळ्याला जाण्याचें कारण नाहीं; हे चिमाजीअप्पा एथें हजर आहेत. आम्हीं सर्व वाद-विवाद ऐकला आहे व सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत; त्यांवरून असा निकाल देतों कीं, स्वामींनीं चालविलेले धर्मकार्य आम्हांला पूर्णपणें संमत आहे व त्यांना ज्यांनीं ज्यांनीं विरोध आरंभिला आहे, त्यांना त्यांना शासन होणें अवश्य आहे." लगेच चिमाजीअप्पांनीं गंगाजी नाइकांकडे वळून आज्ञा केली, "नाईक ! भय्याशास्त्र्याला व धोंडशास्त्र्यांना आतांच्या आतां कैद करा." ते तसेच सर्व मराठा शिपायांना अनुलक्षून उद्गारले, "दरोबस्त गोऱ्या शिपायांना पकडा."

चिमाजीअप्पांची आज्ञा होण्याचा अवकाश, लगेच त्या आज्ञेची अंमल-बजावणी सुरू झाली. भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांच्या सभोंवार मराठे शिपायां-चा गराडा पडलेला पहातांच त्यांच्या बाजूचे इतर ब्राह्मण धांवत चिमाजीअप्पां-पाशीं येऊन त्यांच्या पायांवर लोटांगणें घालून क्षमा मागूं लागले; पण चिमाजी-अप्पांचें लक्ष्य त्या वेळीं गोऱ्या सोजिरांकडे वेधलेलें होतें. ते लोक मराठ्यांशीं लढण्याला उद्युक्त झालेले पहातांच चिमाजीअप्पांनीं आपल्या सैनिकांना दुसरी आज्ञा सोडली, "जे सोजीर खुषीनें स्वाधीन व्हावयाला तयार नसतील त्यांचीं मुंडकीं छाटून टाका."

चिमाजीअप्पांच्या आज्ञेसरशीं दहाबारा सोजिरांचीं मुंडकीं धडावेगळीं होतांच बाकीचे सोजीर तेथून पळ काढूं लागलेले पाहून चिमाजीअप्पांनीं पुन्हा आपल्या सैनिकांना आज्ञा केली, "जे सोजीर पळत असतील त्यांना बेलाशक ठार करा."

मराठे सैनिकांचा जमाव गोऱ्या सोजिरांच्या मानानें बराच असल्यानें व इतर लोकांचेंही मराठे सैनिकांना पूर्ण पाठबळ असल्यानें गोऱ्या सोजिरांना लढतांही येईना व पळतांही येईना. पळावें तरी मरावें व लढावें तरीही मरावें, अशा प्राणांतिक पेंचांत सांपडल्यामुळें त्यांना मराठे सैनिकांच्या स्वाधीन होण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. सुमारें पाव घटकेंत स्थिरस्थावर होऊन सर्व गोरे सोजीर अल्लाच्या गाई बनून चिमाजीअप्पांना शरण आले. त्या दरम्यान् भय्याशास्त्र्यां-

च्या बाजूची मंडळी पळ काढण्याच्या खटपटींत होती. पण गंगाजी नाईक त्यांना थोडेच पळूं देतात ! त्यांनीं भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांसह सर्वांना आपल्या शिपायांकरवीं कोंडून चिमाजीअप्पांसमोर उभें केलें. चिमाजीअप्पांनीं आपल्या सैनिकांना बंदीवान सोजिरांवर खडा पहारा ठेवावयाला सांगून प्रथम रामानंदांना बाजूला घेतलें व त्यांच्या पायांवर मस्तक ठेवून विनम्र भावनेनें त्यांना म्हटलें, " स्वामि ! आपलें दर्शन झालें, आम्ही धन्य झालों. आपणाला भेटण्याची आमची फार दिवसांची इच्छा होती; ती पूर्ण होण्याचा योग हा असा होता. आपण आरंभिलेले कार्य अत्यंत स्तुत्य आहे व त्याला आमचा पूर्ण पाठिंबा आहे. आपल्या कार्यात ज्यांनीं ज्यांनीं विघ्नें आणलीं, त्यांचें त्यांचें यथा-योग्य शासन होईलच. तूर्त आपला मार्ग निष्कंटक झाला आहे, आतां आपण निर्वेधपणें आजचें शुद्धिकार्य करावें." लगेच त्यांनीं आपल्या एका सैनिकाकडून तेथल्या जनसंमर्दांत दवंडी पिटविली, " श्रीमंत पेशवे सरकारांची रामानंद-स्वामींनीं आरंभिलेल्या पवित्र शुद्धिकार्याला पूर्ण संमति असून जे लोक शुद्ध होऊन हिंदुधर्माचा यथाविधि स्वीकार करतील, त्यांच्या व त्यांच्या परिवाराच्या योगक्षेमाची हमी श्रीमंत पेशवेसरकार आनंदानें आपल्या शिरावर घेत आहेत. त्याप्रमाणेंच जे कोणी ह्या शुद्धिकार्याला विरोध करतील त्यांना—ते मग ब्राह्मण असोत किंवा कोणीही असोत—सरकारांतून कठोर शासन करण्यांत येईल."

रामानंद सद्गदित कंठानें चिमाजीअप्पांना आशीर्वाद देऊन हळूच म्हणाले, " श्रीमंत ! घेतल्या सोंगाची बतावणी यथायोग्य करण्यासाठीं मला आपला नमस्कार स्वीकारून आपणाला आशीर्वाद द्यावा लागत आहे; पण त्याला इलाज नाहीं. वास्तविक माझी योग्यता आपणाला आशीर्वाद देण्याची नसून आपला आज्ञाधारक सेवक या नात्यानें आपली सेवा करण्याच्या योग्यतेचा माणूस मी आहे." तोंच सिद्धेश्वरशास्त्री जवळ आलेले पाहून रामानंदांनीं आपलें भाषण आंवरतें घेऊन समारोप केला. " तूर्त आपणाला मीं आशीर्वाद दिला तो आपणा-हून जास्त वयाचा आपला हितचिंतक ब्राह्मण या वडीलधाऱ्याच्या नात्यानें दिला असें आपण समजावें."

" स्वामि ! आम्हांला आपल्या संदिग्ध बोलण्याचा अर्थ कळला नाहीं ! " चिमाजीअप्पा हात जोडून उद्गारले. ते खरोखरच रामानंद ही व्यक्ति खरी कोण याविषयीं बुचकळ्यांत पडले होते.

## प्रकरण बारावें

# हें कारस्थान कोणाचें ?

इतक्यांत रामानंदांच्या बाजूचे आणखी ब्राह्मण सिद्धेश्वरशास्त्र्यांच्या मागोमाग रामानंदांसभोंवार जमा झाले; त्यांच्या मागोमाग आपल्या मायधर्मांत पुन्हा प्रविष्ट होण्यासाठीं भुकेलेली सहस्रावधि जनता चिमाजीअप्पा व रामानंद यांच्या नांवाचा जयजयकार करीत त्यांच्यासभोंवार जमूं लागली; तेव्हां त्या सर्वांना सिद्धेश्वरशास्त्र्यांकरवीं विमल तळ्यावर जाऊन स्नान करून निर्मळ तळ्या-सभोंवार एकत्र जमण्याला सांगून स्नानाचा संकल्प सांगण्यासाठीं सिद्धेश्वर-शास्त्र्यांना तिकडे पाठविलें व स्वतः शुद्धीकरणाच्या पुढील तयारीसाठीं निर्मळ तळ्यावर स्नानाला जातां जातां चिमाजीअप्पांना म्हटलें, " श्रीमंत ! आतां मी माझ्या विहित कार्याला लागतों. हें कार्य आटोपल्यावर मनमोकळेपणानें बोला-वयाला आपणाला भरपूर अवसर आहे. तूर्त आपणाला एवढीच विनंति करा-वयाची कीं, आपण अपराधी जनांना शासन करतांना देशकालपरिस्थितीचा विचार विशेष आस्थेवाईकपणानें करावा. आपल्याला राजकारणाच्या दृष्टीनें जे गुन्हेगारसे आढळतील त्यांना आपण कितीही जबर शासन केलें तरी तें क्षम्यच ठरेल; पण धर्मकारणीं विरोध करणाऱ्या लोकांची कींव करावी. आपण धर्मवीर आहां एवढी त्यांची येथवरच्या प्रकारावरून खात्री झालीच आहे. त्यांचें अवसान किती अल्प आहे हेंही आपल्या निदर्शनाला आलेंच आहे. त्यावरून अशा कोत्या बुद्धीच्या अंधपरंपरेच्या दुबळ्या दासांना क्षमा हें शासन पुरेसें होईल असें मला वाटतें."

एवढें बोलून रामानंद स्नानाला निघून गेले. त्यांच्या उपदेशावरून काय बोध घ्यावयाचा तो घेऊन चिमाजीअप्पा आचार्यांच्या समाधीचें दर्शन घेण्यासाठीं तिकडे वळले. जातांना त्यांनीं नाइकांना आज्ञा केली, " नाईक ! तुमच्या ताब्यांतील गुन्हेगारांना घेऊन समाधीकडे या. त्या परमपवित्र जागींच त्यांचा न्याय होणें उचित आहे."

नाइकांनीं भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांना आचार्यांच्या समाधींत चिमाजी-अप्पांसमोर आणलें, तेव्हां दोघांचाही नूर पालटून अगदीं मलूल झाला होता. चिमाजीअप्पांचा कडा अंमल पाहून त्या दोघांनाही वाटूं लागलें होतें कीं, आतां

आपली धडगत नाहीं. तरीही धोंडशास्त्री मनांतल्या मनांत ह्या दिव्यांतून पार पडण्याला कोणती युक्ति योजावी याविषयीं विचार करीतच होते. चिमाजी-अप्पांनीं ते दोघे समाधिमंदिरांत प्रविष्ट होतांच त्यांना उत्थापन दिलें व नमस्कार केला. त्यावरून धोंडशास्त्र्यांना आशा वाटूं लागली कीं, आपणाविषयीं श्रीमंतांच्या मनांत अजूनही आदर वसत आहे. तो आपणाला फलदायी होईल.

“शास्त्रीबुवा!” चिमाजीअप्पा धोंडशास्त्र्यांना म्हणाले, “आम्ही इतके दिवस तुमच्या विद्वत्तेचा लौकिक ऐकत होतों व तुमच्या सौजन्यावरही आमचा दांडगा भरंवसा होता; पण आज प्रत्यक्ष प्रत्यय आला तो असा कीं, ‘दुरून डोंगर साजरे’!”

धोंडशास्त्री म्हणाले, “श्रीमंतांच्या बोलण्यांतील गूढ आशय माझ्या ध्यानीं आला; पण श्रीमंत ऐकून ध्यावयाला तयार असतील तर मलाही माझी बाजू श्रीमंतांसमोर मांडावयाची आहे.”

“तुम्हांला काय बोलावयाचें तें बोला; खुशाल मोकळ्या मनानें बोला. अजूनही तुमच्या वयाविषयीं व विद्वत्तेविषयीं आमच्या मनांत आदर वसत आहे आणि म्हणूनच आमच्या दृष्टीनें जरी तुम्ही अपराधी आहां, तरी तुमचें म्हणणें शांतपणें ऐकून घेण्यासाठींच आम्हीं तुम्हांला मुद्दाम बाजूला बोलावून घेतलें आहे. असें पहा, आपण ब्राह्मण पडलों.—”

“बस्स! बस्स! तीच मुद्दयाची पहिली गोष्ट मीदेखील बोलणार होतों. आपण न् मी दोघेही ब्राह्मण पडलों परमेश्वरकृपेनें पेशवाईपद आपल्या थोर भट वंशाकडे आलें, तेव्हां माझ्या अंगावर खरोखर मूठभर मांस वाढलें. ब्राह्मण पेशवे झाले, आतां ब्राह्मण जातीची सर्वांगीण उन्नति व्हावयाला कसलीही आडकाठी नाहीं असें पाहून मला तेव्हां जो आनंद झाला तो गगनांत मावेना; पण श्रीमंत! कोत्या बुद्धीचे इतर ब्राह्मण आपणाकडे काय किंवा आमच्याकडे काय, किती अनुदार दृष्टीनें पहातात याचा आपण आजवर कधीं विचार केला आहे काय? माझें म्हणणें कीं, देवदयेनें ब्राह्मणांच्या हातीं मराठशाहीचीं सारीं सूत्रें आलीं, ती ब्राह्मणशाही सर्व ब्राह्मणांनीं एकजुटीनें व निःपक्षपातानें गाजवून अखिल भारतवर्षांत ब्राह्मणपादशाही स्थापून काशीपासून रामेश्वरापर्यंत गोब्राह्मण-रक्षण करून प्रजाजनांना सुखी करावें. पण इतर ब्राह्मणांच्या तें गांवीं नाहीं. आपले राजकारणांतील वाद विचारांत घेऊन ह्या ब्राह्मणांनीं आमच्यावर सूड

घेण्याची बुद्धि धरावी, आमचा पाणउतारा करावा, आम्हांला अपंक्त ठेवण्यापर्यंत मजल आणावी, हें श्रीमंत ! आपणाला तरी रुचतें का ? ”

“ हीच तुमची तक्रार ना ? ”

“ आणखींही तक्रार आहे. पण आपण मुद्द्याला धरून बोलूं प्रथम मला माझ्या प्रश्नाचें उत्तर पाहिजे आहे. आपल्या जातींतील माझ्यासारख्या विद्वान् ब्राह्मणाचा असा अपमान झालेला आपणाला मानवतो का ? अशानें ब्राह्मणां-ब्राह्मणांतच नसती तेढ उत्पन्न होऊन त्यामुळें पेशव्यांनीं आरंभिलेल्या हिंदवी-साम्राज्याच्या जगड्व्याळ महत्कार्याला अपाय पोंचत नाहीं का ? ”

“ तुमची इच्छा मला कळली. ही खरोखरच सदिच्छा आहे; पण खरें सांगावयाचें तर आम्ही तुमच्यापुरतेंच बोलतों तुमची वर्तणूकच तुम्हां आम्हां सर्वांच्या ह्या सदिच्छेला मारक होत आहे. साऱ्या हिन्दु रयतेला सुखी करण्या-साठीं ब्राह्मणशाही स्थापन करण्याची महत्त्वाकांक्षा धरावयाची; आणि साऱ्या रयतेला समता न्यायानें वागविणें तर दूरच राहो; पण खुद्द ब्राह्मणांतील पोटजातीं-तही नसते भेद माजवून एकमेकांनीं एकमेकांना कोंपरखळ्या मारावयाच्या, याला तुम्ही समंजसपणा म्हणाल का ? ”

“ इतका समंजसपणा सर्व ब्राह्मणांच्या अंगीं असता तर ह्या थराला गोष्टी आल्याच नसत्या.”

“ बरें; असल्या क्षुल्लक वादाच्या भरीं पडून तुम्ही शुद्धिकार्याला अडथळे उत्पन्न करूं लागला, तर याचे परिणाम काय होतील ? ”

“ काय होतील ? ”

“ आपण सर्व हिंदुसमाजाची सहानुभूति गमावून बसूं व देशाबरोबर आमच्याही वांटयाला विटंबना येईल. ब्राह्मणवर्ग हा हिंदुसमाजाचा प्रमुख शास्ता, तो समाजच इतर हिंदुसमाजाविषयीं इतका बेफिकीर राहूं लागून ‘आम्हांला काय त्याचें’ असें म्हणूं लागला, कीं ब्राह्मणेतर हिंदुसमाजही ‘ब्राह्मणशाही तरो किंवा मरो; आम्हांला काय त्याचें’ अशा बेफिकीर वृत्तीनें वागूं लागेल. ‘ब्राह्मणसमाज हा बुद्धिबलानें व ज्ञानबलानें हिंदुसमाजांत सर्वश्रेष्ठ असल्यानें हिंदुसमाजाचे काय किंवा शत्रुसमाजांचे काय, सदैव ब्राह्मणसमाजाच्या हालचालींकडे डोळे लागलेले असतात. ब्राह्मणसमाज हा हिंदुसमाजरूपी विराट् पुरुषाचा आत्मा समजला जातो. देहाशिवाय आत्म्याला वसतिस्थान नाहीं व आत्म्याशिवाय देहाला चैतन्य

नाहीं. देह व आत्मा यांचा असा बेबनाव झालेला शत्रूंना दिसला रे दिसला कीं ते त्या चैतन्यहीन कलेवराचे लचके तोडण्याला तत्पर असतात. हेंच पहा, तुम्हीं सर्व ब्राह्मणांनीं मिळून बऱ्याच दिवसांपासून ह्या प्रांतीं चालत आलेली शुद्धीची चळवळ* जर एकमतानें व आत्मीय भावनेनें जोमांत चालविली असती, तर आजला ख्रिस्ती समाजाची एवढी प्रचंड वाढ व हिंदुसमाजाची प्रचंड हानि झालेली दिसते, ती झाली असती का ?"

"मग ही हानि काय आम्हीं केली ?"

"नाहीतर दुसऱ्या कोणीं केली ? शास्त्रीबुवा ! तुमच्यासारखे सुज्ञ लोकाग्रणीच जर स्वजनांचें पारिपत्य करण्यासाठीं शत्रूच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागले, शत्रूला

* मराठ्यांनीं वसईच्या राजकारणांत लक्ष्य घालण्यापूर्वी सुमारें पावणेदोनशें ते दोनशें वर्षांपासून त्या भागांतील तत्कालीन ब्राह्मणांनीं बाटलेल्या लोकांना परत स्वधर्मांत घेण्याचे अनेक प्रयत्न केले. 'अशा लोकांना आपल्या पिढीजाद धर्मांत येण्याबद्दल ते उपदेश करीत. इतकेंच नव्हे तर गोकुळाष्टमी वगैरेंसारख्या मोठ्या मे याच्या दिवशीं बाटलेल्या लोकांना समुद्र अगर गंगास्नान (तीर्थस्नान) घालून शुद्ध करून घेत. अशा पवित्र दिवशीं गंगास्नान केल्यानें सर्व पातकांचें जसें क्षालन होतें, तसें ख्रिस्ती धर्म स्वीकारून व्हावयाचें नाहीं, असा शास्त्राधार ते लोकाना दाखवीत. त्यामुळें पाद्र्यांचें पित्त खवळून जाई. ब्राह्मणांची ही युक्ति पाहून त्यांचा हा उद्योग बंद पाडण्यासाठीं ठाणें–वसई–मुंबई अशा ठिकाणच्या खाड्यांच्या व समुद्राच्या कांठीं ख्रिस्त्यांनीं खांबावर सर्वत्र क्रूस रोंवून ठेविले होते. तेव्हां क्रूस रोंविलेला नसेल अशा ठिकाणीं जाऊन ब्राह्मण आपला मेळा भरवीत. शेवटीं ख्रिस्त्यांच्या जाचाला त्रासून ब्राह्मणांनीं वसईनजीक रानांत एक तलाव पाहिला आणि तेथें कांहीं दिवस शुद्धीकरण गुप्तपणें चालविलें. हें ठिकाण उघडकीला आल्यावर पोर्तुगीज शिपायांनीं ब्राह्मणांवर हल्ला करून त्यांना तेथून हुसकून दिलें. त्यावेळीं एक बैरागी एकदां ख्रिस्ती होऊन पुन्हा हिंदु झालेला निर्भयपणें फौजेसमोर एकटाच उभा राहिला. तेव्हां तर त्या ख्रिस्त्यांचें पित्त जास्तच खवळून त्यांनीं त्या जागेचा विध्वंस केला आणि गाई मारून त्यांचें मांस व रक्त तलावांत व बाजूला शिंपडून ती जागा बाटवून टाकली. ( ऑगस्ट इ० सन १५६४ )'.—ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध.

गौरवानें बोलावून आणून आपल्या घरांत घालूं लागले, तर इतरांना तरी हंसण्यांत काय अर्थ आहे ? आणि एवढा स्वजनद्रोह साधून मिळवावयाचे काय तर ईर्षा ! तुम्ही असें पहा, कांहीं मूढमति ब्राह्मणांनीं तुम्हांला किंचित् हीन लेखतांच तुमच्या अंगाचा जर एवढा भडका झाला, तर इतक्या हिंदुजनांना हिंदुधर्ममंदिराचें महाद्वार तुम्ही बंद करूं लागल्यावर त्या हिंदुजनांचा किती भडका व्हावा ? दुसरें असें कीं, आपल्या फिरंगी शत्रूनीं बलात्काराने स्वतःच्या धर्मानुयायांचे संख्याबल वाढविले, ही हिंदुसमाजाला लागलेली गळती आपण जर तितक्याच झपाट्यानें थांबविली नाहीं तर हिंदुधर्म तरी जाग्यावर राहील का ? हिंदु-धर्मावरील हें महान् अरिष्ट सर्व हिंदूंनीं एकजुटीनें निवारलें पाहिजे व तें निवारण्याची जबाबदारी सर्वांत जास्त ब्राह्मणसमाजावर आहे. ती जबाबदारी थोर मनानें व दूरदर्शीपणानें पार पाडण्याचें सोडून तुम्ही ब्राह्मणां ब्राह्मणांतच नसती चुरस माजवूं लागलां म्हणजे प्रत्यक्षतः हिंदवीचा उच्छेद तुम्हींच आरंभिला असें होत नाहीं का ? ”

“ एकूण श्रीमंतांना आमच्या मानापमानाची कांहींच पर्वा वाटत नाहीं म्हणावयाची ! पेशवेसरकार आमचेच ब्राह्मण आहेत, त्यांच्यापाशीं आमच्या गाऱ्हाण्यांची योग्य दाद लागेल व आज इतकीं वर्षे अंधारांत खितपत पडलेल्या आमच्या ब्राह्मण जातीला राज्यकर्तेपणाचें नववैभव प्राप्त झाल्यामुळें आमची जात राजकीय-सामाजिक-धार्मिक अशा सर्व बाजूंनीं परम श्रेष्ठत्व पावूं लागेल अशी जी आम्हांला बळकट आशा होती ती फुकटच ! ”

“ पुन्हा तेंच ! शास्त्रीबुवा ! आम्हांला तुमच्या ह्या जातिदुरभिमानाबद्दल तुमची कींव येते. तुम्हांला तुमच्या एकट्याचा किंवा फारतर आपल्या जातीचा तेवढा स्वार्थ दिसतो; पण इतकी संकुचित दृष्टि ठेवून कोणाही राज्यकर्त्याचा कधींही पल्ला यावयाचा नाहीं. ज्या सदोष राज्यपद्धतीबद्दल तुम्ही-आम्ही मुसल-मानांना व फिरंग्यांना नांवें ठेवतों आणि त्यांना विरोध करतों, त्याच सदोष राज्यपद्धतीचा आम्हीं अवलंब करावा असें तुम्ही तरी कसें म्हणतां ? खरें सांगावयाचें तर अशा फाजील ज्ञातिनिष्ठ माणसांना गुन्हेगार समजून आम्हीं शासन केलें पाहिजे. तसें तुमच्या बाबतींत करण्याचा जरी आमचा इरादा नाहीं, तरी तुम्हांला एवढें मात्र निक्षून सांगणें आहे कीं, तुम्हीं पेशव्यांपासून असल्या हिणकस स्वार्थाची अपेक्षा कधींच करूं नका. स्पष्टच

सांगावयाचें तर पेशवे छत्रपतींच्या राज्यांत जबाबदारीच्या अधिकारपदावर आरूढ झाले, तेव्हांच ते पंथभेदातीत ठरले. त्यांनीं पक्षपातात्मक स्वजातिनिष्ठा तेव्हांच सोडली व कर्तव्यनिष्ठेची कांस धरली. पेशवे तेव्हांपासून केवळ ब्राह्मण जातीचे किंवा चित्पावनांचे उरले नाहींत, ते साऱ्या रयतेचे झाले. त्यांना ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र सारे सारखेच. पेशवे आपल्या जातीचे म्हणून चित्पावन जर चढेलपणानें वागूं लागतील, तर त्यांनादेखील शासन करण्याला पेशवे कचरणार नाहींत. यावरून तुम्हीं काय उमजावयाचें तें उमजावें व त्याप्रमाणें वागावें असें आमचें तुम्हांला सांगणें आहे."

"एकूण पेशवाईचा आत्यंतिक अभिमान आजवर धरण्यांत आम्हीं मोठी चूकच केली म्हणावयाची !"

"असले अभिमानी पेशव्यांना नको आहेत. कारण त्यांचा अभिमान पेशव्यांची बद्नामी व देशाची हानि करण्याला कारण होत आहे."

"ठीक आहे !" धोंडशास्त्री दोन दीर्घ उसासे सोडून उद्गारले. त्यांना मनांतून चिमाजीअप्पांचें निस्पृहतेचें बोलणें मुळींच रुचलें नाहीं; पण 'सत्तेपुढें शहाणपण नाहीं' असें मानून स्वतःच्या मनाचा विरंगुळा करण्याशिवाय त्यांना गत्यंतरच उरलें नव्हतें.

"तेव्हां याप्रमाणें पुढें वागावयाचें. कबूल ?" चिमाजीअप्पानीं विचारलें.

"कबूल !" असें म्हणून धोंडशास्त्री बाहेर जाऊं लागले. त्यांच्या मागोमाग भय्याशास्त्रीही जाऊं लागले. तेव्हां चिमाजीअप्पांनीं नाइकांना खूण करून भय्याशास्त्र्यांना अटक करण्याला सांगितलें.

"श्रीमंत ! हें काय ? हे नाईक मला बाहेर जाऊं कां देत नाहींत ?" भय्याशास्त्र्यांनीं नाइकांवर चिडून विचारलें.

"तुमची चौकशी अजून व्हावयाची आहे." चिमाजीअप्पा उद्गारले.

"आणखी कसली चौकशी व्हावयाची आहे ? शास्त्रीबुवा व मी कांहीं दोन नाहीं. ज्या गोष्टी त्यांनीं कबूल केल्या त्या मलाही कबूल आहेत." भय्याशास्त्री म्हणाले.

धोंडशास्त्री माघारे येऊन चिमाजीअप्पांना हात जोडून म्हणाले, "श्रीमंत ! ते माझे जामात आहेत; ते कोणी परके नाहींत. ते माझ्या शब्दाबाहेर जावयाचे नाहींत."

" म्हणून काय झाले ? ते तुमचे जामात असले तरी ते तुमच्या पापपुण्याचे धनी थोडेच आहेत ! त्यांच्या अपराधाबद्दल त्यांचीच चौकशी झाली पाहिजे व शासनही त्यांनाच झाले पाहिजे." लगेच चिमाजीअप्पा भय्याशास्त्र्यांकडे वळून म्हणाले, " भय्याशास्त्री ! तुम्ही फिरंग्यांना फितूर होऊन आमच्याशीं, आपल्या मायदेशाशीं, आपल्या समाजाशीं व आपल्या धर्माशीं द्रोह केल्याचा आरोप तुमच्यावर ठेवण्यांत आला आहे; व त्या अपराधाबद्दल तुम्हांला कैद करण्यांत येत आहे. श्रीमंत पेशवे व शाहूमहाराज तुम्हांला काय शासन करावयाचें तें करतील."

" भय्याशास्त्र्यांवर हा निव्वळ आळ घेण्यांत येत आहे. आमच्या दुष्टाव्या-वर टपून बसलेल्या लोकांनीं श्रीमंतांच्या मनांत कांहींतरी काळेंबेरें भरवून दिलें आहे. भय्याशास्त्र्यांचें वैभव ज्यांच्या डोळ्यांत सलतें, अशा विघ्नसंतोषी लोकांनीं श्रीमंतांच्या कानांत विष ओतले आहे. मी यज्ञोपवीताच्या ब्रह्मगांठीची शपथ घेऊन सांगतों कीं, भय्याशास्त्र्यांनीं अशा प्रकारचा द्रोह मुळींच केलेला नाहीं." धोंडशास्त्री जानवें हातांत घेऊन उद्गारले.

धोंडशास्त्र्यांनीं आपली बाजू उचलून इतक्या धडाडीनें धरलेली पाहून भय्या-शास्त्र्यांना अंमळ जोर आला. ते देखील धोंडशास्त्र्याचेंच अनुकरण करून जानवें हातांत घेऊन म्हणाले, " श्रीमंत ! मीही यज्ञोपवीताच्या ब्रह्मगांठीची शपथ घेऊन सांगतों कीं, धोंडशास्त्री म्हणतात तेंच अक्षरशः खरें आहे. ह्या ब्रह्मगांठी शपथ, मीं किंवा धोंडशास्त्री ह्या दोघांनींही राजाचा-पेशव्यांचा-देशाचा, समाजाचा, धर्माचा कोणाचाही द्रोह केलेला नाहीं."

" तर मग तुम्ही वसईच्या किल्ल्यावर फिरंग्यांच्या पायांशीं लोटांगणें घालीत कशाला गेलां होतां ? " चिमाजीअप्पांनीं विचारलें.

याच वेळीं एक घोडेस्वार दौडत दौडत आचार्यांच्या समाधीपाशीं येऊन पोंचला. त्याच्यासह गंगाजी नाईक आंत येतात तोंच धोंडशास्त्री चिमाजीअप्पांच्या प्रश्नावर गर्जून म्हणाले, " असत्य ! सर्वथा असत्य ! श्रीमंत ! आपणाला अशी अपवार्ता कळविणारा मनुष्य असत्यभाषी चांडाळ आहे. भय्याशास्त्री वसईला त्या म्लेच्छभूमींत कधींही गेलेले नाहींत."

" आणि शास्त्रीबुवादेखील कधीं गेलेले नाहींत." भय्याशास्त्र्यांनीं धोंड-शास्त्र्यांना दुजोरा दिला. " मी माझ्या ब्रह्मगांठीची गोमातेची, आचार्यांच्या

समाधीची शपथ घेऊन सांगतों कीं, आम्ही दोघेही अशा फितुरींत कधींच सामील झालेलों नाहीं."

सासरे जांवयांची ही संपादणी ऐकून नुकताच आंत आलेला तरुण एकदम पुढें होऊन चिमाजीअप्पांना म्हणाला, " श्रीमंत ! हे दोघेही ब्राह्मण नसून चांडाळ आहेत–चांडाळांहूनही नीच हे आहेत. ब्रह्मगांठीची, गोमातेची व आचार्यांच्या समाधीची शपथ घेऊन प्रत्यक्ष आचार्यांच्या समाधींत असत्य बोलणाऱ्या ह्या दोघांही बेरडांना देहान्त शासन होणेंच योग्य आहे. मीं धडधडीत डोळ्यांनीं ह्या दोघांना त्या–वाटग्या कायस्थाधमावरोवर–त्या अंताजी देशपांड्या बरोबर वसईच्या किल्ल्यावर पाहिलें आणि हे एथें सफा खोटें बोलतात ! हा म्हातारडा थेरडा धोंडशास्त्री एवढा विद्वान् म्हणवितो; ह्या नर्मदेंतील धोंड्याला ब्राह्मण कोण म्हणेल ! आणि हा त्याचा जांवई !–दोघांच्याही फितुरीला मी चक्षुर्वैसत्यं साक्ष आहें. हे घरभेदे आयत्या वेळीं वसईला जाऊन स्वार्थासाठीं कुत्र्यांप्रमाणें सेनापतीच्या पायांपाशीं लोळले नसते, तर आपलें राजकारण खास इतकें बिघडलें नसतें. श्रीमंत ! हे ब्राह्मण नव्हेत; नीच–चांडाळ नराधम हे ! यांना आपण देहान्त शासन देणेंच उचित आहे."

तो तरुण नारोशंकर होता; एवढें सांगितलें म्हणजे पूर्ववृत्तान्तावरून त्याच्या बोलण्यांतील सत्यता चिमाजीअप्पांच्या मनाला त्याच क्षणीं किती उत्कटतेनें पटली असेल हें निराळें सांगावयाला नको. धोंडशास्त्री व भय्याशास्त्री ह्या दोघांनींही नारोशंकरांना वसईच्या किल्यावर प्रत्यक्ष पाहिलें असल्यानें त्यांनाही आंता वर मान करून बोलावयाला तोंड उरलें नाहीं. चिमाजीअप्पानांही त्यांची जास्त चौकशी करण्याची आवश्यकता भासली नाहीं. ते धोंडशास्त्र्यांना रागाच्या भरांत एवढेंच म्हणाले, " शास्त्रीबुवा ! एवढ्या अगाध विद्वत्तेच्या पवित्र गंगाप्रवाहांत तीन त्रिकाळ अभ्यंगस्नान करणारा ब्राह्मण सुसंस्कृतीच्या नांवानें इतका कोरडा ठणठणीत राहूं शकतो व सामान्य माणुसकीलाही पारखा ठरतो, असें आमच्या उभ्या आयुष्यांत हें पहिलेंच उदाहरण आम्ही पहात आहों. तुमच्यावर एकवार दया करण्याचा आमचा इरादा होता; पण आतां आमच्या मनानें घेतलें आहे कीं, तुमच्यावर दया दाखविणें हा अक्षम्य अन्याय आहे. पेशवाई अंमल म्हणजे तुमच्यासारख्या कर्मनष्ट ब्राह्मणांचा भूतखाना नव्हे, हे समाजाला पटवून देऊन पेशवाईची इभ्रत

राखण्यासाठीं तुमच्यासारख्यांना कठोर शासन होणेंच अवश्य आहे." लगेच ते नाइकाकडे वळून म्हणाले, "नाईक ! ह्या दोघांनाही कैद करून अर्नाळ्यावर नेऊन नीट बंदोबस्तानें ठेवा.

नाईक आपल्या शिपायांकरवीं धोंडशास्त्री व भय्याशास्त्री यांना कैद करवीत असतां आपल्या बचावाचा अखेरचा उपाय म्हणून ते दोघेही चिमाजीअप्पांच्या पायांवर लोटांगणें घालून अत्यंत काकुळतीला येऊन क्षमेची याचना करूं लागले. धोंडशास्त्री म्हणाले, "श्रीमंत ! निदान आम्ही ब्राह्मण–अशा सर्वश्रेष्ठ ब्राह्मणांना आपण सामान्य अपराधी समजून शासन केलें तर साऱ्या ब्रह्मवृंदाला केवढी दहशत बसेल ! एवढ्या समाजांत ब्राह्मणांची केवढी नाचक्की होईल ! ब्राह्मणांचा अभिमान आपण ब्राह्मणांनीं धरला नाहीं, तर आमचा त्राता कोण आहे ! निदान ह्या ब्राह्मणाच्या यज्ञोपवीताची तरी अशी अप्रतिष्ठा न व्हावी !"

"यज्ञोपवीताची अप्रतिष्ठा तुम्हीं केली ! आतां खोटी शपथ तुम्हींच घेतली ना ? यज्ञोपवीताचा गळफांस लावून अलम् हिंदु दुनियेच्या जिवावर उठणाऱ्या तुमच्यासारख्यांना क्षमा आमच्या हातून कालत्रयींही होणें शक्य नाहीं." चिमाजीअप्पा संतापून नाइकांकडे वळून म्हणाले, "नाईक ! पहातां काय ? पकडा त्यांना. हे ब्राह्मण म्हणून तुम्ही कचराल तर आपल्या कर्तव्याला मुकाल. पकडा त्यांना !"

एखाद्या मांजराला कोंडून मारावयाचें म्हटल्यास प्रथम तें मांजर भीतभीत बाहेर पळण्याचा प्रयत्न करतें, व बाहेर पळण्याला मार्ग नाहीं अशी खात्री होतांच स्वतःच्या जिवावर उदार होऊन कोंडणाऱ्या माणसावरच तुटून पडतें, तशी धोंडशास्त्र्यांची अवस्था आतां झाली. त्यांनीं जिवावर उदार होऊन 'शेषं कोपेन पूरयेत्' हा अखेरचा उपाय योजून चिमाजीअप्पांना म्हटलें, "श्रीमंत ! आजवर ज्यांनीं ज्यांनीं ब्राह्मणांचा छळ केला व ज्यांच्या ज्यांच्यावर ब्राह्मणांचा कोप झाला, ते कसे रसातळाला गेले याचीं पुराणांतरीं नमूद असलेलीं उदाहरणें आपणांला आठवतात का ?"

"ज्यांच्या शाप-कोपाची पर्वा बाळगावयाची असते, ते ब्राह्मण निराळे असतात." नारायणराव मध्येंच म्हणाला, "शास्त्रीबुवा ! सिंह हत्तींचें गंडस्थळ फोडून आंतील मुक्ताफळें भक्षण करण्याला समर्थ झाला म्हणून एखादा लंबकर्ण सिंहाचें कातडें पांघरून हत्तीवर चालून जाईन म्हणेल, तर तें शक्य होईल का?"

चिमाजीअप्पांनीं धोंडशास्त्र्यांच्या अखेरच्या ओरडीकडे मुळीं लक्ष्यच दिलें नाहीं. नाईकही इतका वेळ ब्राह्मणांना कसें पकडावें याविषयीं अळम् टळम् करीत होते; पण धन्यांनीं पुन्हा निक्षून आज्ञा करतांच नाइकांना तिची अंमल-बजावणी करणें भागच पडले. लगेच तेथल्या तेथें त्यांनीं आपल्या सैनिकांकरवीं धोंडशास्त्री व भय्याशास्त्री ह्या दोघांनाही कैद करवून धन्यांच्या आज्ञेप्रमाणें बंदोबस्तानें अर्नाळ्याकडे रवाना केलें.

भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांचा बंदोबस्त केल्यावर चिमाजीअप्पांना नारो शंकरांच्या कुशलवृत्ताची चौकशी करण्याला फावलें. त्यांनीं नारो शंकरांना विचारलें, “ नारायणराव ! तुमची वसईच्या किल्ल्यावरून सुटका कशी झाली ? बुबाजी काल सुटून आला, त्यानें सांगितलेल्या माहितीवरून आम्ही तर तुमच्या-विषयीं फारच फिकिरींत पडलों होतों.”

नारो शंकर म्हणाले, “ सरकार ! ती वेळ तशीच आणीबाणीची होती ; पण तेथील किल्लेदाराचा मुलगा डोमिंगो फारच सज्जन तरुण आहे; त्याच्या मेहेर-बानीनें माझी व माझ्याबरोबरच्या इतर मंडळींची अचानक सुटका झाली. माझ्या रामाची कृपा म्हणून त्याला ही सुबुद्धि सुचली.”

चिमाजीअप्पा नाइकांकडे वळून समाधानपूर्वक उद्गारले, “ नाईक ! एकूण आपली शक्कलच अखेर उपयोगी पडलीशी वाटते. आपण त्या दोन पोर्तुगीज तरुणींना सन्मानपूर्वक वसईला पाठविलें व फ्रॅन्सिसला ओलीस धरलें, असें सेनापतीचें नाक दाबलें तेव्हां तोंड उघडलें. त्या दोन्ही मुली बऱ्याच सज्जन दिसतात एकूण.”

नाईक म्हणाले, “ त्या सज्जन असतील असें जरी मला म्हणवत नाहीं, तरी त्या धूर्त स्वार्थसाधु आहेत असें मात्र मी म्हणूं शकेन. त्यांतल्या मोठ्या मुलीचा फ्रॅन्सिस हा प्रियकर आहे व त्या दोघी चुलत बहिणी असून धाकटी तर सेना-पतीची कन्या आहे. तिचें डोमिंगोवर फार प्रेम आहे. तिला थोरल्या बहिणीची भीड पडली असेल व तिनें आपल्या प्रियकराला सांगून नारायणरावांची मुक्तता करविली असेल. ह्या मुक्ततेला खुद्द सेनापतींची मान्यता असेल असें मला नाहीं वाटत !” त्यांनीं नारो शंकरांकडे वळून विचारलें, “ नारायणराव ! खरें ना ? ”

“ होय. सेनापतीची माझ्या सुटकेला मान्यता नसावी असें मलादेखील वाटतें. तसें असतें तर डोमिंगोनें गुप्तपणें माझी मुक्तता करून मला अत्यंत गुप्त

वाटेनें वजीरगडापर्यंतच्या भुयारांतून बाहेर काढून दिलें नसतें. पण तुम्ही आतां म्हणालां त्या सेनापतीच्या मुलींचीं नांवें काय बरें ? बार्बारा व पोर्शिया का ? "

" होय." चिमाजीअप्पा म्हणाले.

" तर मग सरकारांचाच तर्क खरा असेल. पोर्शिया व डोमिंगो यांचें एक-मेकांवर फार प्रेम असून त्यांचें लग्न व्हावयाचें आहे, त्याप्रमाणेच बार्बारा व फ्रॅन्सिस यांचेंही लग्न ठरलें आहे असे मींदेखील ऐकलें आहे. पोर्शियानें बहिणी-साठीं डोमिंगोला भीड घातली असेल व त्यामुळें डोमिंगोनें मला सोडलें असेल, हें जास्त संभवनीय दिसतें."

" आणि बुवाजीची मोकळीकदेखील डोमिंगोनेच केली कीं काय ? " चिमाजीअप्पांनीं विचारलें.

" नाहीं ते मात्र शक्य दिसत नाहीं. तसें असतें तर आमची चौकशी करतांना बुवाजी पूर्वीच पळून गेला आहे असें आढळून येतांच बुवाजीच्या खोलीवर पहारा करणाऱ्या नोकराला त्याने हलगर्जीपणाबद्दल कैदेची शिक्षा सांगितली नसती."

" तो पहारेकरी कोण होता ? " नाइकांनीं विचारलें.

नारो शंकर उत्तरले, " तें कळण्याला कांहीं मार्ग नाहीं; पण एवढें मात्र मला कळलें की, धर्मशासन मंडळाच्या हुकुमावरून जे लोक ठिकठिकाणीं पोर्तुगीज तुरुंगांत हालअपेष्टा भोगीत कुजत पडले आहेत, त्यांपैकीं बहुतेकांना अलीकडे नोकरांच्या तुटवड्यामुळें शिपाईप्याद्यांचीं कामें सांगण्यांत येऊं लागलीं आहेत व मूळच्या शिपायांना कवाइती शिक्षण देऊन सैन्यांत सामील करून घेण्यांत येत आहे अशा कैद्यांपैकींच तो पहारेकरी असावा."

" फिरंग्यांचें हें वर्म ध्यानीं ठेवण्याजोगें आहे." नाइकांनीं नारायणरावांकडे वळून विचारले, " बरें; तुम्ही ज्या गुप्त वाटेनें आलां, ती वाट तुमच्या पूर्ण माहितीची आहे ? "

" हो ! मीं ती मुद्दाम नीट ध्यानीं ठेवली आहे. सहसा कोणाच्याही ध्यानीं येणार नाहीं अशी ती भुयारांतील पक्की बांधीव वाट आहे व ती एवढी रुंद व उंच आहे कीं, एक घोडेस्वार घोड्यासह त्या वाटेनें दौडत थेट किल्ल्यांत जाऊं शकेल. ह्या बांधीव भुयाराचें किल्ल्यांतील तोंड किल्ल्याच्या पूर्वेकडील तटाला असलेल्या बुरुजांत असून दुसरें तोंड हिरा-डोंगरीवरील तटाच्या आंतील विहिरींत

आहे.* विहीर इतकी खोल आहे कीं, कल्पनाच करवत नाहीं. शिवाय कोणालाही ह्या गुप्त वाटेचा मागमूस लागूं नये म्हणून विहिरीसभोंवार चिरेबंदी भिंत बांधून त्या भिंतीवर उगाच तीन-चार हातरहाट उभे केलेले आहेत. विहिरींतून वर यावयाला पक्की वाट बांधून काढलेली आहे. ती बरीच रुंद आहे; पण ती बाहेरून मुळींच दिसावयाची नाहीं."

"आणि किल्लेदाराच्या मुलानें तुम्हांला ही गुप्त वाट दाखवून दिली हें मोठेंच आश्चर्य!" नाईक म्हणाले.

चिमाजीअप्पा म्हणाले, "नारायणराव! तुमच्या सुटकेची आम्ही सारे डोळ्यांत तेल घालून वाटच पहात होतों; तेव्हां तुम्ही आलेले पाहून आम्हांला परम संतोष झाला; पण किल्लेदाराच्या मुलानें तुम्हांला सेनापतीच्या इच्छेविरुद्ध सोडून देण्याची इतकी तत्परता दाखविली, यावरून तो फारच शहाणा दिसतो."

नारो शंकर किंचित स्मित करून म्हणाले, "सरकार, डोमिंगोचा आपणाला परिचय नाहीं म्हणून असें वाटतें. तो खरोखरच फार सुज्ञ, सुस्वभावी, दूरदर्शी व फार सात्त्विक वृत्तीचा आहे. मी तर म्हणतों कीं, ती भांगेंत तुळस रुजलेली आहे."

"आपणाला पथ्यकर गोष्टी जे जे कळून किंवा न कळून करतील, त्यांना त्यांना आपण सुज्ञच म्हटलें पाहिजे. आतांच पाहिलेंत ना? धोंडशास्त्री व भय्याशास्त्री हे आपल्या दृष्टीनें द्रोही ठरले तरी फिरंग्यांपाशीं ते सुज्ञ, सुस्वभावी व दूरदर्शी म्हणूनच गाजलेले असणार!" नाईक म्हणाले.

---

* वसईच्या उत्तरेला निर्मळच्या वाटेवर वसईपासून दीड-दोन मैलांच्या अंतरावर एक लहानशी टेंकडी आहे. एथेंच पोर्तुगीज अंमलाच्या अखेरीनंतर पेशव्यांचा खजिना होता. पूर्वी ह्या टेंकडीवर किल्ल्यासारखा मजबूत तट होता. म्हणून त्याला गड असें नांव पडलें आहे. ह्या टेंकडीच्या उतरणीवर रुंद व फार खोल अशी विहीर आहे. यांतून वसईच्या किल्ल्यांत जाण्याला घोड्यावरून बसून जाण्याजोगें मोठें भुयार होतें असें तेथील लोक अजूनही सांगतात. वजीरगडावर पूर्वीच्या पडक्या इमारतींचे अवशेष अजून पहावयाला सांपडतात. ह्या टेंकडीवर हिऱ्यासारखे तेजस्वी दगड सांपडतात; म्हणून हिला हिरा-डोंगरी असेंही म्हणतात. वजीरगड हें नांव पेशवाई अंमलांत पडलें असावें. तेंच सध्यां रूढ आहे.

" नाईक ! ह्या राहू-केतूंची बरोबरी तुम्ही त्या महाभागाशीं करूं नका' तुमच्या बोलण्याचा रोंख मीं ओळखला. तुमच्या मतें डोमिंगोनें मूर्खपणा— निदान स्वजनांशीं विश्वासघात केला व तो आपल्या पथ्यावर पडला; तर तसें नाहीं. त्याच्या ठिकाणीं तुम्ही, मी किंवा प्रत्यक्ष सरकार असते तरी आम्हीं देखील तेंच केलें असतें. आतां, डोमिंगोला त्याच्या प्रियतमेची भीड पडली असेल हें खरें; पण केवळ त्या भिडेमुळें तो असा वागला असें मात्र खास नाहीं. आपणा मराठयांचें सामर्थ्य व भावना अचूक ओळखणारे सुज्ञ अधिकारी फिरंग्यांत सध्यां असतील तर ते किल्लेदार पेरीरा व त्याचा मुलगा डोमिंगो हे दोघे. त्यांतल्या त्यांत डोमिंगोला विशेष तारतम्य ज्ञान आहे व सहृदयताही आहे. सध्यांच्या परिस्थितींत मराठयांशीं तह करण्यांतच शहाणपणा आहे अशी डोमिंगोची खात्री होऊन चुकल्यामुळें पहिल्या दिवसापासून तो तशी खटपट करीत आहे. तो मूर्खही नाहीं किंवा आपला पक्षपातीही नाहीं; तो स्वजनांचा खराखुरा कैवारी व खराखुरा हितकर्ता आहे. मराठयांशीं तह न केल्यास फिरंग्यांचा सर्व नाश ठेवलेला आहे हें ओळखूनच तो तहाची खटपट करीत आहे व त्यानें माझी मुक्तता केली तीही केवळ तेवढयासाठींच.—सेनापतीच्या शिरजोरपणामुळें बिथरून जाऊन मराठयांनीं चिडून रक्तपाताला प्रवृत्त होऊं नये म्हणून त्यानें माझ्याबरोबर सरकारांना नम्रतापूर्वक निरोप पाठविला आहे कीं, 'आपण अजूनही सेनापतीची समजूत घालून त्याला तहाला अनुकूल करण्याचा प्रयत्न चालविला आहे व त्या प्रयत्नांत यश येईल अशी अजूनही आशा आहे. यासाठीं मराठयांनीं इतक्यांतच रक्तपाताला उद्युक्त होऊं नये ! हा डोमिंगोचा सद्भावनात्मक निरोप सरकारांच्या कानांवर घालण्यासाठींच मी प्रथम अर्नाळ्या-वर न जातां इकडे आलों."

" आम्ही इकडे आहों ही बातमी तुम्हांला बरी कळली ? " चिमाजीअप्पांनीं विचारलें.

" येथल्या भानगडीविषयीं वाटाघाटी किल्ल्यावर परवांपासूनच सुरू आहेत. प्रहरा प्रहराला इकडून तिकडे बातमीदार जाऊन बातम्या देत आहेत. असाच एक बातमीदार मला वजीरगडावरच भेटला. त्याला वाटलें कीं, मी किल्ल्या-वरचा हरकारू आहें; व मी निर्मळकडेच चालला आहें. त्यानें मला हटकलें, 'किल्ल्यावरून निर्मळकडे आल्काकोव्हा सैन्य घेऊन जावयाचा होता तो निघाल

का ?' मीं 'हो ! निघाला' असें खोटेंच उत्तर देऊन त्याच्याकडून खरी बातमी काढून घेतली. 'निर्मळला चिमाजीअप्पा पेशवे स्वतः चालून येत आहेत; इतर मराठे मंडळींनें किल्ल्याला वेढा देण्याचें काम जोमानें चालविलें आहे; अशा वेळीं चिमाजीअप्पांना निर्मळ येथें कोंडून कैद किंवा ठार करतां आलें तर मराठयांचा पुढील सर्व उद्योग अल्पायासांनीं लुला पडण्याचा संभव आहे' असें तो बातमीदार म्हणाला."

"एकूण आमच्या हालचालींची वित्तंबातमी इतक्या जलद आमच्या शत्रूंना मिळते म्हणावयाची !" चिमाजीअप्पा म्हणाले, "ठीक आहे, आपणही जास्त सावधगिरीनें वागलें पाहिजे."

"अर्थात् ! पहिली गोष्ट, आपण आजच्या आज आल्काकोव्हाशीं सामना देण्याची तयारी केली पाहिजे. त्याची व आपली लढत आज एवढ्या टापूंत खाशी जुंपणार यांत संशय नाहीं." नारो शंकर म्हणाले.

"आमची तयारी आहे." चिमाजीअप्पा गंगाजी नाईक व नारो शंकर ह्या उभयतांना म्हणाले, "तुम्ही आतांच्या आतां शत्रूच्या टेहळणीवर जा; व अर्नाळ्यावर एक जासूद पाठवून किल्लेदाराला आपलें तेथील सारें सैन्य सज्ज ठेवावयाला सांगा."

नाईक म्हणाले, "हें किल्ल्यावरचें जबाबदारीचें काम मला वाटतें, आमच्यापैकींच कोणीतरी केलें पाहिजे."

नारो शंकर म्हणाले, "तें काम मी करतों; नाइकांना ह्या भागांतील सर्व आडवाटा चोरवाटा व मारगिरीच्या जागा पूर्ण माहीत असल्यानें ते टेहळणीचें काम करतील."

"कबूल !" चिमाजीअप्पा म्हणाले.

"पण सरकार ! आपण पकडलेल्या पोर्तुगीज सैनिकांची काय व्यवस्था करावयाची ? मला वाटतें, त्यांना आपण निःशस्त्र केलेंच आहे; त्यांची सरसकट कत्तल करून टाकावी, कीं कायमची भगभग मिटली."

"छे छे !" चिमाजीअप्पा मानेनें नापसंती दर्शवून म्हणाले, "निःशस्त्र लोकांची निष्कारण कत्तल करणें ही माणुसकी नव्हे. त्यांना तुम्हीं नारायणरावाबरोबर थोडें सैन्य देऊन नीट बंदोबस्तानें कैद करून अर्नाळ्यावर पाठवून द्या. त्यांचीं शस्त्रें मात्र इथेंच असूं द्या. त्यांचा आम्ही योग्य उपयोग करून घेऊं."

याप्रमाणें चिमाजीअप्पा, गंगाजी नाईक व नारो शंकर यांचें आणखी कांहीं वेळ पुढील योजनेविषयीं संभाषण झाल्यावर लगेच ते दोघे आपापल्या कामगिरी-वर निघाले. फिरंगी शिपायांना नारो शंकर निःशस्त्र कैद करून नेऊं लागले, तेव्हां त्या शिपायांनीं आपण मराठ्यांच्या सैन्यांत नोकरी पत्करण्याला तयार असल्याचें सांगितलें; पण चिमाजीअप्पा तसल्या हुलकावणीला थोडेच बधतात! त्यांनीं उलट यदाकदाचित् इतक्यांतच आल्काकोव्हा किंवा आणखी कोणी फिरंगी सेनानी आपणाशीं सामना देण्यासाठीं पुढें आला तर कैदी फिरंगी शिपायांना दहशत असावी म्हणून नारायणरावांना मुद्दाम त्या शिपायांदेखत इषारा दिला, " नारायणराव ! मार्गानें जातांना ह्या कैद्यांपैकीं कोणी जर सुटून जाण्याची चुळबूळ करूं लागला तर एकदम त्याची गर्दन उडवा. सर्वजण नीट शिस्तीनें अर्नाळ्यावर तुमच्याबरोबर आले तर ठीक आहे, नाहींपेक्षां सर्वांची कत्तल करण्यालाही आमची तुम्हांला सदर परवानगी आहे. आणि किल्ल्यावर गेल्यावरदेखील किल्लेदाराला सक्त ताकीद देऊन ठेवा कीं, हे कैदी सोईनें वागेनासे झाले तर त्यांना अन्नपाणीदेखील देऊं नका. खुशाल तहानभुकेनें तडफडून मरूं देत."

  

नारो शंकर व गंगाजी नाईक आपापल्या कामगिरीवर निघून जाईतों तिसऱ्या प्रहराचा सुमार आला होता. आतां न्याय व्हावयाची अशी भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांची कैवारी ब्राह्मणमंडळी काय ती बाकी होती. ती मंडळी चिमाजीअप्पांना शरण येऊन क्षमा मागण्याची वाट पहात होती. भय्याशास्त्री व धोंडशास्त्री यांच्या कपाळीं देखील कैद आलेली पाहून त्या ब्राह्मण मंडळीची अगदीं पांचांवर धारण बसली होती. त्यांनीं अखेर रामानंदांना शरण जाऊन आपणांविषयीं चिमाजीअप्पांपाशीं आपला मोलाचा शब्द खर्च करण्याला विनंति केली. रामानंदांनीं दयाळु अंतःकरणानें ती विनंति मान्य करून चिमाजी-अप्पांपाशीं येऊन तशी भीड घातली, व चिमाजीअप्पांनींही विशेष आढेवेढे न घेतां त्यांच्या शब्दाला मान्यता दिली. मात्र आपल्या दराऱ्याची चुणुक त्या ब्राह्मण मंडळीला दाखविण्यासाठीं त्या प्रत्येक ब्राह्मणानें आपल्या अपराधाबद्दल प्रायश्चित्त म्हणून निर्मळ तळ्यांत स्नान करून शुचिर्भूतपणें आचार्यांच्या समाधीवर रुद्राभिषेक करावा अशी आज्ञा केली. सर्व ब्राह्मणांनीं तें आनंदानें मान्य केलें.

याप्रमाणें समाधि-मंदिरांत रुद्राभिषेक सुरू झाला. तोंच बरेच दिवस ताटातूट झालेल्या मायलेंकरांची भेट व्हावी, त्याप्रमाणें आपल्या हिंदुधर्ममाउलीला पुन्हा भेटून प्रसन्नचित्त झालेल्या हजारों पुनीत जनांचा घोळका आचार्यांच्या समाधीचें दर्शन घेण्यासाठीं रामानंदांच्या नेतृत्वाखालीं समाधि-मंदिरासमोर आला. रामानंदांनीं चिमाजीअप्पांना विचारलें, "सरकार ! ह्या सर्व लोकांना विधिपूर्वक शुद्ध करून हिंदुधर्मांत घेण्यांत आलें आहे. आतां यांना आचार्यांच्या समाधीचें दर्शन घेण्याला कांहींच प्रत्यवाय नसावा, असें मला वाटतें."

"हें विचारावयालाच नको; आपल्या धर्मगुरूंच्या समाधीचें दर्शन घेण्याला त्यांना प्रत्यवाय कसला ?" चिमाजीअप्पा म्हणाले. लगेच त्यांनीं समाधि-मंदिरांत रुद्राभिषेक करण्यांत गढून गेलेल्या ब्राह्मणांना विचारलें, तेव्हां त्यांनींही आनंदानें संमति दिली. सर्व शुद्धिकृतांनीं मंदिरांत जाऊन समाधीचें दर्शन घेतलें. सिद्धेश्वरशास्त्र्यांनीं सर्वांना तीर्थ वांटलें. थोड्या वेळापूर्वी जी ब्राह्मण-मंडळी शुद्धीकरणाला कसून विरोध करीत होती, तीच मंडळी शुद्धिकृतांच्या शुद्धीला मान्यता देण्याइतकी विचारी बनलेली पाहून सर्वांनाच सानंदाश्चर्य वाटलें. हा सारा चिमाजीअप्पांच्या कर्तव्यतत्परतेचा प्रभाव होय हें सर्वजण जाणत होते. त्याबद्दल सर्वांनीं कृतज्ञताबुद्धीनें चिमाजीअप्पांना धन्यवादपूर्वक प्रणिपात केला.

त्या सर्व मंडळीला समाधीसमोरच्या पटांगणांत जमवून चिमाजीअप्पा त्यांना म्हणाले, "ईशकृपेनें तुम्ही सर्व पावन होऊन आपल्या हिंदुधर्मांत पुन्हा प्रविष्ट झालां, याबद्दल आम्हांला परम संतोष होत आहे; पण ह्या संतोषाच्या वेळीं तुम्हांला तुमच्यावरील जबाबदारीची जाणीव करून देणें आम्हांला प्राप्त आहे. सध्यां फिरंग्यांनीं आपल्या परमप्रिय हिंदुधर्मावर ओढवून आणलेल्या संकटाची तुम्हां सर्वांना पूर्ण जाणीव आहेच. अर्थात् ह्या धर्मसंग्रामांत तुम्हीं सर्वांनीं हिंदुधर्मसंरक्षणासाठीं जीवाची पर्वा न बाळगितां उडी घातली पाहिजे. प्रसंग पडला तर धर्मासाठीं मरावयाला तुम्हीं कंबरा कसून तयार झालें पाहिजे."

लगेच त्या जनसंमर्दांतून एकदम गगनभेदी गर्जना उसळली, "आम्ही सरकारांच्या आज्ञेप्रमाणें रणकंकण हातीं बांधून आमच्या जीवनसर्वस्वाच्या कुरवंड्या करून धर्मरक्षणासाठीं फिरंग्यांशीं झगडावयाला तयार आहों."

"माघार हा शब्द तुमच्या गांवीं असतां कामा उपयोगी नाहीं. जी गत आमची ती गत तुमची !" चिमाजीअप्पा पुन्हा मोठ्यानें सर्वांना उद्देशून उद्गारले.

त्या उद्गारांना पुन्हा जनसंमर्दांतून मेघगर्जनेसारखी गर्जना होऊन उत्तर मिळालें, " माघार हा शब्दच आमच्या गांवीं नाहीं. ह्या धर्मसंग्रामाच्या अंतीं पराजित असा एकही जीव सरकारांना पहावयाला सांपडणार नाहीं. त्याप्रमाणेंच आमच्यांतला शेवटचा एक माणूस उभा असे पावेतों सरकारांच्या केंसालाही धक्का लागूं देणार नाहीं."

" एवढा निश्चय सर्वांचा असल्यावर आपण ह्या धर्मसंग्रामांत सर्वत्र विजयी होऊं याविषयीं आम्हांला मुळींच शंका नाहीं." चिमाजीअप्पा जवळच फिरंगी शिपायांच्या शस्त्रांची रास होती तिकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाले. " ज्यांना लढण्याचा चांगला सराव असेल त्यांनीं त्या राशीतील एकेक शस्त्र घेऊन शत्रूशीं तोंड द्यावयाला प्रथम तयार व्हावें. बाकीच्यांनीं आपल्या घरीं जाऊन शस्त्रे घेऊन ताबडतोब गांवांत जमा व्हावें. उशीर नको; शत्रु आपणावर चालून येत आहे."

चिमाजीअप्पांच्या आज्ञेप्रमाणें सुमारें शंभर निवडक मराठे वीर पुढें आले व तीं शस्त्रें घेऊन सज्ज होऊन चिमाजीअप्पांच्या पुढील आज्ञेची वाट पहात त्यांच्यासभोंवार उभे राहिले. ज्यांना तीं शस्त्रे मिळालीं नाहींत ते समरांगणांत उतरण्याची तयारी करून येण्यासाठीं आपापल्या घरांकडे निघाले. त्या जनसमूहांत अनेक स्त्रिया व मुलेंही होतीं. त्यांनीं देखील शत्रूशीं लढण्याची आपली पूर्ण तयारी दाखवितांच सर्वांना पराकाष्ठेचें कौतुक वाटलें.

आणखी थोडा वेळ गेला नाहीं, तोंच गंगाजी नाइकांकडून एक हरकारू आला. त्यानें फिरंगी सेनानी आल्काकोव्हा हा मोठया सैन्यासह निर्मळवर चालून येत असून तो चुळण्याच्या पुढें आला आहे अशी बातमी आणली. त्याबरोबर चिमाजीअप्पांनीं रणशिंग फुंकून आपल्या सर्व नव्या-जुन्या सैनिकांना एकत्र जमवून शत्रूशीं सामना देण्याची जय्यत तयारी केली. ती तयारी सुरू असतांच एक शिपायी एक घायाळ कबुतर व एक चिठ्ठी घेऊन चिमाजीअप्पांपाशीं आला व म्हणाला, " सरकार ! मी पलीकडे वृक्षाखालीं विश्रांति घेत बसलों होतों, तों आकाशांत खबुतर भराऱ्या मारीत चाललें आहे व एक बहिरी ससाणा त्याच्यामागें लागला आहे असा देखावा मला पहावयाला मिळाला. मीं सहज मौजेनें एक तीर सोडला. बहिरीससाण्यानें त्या कबुतराला धरावयाला व माझा तीर त्याच्या वर्मीं झोंबावयाला एक गांठ पडून बहिरीससाणा त्या कबुतरासह मरून खालीं पडला. मी तीर आणण्यासाठीं पुढें गेलों, तों त्या कबुत-

राच्या पायाला ही चिठ्ठी बांधलेली मला सांपडली. ती उघडून पाहिली, तों ती फिरंगी भाषेंत लिहिली आहे असें मला आढळून आलें. आपण तिचा योग्य तो तपास करावा.”

चिमाजीअप्पांनीं तेथल्या लोकांत पोर्तुगीज भाषा व लिपी ज्याला अवगत आहे असा एक मनुष्य हुडकून काढला व त्याच्याकडून ती चिठ्ठी वाचून घेतली. त्या चिठ्ठींतील मजकूर असा होता—“ बाजीराव पेशवे निघून गेले... चिमाजी पेशवा निर्मळकडे गेला आहे...मंडपेश्वरावर मराठ्यांचा घाला पडला... वसईसभोंवार वेढा जारीनें सुरू आहे...रॉबर्टसन फितूर झाला...माझी कामगिरी यशस्वी होत आहे.”

चिठ्ठींतील हा मजकूर वाचून चिमाजीअप्पा बुचकळ्यांत पडले कीं, ही चिठ्ठी कोणीं लिहिली असावी ? हें कारस्थान कोणाचें असावें ?

## प्रकरण तेरावें

# 'भांगेंत तुळस'

सेनापति सिल्व्हेराचें तांतडीचें बोलावणें आल्यामुळें डोमिंगो उजाडतें न उजाडतें अशा वेळीं सेनापतीच्या वाड्याच्या प्रवेशद्वारापाशीं येऊन पोंचला, तोंच वाड्याच्या मागच्या बाजूनें एक दासी लगबगीनें तेथें आली व त्याला म्हणाली, " सरदारसाहेब ! तुम्हांला पोर्शियाबाईसाहेबांनीं तांतडीनें भेटून जावयाला सांगितलें आहे, त्या तुमची वाट पहात आहेत."

" पोर्शियाला म्हणावें, मी सेनापतिसाहेबांना भेटून मग तुझ्याकडे येतों. सेनापतिसाहेबांचें मला निकडीचें बोलावणें आहे." डोमिंगो उत्तरला.

" पण सेनापतिसाहेबांची व तुमची भेट होण्यापूर्वीच पोर्शियाबाईसाहेबांना तुमची भेट घ्यावयाची आहे." दासी म्हणाली, " आणि सेनापतिसाहेबही अजून झोंपून उठले नाहींत."

" कां बरें ? नेहमीं तर ते मोठ्या पहांटेलाच उठतात !"

" होय; पण रात्रौ जवळ जवळ सारी रात्र त्यांचीं खलबतें चाललीं होतीं."

" खलबतें ? आणि तीं कोणाशीं ? "

" सरदार ॲन्टोनिओ काल रात्रौ सेनापतिसाहेबांच्या भेटीला आले; त्यांच्याशीं सेनापतिसाहेबांचीं खलबतें चाललीं होतीं."

ॲन्टोनिओचें नांव ऐकतांच डोमिंगो क्षणभर बुचकळ्यांत पडला, कीं ॲन्टोनिओ इकडे कसा आला ? डोमिंगोला असा प्रश्न पडण्याचें कारण ॲन्टोनिओ आपल्या परिवारासह मंडपेश्वराहून वसईकडे येतांना मराठ्यांच्या हातीं कैद होऊन अर्नाळ्यावर डांबला गेल्याचें त्याला माहीत होतें. निर्मळच्या संग्रामाचा शेवट होऊन आज एक आठवडा लोटला होता. आल्काकोव्हा मोठया आवेशानें व ईर्षेनें निर्मळवर चालून गेला, तो एकसारखा चार दिवस मराठयांशीं लढला; पण अखेरच्या हल्ल्यांत तो ठार मारला जाऊन त्या संग्रामाचा शेवट मराठयांना हितकर असाच झाला होता. बरें; वसईच्या किल्ल्यासभोंवार बारा तेरा दिवसांपूर्वीच मानाजी आंग्रे, शंकराजी नारायण फडके वगैरे मंडळीनें पक्का वेढा देण्याचा उद्योग आरंभिला होता. तें वेढ्याचें कार्यही इतक्या दिवसांत बरेंच

दुर्भेद्य असें झालें होतें. त्यापूर्वीच मराठ्यांनीं अन्न, भाजीपाला वगैरे किल्ल्यांतील लोकांना मिळूं नये म्हणून जी खटपट चालविली होती, तीही आतां चांगलीच नेटाला लागून किल्ल्यांतील लोकांना उपासमार बरीच जाणवूं लागली होती. मंडपेश्वरचा संग्रामही मिटण्याऐवजी दिवसेंदिवस जास्तच भडकत चालला होता व त्याप्रमाणेंच इतर ठिकाणींही मराठ्यांनीं चांगलाच धुमाकूळ मांडला होता. मंडपेश्वराकडेही बुबाजी नाईक, विठ्ठल शिवदेव, भैरव, दुल्लभजी व रॉबर्टसन यांनीं आपल्या मर्दुमकीची शिकस्त चालविली होती.

माणसाचा पडता काळ आला कीं, त्यानें हातीं सोनें धरलें तरी त्याची माती होते असें म्हणतात; त्याप्रमाणें पोर्तुगीजांचा सर्व बाजूंनीं पडता काळ आल्यानें मराठ्यांच्या निकराच्या चढावाविरुद्ध त्यांचा कांहींच उपाय चालेनासा झाला होता. प्रांतांतल्या प्रांतांत तर त्यांची मराठ्यांनीं खाशी गळेचेंपी केली होतीच; पण बाहेरही हरएक बाबतींत त्यांना मराठ्यांची मर्दुमकी जाणवूं लागली होती. सेनापति सिल्व्हेराचें मुंबईहून आलेलें जहाज लुटून मराठ्यांनीं पोर्तुगीजांना कसा खासा हात दाखविला हें वाचकांना पूर्वीं विदित झालें आहेच. तसाच दुसरा प्रयत्न सेनापतीनें अत्यंत सावधपणे केला तो तर पहिल्याहूनही जास्त विस्मयजनक रीतीनें त्याच्या गळ्यांत आला. सर्व समुद्रांत मराठ्यांचा अनिरुद्ध संचार सुरू आहे असें पाहून सेनापति कोणालाही दाद न देतां अत्यंत गुप्त रीतीनें एका जहाजांत बसून दहा बारा दिवसांपूर्वीच मुंबईकडे गेला, तों त्याच्या मागोमाग अंताजीपंत कावळेही मुंबई बेटावर त्याला नकळत तयार ! या वेळींही सेनापतीनें सोन्याचांदीचे अनेक अलकार इंग्रजांकडे तारण ठेवून त्या तारणावर लढाईच्या उपयोगाचें सामान आणण्यासाठीं आपल्याबरोबर घेतले होते. तो सौदा पटून सामानाचें जहाज भरून मुंबईहून रवाना झालें, व त्याच्या मागोमाग अंताजी रघुनाथही चालूं लागला. धारावीच्या अंदाजें सेनापतीचें जहाज येईतों अंताजीपंतानें कांहींच हालचाल केली नाहीं. पण त्या अंदाजें अचानक मराठ्यांच्या दोन आरमारी जहाजांनीं त्या जहाजाला कोंडलें व पाडाव केलें. सेनापतीला एका लहानग्या होडींतून पळ काढून जीव बचावतां बचावतां पुरे वाट झाली. त्याच दिवशीं निर्मळचा संग्राम आटोपून मराठ्यांना विजयश्रीनें वरिलें होतें; त्यामुळें चिमाजीअप्पांच्या संमतीनें अंताजीपंत इंग्रजांचा हा घरभेदेपणा बंद करण्यासाठीं नारो शंकराला बरोबर घेऊन पुन्हा मुंबईला रवाना झाले. इंग्रज

आधींच मराठयांना भिऊन वागत होते, तशांत निर्मळच्या लढयांतही मराठेच विजयी झाले व सेनापतीचें जहाजही त्यांनीं लुटून सेनापतीला पळतां भुई थोडी केली, हें पाहून अत:पर पोर्तुगीजांना साह्य करण्यांत अर्थ नाहीं हें ओळखून मुंबईकर इंग्रजांनीं यापुढें पोर्तुगीजांना साह्य करणार नाहीं असें अंताजीपंतापाशीं चिमाजी-अप्पांना अभिवचन दिलें व उभयपक्षीं दिलजमाईची भाषा करण्यासाठीं आपला वकील कॅप्टन इंचबर्ड ह्या लौकरच चिमाजीअप्पांना येऊन भेटेल असेंही जाहीर केलें.

याप्रमाणे इंग्रजांकडून पोर्तुगीजांना साह्य होण्याचा मार्ग अजिबात बंद झाला; अंताजीपंत आणि नारो शंकर यांच्याऐवजीं दुसरे कोणी त्या कामगिरीवर गेले असते तरीही तेंच झालें असतें. पण नारो शंकर त्या कामगिरीवर गेला होता, ह्या एकाच निमित्तानें सेनापति सिल्व्हेरा व आणखी बरेचसे पोर्तुगीज अंमलदार यांनीं त्या अपयशाचें खापर डोमिंगोच्या माथीं मारण्याला कमी केलें नाहीं. डोमिंगोनें नारो शंकराला निर्दोषी ठरवून जिवंत सोडलें म्हणून इंग्रजांकडून मदत मिळण्याचा मार्ग बंद झाला व सेनापतीचें जहाज नारो शंकरानेंच पाळत राखून लुटविलें; त्याप्रमाणेंच नारो शंकर निर्मळच्या लढ्यांत विजयी होऊन मंडपेश्वराकडे स्वकीयांचें साह्य करण्यासाठीं गेला होता, त्यानेंच मंडपेश्वरचा संग्राम इतका नांवारूपाला आणून तिकडेही पोर्तुगीजांचा कोंडमारा केला; ह्या दोन्ही बाबींचा बादरायणसंबंध डोमिंगोकडे जोडून इतर पोर्तुगीज सरदार व सेनानी त्या अपवादाच्या वाहत्या गंगेत आपले अपयशानें काळे झालेले हात धुऊन मोकळे होऊं पहात होते. अशा खलबुद्धीच्या व बालिश विचारांच्या लोकांत डोमिंगो पूर्वीच्या स्वानुभवानें ॲन्टोनिओची गणना करीत होता. ॲन्टोनिओ मराठ्यांच्या कैदेंत पडल्यानें डोमिंगोला आनंद झाला होता असें जरी नाहीं, तरी त्याच्या कर्माप्रमाणें फळ त्याला मिळालें असा मात्र डोमिंगोचा ठाम ग्रह होता. ॲन्टोनिओ कोणत्या प्रकारचा माणूस होता हें वाचकांना पूर्वींच माहीत झालें आहे. चिमाजीअप्पा पेशवे काय किंवा मराठ्यांकडील दुसरा कोणीही खासा सज्जन काय कितीही कनवाळु झाला तरी मनुष्यजातीला लांछनभूत असणाऱ्या अशा माणसाला दया दाखविण्याइतकी दयेची अन्याय्य खैरात करण्यासाठीं वारेमाफ दया त्यांच्या अंत:करणांत असणार नाहीं अशी डोमिंगोची प्रामाणिक समज़ूत होती. ॲन्टोनिओची अर्नाळ्याच्या किल्ल्यावर बंधमुक्तता होणें संभवनीयच नव्हतें. बरें; त्याची मुक्तता झाली हेंही तितकेंच खरें होतें.

मग असें कसें झालें ? दावेदारीच्या बाबतींत सर्पावरही ताण करणारा तो खलपुरुष अर्नाळ्यावरून कैदेंतून मोकळा कसा सुटला ? तें आपणांला ओघा-ओघानें पुढें कळेलच. तूर्त त्या बाबतींत एवढेंच सांगणें पुरेसें आहे कीं, अॅन्टो-निओच्या सुटकेची वार्ता डोमिंगोच्या कानीं आली, ती त्याला कांहीं सुवार्ताशी वाटली नाहीं. अॅन्टोनिओ डोमिंगोच्या वाइटावर होता निदान नारो शंकराच्या मुक्ततेपासून तरी तो डोमिंगोचा विरोधक बनला होता, म्हणून डोमिंगोला त्याची अर्नाळ्यावरून मुक्तता झालेली ऐकून विषाद वाटणें स्वाभाविक होतें. पण खरा प्रकार मात्र तसा नव्हता. डोमिंगो हा केवळ सामान्य प्रतीचा मनुष्य नव्हता. तो धर्मानें ख्रिस्ती पोर्तुगीज होता ही गोष्ट वाचकांस विसरतां येणें शक्य नाहीं, म्हणूनच एथें एवढें निक्षून सांगणें अवश्य आहे कीं, डोमिंगो हा खराखुरा ख्रिस्ती-महात्मा येशु ख्रिस्ताचा खराखुरा श्रद्धाळु अनुयायी असून त्याला आपल्या धर्माचा उत्कट अभिमान वाटत होता. म्हणूनच परधर्मीयांचा छळ, परवित्तापहरण वगैरे त्याच्या जातभाईंनीं चालविलेले अमानुष प्रकार त्याला पूर्ण अधार्मिक अतएव राक्षसी वाटत होते. अगदीं थोडक्यांत सांगावयाचें तर भांगेच्या बनांत तुळस निपजावी त्याप्रमाणें तत्कालीन ख्रिस्तधर्मावलंबी पोर्तुगीज जातींत डोमिंगो निपजला होता; दुर्गंधमय खातेऱ्यांत सुवासिक कमलपुष्पाचा जन्म व्हावा त्याप्रमाणें त्याची अवस्था होती. हिरण्यकश्यपूच्या पोटीं परमभक्त प्रल्हादाचा जन्म व्हावा त्या-प्रमाणें पेरीराच्या पोटीं डोमिंगोचा जन्म झाला होता; व ईश्वरविषयक भावनांच्या बाबतींत हिरण्यकश्यपू आणि प्रल्हाद यांच्यांत जितका विरोध होता तितकाच पेरीरा आणि डोमिंगो ह्या पितापुत्रांच्या देवधर्मविषयक भावनांत विरोध होता. मात्र हिरण्यकश्यपूनें प्रल्हादाला त्याच्या नारायण निष्ठेबद्दल जितकें छळलें तितकें पेरीरानें डोमिंगोला कधीं छळलें नाहीं हें जरी खरें, तरी पेरीराला डोमिंगोच्या सद्धर्मभावना अप्रिय होत्या हेंही कांहीं खोटें नाहीं. आतां, तो पोटजाळच पडला म्हणून पेरीरानें त्याला त्याच्या सद्धर्मभावनांबद्दल कठोर शासन मात्र कधीं केलें नाहीं. हाच डोमिंगो जर पेरीराच्या हाताखालील अन्य एखाद्या अधिकाऱ्याचा पुत्र असता, तर शिवाजीच्या जन्मदात्या शहाजीला विजापूरच्या बादशहापासून शिवाजीच्या जाज्वल्य स्वाभिमानाबद्दल जितका त्रास झाला त्याच्या सहस्त्र पटींनीं त्रास डोमिंगोच्या पित्याला झाला असता.

असें होतें तरी जितकें डोमिंगो व पेरीरा यांच्यांत अंतर होतें, तितकेंच

पेरीरा व सेनापति सिल्व्हेरा यांच्यांत अंतर होतें. धर्माधर्माच्या बाबतींत स्वतंत्रपणें विचार करण्याइतकी पेरीराची पात्रता नव्हती; पण माणुसकी त्याच्या अंगीं नव्हती असें मात्र नाहीं. अष्टौप्रहर अधःपाताच्या गर्तेत डुंबणाऱ्या ख्रिस्ती धर्मगुरूंनीं शेंकडों वर्षांपासून हिंदुस्थानांतील रयतेवर अमानुषपणें चालविलेला जुलूम पेरीराला व्यक्तिशः मान्य नसला तरी राज्यकारभारांत असलेल्या धर्मगुरूंच्या पाशवी प्राबल्यासमोर मान वांकविण्याशिवाय त्याला गत्यंतर नव्हतें. त्याबद्दल पेरीराला फारसा खेद होत असे असेंही नाहीं; शेणांतील किड्यांना शेणांतच डुंबणें गोड वाटतें, त्याप्रमाणें पेरीराची अवस्था होती. पण सेनापति सिल्व्हेराची गोष्ट निराळी होती. तत्कालीन पोर्तुगीज सरकाराचा जितका पेरीरावर विश्वास होता त्याहीपेक्षां जास्त विश्वास सिल्व्हेरावर होता व म्हणूनच पेरीरासारखा कर्तबगार, कैक वर्षें वसईला किल्लेदार असतांना पोर्तुगीज सरकारनें मुख्य सेनापति त्यास न नेमतां मुद्दाम सिल्व्हेराला सेनापति नेमिलें होतें. आणि ही बढती कशाबद्दल मिळाली होती! त्याच्या अंगच्या शाश्वत चांगुलपणाबद्दल नव्हे, तर पोर्तुगीज अधिकारी व धर्मगुरु यांनीं हिंदुस्थानांतील जित प्रांतांत आपल्या अनर्थावह राजसत्तेचा जो नरकाचा दरबार भरविला होता, त्या दरबारांत सिल्व्हेरा पहिल्या प्रतीचा मानकरी शोभणारा होता म्हणून!

पण प्रेमाचा व प्रणयाचा कायदा राज्यकारभाराच्या सामान्य कायद्यांहून अगदीं भिन्न असतो. त्यामुळेंच डोमिंगोला जरी पोर्तुगीज राज्यांत पुढें येण्याला फारसा वाव नव्हता, तरी तो पोर्शियाच्या प्रेमाला पात्र ठरण्याला त्यामुळें मुळींच अडथळा उत्पन्न झाला नाहीं. सिल्व्हेरालाही डोमिंगोच्या स्वभावांतील व मतांतील भिन्नता पूर्वी माहीत नसल्यानें त्यानेंही त्या युवयुवतींना यौवनसुलभ प्रणयपाटव विणण्याच्या कार्यांत मुळींच अडथळा केला नाहीं. सिल्व्हेराचीच गोष्ट कशाला? त्याच्या जागीं दुसरा कोणी तशाच योग्यतेचा माणूस असता, त्याला पोर्शियासारखी उपवर कन्या असती व डोमिंगोसारख्या उमद्या तरुणावर ती प्रेम करूं लागली असती, तर त्यानेंही तिला प्रतिबंध केला नसता. डोमिंगो वृत्तीनें खराखुरा सज्जन, हाडापेरानें मजबूत, स्वभावानें प्रेमळ व दिलदार, रूपानें सुंदर व वयानेंही पोर्शियाला अनुरूप असा वर होता. त्याला प्रतिस्पर्धी अनेक असले तरी चहातेही कांहीं कमी नव्हते. इतकेंच काय पण कोणाही पोर्तुगीज अधिकाऱ्याला खुद्द सेनापति सिल्व्हेरालाही सत्तेच्या व तरवारीच्या जोरावर जितकी

माणसें वश होतीं, त्यापेक्षांही जास्त माणसें डोमिंगोनें प्रेमानें वश करून घेतलीं होतीं. धूर्त सिल्व्हेराला हें कळत नव्हतें असें नाहीं. म्हणूनच ह्या सर्व गोष्टींचा विचार करून त्यानें पोर्शिया व डोमिंगो यांचा स्नेहसंबंध जुळूं दिला व त्यांच्या स्नेहाचें रूपांतर विवाहांत होणार आहे हें जरी त्याला खुद्द डोमिंगो व पोर्शिया यांच्या तोंडून कळले नव्हतें, तरी तो तें ओळखून होता. आपल्या वडीलपणाचा मान राखण्यासाठीं तो मुद्दामच ह्या बाबतींत कधीं कोणापाशीं चौकशी करीत नसे. त्याला पोर्शिया व डोमिंगो यांचा प्रेमसंबंध मान्य असूनही तो अजून उघडपणें तसें बोलूं लागला नव्हता; याचें कारण प्रथम डोमिंगोला चांगल्या मान्यतेला चढावावयाचें व मग त्याला आपली मुलगी द्यावयाची असा त्यांचा मानस होता. वसईच्या वेढ्यांत आपण विजयी होऊं अशी सिल्व्हेराची खात्री होती. ही मोहीम आटोपतांच आपण नोकरीचा राजीनामा द्यावयाचा असा त्याचा मानस होता. गोंवें प्रांतीं त्याची खासगी संपदा अपार होती, व एकुलती एक पोर्शिया त्या सर्व इस्टेटीची धनीण व्हावयाची होती. पेरीरा-देखील वृद्ध झाल्यामुळें वसईच्या मोहिमेनंतर तोही राजीनामा देणार होता. आपल्या पश्चात् आपल्या पुत्राला वसईची किल्लेदारी मिळावी अशी पेरीराची इच्छा होती, व सिल्व्हेरानें डोमिंगोला आपला भावी जांवई म्हणून मान्य केलें आहे असें पाहून पेरीरानें सिल्व्हेराच्या वशिल्यानें आपली नोकरी आपल्या पश्चात् डोमिंगोला मिळावी अशाविषयीं प्रयत्नही चालविला होता. पण सिल्व्हे-रानें पेरीराला आणखी थोडे दिवस धीर धरावयाला सांगितले होतें. शक्य तों डोमिंगोला आपल्या पश्चात् एकदम आपली सेनापतीची जागा मिळावी अशी सिल्व्हेराची इच्छा असून त्या दिशेनें त्याची खटपट सुरूच होती. सिल्व्हेरानें आपल्या मतें हे बेत अगदीं गुप्त राखले होते, तरी तो आपल्या एकुलत्या एका प्रियतम कन्येपासून कांहींच गुप्त राखूं शकत नसे. पोर्शियाला हें माहीत होतें. इतर लोकांनाही अंदाजानें ह्या सर्व गोष्टी ओळखतां येत होत्या. त्यामुळें डोमिंगोवर प्रेम करणाऱ्या अनेकांना जरी आनंद वाटत होता, तरी 'गांव तेथें म्हारवडा' या न्यायानें डोमिंगोचा द्वेष करणारे व त्याच्या भाग्योदयाविषयीं विषाद मानणारे कांहीं दुरात्मेही त्याच्यासभोंवार होते, हें पूर्वीच सांगण्यांत आलें आहे. त्या दुरात्म्यांशिवाय आणखी एक परमसामर्थ्यवान् व परमपापी अशी व्यक्ति कामुकतेच्या दुर्दमनीय पापी वासनेला बळी पडून

आपणाबरोबरच डोमिंगोलाही अधःपाताच्या गर्तेत ओढण्याचा प्रयत्न करीत होती. ती व्यक्ति डोमिंगोच्या इतर प्रतिस्पर्ध्यांहून अगदीं निराळ्या वृत्तीची होती, त्या व्यक्तीला डोमिंगोचा उत्कर्ष सहन होत नव्हता अशांतली गोष्ट नसून उलट ती डोमिंगोच्या उत्कर्षाला डोळ्यांत तेल घालून जपणारी होती. पण त्या व्यक्तीला पोर्शियाविषयीं सवतीमत्सर वाटत असल्यानें डोमिंगो पोर्शियावर प्रेम करी ह्या एकाच कारणामुळें ती डोमिंगोच्या सर्वनाशाला कारण होणारी होती. बाकी, तिचा खरा दांत पोर्शियावर होता. कारण पोर्शियाच्या प्रेमपाशांत डोमिंगो जखडला गेल्यामुळे तो त्या व्यक्तीकडे पापी वासनेने ढुंकूनही बघण्याला तयार नव्हता. त्या व्यक्तीचा परिचय पुढें होईलच.

याप्रमाणे डोमिंगोला प्रारंभीं सर्व बाजूंनीं परिस्थिति अनुकूल होती; सेनापती-सारख्या सर्वश्रेष्ठ माणसाचा पाठिंबा असल्यानें त्याला विरोधकांच्या विरोधांची पर्वा करण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण अलीकडे दहाबारा दिवसांत त्याचे ग्रह उलटले होते. नारो शंकराला त्यानें निर्दोषी ठरवून सोडून दिलें, त्या क्षणापासून त्याच्या नशिबानें उलट खाण्याला प्रारंभ केला होता; व अवघ्या बारा तेरा दिवसांत त्याच्यासभोंवारचें वातावरण त्याला इतकें प्रतिकूल झालें होतें कीं, त्यांतून आपणाला वर डोकें काढतां येईल किंवा नाहीं याविषयीं देखील त्याला शंका वाटूं लागली होती. सेनापति सिल्व्हेराला डोमिंगोविषयीं आतां तिरस्कार वाटूं लागला होता. सिल्व्हेरा मुंबईच्या सफरीवरून अपयश पदरीं घेऊन परत आला त्याच दिवशीं त्याच्या मनांत डोमिंगोनें नारो शंकराची सुटका केल्याबद्दल डोमिंगो-विषयीं तेढ उत्पन्न झाली होती; व पुढें निर्मळ एथें पोर्तुगीजांचा पराभव होऊन आल्काकोव्हाची वाट लागली, मंडपेश्वराचा लढा जोरांत सुरू असून त्यांत पोर्तुगीजांना यश येण्याची आशा दिसेना, अन्यत्रही ठायीं ठायीं मराठे विजयी होत होतेच, हा सर्व डोमिंगोनें नारो शंकराला जिवंत सोडल्याचा परिणाम होय असें तर्कटी वेड सिल्व्हेराच्या मनानें पक्के घेतलें होतें. केवळ डोमिंगोबद्दलच सिल्व्हेराला असा संशय आला होता असें नाहीं, पेरीरा हा त्याचा जन्मदाता असल्यानें पेरीराच्या संमतीनें डोमिंगोनें हा अपराध केला असावा असें सिल्व्हे-रानें गृहित धरून त्याबद्दल पेरीरालाही हरएक बाबतींत तरवारीच्या धारेवर धरण्याला सुरुवात केली होती. वस्तुतः पेरीराचा त्या गोष्टीशीं कांहींच संबंध नव्हता. डोमिंगो आपल्या सदसद्विवेकबुद्धीवर विसंबून ज्या कांहीं गोष्टी करी,

त्यांतलीच नारो शंकराची मुक्तता ही एक गोष्ट होती. पेरीराला तो प्रकार कळला तेव्हां त्यानें डोमिंगोचा त्याविषयीं तीव्र निषेधही केला होता. इतकेंच काय; पण 'सेनापतीनें ह्या अपराधाबद्दल तुला कठोर शासन करण्याचें योजिलें तर मला त्यांत आनंदच होईल. केवळ माझा पोटजाळ म्हणून मी पुत्रप्रेमाच्या मोहाला बळी पडून तुला शासन करूं शकत नाहीं. पण आजपासून तूं मला मेलास व मी तुला मेलों' असेंही पेरीरानें डोमिंगोला निक्षून सांगून टाकलें होतें. सिल्व्हेरा इतका कडक शिस्तीचा भोक्ता, इतका साम्राज्याभिमानी, स्वधर्माभिमानी व इतका हिंदूंचा द्वेष्टा होता कीं, त्या भरांत त्यानें त्याच दिवशीं डोमिंगोला हद्दपार तरी करावयाचें किंवा कैदेंत तरी लोटावयाचें आणि डोमिंगो अपराधी म्हणूनच त्याच्या वांट्याला इतकी सौम्य शिक्षा यावयाची. डोमिंगोच्या ठायीं दुसरा कोणी अपराधी असता तर त्याला देहान्त शासन करण्यालाही सिल्व्हेरा मागें पाहाणारा नव्हता; पण केवळ पोर्शियाकडे पाहून सिल्व्हेरा डोमिंगोच्या बाबतींत शक्य तोंवर मूग गिळून स्वस्थ बसत होता; व शिवाय आपण तोंडानें ज्या डोमिंगोला आपल्या पश्चात् सेनापतीची जागा मिळण्यासाठीं जारीची खटपट चालविली आहे, त्याच डोमिंगोला आपण अपराधी ठरविल्यानें गोव्याचा गव्हर्नर आपणाला काय म्हणेल, हा स्वतःच्या इभ्रतीचा अवघड प्रश्नही सिल्व्हेरासमोर होता. पैकीं अपत्यवात्सल्य सिल्व्हेरानें त्या प्रसंगीं गुंडाळून ठेविलें असतें. तो शिस्तीची इतका भोक्ता, स्वधर्माचा इतका अभिमानी व स्वतःच्या इभ्रतीला इतका जपणारा होता कीं, प्रत्यक्ष पोटचें अपत्य आपल्या इभ्रतीच्या आड येतें असें आढळतांच त्यालाही कापून काढण्याला त्यानें कमी केलें नसतें. पण तीच इभ्रत डोमिंगोला शासन करण्याच्या कामीं त्याच्या आड येत होती. बरें; इभ्रतीसाठीं डोमिंगोला महत्पदाला चढविणेंही आतां त्याला अशक्य होऊन बसलें होतें.

अशा स्थितींत डोमिंगोला खरा आधार वाटत असेल तर तो एक त्याच्या जन्मदात्या आईचा व दुसरा परमेश्वराचा. डोमिंगोची आई जन्मतः हिंदु होती व ती बाटून ख्रिस्ती झाली असून ख्रिस्तीधर्मानुसार वर्तत असली तरी हिंदु-धर्माची थोरवी तिला कळत होती. कॉन्स्टन्स हें त्या बाईचें ख्रिस्ती नांव होतें. कॉन्स्टन्स बहुश्रुत होती असें जरी नाहीं, तरी तिच्या श्रद्धाळू व पवित्र अंतः-करणांत धर्माचीं चिरंतन तत्त्वें पूर्णपणें बाणलेलीं होतीं. सत्य, समता व सर्वो-

भूतीं प्रेम हीं तीन महत्तत्त्वें कॉन्स्टन्सला कळूं लागल्यापासून तिच्या आचार-विचार-उच्चारांत अखंड प्रतिबिम्बित होत. तीं तत्त्वें कोणत्या धर्मांत प्रामुख्यानें प्रतिपादन केलेलीं आहेत हें नक्की सांगण्याइतकी जाडी विद्वत्ता तिच्या ठायीं नव्हती व त्यामुळें विद्वत्ताजन्य, अहंतामय दुरभिमानाचा विटाळही तिच्या मनाला झाला नव्हता. कॉन्स्टन्स बाटून ख्रिस्ती झाली तीही सुजाणपणें ख्रिस्ती धर्माचें रहस्य मनाला पटल्यामुळें झाली असाही प्रकार नव्हता. हिंदुधर्मांतील कर्मठ भिक्षुकांच्या अंधपरंपरात्मक धर्मावडंबराला विटून व पोर्तुगीज मिशनऱ्यांच्या लफंगेगिरीला आणि क्रौर्याला बळी पडून इतर सहस्त्रावधि लोक बाटले, त्यांतच तीही बाटली, इतकेंच. बरें; त्यानंतर तिचें पेरीराशीं लग्न झालें तेंही केवळ जनरूढीप्रमाणेंच झालें होतें. पेरीराचें तिच्यावर मन बसलें, तिलाही पेरीराची धर्मपत्नी होणें आवडलें, दोघांचें लग्न झालें; पुढें संसारही सुखानें झाला. त्या संसारांत कॉन्स्टन्सला सत्य-समता, सर्वांभूतीं प्रेम ह्या आपल्या धर्मापासून कधींच ढळावें लागलें नाहीं. ख्रिस्ती धर्माच्या नांवावर अधर्माचा धुडगूस घालणारे ख्रिस्ती मिशनरी, कॉन्स्टन्सपासून तिचा लौकिक हिंदुधर्म लुबाडून घेऊं शकले; पण सत्य-समता-सर्वांभूतीं प्रेम ह्या परमपवित्र विश्वधर्माच्या सूत्रत्रयीवरील श्रद्धेचें कुबेरी वैभव जें परमेश्वरानें तिला दिलें होतें, तें तिच्यापासून कोण कसें हिरावून घेणार! तें वैभव तिला हिंदु-धर्माच्या पुरोहितांनीं दिलें नव्हतें, शंकराचार्यांनीं दिलें नव्हतें, ख्रिस्त्यांच्या धर्म-गुरूंनींही दिलें नव्हतें; ती तिला देवानें दिलेली विश्वधर्माची शिकवण होती व ती त्या शिकवणीबरहुकूम तंतोतंत वागत होती. कॉन्स्टन्स आपल्या हातून तर कधींच आपल्या परमश्रेष्ठ धर्माविरुद्ध आचरण होऊं देत नसे; पण आपला पति अथवा आपल्या हाताखालील माणसें तशा अत्याचारांना बळी पडत आहेत असें कधीं आढळतांच ती त्यांचाही शक्य तों प्रतिकार करी. पेरीराला तर तिनें कैक वेळां अधर्माचरणापासून परावृत्त केलें होतें. त्यामुळें पेरीराला जरी राजदरबारीं सिल्व्हेराप्रमाणें पहिल्या प्रतीचा मान मिळण्याला अडथळा झाला, तरी खुद्द त्याला जनतेचे शिव्याशापही फारसे ध्यावे लागत नसत.

कॉन्स्टन्सला लग्नानंतर सुमारें सात आठ वर्षांनीं एकच अपत्य झालें, तोच डोमिंगो होय. डोमिंगोला लहानपणापासून खरी शिकवण अशी आईचीच असल्यानें तो आपल्या आईला शोभेसा पुत्र निपजला यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

डोमिंगो सात वर्षांचा झाला तेव्हांपासून पेरीरा व कॉन्स्टन्स ह्या दंपत्यानें त्याच्या शिक्षणाची योग्य ती काळजी घेतली. त्या काळच्या रीति-रिवाजांप्रमाणें डोमिंगोला लिहितां वाचतां चांगलें येऊं लागल्यावर त्याचा बायबलाचाही अभ्यास यथासांग झाला. पोर्तुगीजांचा ख्रिस्ती रोमन कॅथॉलिक पंथ असल्यानें त्याला 'जुना करार' (Old Testament) प्रामुख्याने पढविण्यांत आला. इतर सर्व धर्मांपेक्षां विशेषतः हिंदुधर्म, मुसलमानी धर्म व ख्रिस्तीधर्मांतील इतर पंथ यांपेक्षां रोमन कॅथॉलिक धर्म कसा श्रेष्ठ व सर्वांगपरिपूर्ण आहे हें आपल्या विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्यासाठीं तेव्हांचे पोर्तुगीज ख्रिस्ती धर्मगुरु स्वधर्मेतर धर्मांची भरपूर टवाळी विद्यार्थ्यांपाशीं करीत. हेतु हा कीं, विद्यार्थ्यांनीं रोमन कॅथॉलिक धर्माशिवाय इतर सर्व धर्मांचा तिरस्कार व द्वेष करण्याला आरंभापासूनच शिकावें; पण डोमिंगोच्या मनावर मात्र त्या शिकवणीचा निराळाच परिणाम झाला. सर्व धर्मांविषयीं सहिष्णुता बाळगण्याचें बाळकडूं त्याला त्याच्या सुशील मातेनें प्रथमपासूनच पाजलें होतें, त्यामुळें आपल्या गुरूंकडून होणारी परधर्मांची टवाळी त्याला रुचली तर नाहींच; पण आपल्या धर्मगुरूंची ही धर्मप्रसाराची प्रणालि पाहून त्याला तिच्याविषयीं तिरस्कार मात्र वाटूं लागला. परधर्मांची टवाळी करण्यासाठीं धर्मगुरूंनीं योजिलेल्या उदाहरणांतून चांगलें तेवढें कसें निवडून घ्यावें हें त्याला चांगल्या प्रकारें कळूं लागलें. त्याला धंदेवाईक पातकी धर्मोपदेशकांनीं चालविलेल्या धर्मप्रसाराचा वीट आला. इतकेंच काय, पण कोणत्याही धर्माच्या योग्य शिकवणीच्या अभावीं कोणत्याही विशिष्ट धर्माभिमानाच्या दृष्टीनें निर्लेप असलेल्या कॉन्स्टन्सलाही डोमिंगोच्या सत्सहवासांत ख्रिस्ती धर्माचें मर्म कळून ती काया-वाचा-मनानें खरोखरीची ख्रिस्ती झाली. त्या मायलेकरांना ही खरोखरीची धर्मदृष्टि प्राप्त होतांच त्यांना त्यांचे जातभाई ख्रिस्ती धर्माच्या नांवावर परमेश्वराच्या हिंदी लेंकरांना गांजीत असलेले पाहून अत्यंत विषाद वाटूं लागला; पण त्या दीन दुबळ्यांच्या गांजणुकीचा प्रतिकार करणें त्यांच्या आवांक्याबाहेरचें होतें.

डोमिंगोवर जितकें कॉन्स्टन्सचें उत्कट प्रेम होतें, तितकेंच डोमिंगोचेंही कॉन्स्टन्सवर प्रेम होतें. डोमिंगोला कोणतीही महत्त्वाची गोष्ट करावयाची झाली तर तो आपल्या आईला विचारल्याशिवाय करीत नसे. नारो शंकराला बंधमुक्त करतांनाही त्यानें कॉन्स्टन्सची आगाऊ अनुमति घेतली होतीच. विश्वासानें तहाची वाटाघाट करण्याला आलेल्या प्रतिपक्षीयाला विश्वासघातानें ठार मारणें

अगर अन्य शासन करणें हा अधर्म आहे, असें डोमिंगो व कॉन्स्टन्स यांचें एक-मत झाल्यामुळेंच नारो शंकराची सुटका झाली होती. आतां ती त्या दोघा मायलेंकरांशिवाय तिसऱ्या कोणालाच प्रत्यक्ष पेरीरालाही रुचली नाहीं हें निराळें.

आजदेखील डोमिंगोला सेनापति सिल्व्हेराकडून निकडीचें बोलावणें आलें तेव्हांच डोमिंगोनें अंदाजानें ताडलें होतें कीं. सेनापतीनें आपणाला आपल्या पूर्वोक्त कृत्याबद्दल शहानिशा करण्यासाठींच बोलावलें असलें पाहिजे. पेरीरा तर सेनापतीच्या निमंत्रणावरून मोठ्या पहांटेलाच सेनापतीच्या प्रासादांत येऊन दाखल झाला होता. त्यापूर्वी त्याच रात्रीं पेरीरा, कॉन्स्टन्स व डोमिंगो यांची कॉन्स्टन्सच्या शयनमंदिरांत बैठक होऊन एकंदर परिस्थितीचा खल झाला होता. आज जवळजवळ दोन महिने कॉन्स्टन्स क्षयानें रुग्णशय्येवर पडून होती, त्यामुळें तिच्या मनाला त्रास होईल अशी कोणतीच गोष्ट तिच्या कानावर जाणार नाहीं अशी पेरीरा व डोमिंगो हे दोघेही खबरदारी घेत असत. असें असतांही पेरीरानें त्या रात्रीं कॉन्स्टन्सच्या समक्ष तो विषय काढला, त्यावरूनच डोमिंगोची खात्री झाली होती कीं, त्या बाबतींत पुष्कळच गवगवा होऊन परिस्थितीनें बरेंच भयंकर स्वरूप धारण केलें असलें पाहिजे. पेरीरा तेव्हां डोमिंगोला 'कुळबुडवा-घरबुडवा-देशबुडवा-धर्मबुडवा' अशीं अनेक दुरुत्तरें बोलला. डोमिंगोनें तीं शांतपणें सहन केलीं; पण कॉन्स्टन्सनें आपल्या एकुलत्या एका मुलाबद्दल असे अभद्र शब्द न बोलण्यासाठीं पतीला विनविलें. पेरीराच्या सर्व अकांडतांडवांतील मथितार्थ एवढाच होता कीं, डोमिंगोनें अजूनही सेनापतीपाशीं जाऊन झाल्या गेल्या गोष्टींबद्दल क्षमा मागावी व स्वतः पेरीरानें मध्यस्थी करून सेनापतीची समजूत करावी, आणि उदयाचलावर विराजमान झालेल्या डोमिंगोच्या भाग्यरवीला लागलेलें अपवादाचें ग्रहण टळावें. कोमल वृत्तीच्या कॉन्स्टन्सला पेरीराचा हा विचार पटला व तिनें डोमिंगोला त्याप्रमाणें वागण्याचा उपदेशही केला. डोमिंगोनेंही कांहीं अंशीं पित्याचें समाधान करण्यासाठीं व कांहीं अंशीं पोर्शियाच्या प्रेमासाठीं तसें करण्याचें कबूल केलें होतें; पण तेव्हांपासून ह्या वेळेपर्यंतच्या कांहीं प्रहरांत त्याचें मन त्याला बोंचीत होतें कीं, 'सेनापतीपाशीं विनापराध क्षमा मागितल्यानें आत्मवंचनेच्या पापाचें धनीपण आपल्या माथीं येणार नाहीं काय ? ''

असे अनुतापाचे विचार डोक्यांत घोळत असतांच डोमिंगो सेनापतीच्या निकडीच्या बोलावण्यावरून सेनापतीच्या भेटीसाठीं इतक्या लौकर इकडे आला.

होता. सेनापति अजून झोंपीं गेला आहे असें पोर्शियाच्या दासीकडून त्याला कळलें. सेनापतींचा जो नोकर उजाडतें न उजाडतें तोंच डोमिंगोला बोलावण्यास गेला होता तोही तेवढ्यांत तेथें येऊन उद्गारला, "सेनापतिसाहेब अजून उठले नाहींत. रात्रीं ते किल्लेदारसाहेब व इतर मंडळी यांच्याशीं पहांटेपर्यंत बोलत बसले होते; नुक्ते थोड्या वेळापूर्वी झोंपीं गेले आहेत."

"तर मग त्यांनीं मला बोलावून आणण्याचा हुकूम तुला केव्हां दिला ?" डोमिंगोनें विचारलें.

"पहांटेला बैठकींतून उठण्यापूर्वी !" नोकर उत्तरला.

"आणि किल्लेदारसाहेब कुठें आहेत ?" डोमिंगोने विचारले.

"ते नुक्तेच आपल्या बंगल्याकडे निघून गेले; पण ते इतक्यांतच परत येणार आहेत." नोकरानें उत्तर दिलें.

"ठीक आहे. सेनापतिसाहेब उठेपावेतों मी येऊन त्यांना भेटतों." असें म्हणून डोमिंगो पोर्शियाच्या दासी मागोमाग पोर्शियाच्या महालाकडे वळला.

दासी पुढें निघून गेली व डोमिंगो तिच्या मागोमाग हळुहळू चालला. नेहमींचा प्रकार असा कीं, पोर्शियाच्या भेटीला जातांना डोमिंगोचे पाय दुप्पट वेगानें उचलावयाचे; व तरीही एकेक पळ त्याला एकेका घटकेसारखें कंटाळवाणें वाटावयाचें. सेनापतीचा प्रासाद किल्लेदाराच्या वाड्यापासून फार दूर नव्हता; सुमारें एका हांकेच्या अंतरावर होता; पण पाव अंतर तोडतांच एका वाड्यापासून दुसरा दिसूं लागे. डोमिंगो आपल्या वाड्यांतून पोर्शियाला भेटण्यासाठीं म्हणून बाहेर पडला तर त्याची दृष्टि एकसारखी सेनापतीचा वाडा व त्या वाड्यांतील पोर्शियाच्या बैठकीचा दुसऱ्या मजल्यावरील दर्शनी महाल यांकडे असावयाची व ते तो न्याहाळीत चालावयाचा. पण आज त्याला तेवढेंही भान उरलें नव्हतें. आज पोर्शियाकडे जातांना त्याचे पाय बळेंच माघार घेत होते. त्याला कारणही तोच विषय होता. डोमिंगो त्याच दिवशीं पोर्शियापाशीं गेला व आपण नारो शंकराला बंधमुक्त केल्याची वार्ता तिला सांगून सध्यांच्या परिस्थितींत मराठ्यांशीं तह करणें कसें सर्वथैव उचित आहे आणि त्या दृष्टीनें आपलें हें कृत्य किती फलदायी होईल हें तिला पटवून देऊं लागला. त्यावरून त्या दोघांचा चांगलाच खटका उडाला होता. तो त्यांच्या रागाचा भर एखाद दुसऱ्या दिवसांतच ओसरला असेल—

नव्हे, ओसरला होताच. आतां प्रथम कोणीं कोणाला भेटावयाला जावयाचें एवढाच प्रश्न उरला होता. निदान डोमिंगोच्या मनांत तरी पोर्शियाविषयीं कांहीं विकल्प उरला नव्हता; पण दरम्यान् सेनापति मुंबईहून माघारा आला, नारो शंकराच्या मुक्ततेच्या वाजवीपेक्षां जास्त बोभाटा झाला, सेनापतीचें मन डोमिंगो-विषयीं कलुषित झालें, अशी परिस्थिति सर्वच बाजूंनीं 'आ' वांसून उभी राहिल्यामुळें डोमिंगो व पोर्शिया यांची भेट आजवर झाली नव्हती. आजदेखील डोमिंगो आपण होऊन पोर्शियाला भेटावयाला जाणार नव्हताच; पण पोर्शियानें-च मुद्दाम दासीला पाठवून बोलावलें, ही तिनें माघार घेतली; व हा आपला विजय झाला असेंच डोमिंगोला वाटलें.

पण आजची पोर्शियाची भेट आपल्याला मनस्तापापासून जरादेखील मुक्त न करतां उलट मनस्ताप वाढविण्याला कारण होईल हें बिचाऱ्या डोमिंगोला तरी काय माहीत !

## प्रकरण चौदावें

# प्रणयी युग्म

डोमिंगो पोर्शियाच्या दिवाणखान्यांत गेला तेव्हां पोर्शिया दरवाजांतच उभी राहून एका नोकराशीं बोलत होती. तिची दासी हातांत एक कबुतरांचा पिंजरा घेऊन जवळच उभी होती. पोर्शियाच्या हातांत एक बंद लिफाफा होता. डोमिंगो तेथें जाऊन पोंचावयाला व पोर्शियानें तो लिफाफा त्या नोकराच्या स्वाधीन करावयाला एक गांठ पडली.

" तो पिंजरा त्याच्यापाशीं दे." असें दासीला सांगून दासीनें तसें करतांच पोर्शिया त्या नोकराला म्हणाली, " मुरारी ! हा पिंजरा व हें पत्र ह्या दोन्ही जिनसा नीट बंदोबस्तानें अर्नाळ्यावर न्यायच्या."

" होय बाईसाहेब ! " मुरारी मुजरा करून उद्गारला.

" आणि पुढें काय करायचें ? "

" तिथें पांखरेंविक्याच्या मिषानें बार्बाराबाईसाहेबांच्या महालासभोंवार सायंकाळच्या प्रहरीं फेऱ्या घालीत राहावयाचें.—"

" बरोबर. तेवढ्यांत बार्बाराबाईसाहेब बाहेर येतील, त्यांच्याशीं सौदा पटवून पिंजरा त्यांच्या स्वाधीन करायचा; पण दरम्यान् दुसरे लोक कबुतरें विकत मागूं लागले तर ? "

" तो सौदा पटविणें किंवा न पटविणें सर्वस्वीं माझ्या मर्जीवर अवलंबून राहील. त्यांनीं देऊं केली सर्वांची एक मोहोर तर मी सांगेन एकेका कबुतराला एकेक मोहोर अशी चार मोहरा किंमत. मग कोण कशाला सौदा पटवील ? "

" शाबास ! तूं तसा फार चतुर आहेस. आणि तें पत्रदेखील बार्बाराबाई-साहेबांशिवाय दुसऱ्या कोणाच्याही हातीं द्यायचें नाहीं, समजलें ना ? "

" वाः ! हें काय मला सांगावयाला हवें बाईसाहेब ! "

" पण तुला कोणी ओळखणार तर नाहीं ना ? "

" छे ! मला कोण ओळखणार ? येऊनजाऊन मला स्वामी ओळखणार. ते गुंतलेले आहेत मंडपेश्वराकडे आणि समजा, त्यांनीं मला ओळखलें, तरी मी

अजून त्यांचा शिष्यच आहें कीं ! माझ्या मनांत त्यांच्याविषयीं कितीही काळेंबेरें असलें तरी जनांत आमचें गुरुशिष्याचें नातें कायमच आहे."

"ठीक तर. जा आतां आणि काम फत्ते केलेंस हें सांगायला लौकर माघारा ये बरें का !"

यावर "जशी आज्ञा बाईसाहेब !" असें म्हणून मुरारी तें पत्र आपल्या बंडीच्या खिशांत कोंबून व पिंजरा हातीं घेऊन निघून गेला.

त्या दिवशीं आपसांत खटका उडाल्यानंतर आज बारा तेरा दिवसांनीं पुन्हा डोमिंगो व पोर्शिया यांच्या भेटीचा योग आला असल्यानें आतां प्रथम कोणीं कोणाशीं बोलावें हा प्रश्न होता; व तो प्रश्न कसा सोडवावा याचा विचार करतां करतां इतका वेळ डोमिंगो तेथेंच पोर्शियापाशीं उभा होता. तेवढया मुदतींत पोर्शिया व मुरारी यांचा संवाद त्याला ऐकावयाला मिळाला, तेव्हां त्याचा पहिला विचार सुटून हा नवा विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागला कीं, 'हा मुरारी कोण ! बार्बारा अर्नाळ्यावर कशाला गेली ? आणि ही कबुतरांची भानगड काय आहे ?'

ह्या नव्या शंकेनें डोमिंगोला इतकें विस्मित करून सोडलें होतें कीं, हा 'काय प्रकार आहे' असा प्रश्न पोर्शियाला विचारण्यासाठीं त्यानें अगदीं ओंठावर आणला होता. पण तेवढयांत पोर्शिया आपण होऊनच त्याला म्हणाली, "डोमिंगो ! त्या दिवशीं मी तुम्हांला रागाच्या भरांत कांहीं उणादुणा शब्द बोललें असेन तर मला क्षमा करा. माझें अंतःकरण तुम्ही जाणतां. माझे शब्द एखादे वेळीं कानाला कठोर लागले, तरी माझा हेतु लक्षांत घेऊन तुम्हीं ते मनावर घ्यायचे नव्हत."

पर्जन्यमेघांनीं आकाशांत मारे बेहंगामी अवडंबर माजवावें, आतां पर्जन्य पडतो कीं अमळशानें पडतो अशा चिंतेनें लोकांची तारांबळ उडावी, तोंच सोसाटयाच्या वायुलहरींनीं त्या मेघांची चोहींकडे पांगापांग करून आकाश अगदीं निरभ्र करून सोडावें, त्याप्रमाणें पोर्शियाच्या स्नेहमय गोड शब्दांच्या एका लाटेबरोबर डोमिंगोच्या मनांतील विकल्पाचे सारे ढग एकदम पांगले गेले. मोकळ्या मनानें त्यानें पोर्शियाचा लुसलुशीत गोंडस हात आपल्या हातीं धरून त्याचें चुंबन घेतलें व पोर्शियाला म्हटलें, "पोर्शिया ! तुझें थोर अंतःकरण मी ओळखतों."

"तर मग इतके दिवस रुसवा कां बरें धरला होता?" पोर्शियानें डोमिंगोचा हात आपल्या हातीं घेऊन त्याला दिवाणखान्याच्या मध्यभागीं मांडलेल्या कोचांपैकीं एका कोंचापाशीं नेले व त्याच्या समवेत त्या कोचावर बसून त्याचा हात आपल्या हातीं घेऊन प्रेमळ स्वरांत विचारलें.

डोमिंगो पोर्शियाच्या प्रश्नाचें उत्तर देतांना अंमळ गोंधळला. पोर्शिया त्या गोंधळण्याचा आपल्या कल्पनेप्रमाणें मनोमय अर्थ करून म्हणाली, "मीं ओळखलें तुम्ही कां गोंधळलां तें."

"कां गोंधळलों? सांग पाहूं." डोमिंगोनें प्रश्न केला.

पोर्शिया उत्तरली, "सभोंवारच्या प्रतिकूल परिस्थितीनें तुमच्या मनांत हा गोंधळ उडवून दिला आहे. तरी बरें आहे कीं, तुम्हांला वर्तमान परिस्थितीच्या भयाण स्वरूपाची अजून यथास्थित ओळख पटलेली नाहीं. ती पटली तर तुम्ही जास्तच चिंतेंत पडाल."

"म्हणजे?" डोमिंगोनें विषण्णतापूर्वक विचारलें, "आणखी कोणती आपत्ति माझ्या मस्तकावर कोसळण्याची बाकी राहिली आहे? सध्याचा काळच असा विपरीत आला आहे कीं, ईश्वरी कोपांतून कोणतीही आपत्ति जन्म पावून तीं भूतलावर उतरली, कीं ती प्रथम नेमकी डोमिंगोचीच चौकशी करीत येते!"

"आणि पोर्शिया तुमच्या जन्माची भागीदारीण व्हायची, म्हणून ती आपत्ति तुमच्याकडे येतांयेतां प्रथम पोर्शियाचीही चौकशी करायला विसरत नाहीं!" पोर्शिया डोमिंगोच्या स्कंधावर मस्तक ठेवून विमनस्कतेनें उद्गारली, "डोमिंगो! प्रिय डोमिंगो! आपत्तींच्या वणव्याची आजवर गेल्या बारा तेरा दिवसांत तुम्हांला नुसती झळच लागत असेल; कारण तुम्ही दूर आहां; पण मी त्या वणव्याच्या मध्यभागीं सांपडलेली असल्यानें माझी काय दशा होत असेल याची तुम्हांला कल्पनाही नसेल."

"सेनापतींच्या गैरसमजाविषयीं तूं हें बोलत आहेस का?"

"होय. यांत काय तें समजा."

"अरेरे!" डोमिंगो हळहळत उद्गारला, "एकूण इतका माझा सहवास तुला जाचूं लागला म्हणावयाचा!" बोलतां बोलतां डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं, तीं पुशीत डोमिंगो घोगऱ्या आवाजांत म्हणाला, "पोर्शिया! लाडके! मला सांग, मीं काय केलें म्हणजे ह्या जाचणुकींतून तुझी मुक्तता होईल? सभोंवारच्या एकंदर

परिस्थितीवरून मला तरी आतां नक्की वाटूं लागलें आहे कीं, पोर्शिया व डोमिंगो हीं एकमेकांचीं कोणी नव्हेतशीं ठरावीं, अशीच परमेश्वराची इच्छा आहे.—"

"नका ! असें अभद्र बोलूं नका !" पोर्शिया डोमिंगोच्या तोंडावर हात ठेवून उद्गारली, "बायकोसारखी बायको असूनही मी डगमगत नाहीं आणि तुम्ही इतके डगमगतां ? माझी तर कल्पना होती कीं, तुम्ही माझ्याहीपेक्षां जास्त खंबीर मनाचे आहां; पण आतां पहातें तर तुमचें मन जास्तच हळवें ! इतक्या हळुवार मनानें जगांत दिवस कसे निघणार ? नुसता तर्क चालवून जर तुम्हीं इतके हातपाय गाळले, तर बाबांच्या रागाचा भडिमार माझ्यावर प्रत्यक्षतः एकसारखा सुरू असतां मीं किती हातपाय गाळावे ?"

"तूं माझ्यावर प्रेम करतेस, म्हणूनच तुझ्या बाबांचा तुझ्यावर राग ना ?"

"होय !—"

"म्हणूनच मी म्हणतों कीं, आपण आतां एकमेकांना विसरलें पाहिजे."

"पण मी काय म्हणतें तें तुम्ही ऐकून तरी घ्याल कीं नाहीं ? आधीं मला सांगा, तुम्हीं तुमच्यावर आलेल्या आरोपांचें निराकरण करण्याची काय खटपट केली ?"

"मी काय खटपट करणार ?"

"हेंच तें ! तुमचें माझ्यावर मनापासूनचें प्रेम नाहीं, हेंच खरें. पुरुष तेवढे चंचल वृत्तीचे असतात असें मी आजवर ऐकत आलें, त्याचा प्रत्यक्ष अनुभव तुम्ही मला देत आहां."

"ईश्वरसाक्ष—"

"मला ईश्वराची साक्ष नको. तुमच्या शब्दावर माझा विश्वास आहे."

"मग असें कां म्हणालीस ? पोर्शिया ! मला जर माझें हृदय फाडून दाखवितां आलें असतें, तर माझ्या हृदयसिंहासनावर तुझी मूर्ति मीं माझ्या हातानें अधिष्ठित केलेली असून त्या मूर्तीची मी तीन त्रिकाळ आत्मीयतेनें आराधना करीत आहें, असें नयनमनोहर दृश्य तुला पहावयाला सांपडलें असतें." डोमिंगो आपल्या हृदयावर उजवा हात ठेवून उद्गारला.

"एकूण माझ्यापेक्षां कोणत्याही अन्य युवतीच्या मोहजालांत तुम्ही भडकलेले नाहीं, हें खरें ना ?" पोर्शियानें लाडिकपणानें विचारलें.

"हा प्रश्न तूं मला विचारणें म्हणजे माझा अपमान करण्यासारखें आहे."

" नाहीं, माझें मन पापी म्हणून मला संशय आला. तसा संशय येण्याला कारणें होतीं व आहेतही." पोर्शिया बोलतां बोलतां एकाएकीं उठली व दरवाजांतून आपल्या दासीला हांक मारूं लागली, " इडा ! इडा ! "

हांकेसरशी एक सुमारें पंचविशीच्या उमरीची, साधारण रूपाची व कृष्ण वर्णाची दासी पोर्शियासमोर येऊन उभी राहिली. तिनें विचारलें, " काय बाईसाहेब ? "

" बव्या मेमसाहेब काय करीत आहेत ? " पोर्शियानें विचारलें.

" त्या कपडे करून कुठें बाहेर जाण्याच्या तयारींत आहेत बाईसाहेब ! " दासी उत्तरली.

" कपडे करून इतक्या लौकर त्या कुठें चालल्या ? " पोर्शिया स्वतःशींच म्हणाली. लगेच दुसऱ्याच क्षणाला तिच्या तोंडून स्वगत उद्गार निघाले, " खरेंच, आज रविवार ! आज प्रार्थनेचा दिवस ! " ती डोमिंगोकडे वळून म्हणाली, " डोमिंगो ! तुम्हांला आजच्या रविवारची आठवण नाहीं वाटतें ? "

" मला आठवण नव्हती. मी प्रार्थनेच्या दिवसांचें इतके कांटेतोल मोजमाप कधींच ठेवीत नसतों. तुला हें कदाचित् माहीत नसेल ! "

" छे ! मला हें माहीत नाहीं. माझी तर आजवर अशी समजूत होती व अजूनही आहे कीं, तुम्ही फारच धर्मभोळे आहां. परमेश्वरावर तुमची जितकी अढळ व उत्कट श्रद्धा आहे तितकी फारच थोडयांची असेल."

" गोष्ट खरी आहे. म्हणूनच मी दर रविवारीं प्रार्थनामंदिरांत जाण्याला नाखूष असतों."

" याचा अर्थ काय ? "

" याचा अर्थ हाच कीं, प्रार्थनामंदिरांतील प्रार्थनेवर व ती प्रार्थना चालविणाऱ्या धर्मगुरूंवर माझी मुळींच श्रद्धा नाहीं. नित्य नाना परींच्या पातकांच्या कर्दमांत लोळणारे पतित कोणी धर्मगुरु म्हणून तर कोणी भक्त म्हणून प्रार्थनेची कवाईत करतांना पाहिले, कीं प्रभूच्या पवित्र धर्माची ती विटंबना पाहून माझें काळीज चर्रर्र होतें व मी कोठून घटकाभर तरी ह्या नरकवासांत येऊन पडलोंसें मला वाटूं लागतें. अशा पापी जनांचा सहवास टाळावा म्हणून मी घरच्या घरींच प्रभूची प्रार्थना करीत असतों."

धर्मांची बाब पोर्शियाला अगम्य होती. दर रविवारीं प्रार्थनेसाठीं प्रार्थना-मंदिरांत जाणाऱ्या इतर कवाइती माणसांपैकींच ती एक होती. शिवाय तिला आतां जें बोलावयाचें होतें तें अगदीं निराळ्या विषयावर. ती दासीकडे वळून म्हणाली, "बरें; इडा! बडया मेमसाहेब बाहेर गेल्या, कीं मला सांगायला ये बरें का?"

"आज्ञा बाईसाहेब!" दासी उद्गारली.

"त्या आतां आमचें संभाषण चोरून ऐकत नव्हत्या ना?" पोर्शियानें पुन्हा विचारलें.

"नव्हत्या बाईसाहेब!" असें बोलून त्या दासीनें तेथून निघून गेल्यासारखें दाखविलें. तेवढ्यांत पोर्शियानें दिवाणखान्याचा दरवाजा लावून घेतला; त्याबरोबर दासी पुढें गेलेली पुन्हा माघारीं आली व दरवाजाला कान देऊन ऐकूं लागली. पोर्शियाला त्याची दादही नव्हती.

पोर्शिया डोमिंगोला म्हणाली, "डोमिंगो! मला संशय अशासाठीं आला कीं, तुम्हांला बडया मेमसाहेबांची दृष्ट लागेल कीं काय असें मला अलीकडे फार भय वाटूं लागलें आहे."

"कां बरें?" डोमिंगोनें विचारलें, "अलीकडे त्या माझ्याशीं फार मन-मोकळेपणानें वागतात म्हणून?"

"होय!"

"हा तुझ्या संशयी वृत्तीचा परिणाम आहे. माझी तर अशी ठाम समजूत झाली आहे कीं, तुझ्या सावत्र आई अत्यंत प्रेमळ, सदाचारी व मनमोकळ्या आहेत. माझा त्यांच्याशीं दाट परिचय असा गेल्या दोन तीन महिन्यांचा आहे. एवढ्या सहवासांत माझें त्यांच्याविषयीं फारच चांगलें मत झालें आहे."

"म्हणूनच तर मला फार भय वाटतें! मीं माझ्या सावत्र आईविषयीं असे अनुदारपणाचे उद्गार काढणें योग्य नाहीं हें खरें; पण गेल्या दहा बारा दिवसांत तुमच्याविरुद्ध जें काहूर उठविण्यांत आलें आहे, त्यांत त्यांचें बरेंच अंग असावें असें म्हणण्याला माझ्यापाशीं पुरावा आहे.

"काय पुरावा आहे?"

"बाबांनीं मला तुमच्यावरील प्रेमापासून परावृत्त करण्याकरितां जीं कारणें

सांगितलीं त्यांतलें एक कारण म्हणून 'मार्गारेटचें मतही डोमिंगोविषयीं चांगलें नाहीं' असें होतें."

"शक्य नाहीं. बाकी तसें तरी कसें म्हणावें ? प्रत्येकाचें मन माझ्याविषयीं कलुषित झालें आहे. मग मार्गारेटबाईंना तसें वाटत असल्यास मीं त्यांना दोष कां द्यावा ? मी दोष माझ्या कर्माला देतों."

"तसा त्याचा अर्थ नाहीं, डोमिंगो ! तुम्ही इतके भोळे कसे ?–" पोर्शिया जीभ चावून म्हणाली, "पण जाऊं द्या. माझ्याच आईविषयीं मीं असें बोलणें बरें नाहीं. परमेश्वरानें तुमचें मन आजवर जितकें निर्मल राखलें आहे तितकेंच तें नेहमीं राखावें. ज्यांचीं कर्मे तीं भोगतील."

पोर्शिया जें बोलली त्यापेक्षां कितीतरी पटींनीं गूढार्थ ती जें कांहीं बोलली नाहीं त्यांत सांठलेला होता. पोर्शियाच्या मताप्रमाणें त्याचा आशय उघड उघड असा होता कीं, मार्गारेट ही डोमिंगोकडे पापवासनेनें पहात असून आपणाकडे डोमिंगोचें चित्त वेधावें अशासाठीं पोर्शियाशीं त्याचें वितुष्ट आणण्याविषयीं मार्गारेटची खटपट सुरू होती. पोर्शियाचा हा संशय साधार होता. मार्गारेट ही सेनापति सिल्व्हेराची दुसरेपणाची बायको असून ती वृत्तीनें बरीच चंचल व दुर्वर्तनी होती. ती मूळची आल्मेडा नांवाच्या एक पोर्तुगीज शिलेदाराची स्त्री. तो शिलेदार ठाण्याच्या किल्ल्यावर मराठ्यांनीं हल्ला केला त्या सुमाराला सेनापतीच्या सह-वासांत आला. किंवा याहीपेक्षां खरें सांगावयाचें तर योगायोगानुसार सेनापतीला आल्मेडाची तरुण व सुंदर पत्नी मार्गारेट एकदां भेटली, व त्या पहिल्या भेटींतच सेनापतीचें तिच्यावर मन बसून तो तिला प्राप्त करून घेण्याच्या उद्योगाला लागला. तेवढ्यासाठीं सेनापतीनें आल्मेडाला खास आपल्या हाताखालीं नोकरीला घेऊन मार्गारेटचा आपणाशीं नित्यसंबंध येईल असें केलें. सेनापति तेव्हां विधुर होता व मार्गारेट केवळ एकोणीस वर्षांची कोंवळी लुसलुशीत तरुणी होती. सेनापतीचें जीवन विधुरावस्थेमुळें नीरस झालें होतें, तर मार्गारेटची दृष्टि सेनापतीच्या सतत सहवासांत त्याच्या मान-धन-संपत्तीनें दिपून गेल्यामुळें आल्मेडाच्या संसारांत सुखाचा शोध तिला लागेनासा झाला होता. त्यामुळें सेनापतीनें मार्गारेटला वेळोवेळीं बहुमोल वस्त्रालंकार देऊन व अशाच अनेक अन्य मार्गांनीं प्रसन्न करण्यासाठीं तिच्यासभोंवार मोहजाल पसरलें. तेव्हां मार्गारेट आपल्या बऱ्याचशा भाबडेपणानें व कांहींशा छांदिष्टतेनें त्या जाळ्यांत हळुहळू

अडकूं लागली. आल्मेडाच्या नजरेला हा प्रकार येण्याला फारसा कालावधि लागला नाहीं; पण 'धरावें तर चावतें व सोडावें तर पळतें' अशी त्याची अवस्था झाली होती. सेनापतीच्या पापी दृष्टीपासून मार्गारेटला दूर न्यावी तर नोकरीचें बंधन; बदली करावयाला सेनापति राजी नाहीं व प्राप्त स्थितींत रहावें तर मार्गारेट सेनापतीच्या नादानें बहकत चाललेली ! त्यामुळें आल्मेडाला अत्यंत दुःख होऊन तो जिवाला वैतागला. त्याच सुमाराला ठाण्याची लढाई सुरू झाली व त्या लढाईनंतर आल्मेडा कोणालाही आढळला नाहीं. तो लढाईंत ठार मारला गेला अशी दाट बातमी उठली. आल्मेडाची अशी अवस्था झाल्यामुळें मार्गारेट-चा लौकिकांतील आधार तुटला; पण एका दृष्टीनें त्यांतही मार्गारेटला समाधानच वाटलें. तिचा छळ थांबला. सेनापतीला तर आपला मार्ग पूर्णपणें निष्कंटक झाला असें वाटलें. पुढें थोड्याच दिवसांत सेनापतीनें मार्गारेटला मागणी घातली व मार्गारेटनेंही ती फारसे आढेवेढे न घेतां स्वीकारली.

पण चंचल वृत्तीच्या मार्गारेटला ह्या विषमविवाहांत लौकरच खरें सौख्य लाभेनासें झालें. मार्गारेट तरुण व सुंदर आणि चंचल होती. चांचल्य हा स्त्री-जातीचा नैसर्गिक गुण आहे असें म्हटलें तरी मार्गारेट विशेष चंचल—थिल्लर-पणाचा आरोप जगानें तिच्यावर करावा इतकी चंचल—होती; व सेनापति मान-धन संपन्न असला तरी मार्गारेटला आजोबा, निदान पिता शोभण्याइतका वृद्ध होता. एवढें सांगितल्यानें मार्गारेटची वृत्ति कां चळूं लागली याचा उलगडा होण्याजोगा आहे. मात्र मार्गारेट जरी डोमिंगोची भेट झाल्यापासून त्याच्याशीं अत्यंत रसाळ वृत्तीनें वागून त्याला वश करूं पहात होती तरी डोमिंगोच्या मनांत प्रथम तसा संशय कधींही आला नाहीं. थोड्या दिवसांनीं डोमिंगो व पोर्शिया यांचा परस्पर प्रेमसंबंध मार्गारेटच्या निदर्शनाला आला तेव्हां मार्गारेटला अर्थातच पोर्शियाविषयीं मत्सर वाटूं लागला व तिनें त्या दोघांच्या प्रेमसंबंधावर बिब्बा घालण्याचा घातकी उद्योग आरंभिला. तेवढ्यासाठीं मार्गारेटनें हळुहळू पोर्शियाची नालस्ती सुरु करून ती डोमिंगोच्या कानीं जाईल असें केलें; पोर्शियाचें मनही कलुषित करण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण कांहीं केल्या तें जमेना. ह्या सर्व गोष्टी मार्गारेट स्वतः अगदीं नामानिराळी राहून करीत असल्यानें आजवर तिच्या ढालगजपणाविषयीं डोमिंगोला जरादेखील संशय आला नव्हता, 'चोराचीं पावलें चोरानें ओळखावीं' या न्यायानें पोर्शिया मात्र अलीकडे आपल्या

सावत्र आईचे आगलावे चाळे थोडथोडे उमजूं लागली होती. विशेषतः गेल्या बारा तेरा दिवसांत मार्गारेट डोमिंगोविषयीं सेनापतीच्या कानीं विष ओतूं लागल्याचा पोर्शियाला प्रत्यक्ष अनुभव येऊं लागला होता.

मात्र मार्गारेट डोमिंगोवर एकाएकीं अशी नागिणीसारखी कां उलटावी हें पोर्शियालाही एक गूढच होतें. त्या गूढाचा उलगडा डोमिंगोच्या साह्यानें करतां येईल अशी तिची अपेक्षा होती; म्हणून तिनें मुद्दाम या वेळीं तो विषय काढला होता; पण डोमिंगोच्या उद्गारांवरून त्याच्या मनाच्या निर्मलतेविषयीं पोर्शियाची खात्री झाली व तिनें तो विषय तेवढ्यांतच आटोपता घेण्याची तयारी दर्शविली.

पण डोमिंगोच्या तोंडून तेवढ्यांत ओघासरसे त्या विषयाला चालना देणारे उद्गार निघाले, "एकूण मार्गारेटबाईंच्या पापवासनेला मीं पायांखालीं तुडविलें, म्हणून त्या माझ्यावर एकदम इतक्या उलटल्या काय ? ठीक आहे. त्यांचें कर्म त्यांच्यापाशीं."

"म्हणजे ? बऱ्या मेमसाहेबांनीं तसा डाव टाकला होता एकूण ?" पोर्शिया पुन्हा जिज्ञासापूर्वक विचारूं लागली.

"टाकला होता. खोटें कशाला बोलूं ? त्यांनीं पंधरा दिवसांपूर्वी तसा डाव टाकला होता; पण मीं तिच्या शब्दाला मान देऊन पापाच्या गर्तेत चालत जाण्याचें स्पष्टपणें नाकारलें; त्यामुळें ती चिडली असेल."

"तो डाव कोणता ?"

"पोर्शिया ! असल्या किळसवाण्या गोष्टींची वाच्यता करणें माझ्या शीलाला शोभणार नाहीं, व ती ऐकणें तुझ्याही शीलाला शोभणार नाहीं."

"पण तुम्ही आजवर हें माझ्यापाशीं कां बोलला नाहीं ?"

"सांगितलें ना ! असल्या गोष्टी वाचेनें उच्चारणें म्हणजे वाचेची विटंबना करण्यासारखें आहे. हीच गोष्ट कशाला ? अशा आणखी कितीएक कर्णकटु गोष्टी माझ्या कानीं आल्या आहेत व त्यांचा तुझ्या चारित्र्याशीं संबंध आहे."

"माझ्या चारित्र्याशीं त्यांचा संबंध आहे ?"

"होय; तुझ्या चारित्र्याशीं त्यांचा संबंध आहे; पण त्या मीं कुठें मनावर घेतल्या ? किंवा त्यांविषयीं तुझ्यापाशीं तरी चौकशी कुठें केली ? कांहीं कांहीं गोष्टी अशा घडतात किंवा ऐकूं येतात कीं, त्यांचा आपण कसाही विचार किंवा उच्चार केला तरी त्यांना महत्त्व मिळून अकल्पित अनर्थांची परवड लागते.

हा मत्सराग्नि चेतविणारीं माणसें स्वतः बाजूला राहून आग कशी भडकते याची मजा पहात असतात व त्या आगींत तुझ्या-माझ्यासारख्या सरळ वृत्तीच्या निष्पाप जीवांची मात्र व्यर्थ होळी होते. तेव्हां इतकें हवेंच कशाला ? आपला एकमेकांचा एकमेकांवर अढळ विश्वास आहे, तसेंच आपलें परस्परांवरील प्रेमही अढळ असावें, एकमेकांविषयी एकमेकांच्या मनांत विकल्पाला जरादेखील थारा मिळूं नये, म्हणजे झालें."

"तें खरें; पण अशा आपल्या प्रच्छन्न शत्रूंकडे कानाडोळा करून कसें चालेल ? त्यांना योग्य शासन झालेंच पाहिजे."

"छे ! छे ! त्यांना शासन करणारीं आपण कोण ? तो अधिकार परमेश्वराचा आणि परमेश्वरही महापाप्यांनादेखील शासनाग्नीनें जाळण्याचें सोडून दयेच्या अमृतवर्षावानें त्यांना पावन करून घेतो. अशीं किती तरी उदाहरणें आपल्या पवित्रशास्त्रांत तुला सांपडतील. अपकारांची फेड आपण उपकारानें करावी; व पापिष्ठांचा उद्धार करण्यासाठीं प्रभूची प्रार्थना करावी."

"पण सर्पाला दूध पाजलें तरी त्याचें सर्पाच्या पोटीं विषच व्हायचें ! आणि त्या विषाच्या दाहाला तुमच्यासारखे साधुवृत्तीचे उपकारकर्ते हकनाहक बळी पडायचे !" पोर्शिया फूत्कार करण्यासाठीं स्फुरून फणा उभारलेल्या नागिणी-सारखी उंच मान करून निश्चल दृष्टीनें डोमिंगोकडे पहात म्हणाली.

डोमिंगो यावर एकवार नुसता हंसला व समोर टांगलेल्या येशूख्रिस्ताच्या भव्य व गंभीर तसबिरीकडे पाहूं लागला. पोर्शियाला वाटलें कीं, डोमिंगोनें आपली उपेक्षा केली, म्हणून ती कांहींशी मानखंडित होऊन म्हणाली, "डोमिंगो ! माझे बोल तुम्हांला पटत नाहींतसें दिसतें ! माझा तुम्हांला राग येतो वाटतें ?"

"राग येत नाहीं; कींव मात्र येते." डोमिंगो पुन्हा समोरील येशूख्रिस्ताच्या तसबिरीकडे श्रद्धापूर्ण दृष्टीनें पहात म्हणाला, "तूं प्रभूचें लेकरूं म्हणवितेस, ख्रिस्ती धर्माचा अभिमान बाळगितेस; पण वागणुकींत मात्र प्रभूच्या शिकवणीशीं पूर्ण विसंगतपणें वागूं पहातेस याबद्दल मला वाईट वाटतें.–बरें; तो विषयच राहूं दे. सेनापति आतां उठतील; मला त्यांच्याकडे लौकर गेलें पाहिजे. मी आतां येतों." असें म्हणून डोमिंगो तशाच विस्मयपूर्ण मनःस्थितींत बाहेर जाण्या-साठीं उठला.

" थांबा. इतकी घाई कां ? बाबा उठले कीं नोकर तुम्हांला हांक मारायला येईलच." पोर्शिया डोमिंगोचा हात आपल्या हातीं धरून म्हणाली.

" पण इथें बसून तरी त्याच विषयाचा काथ्याकूट करावयाचा ना ? खरें म्हणशील तर मला असल्या गोष्टींचा मनापासून तिट्कारा आहे. परमेश्वरानें अमोल विचारशक्ति आपणां माणसांना दिली आहे, तिचा असल्या क्षुद्र व कलहात्मक गोष्टींचा विचार करण्यांत अपव्यय कां म्हणून करावा ? माझी कल्पना होती कीं, इतक्या दिवसांनंतर तूं भेटलीस ती माझ्या मनावरचें चिंतेचें ओझें जेणेंकरून दूर होईल असे चार उत्साहवर्धक शब्द मला ऐकवशील; सध्यांच्या बिकट परिस्थितींत मीं कसें वागावें याबद्दल कांहीं धीराचा बोध करशील; पण इथें ऐकतों तर—"

पोर्शिया डोमिंगोला तोंडचें वाक्य पूर्ण करूं न देतां म्हणाली, " मीं तरी तेवढ्यासाठींच तुम्हांला हांक मारली.—"

" खरें, तूं आतां त्या कोणा मुरारीपाशीं कबुतरांचा पिंजरा व पत्र बार्बाराला देण्यासाठीं दिलेंस, तो काय प्रकार आहे ? "

" सांगतें. ती सारी खटपट तुमच्यावरील आरोपाचें यथायोग्य परिमार्जन करण्यासाठीं चालली आहे."

" पण बार्बारा परत अर्नाळ्यावर कशासाठीं गेली ? आणि तिला तिकडे कबुतरें काय करावयाचीं ? "

पोर्शियानें बार्बारा अर्नाळ्यावर केव्हां व कां गेली तो सारा वृत्तान्त डोमिंगोला थोडक्यांत सांगितला. मराठ्यांच्या गोटांतील भेद आणण्यासाठीं बार्बारानें अर्नाळ्यावर जाऊन तळ देण्यांत कशी हिकमत लढविली व ती आजवर तेथून पहिल्यानेंच बरोबर नेलेल्या कबुतरांच्या साह्यानें मराठयांचे गुप्त बेत पोर्शियाला कशी कळवीत आली, हा वृत्तान्त ऐकून डोमिंगोनें शरमिंदेपणानें खालीं मान घातली. त्याला त्या वेळीं मनांतून काय वाटलें तें तो जाणे; पण पोर्शियाला मात्र त्याची विस्मयचकित अवस्था पाहून वाटलें कीं, आपला प्रियकर आपलें राजकारणचातुर्य पाहून अगदीं थक्क होऊन गेला आहे. त्यामुळें ती जास्त उत्साहभरित होऊन उद्गारली, " डोमिंगो ! आतां तुम्ही साहजिकपणेंच विचाराल कीं, यांत आपला तरणोपाय कोठें आहे. खरें ना ? "

डोमिंगो यावर कांहींच बोलला नाहीं. पोर्शिया आपण होऊनच पुढें म्हणाली, "तें तुमच्या ध्यानीं एरव्हीं यायचें नाहीं; हें पत्र पहा म्हणजे तुम्हांला कांहीं अटकळ होईल." असें म्हणून पोर्शियानें आपल्या समोरील मेजाच्या खणांतून एक पत्र काढून डोमिंगोच्या हातीं दिलें.

डोमिंगो तें पत्र घेऊन वाचूं लागला. त्यांत पुढील आशयाचा मजकूर मूळ पोर्तुगीज भाषेंत लिहिलेला होता.

**प्रिय भगिनी !**

नारो शंकराची मोकळीक करण्यांत डोमिंगोची मोठी चूक झाली; पण अकल्पितपणें ती माझ्या पथ्यावर पडली. आपण पूर्वी नारो शंकराची मोकळीक करण्याचें चिमाजीअप्पाला वचन देऊन आपली दोघींची मुक्तता करून घेतली होती व मी पुन्हा येथें आलें तेव्हां स्वतःचा जम बसविण्यासाठीं नारो शंकराच्या मुक्ततेची तजवीज केल्याची थापही ठोकून दिली होती. फुलाबोलाला गांठ पडून तसें घडून आल्यानें मला येथें सर्व मराठयांचा पूर्ण विश्वास संपादन करतां आला आहे. मराठयांचे मुख्य आधारस्तंभ चिमाजीअप्पा पेशवे व स्वामी रामानंद हे आहेत. विशेषतः रामानंदांची हिंदुधर्मजागृतीची चळवळ हरघडी शेंकडों हिंदूंना स्वधर्माभिमानाला चेतवून मराठयांच्या भगव्या झेंडयाखालीं ओढून आणीत आहे ह्या दोघांचा नाश केल्याशिवाय जय नाहीं. आपल्या लोकांनीं तांतडी केल्यास या वेळीं हा किल्ला हातीं लागण्याजोगा आहे. किल्लेदार पूर्णपणें माझ्या मुठींत आला आहे. फ्रॅन्सिसनें चिमाजीअप्पांची मर्जी संपादन केली असून थोडयाशा लोकांचें पाठबळ तिकडून मिळाल्यास तो चिमाजीअप्पांना जिवंत पकडून तिकडे आणूं शकेल. सध्यां तो मराठयांच्या बाजूनें मंडपेश्वरच्या रणांगणावर लढावयाला गेला आहे. किल्लेदार पेरीरा आणि डोमिंगो हे दोघेही पितापुत्र मराठयांशीं तह करण्याला उत्सुक आहेत अशी नारो शंकराच्या सांगण्यावरून इकडे दाट बातमी उठली असल्यानें डोमिंगो किंवा पेरीरा विशेषतः डोमिंगो मराठयांशीं तह करण्याच्या मिषानें ताबडतोब एकदोन दिवसांत कांहीं गुप्त युद्धसामुग्रीसह इकडे आल्यास किल्ला जिंकतां येऊन रामानंद व चिमाजीअप्पा हे दोघेही हातीं सांपडण्याचा फार संभव आहे. चिमाजीअप्पा तर थोडेसे आजारी

असल्याने सध्यां इथेंच आहेत; पण रामानंदही आजच मंडपेश्वराहून इकडे आले आहेत. मंडपेश्वराकडे बहुतेक मराठ्यांची फत्ते झाली आहे.

काय पाहिजे तें झालें तरी चिमाजीअप्पा व रामानंद यांना उचलल्याशिवाय मराठ्यांची बंडाळी थांबावयाची नाहीं व आम्हांला यश यावयाचें नाहीं. तरी सेनापतींना सांगून ताबडतोब पत्रीं लिहिल्याप्रमाणें व्यवस्था व्हावी. कबुतरें संपलीं तींच पुन्हा पाठवावीं. —**बार्बारा**.

डोमिंगोनें पत्र वाचून होतांच तें पूर्ववत् घडी करून पोर्शियाच्या हातीं दिलें. त्याचें पत्रवाचन सुरू असतांना त्याच्या चर्येवर क्षणोक्षणीं जास्त जास्त गंभीरतेची छाया पडूं लागली होती. पोर्शियाचें तिकडे लक्ष्य होतें. तिला वाटलें, आपण दोघी बहिणी इतके गुंतागुंतीचे राजकारणी डाव सहज इतक्या बेमालूमपणें खेळूं शकतों, हें पाहून डोमिंगोला अचंबा वाटला असावा. ती तें पत्र घेऊन पुन्हा पूर्वस्थळीं ठेवून डोमिंगोला म्हणाली, " डोमिंगो ! इतके दिवस मी काय करीत होतें याची तुम्हांला ह्या पत्रावरून बरीचशी कल्पना आली असेल. याहीपेक्षां स्पष्ट सांगायचें तर आम्हां दोघां बहिणींच्या मार्फत मराठयांकडील महत्त्वाच्या बित्तंबातम्या बाबांना कळतात, म्हणून तर त्यांचा एथवर तरी पल्ला आला आहे."

डोमिंगो पोर्शियाचें प्रवचन ऐकलेंसे दाखवून, पण खरोखर मनांतून त्याची विशेष दरकार न बाळगितां पोर्शियाला म्हणाला, " आणि आज अर्नाळ्यावर गेलेला तो मुरारी तुला कुठें भेटला ? "

पोर्शिया अभिमानपूर्वक उत्तरली, " तो बाबांना मुंबईहून इकडे येतांना भेटला. कां बरें ? "

" नाहीं; ह्या मोहिमेवर चालून आलेल्या मराठमोळ्यांत असल्या निमकहरामांचें पीक मुळींच पिकत नाहीं अशी या घटकेपर्यंत माझी समजूत होती, म्हणून विचारलें." डोमिंगो कोचाच्या पाठीला डाव्या हाताचें कोंपर टेंकून त्या हाताच्या तळहाताला डावा गाल टेंकीत उद्गारला, " पण जो हरामखोर आपल्या धन्यांना दगा द्यावयाला तयार झाला, तो तुम्हांला देखील दगा देणार नाहीं ना ? "

" बाबांना माणसांची पारख आहे. त्यांनींच मुद्दाम ह्या जबाबदारीच्या कामावर त्या माणसाची नेमणूक केली आहे."

" एकूण तूं ह्या साऱ्या उलाढाली सेनापतींच्या अनुमतीनेंच करीत आहेस तर ! "

" अर्थात् !" पोर्शिया आल्हादपूर्वक स्मितहास्य करीत म्हणाली, " म्हणून तर मला तुमच्या भाग्योदयाबद्दल एवढी हमी देतां येते आहे ! बाबांच्या मनांत तुमच्याविषयीं अतिशय विकल्प आला आहे हें खरें. बड्या मेमसाहेबही तुमच्या नाशावर टपलेल्या–पण तो विषय काढावयाचा नाहीं. तेव्हां सांगतें, डोमिंगो ! मी प्रौढी मिरविते असें नाहीं, पण मराठ्यांकडील भेद आणण्याची ही कल्पना माझी, ती कशी कृतींत उतरवावी याविषयींची योजनादेखील मींच तयार केली. इतके ह्या मोहिमेचे पंचप्राण अंतस्थरीत्या माझ्या मुठींत सांठविलेले आहेत. बाबादेखील कोणतीही गोष्ट करावयाची झाली तरी माझ्या संमतीशिवाय करीत नाहींत; पण खरेंच सांगूं ? इतके दिवस मला माझें जीवित शिशिरऋतूंतील भुंड्या वनश्रीप्रमाणें नीरस वाटत होतें. बाबांनीं माझी प्रशंसा केली, आणखी कितिकांनीं माझ्या मुत्सद्देगिरीबद्दल तोंडांत बोटें घातलीं असतील; पण तरीदेखील ज्यांनीं प्रशंसा करावयाची त्यांनीं केली नाहीं असें मन खात होतें. "

पोर्शियानें बोलतां बोलतां लडिवाळपणानें डोमिंगोच्या मानेसभोंवार आपल्या उजव्या हाताचा विळखा घातला. डोमिंगोनें त्याचा प्रतिकार जरी केला नाहीं, तरी त्याला पोर्शियाच्या त्या प्रणयचेष्टांमुळें नेहमींप्रमाणें संतोषही वाटला नाहीं. तो गंभीर स्वरांत उद्गारला, " तुझ्या चातुर्याची प्रशंसा करण्याइतकें राक्षसी धैर्य माझ्या अंगीं नाहीं. देवाला व धर्माला तुझी ही विश्वासघातकी वागणूक मान्य होण्यासारखी नाहीं; माणुसकीला शोभण्यासारखी नाहीं. ह्या अधःपातांतच आमचें मरण–आमचा सर्वनाश आहे व आमच्या प्रतिस्पर्ध्यांचा विजयही यांतच सांठविलेला आहे."

" डोमिंगो ! ही सर्व यातायात मीं केवळ तुमच्यासाठीं केली. बाबांपाशीं शक्य तेवढी मध्यस्थी करून मीं तुमच्याविषयींची त्यांच्या मनांतील आढी काढून टाकली व तुमचें स्वतःचें, तुमच्या देशाचें आणि तुमच्या धर्माचें मंगल करण्याची सोन्याची संधि तुम्हांला प्राप्त करून दिली. आणि तरीही तुम्ही असें म्हणतां ? काय म्हणतात त्यांतली अवस्था, 'शेळी जाते जिवानिशीं व खाणारा म्हणतो वातड' !"

" पण माझ्यासाठीं तूं शीलभ्रष्ट व्हावें, धर्मनिषिद्ध आचरणाची सुरी आपल्या

धर्माच्या मानेवर फिरवावी, उपकारकर्त्यांच्या उपकारांची फेड अपकारांनीं करावी अशी माझी मुळींच इच्छा नव्हती."

"हे आरोप केवळ अतिशयोक्तीचे–नव्हे, निव्वळ खोटे आहेत.—"

"कावीळ झालेल्याला सारें जग पिंवळेंच दिसावयाचें. पोर्शिया! मला सांग, तूं हा विश्वासघात करीत नाहींस? विचार कर, तुम्ही दोघी मराठ्यांच्या तावडींत सांपडलां होतां तेव्हां तुमची विटंबना होणें अशक्य नव्हतें. तूंच सांगितलेंस कीं, त्या वेळीं मराठ्यांच्या नाटकशाळा होऊन बसण्याचा प्रसंग तुम्हां दोघींवरही ओढवला होता. तसें झालें असतें, तर तुम्हीं आम्हीं मराठ्यांचें काय वांकडें केलें असतें? पण तो चिमाजीअप्पा सज्जन पडला, म्हणून त्यानें तुम्हां दोघींच्या केंसालाही धक्का न लावतां उलट तुमच्या पाठीराख्या भावाप्रमाणें तुमचा यथोचित गौरव करून तुम्हांला तुमच्या घरीं पाठविलें. एवढा वंदनीय उपकार-कर्ता तो, त्याच्या उपकारांची फेड पोर्शिया! तुम्हीं दोन्ही बहिणींनीं अशी अपकारानें करूं पहावी? आपला धर्मदेखील आपल्याला सांगतो कीं, जे आपणा-ला अपकार करतात त्यांच्यावरही आपण उपकार करावा; परमेश्वर जसा सम-दृष्टि आहे तसें तुम्हीं असावें; पण तूं तर उपकारकर्त्यावर विश्वासघातानें अपकाराची आग पाखडीत आहेस! यापेक्षां शीलभ्रष्ट होण्याची आणखी काय बाकी राहिली? पोर्शिया! खरोखर, तूं इतक्या थराला जाऊन आपला अधःपात करून घेण्याला तयार होशील असें मला वाटलें नव्हतें."

"डोमिंगो! मी ह्या तुमच्या बोलण्याचा एवढाच अर्थ घेतें कीं, तुमचें माझ्यावर प्रेम नाहीं; तुम्हांला माझा कंटाळा आला आहे; त्या चेटकीनें कांहीं चेटुक करून तुम्हांला भारून टाकलें आहे.—"

"बस्स! पुरे कर, एवढेंच ना तूं मला सांगणार होतीस?"

"तुम्हीं माझा शब्द धिक्कारला तर तुमच्यावर संकटांचे पर्वत कोसळतील व त्या भाराखालीं तुम्ही चिरडून जाल."

"माझी काळजी घेणारा परमेश्वर सर्वसमर्थ आहे."

"एकूण तुम्हांला ही तुमची लहर माझ्या प्रेमापेक्षांही प्रिय वाटते ना?"

इतक्यांत दरवाजावर कोणाचीशी थाप ऐकूं आली. पोर्शिया दचकून उठली व दरवाजाकडे गेली. ती दरवाजा उघडून पहाते, तों सेनापतीचा शिपायी दर-वाजाबाहेर उभा! जवळच इडाही उभी होती. वस्तुतः इडा तिथें प्रारंभापासून

चोरून उभीच होती; पण पोर्शियानें 'तूं केव्हां आलीस' असें तिला विचारलें, तेव्हां 'ही आतांच सेनापतिसाहेब उठल्याची खबर देण्यासाठीं आलें' असें उत्तरली.

" काय रे ? " पोर्शियानें त्या नोकराला विचारलें.

" सेनापतिसाहेब उठले ही खबर देण्यासाठीं आलों." नोकर म्हणाला.

डोमिंगोनें तें ऐकलें व तो सेनापतीकडे जाण्याला निघतां निघतां पोर्शियाला म्हणाला, " पोर्शिया ! मी जातों."

" जरा थांबा " पोर्शिया म्हणाली.

" आतां वेळ नाहीं." डोमिंगो उत्तरला.

" मग असें पहा, बाबांकडून परत आल्यावर इकडे याल का ? "

" तें कांहीं नक्की सांगत नाहीं. शक्य झालें तर येईन."

" असें नको, याच; आणि हें पहा, जरा इकडे या." असें म्हणून डोमिंगोला हाताशीं धरून ती पुन्हा आंत गेली व हळुहळू त्याला म्हणाली, " डोमिंगो ! माझी एवढी विनंति ऐका, आतां बाबा कदाचित् तुमच्यावर रागावले तरी तुम्ही सुज्ञपणानें त्यांचा राग निवेल असें करा. ते तुमच्यावर जी कामगिरी सोंपवितील ती मुकाटपणें पत्करा. मीं इतक्या प्रयत्नांनीं जमवून आणलेली संधि वांया दवडूं नका. तुमच्या स्वतःसाठीं नाहीं तर निदान माझ्यासाठीं तरी एवढें करा.''

" बरें आहे." डोमिंगो बाहेर जावयाला निघतां निघतां उद्गारला, " परमेश्वर मला जशी बुद्धि देईल तसें मी करीन."

" असें करूं नका. हा योगदेखील परमेश्वरानेंच जमवून आणला आहे अशी श्रद्धा ठेवून वागा. ओंठाशीं लागणारा अमृताचा पेला अविचारानें झुगारून देऊं नका."

यावर " पण तो अमृताचा पेला नसून विषाचा असला तर ? पण पाहूं काय होतें तें." असें म्हणून डोमिंगो घाईघाईनें तेथून निघून गेला. तो दृष्टिआड होईतों पोर्शिया त्याच्याकडे चातकाप्रमाणें टक लावून पहात होती.

प्रकरण पंधरावें

# अकल्पित अनर्थ

त्या दिवशीं सेनापति सिल्व्हेरा सूर्योदयाच्या सुमाराला बैठकखान्यांत येतो, तों थोड्या दिवसांपूर्वी सेनापतीकडून संभाजी आंग्र्यांकडे विनंतिपत्र घेऊन गेलेला माणूस तेथें येऊन पोंचला. ॲन्टोनिओ पूर्वींच तेथें येऊन बोलत बसला होता व किल्लेदार पेरीराही नुक्ताच तेथें येऊन पोंचला होता. पेरीरानें तेथें येतांच प्रथम डोमिंगोविषयीं चौकशी केली व तो पोर्शियाच्या महालांत बोलत बसला आहे असें कळतांच त्याला बोलावणें पाठविलें होतें. सेनापतीनेंही आंत येतांच पेरीरापाशीं डोमिंगोची चौकशी केली व ती नेहमींहून कठोर शब्दांनीं केली. पेरीराला वाटलें कीं, डोमिंगोनें आपल्या निकडीच्या आमंत्रणाची अवज्ञा केली असा सेनापतीचा ग्रह झाला असावा; म्हणून त्यानें शक्य तों डोमिंगोची बाजू सांवरण्याचा प्रयत्न केला. पण सेनापतीनें तें मनावर न घेतां उलट पेरीराला टोमणा दिला, "किल्लेदार! तुम्हांला तुमच्या मुलाविषयीं कळकळ वाटणें साहजिक आहे व मलाही त्याच्याविषयीं आजवर तितकीच कळकळ वाटत होती; पण या घटकेपर्यंतच्या अनुभवावरून मला वाटूं लागलें आहे कीं, माझी ती कळकळ अस्थानीं होती. आणि म्हणूनच मी तुम्हांला आगाऊ सांगून ठेवतों कीं, आतां डोमिंगो इथें आल्यास व त्याच्या अन्यायाच्या वर्तनाबद्दल त्याला योग्य ती शिक्षा करणें मला प्राप्त झाल्यास तुम्हीं आडकाठी करतां कामा नये."

पेरीराला सेनापतीच्या ह्या जळजळीत बोलांचा कांहींच अर्थ कळेना. तो बुचकळ्यांत पडला कीं, इतक्या थोड्या वेळांत सेनापतीच्या वृत्तींत इतका बदल होण्याला कारण तरी काय झालें? पेरीराला अशी चिंता वाटण्याचें कारण रात्रभर त्याचें सेनापतीशीं जें खलबत झालें होतें, त्यांत डोमिंगोला आपलें वर्तन सुधारण्याची आणखी एकवार अखेरची संधि देण्याचें ठरलें होतें व म्हणूनच सेनापतीच्या नांवानें पेरीरानें पहांटेला घाईघाईनें डोमिंगोला बोलावणें पाठविलें होतें. डोमिंगो कदाचित् त्या आमंत्रणाची अमान्यता करील, ह्या भीतीनें स्वतः पेरीरा मुद्दाम सकाळींच आपल्या वाड्याकडे गेला होता. तेथें त्याला डोमिंगो पूर्वींच सेनापतीच्या वाड्याकडे गेल्याचें कळलें तेव्हां तो बराच निर्घोर होऊन माघारा आला होता.

माघारा येतांच त्याला डोमिंगो पोर्शियाच्या महालांत बोलत बसला आहे असें कळलें, त्यांतही त्याला अनुचित असें कांहींच वाटलें नाहीं; पण सेनापतीचे आतांचे उद्गार ऐकून मात्र त्याला पुन्हा भय उत्पन्न झालें. सेनापति तेथें येतांच संभाजी आंग्र्याकडून आलेल्या मनुष्याशीं बोलण्यांत गुंतला असतां पेरीरानें क्षणभर बाहेर जाऊन सेनापतीच्या नोकरापाशीं चौकशी केली; तेव्हां सेनापति आतां मार्गारेटला भेटून आला; त्या भेटींत त्यांचा डोमिंगो व पोर्शिया यांच्या भेटींतील संभाषणाविषयीं थोडा खल झाला असें कळून आलें. पण त्यांत डोमिंगोचा सेनापतीला राग येण्याजोगें काय होतें याचा मात्र त्याला पत्ता लागेना. तेवढ्यांत डोमिंगोही तेथें येऊन हजर झाला. पेरीरानें त्याला बाजूला घेऊन हळुहळू कायसें सांगितलें, व डोमिंगोनेंही अर्थशून्य होकार देऊन आपल्या पित्याचें तोंडदेखलें समाधान केलें. त्या पितापुत्रांचें काय संभाषण झालें हें मात्र तिसऱ्या कोणालाही कळलें नाहीं.

दरवाजाबाहेर त्या पितापुत्रांचें संभाषण चाललें असतां आंत सेनापतीनें आंग्र्यांकडून आलेल्या माणसाकडून आंग्र्यांचा लेखी उत्तराचा मोहोरबंद लिफाफा मागून घेऊन उघडिला. तों तें उत्तर मराठींत लिहिलेलें होतें. 'संभाजी आंग्रे आम्हांला मदत करावयाला खास कबूल असला पाहिजे. कारण त्याला मानाजी आंग्र्यावर सूड घ्यावयाचा आहे.' असें सेनापतीनें स्वतःशीं म्हणून तें पत्र ॲन्टोनिओच्या हातीं देऊन त्यांना सांगितलें, "सरदारसाहेब! एवढें उत्तर वाचा पाहूं!"

ॲन्टोनिओनें तें उत्तर प्रथम स्वतःच्या मनाशीं वाचलें. तें वाचतांना ॲन्टोनिओची मुद्रा जास्त जास्त गंभीर होऊं लागलेली पाहून सेनापतीला संशय आला व त्याचीही चर्या गंभीर झाली. ॲन्टोनिओनें पत्र वाचून होतांच एक दीर्घ उसासा सोडला. तो पाहून तर सेनापतीची त्या पत्राविषयीं शेंकडा पाऊणशें हिस्से निराशा झाली. त्यानें ॲन्टोनिओला विचारलें, "आंग्रे काय म्हणतो?"

ॲन्टोनिओ खिन्न वदन करून उत्तरला, "ते आपणाला साह्य करावयाला तयार नाहींत."

ॲन्टोनिओच्या तोंडून हे शब्द निघावयाला व पेरीरा आणि डोमिंगो आंत यावयाला एक गांठ पडली. डोमिंगो आंत येतांच रीतीप्रमाणें सेनापतीला अभिवादन करून समोर उभा राहिला; पण सेनापतीनें त्याच्याकडे बळेंच

दुर्लक्ष्य करून त्याला बसावयाला देखील न सांगतां ॲन्टोनिओला म्हटलें, "तें पत्र समग्र वाचा पाहूं!"

ॲन्टोनिओनें तें पत्र वाचून दाखविण्याला सुरुवात केली; त्या पत्रांतील मुख्य मजकूर पुढीलप्रमाणें होता.

"...गोरे लोक मोठे धूर्त; ते फार धोरणानें व सावधपणें वागतात; या बाबतींत इंग्रज काय किंवा फिरंगी काय सारखेच; असा आजवर आमचा जो समज होता, तो तुम्ही तुमच्या पत्रानें खोटा पाडला. आम्हां आंग्र्यांच्या बाबतींतील तुमचा अंदाज चुकला. आमची भाऊबंदकी आमच्यापुरती, देशाच्या-देवाच्या धर्माच्या रक्षणाची बाब उत्पन्न झाली कीं, आम्ही सारे एक. मानाजी आंग्रे कितीही आमच्या विरुद्ध वागत असला तरी तो माझा भाऊ आहे. पेशव्यांनीं आमचें अपरिमित नुकसान केलें, आम्हांला धुळींत बसविलें हें जरी खरें, तरी पेशवे आमच्या परमपूज्य छत्रपतींचे प्रतिनिधि, आमचे हिंदु बांधव व ह्या धर्मसंग्रामाचे प्रमुख नेते म्हणून आम्हांला वंद्य आहेत. पेशवे सर्वत्र ब्राह्मणशाही करूं पहातात असे तुम्ही नक्राश्रु गाळतां व त्या ब्राह्मणशाहीविरुद्ध आम्हीं शस्त्रग्रहण करावें म्हणून आम्हांला पाठीशीं घालूं पहातां; पण तुमचे असले लांडे कारभार आमच्यापाशीं मुळींच चालावयाचे नाहींत. आमच्या दौलतीची व इभ्रतीची काळजी घेण्याला आम्ही समर्थ आहों. तुम्ही मध्यें लुडबूड करण्याचें कारण नाहीं. आम्हांला तुमची मदत नको व आम्ही तुम्हांला मदत करणार नाहीं...."

"बस्स! बस्स! ॲन्टोनिओ तें पत्रवाचन पुरें करा. त्यांतला आशय मला समजला." सेनापति कपाळाला आंठ्या घालून त्रासिक स्वरांत उद्गारला.

ॲन्टोनिओ पुन्हा एकवार पत्रावरून नजर फिरवीत म्हणाला, "संभाजी आंग्रे पुढें रामानंदांना पकडण्याची तजवीज करण्याचेंही नाकबूल करून उलट त्यांना आपल्या गुरुस्थानीं मानतात!" तो भुंवया चढवीत म्हणाला, "एकूण सुंभ जळलें तरी अजून पीळ कायमच आहे. सेनापतिसाहेब! ह्या मगरूर आंग्र्याचें आपण आज ना उद्यां शासन केलेंच पाहिजे. सेनापतिसाहेबांना उद्देशून इतकी उद्दामपणाची भाषा वापरतात म्हणजे काय गोष्ट आहे? बस्स! ही मोहीम

संपल्यावर आपण प्रथम संभाजी आंग्र्यांची खोड मोडण्याची कामगिरी हातीं घेतलीच पाहिजे."

"तें पुढचें पुढें पहातां येईल." सेनापति पेरीराकडे वळून म्हणाला, "किल्लेदार! पहा! धर्मसंग्राम म्हणतांच संभाजी आंग्र्यासारखा हिंदु, पेशवे, मानाजी आंग्रे वगैरे आपल्या कट्ट्या प्रतिस्पर्ध्यांशीं देखील किती दिलजमाईनें व एकोप्यानें वागण्याला तत्पर असतो तें पहा! आणि—" तो डोमिंगोकडे अंगुलीनिर्देश करून म्हणाला, "हे तुमचे चिरंजीव अशा शत्रूंवर अस्थानीं दया दाखवून उघडपणें देशद्रोह व धर्मद्रोह असलीं घोर पातकें जोडून आपल्या ख्रिस्ती समाजाची अब्रू घालवितात!"

पेरीरा चट्कन् उभा राहून सेनापतीला दोन्ही हात जोडून केंविलवाण्या स्वरांत उद्गारला, "सेनापतिसाहेब! झाल्या त्या गोष्टी होऊन गेल्या. डोमिंगो बुद्धिपुरःसर तसें वागला असें नाहीं; त्याच्या हातून ती नजरचूक घडली; त्याबद्दल त्याला आतां पश्चात्ताप होत आहे. तो आपली क्षमा मागून पुढें आपल्या आज्ञेबरहुकूम वागण्याला तयार आहे. आपण थोर मनानें त्याला क्षमा करून त्याच्याकडून सेवा घेतली पाहिजे."

डोमिंगो सेनापतीसमोर एखाद्या पुतळ्याप्रमाणें निश्चलपणें ताठ उभा होता. पेरीरानें आपल्या शब्दांतून जो भाव दर्शित केला, त्याचा मागमूसही डोमिंगोच्या चर्येवर नव्हता. सेनापतीनें एकवार तीक्ष्ण नजरेनें डोमिंगोकडे पाहिलें, तरीही नमतें घेण्याची डोमिंगोची इच्छा त्याला दिसेना. समुद्राच्या पर्वतप्राय लाटा एकसारख्या धडाधड येऊन एखाद्या खडकावर जोराजोरानें आदळत असल्या तरी तो खडक जसा अचल व अभंग असावा, तशी डोमिंगोची अवस्था होती. पेरीराचें बोलणें ऐकून सेनापतीनें अपेक्षा केली होती कीं, डोमिंगो खरोखरच क्षमा मागेल; पण तसें कांहींच लक्षण दिसेना. तेव्हां सेनापति पेरीराला म्हणाला, "किल्लेदार! तुम्ही सांगतां खरें; पण डोमिंगोचें मस्तक माझ्यासमोर क्षमेसाठीं नमण्याचें बाजूलाच राहिलें, त्याच्या पापणीचा एक केंसही लवावयाला तयार नाहीं! याचा अर्थ मी असाच घेऊं काय, कीं डोमिंगो कोणत्याच गोष्टींत नमतें घ्यावयाला तयार नाहीं?"

पेरीरानें संतापून भेदक दृष्टीनें एकवार डोमिंगोकडे पाहिलें व त्या संतापाच्या भरांत तो कांहीं वेडेंवाकडें बोलणार, तोंच डोमिंगो आपला धैर्यमेरु लवमात्रही

ढळूं न देतां सेनापतीकडे वळून उत्तरला, "सेनापतीसाहेब! मी आपणासमोर एकदां सोडून शंभरदां मस्तक नमविण्याला तयार आहें व आपण जो हुकूम कराल त्याची तामिली करण्यालाही माझी ना नाहीं. सर्वश्रेष्ठ अधिकारी व वडील माणूस ह्या दोन्ही नात्यांनीं माझ्यावर तशी सत्ता गाजविण्याचा आपणाला अधिकार आहे. पण यापूर्वी माझ्या हातून घडलेल्या विशिष्ट गोष्टींविषयीं मीं क्षमा मागावी असा आपला आग्रह असेल तर तें मात्र माझ्या वस्तु शक्य नाहीं."

"याचा अर्थ काय!" ॲन्टोनिओ डोमिंगोकडे वळून मध्येंच म्हणाला, "डोमिंगो! चुका माणसाच्या हातून झाल्या म्हणजे त्या चुकांबद्दल वरिष्ठांनीं त्याला जाब विचारावयाला नको! आणि माणसानें त्याबद्दल क्षमा मागावयाला नको! असें पहा, मुंगी होऊन साखर खावी."

ॲन्टोनिओच्या आगंतुक मध्यस्थीवर डोमिंगो कांहींच बोलला नाहीं. त्यानें एकवार उपेक्षाबुद्धीनें त्याच्याकडे पाहिलें मात्र.

"तसें असेल तर माझीही पूर्वीच्या गोष्टी उकरून काढण्याची इच्छा नाहीं; पण नवीन कामगिरी तुला सांगण्यापूर्वी तुला एका गोष्टीची मात्र जाणीव देणें प्राप्त आहे; ती ही कीं, तुझ्या चुकीमुळें आमचा नाश व शत्रूचा फायदा यापुढें तरी होतां कामा नये." सेनापति म्हणाला.

"बोलूं नये म्हटलें तरी आपण मुद्दाम बोलूं लावतां. 'डोमिंगो किंचित् कठोर शब्दांत उद्गारला, "सेनापतिसाहेब! हरघडीला आपण माझ्या चुकीचा उल्लेख करतां, ती माझी चूक कसली? आज इतके दिवस माझ्याविरुद्ध ज्या एका गोष्टीविषयीं इतका हलकल्लोळ माजून राहिला आहे, ती माझी चूकही नव्हे व नजरचूकही नव्हे, मीं जें जें कांहीं केलें तें तें माझ्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून हेतुपुरस्सर केलें आहे. माझ्या हातून नारो शंकराची सुटका झाली व त्यानें पराक्रम गाजवून आमच्या सैन्याची हबेलंडी उडवून दिली असली तर ती माझी चूक कशी? सेनापतिसाहेब! आपण मला नारो शंकराचा न्याय करावयाला सांगितला; मीं परमेश्वराला व माझ्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून योग्य तो न्याय केला.—"

तो आमचा शत्रु होता; त्याचें डोकें तोडून चिमाजीअप्पा पेशव्यांकडे नजर म्हणून पाठविण्याचा माझा निर्धार होता; हें सारें तुला माहीत होतें." सेनापति मध्येंच उद्गारला.

डोमिंगो उद्गारला, " नाहीं. नाहीं.—"

" काय ? तो शत्रु नव्हता ? " सेनापतीनें रागानें विचारलें.

" काय ? नारो शंकर हा आपला शत्रु नव्हता ? " ॲन्टोनिओनें विकट हास्य करीत उद्गार काढले. " यांची ही दिशाभूल झालेली आहे."

डोमिंगो ॲन्टोनिओकडे तिरस्कारपूर्ण दृष्टीनें पहात म्हणाला. " असें पहा, जन्मांधांनीं एखाद्याला वाट दाखविण्याचें अवडंबर माजविण्यांत शहाणपणा नाहीं. ज्यांनीं स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीसह स्वतःला माडभर खोलीच्या अधःपाताच्या गर्तेत गाडून घेतलें आहे, त्यांनीं माझ्यासारख्या मार्गस्थाला उन्नतीचें शिखर कसें गांठावें याचा उपदेश करण्याच्या भरीला पडूं नये." लगेच तो सेनापतीकडे वळून म्हणाला, " सेनापतिसाहेब ! नारो शंकर हा आपला शत्रु नव्हता. प्रतिपक्षाकडून तडजोडीचें बोलणें करण्यासाठीं आलेला मनुष्य कधींच शत्रु म्हणून गणला जात नाहीं हे एक व दुसरें, तो आपला शत्रु होता असें घटकाभर मानलें तरी शत्रूशीं विश्वासघातानें वागणें धर्मसंग्राम नव्हे."

" डोमिंगो ! धर्माधर्माच्या गोष्टी तूं मला शिकवूं नकोस. धर्म कोणता व व अधर्म कोणता हें मला चांगलें कळतें. तूं माझ्या आज्ञे इच्छेविरुद्ध वर्तन केलेंस किंवा नाहींस तें सांग."

" होय. मीं आपल्या इच्छेविरुद्ध वर्तन केलें खरें; पण सेनापतिसाहेब ! आपण मला मारेकऱ्याचें काम करावयाला सांगितलें नव्हतें; न्याय करण्याचें काम सांगितलें होतें.—"

" खबरदार ! असले वरचढपणाचे शब्द तूं कोणासमोर उच्चारीत आहेस याची तुला जाणीव आहे ना ! "

" मला पूर्ण जाणीव आहे, कीं मी वरचढपणाचा एकही शब्द उच्चारीत नसून सत्य तेंच बोलत आहें. पण आपणाला तें रुचत नसेल, तर मी माझे शब्द आंवरतें घेतों."

पेरीरा इतका वेळ अगदीं स्तब्ध होता; तो आतां सेनापतीला म्हणाला, " सेनापतिसाहेब ! पोरगा हूड आहे; त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां आपण माझ्याकडे पाहून व आपल्या भावी कार्यावर दृष्टि देऊन त्याला काय ती आज्ञा

करावी. त्या आज्ञेची अंमलबजावणी त्याच्याकडून होईल अशी मला पूर्ण आशा आहे."

"त्याला तरी तुम्ही जबाबदार आहां का ?"

"होय."

"पहा बरें ! आतांच माझ्या कानीं आलेल्या गोष्टींवरून मी आतां जी कामगिरी डोमिंगोवर सोंपविणार आहें ती पार पाडण्याची त्याची तयारी असेलसें मला वाटत नाहीं." लगेच सेनापतीनें डोमिंगोकडे वळून विचारलें, "डोमिंगो ! आतां पोर्शियाच्या महालांत तूं जे विचार प्रदर्शित केलेस, ते अजूनही कायम आहेत का ? कीं किल्लेदारांच्या आतांच्या उपदेशानें तुझें डोकें ठिकाणावर आलें आहे ?"

ज्या बैठकखान्यांत हें संभाषण सुरू होतें, तो फारच भव्य व सुशृंगारित असा सेनापतीच्या खासगी बैठकीचा दिवाणखाना होता. ह्या दिवाणखान्यांत सहसा कधीं बैठक भरत नसे व भरलीच तर ती अत्यंत खासगी व महत्त्वाची असे. ह्या दिवाणखान्याला लागूनच दोन बाजूंना दोन भव्य दालनें होतीं; त्यांपैकीं एका दालनांत पोर्शियाचें गानमंदिर असून दुसऱ्या दालनांत सेनापतीचें विश्रांतिस्थान असे. पोर्शियाचा कंठ फार मधुर होता व ती गायनकलेची भोक्ती होती. बहुधा रोज कांहीं घटका ती आपल्या गानमंदिरांत गात बसून स्वतःचें मन रिझवीत असे. कधीं कधीं सेनापतीदेखील विश्रांतीच्या वेळीं तिच्या गानमंदिरांत जाऊन आपल्या त्रस्त मनाची करमणूक करी. मधल्या भव्य दिवाणखान्यांत सर्व घरगुती मंडळी बहुधा रोज अर्थात् शांततेच्या वेळीं गुजगोष्टी करीत बसत असत. आजची वेळ गुजगोष्टींची नव्हती, तर आजचा विषय पोर्शिया व मार्गारेट ह्या दोघींनाही कोणत्याना कोणत्या दृष्टीनें जिव्हाळ्याचा असल्यानें त्या दोघीही अनुक्रमें गानमंदिरांत व सेनापतीच्या विश्राम मंदिरांत दरवाजाआड नव्हे, दरवाजावरील पडद्याआड उभ्या राहून दिवाणखान्यांतील संवाद ऐकत होत्या. पोर्शियाची विश्वासू दासी इडा पोर्शिया शेजारींच उभी होती. सेनापतीनें थोड्या वेळापूर्वीं पोर्शिया व डोमिंगो यांचा जो संवाद झाला त्याचा संभाषणांत उल्लेख करतांच डोमिंगोला एकदम आश्चर्य वाटलें कीं, 'असें कसें झालें ! इतक्या झटपट ही बातमी सेनापतीच्या कानांवर कशी आली ? पोर्शियानें तर रागाच्या भरांत ही चुगली केली नसेल ?' ह्या संशयाचा डोमिंगोच्या मनावर

त्याच क्षणाला एवढा जबरदस्त परिणाम घडला कीं, त्यामुळें पोर्शिया आततायी आहे, तिचें आपणावरील प्रेम नाटकी होतें, वगैरे अनेक आरोप त्यानें मनोमन पोर्शियावर केले.

पण त्याच वेळीं कोणीं पोर्शिया व मार्गारेट ह्या दोघी उभ्या होत्या त्या दालनांच्या दरवाजांवरील पडदे दूर सारून पाहिलें असतें, तर त्या पहाणाराला मार्गारेटच्या गौरवर्ण गुलाबी चर्येवर आसुरी साहसाचा रक्तिमा उजळलेला दिसला असता; त्याप्रमाणेंच पोर्शिया 'असें कसें झालें' असें मनाशीं पुटपुटत इडाला तोच प्रश्न विचारीत असून इडा सफाईनें कानांवर हात ठेवीत आहे असा देखावा आढळून आला असता; मात्र तेव्हां कोणी इडाच्या अंतःकरणाचा ठाव घेऊं शकलें असतें तर 'मीं बड्या मेमसाहेबांना डोमिंगो व पोर्शियाबाईसाहेब यांच्या संवादाची बित्तंबातमी दिली हा प्रकार पोर्शियाबाईसाहेबांना कळल्यास माझी काय अवस्था होईल' ह्या भयानें तिचें अंतःकरण धडधड उडत असलेलें आढळलें असतें.

" सेनापतिसाहेब ! कोणते विचार आपण म्हणतां ? " डोमिंगोनें विचारलें.

सेनापतीनें कर्ड्या आवाजांत विचारलें, " पोर्शियानें जो उपाय तुला सुचविला, त्याचें अवलंबन करून स्वतःला व स्वतःबरोबरच इतरांनाही यश मिळवून देण्याला तुझी तयारी आहे का ? "

यावर डोमिंगोचें काय उत्तर मिळतें याची वाट न पाहतां पेरीरा किंचित् उतावीळपणानें उत्तरला, " सेनापतिसाहेब ! आपण मतें घेत बसूं नका; एकदम आज्ञा करा."

ॲन्टोनिओ म्हणाला, " सरदारसाहेब आतां खास शिस्तींत वागतील असें मला वाटतें. आपल्या पक्षाचा अभिमान सरदारसाहेबांना नसेल म्हणजे काय गोष्ट आहे ! "

वस्तुतः पोर्शिया व डोमिंगो यांचें काय संभाषण झालें याविषयीं ॲन्टोनिओ-ला गंधवार्ताही नव्हती; तरीही त्याने लब्धप्रतिष्ठितपणें शिष्टाई चालविलेली ऐकून डोमिंगोला राग आला पण सेनापतींचा उपमर्द होईल ह्या भयानें त्यानें मूग गिळले.

" सेनापतिसाहेबांचा हुकूम होण्यापूर्वीं मला नम्रतापूर्वक सूचनेदाखल दोन शब्द बोलावयाचे आहेत." डोमिंगो म्हणाला, " आम्हां उभयतांचें संभाषण

सेनापतिसाहेबांच्या कानांवर इतक्या लौकर कसें आलें हें जरी मला माहीत नाहीं; तरी ज्याअर्थीं तसा प्रकार घडला आहे, त्याअर्थीं मलाही त्या बाबतींत माझ्या मनोदेवतेची आज्ञा मला स्पष्टपणे आपणासमोर मांडणें भाग आहे. सेनापतिसाहेब! ह्या धर्मसंग्रामांत आमच्या पक्षानें प्रारंभापासूनच अधर्माची कांस धरलेली आहे, त्याअर्थीं आम्हांला ह्यांत यश येणें शक्य नाहीं.—"

"मला कोणाचाही भविष्यवादीपणा नको आहे." सेनापति मध्येंच म्हणाला.

"मी भविष्य सांगत नाहीं, वस्तुस्थिति सांगतों आहें. प्रभूचें धर्मशासन अदृश्य रूपानें चालू असतें, म्हणून आपण तिकडे घटकाभर कानाडोळा केला तरी वस्तुस्थितीपासून प्राप्त होणारा अनुभव तर आपण डोळ्याआड करूं शकणार नाहीं ना! असें पहा, इतके दिवस ही मोहीम सुरू होऊन झाले, इतक्या दिवसांत आपल्या बाजूला विजयश्रीनें एकदां तरी आपला कृपाकटाक्ष फेंकला का! शत्रुबलाची आपण आपल्या बलाशीं तुलना केली तर आपणांला असेंच दिसून येईल कीं, शत्रुबल दिवसेंदिवस वाढत आहे तर आपलें बल दिवसेंदिवस कमी कमी होत आहे. रोज रोज नव्या नव्या हिंदुधर्माभिमानी स्वयंसैनिकांची शत्रुपक्षांत शेंकड्यांनीं भरती होत आहे; इतकेंच काय, पण कोणत्याना कोणत्या रीतीनें एकवार बाटून ख्रिस्ती झालेले लोक पुन्हा आपल्या धर्मांत जात आहेत, यामुळेंही आपल्या सैन्याला एकसारखी ओहोटी लागलेली आहे. जे एतद्देशीय सैनिक आपल्या बाजूनें लढत आहेत, तेही केवळ निरुपाय, सत्तेपुढें शहाणपण नाहीं म्हणून लढत आहेत. आतां आपणाला एकही मार्ग मोकळा नाहीं, एकही ठाणें मोकळें नाहीं, बाहेरची मदत नाहीं, अशा स्थितींत सेनापतिसाहेब! आपण मराठ्यांच्या सूचनेची पडत्या फळाची आज्ञा घेऊन तहाला मान्यता दिली असती, तर फार चांगलें झालें असतें. आपण रागाच्या सपाट्यांत तो बेत कोणा विघ्नसंतोषी पिसाटांच्या नादानें फिसकटून टाकला; तें झालें तें होऊन गेलें. पण आतां तरी आपण मराठ्यांशीं तह करावा व रक्तपात थांबवावा असें माझ्या अल्पमतीला वाटतें,—"

डोमिंगोनें विघ्नसंतोषी माणसांचा मोघम निर्देश केला; तरी तो बाण ॲन्टोनिओच्या वर्मीं बसला. लगेच ॲन्टोनिओ नाक फेंदारून म्हणाला, "सेनापतिसाहेब! आपल्यादेखत यांनीं ही आमची निंदा चालविली आहे.

माझी आपल्या ठायीं किती अनन्यसामान्य भक्ति आहे हें आपण जाणतांच. मी तर माझ्या धर्मासाठीं प्राणदेखील देण्याला तयार आहें."

"यालाच 'चोरांच्या उलट्या बोंबा' म्हणतात!" डोमिंगो संतप्त होऊन सेनापतीकडे वळून म्हणाला, "आणि सेनापतिसाहेब! अशा चोरांच्या नादीं लागूनच आपण हे हत्याकाण्ड आरंभिलें आहे." तो ॲन्टोनिओकडे वळून म्हणाला, "ॲन्टोनिओ! तुम्ही मला धर्माभिमानाच्या गप्पा सांगतां; पण तुम्हांला कितपत धर्माभिमान व धर्मज्ञान आहे हें मला माहीत आहे. मानमरातबाच्या व धनवैभवाच्या अथवा एखाद्या गुल्ज़ार छेलछबेलीच्या नादानें आपल्या धर्मावर लाथ मारून परधर्माला नाममात्र कंवटाळणाऱ्या स्वार्थी किड्यानें मला धर्माची शिकवण द्यावयाला नको आहे. सेनापतिसाहेब! आपण अशा लांड्या कोल्ह्यांच्या कावेबाज उपदेशाला भुलून आजवर फसलां व निष्कारण स्वजनघात आणि स्वधर्मघात होऊं दिला. मी लहान तोंडीं मोठा घांस घेतों आहें असें आपणाला वाटेल, पण सत्य तें सत्य—मला माझा प्रभु जशी प्रेरणा देतो तसें मी बोलतों आहें;—आपण या घटकेला अशा स्वार्थी फितुरांच्या तंत्रानें न वागण्याचा निर्धार करून आपल्या प्रभूच्या पवित्र धर्माज्ञा ध्यानीं आणा, म्हणजे आपली ताबडतोब खात्री पटेल कीं, आपण आपल्या पूर्वजांपासून आपल्या ख्रिस्ती धर्माच्या नांवावर ह्या भूमींत जे अमानुष अत्याचार चालविले आहेत, त्यांतच आपल्या अपयशाचें—सर्वनाशाचें बीज आहे.—"

"बस्स! डोमिंगो! मला तुझें पांडित्य नको आहे. मला सर्व कांहीं कळतें. मला फक्त तुझ्यापासून एवढाच खुलासा पाहिजे आहे कीं, तूं माझी आज्ञा यापुढें तरी मानण्याला तयार आहेस किंवा नाहीं?" सेनापतीनें आपल्या कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् सामर्थ्याची घमेंडखोर जाणीव हृदयाशीं बाळगून विचारलें.

"आपली आज्ञा काय आहे? ती माझ्या सदसद्विवेकबुद्धीला पटण्यासारखी असली तर ती मी अवश्य पाळीन." डोमिंगो नम्रपणें उत्तरला.

"पण डोमिंगो! तूं लढवय्या आहेस व त्या नात्यानेंच तुला माझी आज्ञा पाळणें भाग आहे. मी सेनापति आहें व तूं सैनिक आहेस. सैनिकाचें कार्य स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीवर भर देऊन स्वतंत्रपणें वागण्याचें नाहीं; सेनापति आज्ञा करील तिची निमूटपणें अंमलबजावणी करण्याचें आहे. माझी तुला अशी आज्ञा आहे कीं, तूं ताबडतोब अर्नाळ्यावर छापा घालून तो किल्ला हस्तगत केला

पाहिजे, आणि चिमाजीअप्पा पेशवे व रामानंदस्वामि यांना पकडून आमच्यासमोर आणलें पाहिजे."

"पण समजा, सेनापतिसाहेब! ते दोघे अथवा त्यांतील एखादा कोणी झटापटींत ठार झाला तर! तेवढी आम्हांला आपण मोकळीक ठेवली पाहिजे." ॲन्टोनिओ उद्गारला.

"ते जिवंत हातीं न लागतां समरांगणांत अखेरपावेतों झगडतच राहिले तर अखेर तें प्राप्तच आहे." सेनापति लगेच डोमिंगोकडे वळून म्हणाला, "बोल, डोमिंगो! ही आज्ञा तुला मान्य आहे किंवा नाहीं?"

डोमिंगोला होय किंवा नाहीं, कांहींच उत्तर देववेना. तो उभ्यानेंच आपली दृष्टि अंतर्मुख करून काय बोलावें व काय न बोलावें याचा विचार करीत होता त्या वेळीं बैठकींतील इतर मंडळींच्या चर्यांवर चिंतेचीं विचार-अभ्रें सांठलेलीं दिसतच होतीं; पण बैठकखान्यालगतच्या दोन महालांतून उभ्या असलेल्या पोर्शिया व मार्गारेट ह्या दोघींचेही डोळे डोमिंगोच्या उत्तराकडे लागून राहिलेले दिसत होते. मार्गारेट इतकी उत्कंठित कां झाली होती तें तिचें तिला माहीत. पोर्शियाची उत्कंठा आपणाला माहीत आहेच. जी गोष्ट पोर्शियानें डोमिंगोला थोड्या वेळापूर्वीं आत्यंतिक हिताची म्हणून सुचविली होती व जी डोमिंगोनें बहुतांशीं झिडकारली होती, तीच गोष्ट सेनापति बोलला होता; व आपल्या नाहींतर सेनापतीच्या शब्दाला तरी डोमिंगो मान देतोसें पहावें असें पोर्शियाला वाटणें अगदीं साहजिक होतें. सेनापतीनें तरी ती योजना बार्बाराकडून पोर्शियाला आलेल्या गुप्त पत्रांवरूनच ठरविली होती व तिच्या इष्टानिष्टतेबद्दल सेनापति, पेरीरा व ॲन्टोनिओ यांच्यांत खल होऊन ती योजना बार्बारानें पत्रांत दर्शविल्याप्रमाणेंच मुक्रर झाली होती.

"कां? डोमिंगो! तूं बोलत कां नाहींस?" सेनापतीनें विचारलें.

आतां डोमिंगो काय बोलतो तें ऐकण्यासाठीं पोर्शिया आत्यंतिक उत्कंठेनें आपल्या गानमंदिराच्या दरवाजावरील पडदा आणखी किंचित् बाजूला सारून बाहेर डोकावून पाहूं लागली. ॲन्टोनिओ जरी डोमिंगोकडून मानखंडित झाला होता, तरी त्याचेही हितसंबंध चिमाजीअप्पा व रामानंद पोर्तुगीजांच्या हस्तगत होण्यावर बरेचसे अवलंबून असल्यानें व डोमिंगोशिवाय तितक्या बेमालूमपणानें ती कामगिरी दुसऱ्या कोणाकडून पार पडणें शक्य नसल्यानें त्याला देखील

डोमिंगोचा होकारच पाहिजे होता. पेरीराचा तर डोमिंगो पोटजाळच होता; डोमिंगोचें कल्याण किंवा अकल्याण ठरण्याचा हा निर्वाणीचा क्षण आहे हें ओळखून पेरीरा मनांतून परमेश्वराची प्रार्थना करीत होता कीं, "प्रभो! डोमिंगोला सेनापतीचें आज्ञापालन करण्याची सुबुद्धि दे!" तो सेनापतीच्या दुसऱ्या प्रश्नावरही कांहीं बोलत नाहीं असें पाहून पेरीरा त्याला म्हणाला, "डोमिंगो! स्वतःचें जन्माचें कल्याण किंवा सर्वनाश करून घेण्याची ही संधि परमेश्वरानें तुला प्राप्त करून दिली आहे. तुझ्या स्वतःसाठीं, तुझ्या ह्या पित्या-साठीं, तुझी आई मृत्युशय्येवर पडली आहे तिच्यासाठीं, तुझ्या आवडत्या पोर्शीयासाठीं तरी तूं या वेळीं ही जबाबदारी अंगाबाहेर टाकतां कामा नये. आम्हां सर्वांचें सुख तुझ्या सुखी होण्यावर अवलंबून आहे. विजयश्रीनें तुला माळ घातलेली पाहून आम्हां सर्वांच्या अंगावर मूठभर मांस चढणार आहे."

सेनापति पुन्हा म्हणाला, "डोमिंगो! तुझ्या व आम्हां सर्वांच्या सुखसर्वस्वा-ची मदार ह्या एका विजयावर अवलंबून आहे, इतकेंच काय पण तुझ्या देशाचें व धर्माचें भवितव्यही चिमाजीअप्पा व रामानंद हे शत्रुपक्षांतून अस्ताला जाण्या-वर अवलंबून आहे."

डोमिंगो उद्गारला, "आपली अशी आज्ञाच असेल तर ती शिरसामान्य करणें मला कर्तव्यप्राप्तच आहे; पण अजूनही मी आपणाला सुचवितों कीं, ही गोष्ट माझ्या मनाविरुद्ध मला करावी लागेल. ज्या गोष्टींत एखाद्याचें मन नाहीं, ती गोष्ट त्याच्या हातून यशस्वितेनें तडीला जाईलच असें नाहीं. मी आजवर मोहिमेची जी परिस्थिति पहात आहें, तिच्यावरून आपणांला मराठ्यांवर विजय मिळविण्याची आशा नाहीं.—"

"निग्रहानें कार्य करण्याचें मनांत आणल्यावर आपणाला कोणतीही गोष्ट अशक्य नाहीं. माझा तर असा निर्धार आहे कीं, माझ्या अंगीं रक्ताचा शेवटचा बिंदु शिल्लक असे पावेतों मी माझ्या देशाच्या व धर्माच्या इभ्रतीसाठीं व कल्याणासाठीं लढणार; व माझ्या सर्व सेनानींनींही असाच निग्रह केला पाहिजे.", सेनापति उद्गारला.

"पण सेनापतिसाहेब! कोणता आपला देश व कोणता आपला धर्म? ज्या देशानें आपल्या लोकांना प्रथम आश्रय दिला, ज्या देशाच्या अन्नावर आपले सर्वांचे पिंड आजवर पोसले, तो हा हिंदुस्थान देशच आपला देश नव्हे का?

एकाचे एकवीस आपण ह्या भूमींतच झालों ना ? वैभवाच्या टोलेजंग हवेल्या आपण ह्या देशांतील रयतेच्या जिवावरच उभारल्या ना ? मग आपण देशाचा अभिमान धरावयाचाच तर तो ह्या देशाचा धरिला पाहिजे. आतां धर्माविषयीं बोलाल, तर--मला कटु सत्य बोलावें लागत आहे याबद्दल क्षमा करा. धर्म आपल्या लोकांनीं कुठें राखला आहे ? आज इतक्या पिढ्या आपले पोर्तुगीज लोक इथल्या निरुपद्रवी लोकांना हरतऱ्हांनीं गांजीत आले, हाच आपला धर्म काय ? आमच्या लोकांनीं धर्मप्रसाराच्या नांवावर ऐहिक स्वार्थ साधण्यासाठीं आजवर जो अमानुष जुलूम केला, त्याला जगाच्या पाठीवर तुलना नाहीं. खरा ख्रिस्तानुयायी इतका माणुसकीला पारखा कधींच होणार नाहीं. अशा अधर्माच्या पायावर उभारलेली आपली सत्ता परमेश्वर अबाधित राखूं म्हणेल तर त्याच्या परमेश्वरत्वाला कालिमा लागेल. आज आपणांवर जे परमसंकट कोसळलें आहे तें आमच्याच अघोर कर्माचें फळ आहे. आपला ख्रिस्ती धर्म आपणांला असे अत्याचार करण्याला सांगतो काय ? ख्रिस्ती धर्म इतर धर्मानुयायांवर जुलूम करा असे आम्हांला शिकवतो काय ? ”

“ बस्स ! बस्स ! ” सेनापति एकदम एखाद्या हिंस्र पशूसारखा खवळून गर्जत म्हणाला, “ डोमिंगो ! मला तुझें धर्मपांडित्य ऐकावयाला नको आहे. मला तुझ्याकडून एकच उत्तर पाहिजे आहे. तूं माझी आज्ञा पाळून ही कामगिरी पार पाडणार, कीं आपला सर्वनाश करून घेणार ? ”

सेनापतीच्या गर्जनेसरशीं पोर्शिया पडदा बाजूला सारून पुढें आली व एखाद्या कावऱ्याबावऱ्या हरिणीसारखी आपल्या पित्याच्या खुर्चीमागें उभी राहिली. डोमिंगोनें सहज तिच्याकडे पाहिलें, तेव्हां तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वहात असलेल्या त्याला आढळल्या. पेरीरा आपले सर्व मनोरथ व सर्व प्रयत्न वायां जाणार म्हणून खिन्न वदनानें खालीं मान घालून बसला. ॲन्टोनिओ कुतूहलपूर्ण नजरेनें डोमिंगो व पोर्शिया यांच्या चेहऱ्यांकडे पाहूं लागला. एकीकडे हा प्रकार होतो आहे तों डोमिंगो एकवार ओझरत्या दृष्टीनें पोर्शियाकडे पाहून सेनापतीकडे वळून उत्तरला, “ सेनापतिसाहेब ! मी खरा ख्रिस्ती आहें. शाश्वत सत्यासाठीं ज्याला आत्मयज्ञ करावा लागला व स्वतःच्या आत्मयज्ञानें ज्यानें सर्व जगाला सत्यव्रतपालनाचा धडा घालून दिला, त्या प्रभू येशूचा मी विनम्र अनुयायी आहे.” सेनापतीच्या त्या बैठकखान्यांत क्रूसावर खिळे ठोकून जखडून

ठार केलेल्या भगवान् येशू ख्रिस्ताची भव्य तसबीर टांगलेली होती, त्या तसबिरीकडे नजर देऊन मनोभावानें दोन्ही हात जोडून डोमिंगोनें क्षणभर मनोमय प्रार्थना केली व लगेच तो पुन्हा सेनापतीकडे वळून उद्गारला, "सर्वनाश! सर्वनाश! ज्या माझ्या प्रभूच्या पुण्यचरणांनीं पावन झालेल्या ह्या जगद्भूमीवरील एका रजःकणाइतकीही माझी योग्यता नाहीं, त्या प्रभूला देखील जर शाश्वत सत्यासाठीं इतक्या हाल-अपेष्टांत आत्मयज्ञ करावा लागला, तर माझी काय कथा! सेनापतिसाहेब! मला आपली अधर्माज्ञा मान्य करतां येत नाहीं; त्याबद्दल आपण जी शिक्षा कराल ती भोगावयाला मी तयार आहें."

आतां 'एक घाव दोन तुकडे होणार' याविषयीं कोणालाही शंका राहिली नाहीं. सेनापतीचा स्वभाव तापट, त्याच्या मुखांतून आतां काय शब्द निघतील याचा कोणाला कांहीं नेम उरला नाहीं. पोर्शिया तर भीतीनें थरथर कांपूं लागली. सेनापति संतापानें थरारत म्हणाला, "मी सेनापति या नात्यानें तुला हुकूम करतों कीं, तूं अर्नाळ्याच्या कामगिरीवर गेलेच पाहिजे. सेनापतीचा हुकूम अमान्य करणाऱ्या सैनिकाला देहदंडाची शिक्षा होते, हा लष्करी कायदा तुला माहीत आहेच."

"होय, तो कायदा मला माहीत आहे व मी जोंपर्यंत आपल्या लष्करांत नौकर आहें, तोंवर आपल्या सर्व लष्करी आज्ञा मान्य करण्याला किंवा अमान्यतेबद्दल शासन भोगण्याला मी बांधलेला आहें; पण आपण मला सांगतां ही कामगिरी माझ्या लष्करी कर्तव्याबाहेरची आहे. आपण मला सरळ अर्नाळ्यावर हल्ला करावयाला सांगा, मी तयार आहें. पण प्रथम तहाच्या मिषानें अर्नाळ्यावर जाऊन प्रतिपक्षांतील प्रमुखांना बेसावध राखावयाचें व विश्वासघातानें त्यांना संकटाच्या गर्तेंत लोटावयाचें, हें माझें ब्रीदही नाहीं, कर्तव्यही नाहीं व तसें करणें मलाच काय पण आपणालाही उचित नाहीं. हां, आपण जर तह करावयाला कबूल असाल, तर मला सांगा; तह घडवून आणण्यासाठीं मी माझी सारी पुण्याई खर्च करीन."

"पण माझ्यासाठीं" पोर्शिया पुढें होऊन काकुळतीच्या स्वरानें डोमिंगोला म्हणाली, "डोमिंगो! माझ्या प्रेमासाठीं तुम्ही एवढें मोल देणार नाहीं का?"

"काय! पोर्शिया! तुझ्या प्रेमासाठीं एवढें मोल? पाहिजे तर माझे प्राण माग तेही मी तुझ्या प्रेमासाठीं गमावीन. पण माझ्या माणुसकीचें, माझ्या दानतीचें

मोल मागूं नकोस. प्रेमाच्या धुंदींत मी विश्वासघातकी मारेकरी बनलों, तर त्यांत तुला तर भूषण नाहींच, पण त्यांत माझा अधःपात आहे. परमेश्वर मला काय म्हणेल ! ”

“ एकूण तूं ह्या आपल्या हट्टासाठीं पोर्शियाच्या प्रेमसंबंधावरही लाथ मारावयाला तयार आहेस ! ” सेनापतीनें विचारलें.

डोमिंगो निर्भयपणें उत्तरला, “ सेनापतिसाहेब ! मी सत्यासाठीं–परमेश्वरानें सत्य समता सर्वांभूतीं प्रेम हा विश्वधर्माचा धडा जो मनुष्यमात्राच्या अंतःकरणांत वज्राक्षरांनीं लिहिलेला असतो, त्या विश्वधर्मासाठीं आई-बाप बहीण भाऊ-सगे-सोयरे-स्वतःच्या जीवनसर्वस्वावरही पाणी सोडायला तयार आहें.”

सेनापति पोर्शियाकडे वळून म्हणाला, “ पोर्शीया ! स्वतःच्या बद्करणीनें तुझ्या बापाला लांछन आणणारा, उघड उघड तुझ्या बापाच्या शत्रूंचें मंगल चिंतिणारा हा उत्शृंखल तरुण तुझ्या प्रेमाला पात्र आहे असें तुला खास वाटत नसेल.” लगेच तो पेरीराकडे वळून म्हणाला, “ किल्लेदार ! तुम्हांला तुमच्या व तुमच्या देशाच्या धर्माच्या इभ्रतीवर उठणाऱ्या ह्या पुत्राविषयीं जरादेखील अभिमान वाटतां कामा नये. मला निरुपायास्तव आतां ह्या गुन्हेगाराला योग्य शासन होईल अशी तजवीज करणें प्राप्तच आहे ” तो डोमिंगोकडे वळून म्हणाला, “ डोमिंगो ! शिक्षा ऐकण्यापूर्वी तुझे अपराध एकवार ऐक. पहिला अपराध–तूं शत्रुपक्षाचा साह्यकारी आहेस अर्थात् राजद्रोही आहेस. दुसरा अपराध–तूं सेनापतीच्या हुकुमाची अमान्यता केली आहेस. ह्या अपराधांपैकीं प्रत्येक अपराधाला देहदंडाची शिक्षा सांगितलेली आहे.—”

इतक्यांत पोर्शियानें सेनापतीचे पाय धरून अत्यंत केंविलवाण्या स्वरानें त्याची विनवणी केली, “ नका, बाबा ! त्यांना इतक्यांत शासन फर्मावूं नका. कांहीं काळ त्यांना प्राप्तपरिस्थितीचा विचार करूं द्या; मग ते शांत झाल्यावर मार्गावर येतील अशी मला आशा आहे. बाबा ! तुमच्या ह्या एकुलत्या एक गरीब मुलीला भीक घाला.”

सेनापतीच्या तोंडून शिक्षेचा उच्चार होण्याचाच काय तो अवकाश होता; कीं लगेच त्याची अंमलबजावणीही झाली असती. सेनापति शिस्तीच्या कामीं अत्यंत कडा असल्यानें त्याला न्यायाच्या कामीं दुसऱ्याचें मध्यें येणें रुचणें शक्य नव्हतें; पण सेनापति तरी मनुष्यच होता व त्यानें समतान्यायाचा धर्मकांटा

हातीं घेऊन सर्व कारभार चालविला होता असेंही नाहीं. पोर्शियानें डोमिंगोशीं असलेला आपला प्रेमसंबंध सोडावा म्हणून त्यानें गेल्या थोड्या दिवसांत शिकस्तीचे प्रयत्न केले होते; पण ते अयशस्वी ठरले होते. अर्थात् पोरीचा–व तोही एकुलत्या एका लाडक्या पोरीचा–लळा म्हणून त्याला नमतें घेणें भागच होतें. शिवाय आणखी असेंही असेल!–सत्यासाठीं मरणाला तयार झालेल्या डोमिंगोच्या मस्तकावर परमेश्वराचें कृपाछत्र रुळत असेल, त्या परमेश्वरानें सेनापतीच्या मनांत विवेक उत्पन्न केला असेल! पोर्शियानें शिक्षेचा उच्चार न करण्याची प्रार्थना त्याला केली नसती, तरीही कदाचित् त्या विवेकभावनेनें त्याची जिव्हा खेंचून धरली असती. नाहीं कोणीं म्हणावें!

"पोर्शिया! हें काय?" पोर्शियाच्या शब्दावर बोलण्याची सेनापतीला संधि न देतां डोमिंगो उद्गारला, "मला वांचविण्याचा वृथा प्रयत्न तूं कशाला करतेस? मी हें आवेशाच्या भरांत बोलत आहें अशी जर तुझी अथवा कोणाची समजूत असेल तर ती चुकीची आहे. पोर्शिया! तुझें जर माझ्यावर मनापासून प्रेम असेल तर–पूर्वीच्या सर्व गोष्टी आपण विसरून जाऊं—माझें आजचें मरण उद्यांवर लोटण्याची इच्छादेखील तुझ्या मनाला शिवतां कामा नये. सत्यासाठीं मृत्यूच्यादेखील गळ्याला मिठी मारण्याचें धैर्य माझ्यासारख्या पामराच्या ठायीं सदासर्वदा सारख्याच उत्कटतेनें टिकेल याचा भरंवसा काय? या क्षणाला प्राप्त झालेला मनाचा खंबीरपणा दुसऱ्या क्षणाला उणावला व मी जीविताच्या अथवा कान्तेच्या मोहानें सत्यधर्माच्या असिधाराव्रताला पारखा झालों, तर पोर्शिया! त्या पापाची तूं वांटेकरीण होशील, म्हणून म्हणतों,—"

"बाबा! तुम्ही त्यांचें कांहीं ऐकूं नका, माझ्याकडे पहा. मी तुम्हांला हवी असेन, तर त्यांना शिक्षा देऊन आमच्या संलग्न जीवाचीं दोन शकलें करूं नका. एवढी भीक मला घाला!" पोर्शियानें डोमिंगोच्या बोलण्याकडे लक्ष न देतां पुन्हा सेनापतीला विनविलें.

सेनापतीचे डोळे पाण्यानें भरून आले; पण तो आपल्या मनाचा खंबीरपणा अभंग आहे असें सर्वांना दाखविण्यासाठीं डोळ्यांतील आसवें आंतल्या आंत गिळून डोमिंगोला उद्देशून म्हणाला, "जा! डोमिंगो! मी तुला विचार करण्यासाठीं आणखी तीन दिवसांची सवड देतों; एवढ्या मुदतींत तुझें मन पालटलें व तुला

पश्चात्ताप झाला तर ठीकच; नाहींपेक्षां तुझें कर्म आणि तूं. जा–ताबडतोब माझ्या दृष्टीसमोरून निघून जा."

डोमिंगो सेनापतीच्या शब्दाबरोबर जागचा हलेना. तेव्हां पोर्शियानें त्याला हात जोडून विनविलें, "डोमिंगो ! तुमचा ज्या प्रभूवर सर्व भरंवसा आहे, त्या प्रभूची—" ती समोरच्या भगवान् येशू ख्रिस्ताच्या तसबिरीकडे बोट दाखवून म्हणाली, "ह्या भगवंताची तुम्हांला शपथ आहे; तुम्ही या वेळीं इथून माझ्यासाठीं निघून जा. तुमच्या प्रेमळ मातेवर तुमचें जिवापलीकडे प्रेम आहे, त्या तुमच्या मातेची तुम्हांला शपथ आहे.—तुम्ही अगोदरच इथून निघून जा कसे !"

पोर्शियाच्या विनवणीसाठीं असो किंवा कशासाठींही असो, डोमिंगो समोरच्या ख्रिस्ताच्या तसबिरीला मनःपूर्वक प्रणाम करून तिथून निघून गेला. त्याच वेळीं पलीकडच्या दालनांतून मार्गारेटही बाहेर पडली; पण ती पडद्याआड असल्यामुळें तें कोणालाही दिसलें नाहीं. मग ती कोठें व कशासाठीं निघून गेली हें कोणाला कसें कळणार ?

  

डोमिंगो तेथून निघून गेल्यावर पुन्हा अर्नाळ्यावरील मोहिमेविषयीं विचार झाला. वस्तुतः कोणत्याही महत्त्वाच्या बाबीचा शांतपणें विचार करण्याइतकी त्या बैठकींतील कोणाचीच मनःस्थिति शांत व समतोल नव्हती; पण ॲन्टोनिओनें आपण होऊन तो प्रश्न पुन्हा काढला व कळकळ दाखवून डोमिंगोच्या ऐवजीं स्वतः तें काम पत्करण्याचें कबूल केलें. सेनापतीलाही ती योजना मानवली. याचा अर्थ त्याचा ॲन्टोनिओच्या चातुर्यावर व कर्तबगारीवर विश्वास होता असा नव्हे; पण सेनापतीचा देखील नाइलाज होता. एकदां त्याच्या मनांत आलें कीं, आपण स्वतः त्या कामगिरीवर जावें; पुन्हा मनांत आलें कीं, पेरीराला पाठवावें; पण मराठ्यांचें वेढ्याचें काम आटोपत आलें असून ते आतां लौकरच किल्ल्यावर तोफांचा भडिमार करणार अशा बातम्या येऊन थडकल्या होत्या. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं किल्ल्याचें यथावत् रक्षण करण्यासाठीं पेरीरा हा किल्लेदार व किल्ल्याचा माहितगार म्हणून आणि सिल्व्हेरा हा सेनापति म्हणून, मिळून दोघांनाही किल्ल्याबाहेर जातां येणें शक्य नव्हतें.

पोर्शियाला मात्र डोमिंगोची कामगिरी ॲन्टोनिओनें पत्करली हें आवडलें

नाहीं. ती मनांत म्हणाली, "सिंह गुहा सोडून गेला, कीं कोल्ह्यांनीं मोठ्या दिमाखानें त्या गुहेंत शिरावें, त्यांतलाच हा प्रकार आहे."

याप्रमाणें ती बैठक संपली व पेरीरा, ॲन्टोनिओ ही मंडळी आपापल्या स्थानीं जावयाला निघाली. त्यांच्यामागोमाग सेनापतीदेखील आपल्या त्रस्त मनाला विश्रांति द्यावी म्हणून मार्गारेटच्या महालाकडे चालला. तोंच मार्गारेटच्या तैनातींतील एक दासी घाबऱ्याघुबऱ्या धांवत आली व सेनापतीला सांगूं लागली, "धनीसाहेब! बड्या मेमसाहेबांचा कोणा दुष्टानें खून केला."

मार्गारेटच्या खुनाची बातमी ऐकतांच सेनापति त्याच क्षणीं अगदीं खचून गेला. किल्ल्यावर ती बातमी हां हां म्हणतां पसरली व सर्वांचीं अंतःकरणें हादरून गेलीं. दासीनें ती दुर्वार्ता आणली तेव्हां पोर्शिया तेथें जवळच होती. तिचें व मार्गारेटचें जरी फारसें सरळ नव्हतें, तरी तिलादेखील ती अनर्थकारक वार्ता ऐकून अत्यंत वाईट वाटलें. सेनापति तांतडीनें मार्गारेटच्या महालाकडे जावयाला निघाला, त्याच्या मागोमाग पोर्शियाही निघाली. 'दिवसाढवळ्या वाड्यांत शिरून असले अत्याचार करणारा हा कोण राक्षसी माणूस बरें! त्याला कठोर शासन झालें पाहिजे'. असे विचार पोर्शियाच्या मनांत घोळूं लागले व त्या दृष्टीनें ती जातां जातां दासीपाशीं चौकशी करूं लागली.

पण मार्गारेटच्या महालांत पाऊल टाकतांच तेथील भयाण व अकल्पित दृश्य पाहून सेनापति विजेचा धक्का बसल्याप्रमाणें दरवाजांतच थबकला व पोर्शिया तर 'अरेरे! डोमिंगो! तुम्हीं हें काय केलें!' असे विव्हळते उद्गार काढून मूर्च्छा येऊन धाड्‌कन् खालीं पडली. तिला सांवरण्याचा आजूबाजूच्या दासदासींनीं खूप प्रयत्न केला; पण तो फारसा सफल झाला नाहीं. जिन्यांत पोर्शियाचा तोल जाऊन जिन्याच्या संगमरवरी पाषाणावर तिचें मस्तक जोरानें आदळलें व ती गडगडत खालीं कोसळून बेशुद्ध पडली.

समोरील जो भयाण देखावा पाहून पोर्शियाला प्राणघातक मूर्च्छा आली, सेनापति स्तिमित झाला व दास दासींनीं विस्मयातिरेकानें तोंडांत बोटें घातलीं, तो देखावा असा कीं, त्या महालांत मार्गारेट जखमी होऊन पायांतळच्या गालीच्यावर तळमळत पडली होती; तिच्या वक्षःस्थलावरील जखमेंतून वहाणाऱ्या रक्तानें तिचें सर्वांग भिजून ओलेंचिंब झालें होते; अंगातळच्या गालीच्यावरही रक्ताची राड झाली होती; तिच्याजवळच डोमिंगो आपले रक्तानें भिजलेले दोन्ही

हात एकांत एक गुंतवून किंकर्तव्यमूढ बनून निश्चल उभा होता. त्याच्या पायांपाशीं रक्तानें भरलेला एक जंबिया पडला होता.

" मार्गारेट ! कोणा दुष्टानें तुझी अशी दशा केली बरें ? " सेनापति एक दोन तीन वेळां डोमिंगोवर आपल्या प्रखर दृष्टीचा अग्निवर्षाव करीत खालीं बसून मार्गारेटच्या तोंडापाशीं तोंड नेऊन विचारूं लागला.

पण मार्गारेटच्या तोंडून अक्षर निघेना व सेनापतीलाही तिची जास्त चौकशी करण्याला फुरसत मिळाली नाहीं. दासदासींनीं पोर्शियाला जिन्यांतून वर उचलून आणलें तेव्हां तिची अवस्था अत्यंत बिकट आहे अशी सर्वांची खात्री झाली. पोर्शिया बेशुद्ध होती, तरी तिच्या मुखांतून रक्ताची धार वहात होती व मस्तकांतूनही भळांभळां रक्त वहात होतें. मार्गारेटपेक्षां पोर्शियाचीच अवस्था कठीण आहे असें सर्वांना आढळून आले व औषधोपचारांसाठीं धांवपळ सुरू झाली. सेनापति मार्गारेटचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन ढसढसां रडूं लागला. डोमिंगोही विव्हळत खालीं बसून पोर्शियाकडे पहात 'पोर्शिया ! पोर्शिया ! तुझी ही काय स्थिति झाली' असें उद्गारत एखाद्या पोरासारखा स्फुंदून स्फुंदून रडूं लागला; पण सेनापतीनें, 'हरामखोरा, खुनी चांडाळा ! दूर हो' असें वाक्ताडण करीत जवळचा जंबिया घेऊन डोमिंगोवर उगारला.

डोमिंगोनें मागें सरून तो वार चुकविला; पण मार्गारेटच्या खुनाचा अपवाद त्याला चुकवितां आला नाहीं. त्याचा तो अवतार--तें रक्तानें माखलेले हात व ती घाबरलेली मुद्रा पाहून ज्याला त्याला वाटलें कीं, हाच खुनी ! आणि सेनापतीची हातांतील जंबियावर सहज दृष्टि गेली, तों त्या जंबियाच्या मुठीवरही डोमिंगोचेंच नांव कोरलेले होतें !

" हाच--हाच खुनी हरामखोर ! हा याचा जंबिया ! अगोदर त्या हरामखोराला पकडा." असे म्हणून सेनापतीनें आपल्या हातांतील जंबिया डोमिंगोवर फेंकला.

" एकूण आज माझें नशीबच माझ्या हात धुऊन पाठीला लागलें आहे." डोमिंगो त्याच्या दंडाला चाटून गेलेला जंबिया हातीं घेऊन त्यावरील आपलें नांव पहात उद्गारला, " सेनापतीसाहेब ! काळ माझ्यावर उलटला आहे; या वेळीं माझें निरपराधित्व शाबीत करण्याचें लेशमात्र सामर्थ्य माझ्या अंगीं उरलेलें नाहीं; पण आपण मार्गारेटबाईंना किंचित् आराम पडल्यावर त्यांच्यापाशींच

चौकशी कराल, तर हा अत्याचार मीं केला नसून, दुसऱ्या कोणीं दुष्टानें केला आहे असें आपणाला कळून येईल."

"तर मग तूं या वेळीं इथें हजर कसा? तुझे हात रक्तानें माखलेले आहेत, तुझाच हा जंबिया आहे, कृतकर्माच्या जाणिवेनें उत्पन्न झालेल्या भयामुळें तुझें सर्वांग थरथर कांपत आहे.—तूंच खुनी!"

  

डोमिंगोनें आपली निर्दोषता सिद्ध करण्याचा शक्य तितक्या मोजक्या शब्दांत शक्य तेवढ्या उत्कटतेनें प्रयत्न केला; पण फुकट! सर्वानुमतें तोच गुन्हेगार ठरला व सेनापतीच्या आज्ञेनुसार त्याला तेथल्या तेथें कैद करण्यांत आलें, त्याच्या हातांपायांत लोखंडी बेड्या ठोकून त्याला तुरुंगांत पाठविण्यांत आलें पण त्या सर्व दुःखाचें विस्मरण पाडणारें त्याहून जालीम दुःख त्याच वेळीं डोमिंगोच्या वांट्याला आलें.—वैद्यराज येण्यापूर्वीच त्याची जिवलग पोर्शिया इहलोक सोडून गेली. सेनापतीच्याही दुःखाला मर्यादा उरली नाहीं. सर्वत्र कमालीचा हाःहाःकार उडाला!

## प्रकरण सोळावें

# शत्रुकारस्थानाचा स्फोट

"कबुतरें घ्या ऽऽ! कबुतरें ऽऽऽ!"

त्याच दिवशीं दोन घटका दिवसाच्या सुमाराला एक पांखरेंविक्या एकेका पिंजऱ्यांत चार चार कबुतरें असे दोन पिंजरे दोन हातांत घेऊन अर्नाळ्यावर आला व बार्बाराच्या वसतिस्थानासभोंवार धिरट्या घालूं लागला. हा पांखरेंविक्या वसईच्या किल्ल्यावर वाचकांना परिचित झालेला मुरारी होता, हें सांगावयाला नकोच.

बार्बारा तरी त्याच पांखरेंविक्याची वाट पहात आपल्या वसतिस्थानासमोरच्या उद्यानांत इकडून तिकडे धिरट्या घालीत होती. ती तो आवाज ऐकून उद्यानांत प्रवेशद्वारापाशीं आली. तेथें मुरारीशीं कबुतरांबद्दल सौदा पटविण्याच्या मिषानें ती हळुहळू कांहीं बोलली. मुरारीनेंही तिला समयोचित उत्तरें दिलीं व आपल्या जवळचें पत्रही दिलें. पूर्वयोजनेप्रमाणें सौदा पटून बार्बारानें त्या दोन पिंजऱ्यांपैकीं एक पिंजरा–जो मुरारीनें जास्त वाखाणला तो पांच मोहरांना विकत घेतला व मुरारीला विचारलें, "आणि तो दुसरा पिंजरा काय करणार?"

"घेतल्या सोंगाची बतावणी करण्यासाठीं हीं राहिलेलीं कबुतरें विकण्याच्या मिषानें एकवार किल्ल्यावर सगळीकडून फेरी मारतों. तोंवर कांहीं उत्तर असल्यास तयार करून ठेवा कारण मला आजच्या आज माघारें जावयाचें आहे."

"शाबास! तसेंच कर." बार्बारा आनंदानें चर्या फुलवून म्हणाली, "म्हणजे संशयाला जागा उरणार नाहीं. आणि हें पहा" ती एकवार सभोंवार दृष्टि फेंकून आपणाकडे कोणी पहात तर नाहीं ना याविषयीं खात्री करून घेऊन म्हणाली, "तुला दोन पिंजरे आणतांना कोणीं माहितीच्या माणसानें पाहिलें आहे का?"

"नाहीं. फारसें कोणीं पाहिलें नाहीं." मुरारी उत्तरला.

"तर मग एक पिंजरा मीं घेतला हें कोणालाही होताहोईतों सांगूं नकोस. आपल्याविषयीं संशय घेणारे कांहीं लोक एथें किल्ल्यावर आहेत. माझें एक कबुतर बारा तेरा दिवसांपूर्वी शत्रूच्या हातीं लागलें; तेव्हांपासून कांहीं कांहीं संशय-

ग्रस्त माणसांनीं माझ्यावर करडी नजर ठेविली आहे. त्यांत आणखी धोंडशास्त्री व भय्याशास्त्री यांच्या सुटकेची भर पडली आहे." बार्बारा पत्र उघडून वाचतां वाचतां म्हणाली.

"असें का ? मला सांगून ठेवलेंत हें बरें झालें." असें म्हणून मुरारी दुसरा पिंजरा हातीं घेऊन व एका पिंजऱ्याबद्दल मिळालेल्या पांच मोहरा कडोसरीला लावून ललकारतच पुढें चालला, "कबुतरें घ्याऽऽ कबुतरें."

बार्बाराचा संशय अगदीं सार्थ होता. तिच्या पदरीं कबुतरें असलेलीं पाहून कांहीं मंडळीनें, निर्मळ येथें एका सैनिकाच्या बहिरीससाण्यानें जें कबुतर धरलें होतें, त्याचा संबंध बार्बाराशीं जोडण्याचा प्रयत्न केला होता; पण खुद्द अर्नाळ्याचा किल्लेदार बाजीबा हा बार्बाराच्या मोहपाशांत सांपडला होता, व नारो शंकराच्या सुटकेचें श्रेय बार्बारानें मोठ्या चतुराईनें आपल्या एकटीच्या वांट्याला घेतलें होतें; त्यामुळें इतर दीर्घसूत्री लोकांच्या शंकेखोरपणाचा परिणाम बार्बाराला प्रत्यक्ष जाचला नाहीं. उलट बार्बारा सेनापतीशीं भांडून आली असून तिनें केवळ सेनापतीवर सूड घेण्यासाठीं मराठ्यांचा पक्ष उचलिला आहे, असें मानून बहुतेक सर्व खाशी मंडळी तिला—आणि अर्थात् तिचा प्रियकर फ्रॅन्सिस यालाही बऱ्याच इतमानानें वागवूं लागली होती. इतकेंच काय; पण फ्रॅन्सिसच्या अत्याग्रहावरून त्याला मंडपेश्वराच्या लढ्यांत आपल्या वतीनें लढण्यालाही चिमाजीअप्पांनीं नुकतेंच चार पांच दिवसांपूर्वीं रवाना केलें होतें. असें होतें, तरी किल्ल्यावरील इतर नोकरचाकर मात्र बार्बाराविषयीं रोज जास्त जास्त संशय घेऊं लागले होते. दोन दिवसांपूर्वीं अर्नाळ्याच्या कैदेंतून ॲन्टोनिओ रात्रीचा अचानक पळाला, तेव्हां एकदां त्याबाबत वादळ उत्पन्न झालें होतें. तुरुंगाच्या किल्ल्या नेहमीं किल्लेदारापाशीं असत; व तुरुंगांतील प्रत्येक कैद्याच्या कोठडीवर किल्लेदाराच्या शिपायांचा खडा पहारा असे. इतक्या कडेकोट बंदोबस्तांतून कैदी पळाला व तुरुंगांतील त्या तीनही कोठड्यांचीं कुलुपें उजाडतां उघडीं आढळलीं, तेव्हां बिचाऱ्या त्या पहारेकऱ्याला मात्र कडेलोटाची शिक्षा झाली व ती अंमलांत-ही आणण्यांत आली; पण ॲन्टोनिओच्या सुटकेचा खरा प्रकार निराळाच होता. तो पोर्तुगीज सरकारचा हस्तक आहे हें बार्बाराला पक्कें माहीत होतें. त्याची मुक्तता करणें तिला अवश्य वाटून तिनें एके दिवशीं आपल्या कांहीं सेवकांकडून तुरुंगावरील पहारेकऱ्याशीं बैठक मांडविली व त्य

बैठकींत पहारेकऱ्याला मद्यांतून अंमली पदार्थ पाजविला. किल्लेदार बाजीबा तर बार्बारा किल्ल्यावर आल्यापासून मद्यपानाला चांगलाच चटावलेला होता. त्यांतूनही त्या रात्रीच्या मजलशींत बार्बारानें त्याला मुद्दाम जास्त मद्य पाजलें व तो बेहोष पडला असतां त्याच्या ताब्यांतील तुरुंगाच्या किल्ल्या पाळत ठेवून लांबविल्या. मध्यरात्रीच्या सुमाराला पहारेकरी झिंगून पडले आहेत अशी संधि साधून बार्बारानें खास आपल्या देखरेखीखालीं ॲन्टोनिओची मुक्तता केली व तो वेषांतर करून तेथून पसार झाला! त्याबद्दल पहारेकऱ्याला देहान्त शासन होऊन जरी तें प्रकरण मिटल्यासारखें झालें होतें, तरी बार्बाराचा ढालगजपणा ज्या अनेक लहानसान नोकरांना माहीत झाला होता ( थोरा मोठ्यांच्या पायांखालीं काय जळतें हें त्यांच्या सभोंवारच्या हलक्या नोकरांनाच जास्त माहीत असतें) व त्यांतल्या ज्या कितीएकांनीं पहारेकऱ्याबरोबर मजलस झोडली होती, त्यांनीं प्राणभयानें तो संशयदेखील जरी प्रदर्शित केला नाहीं, तरी ही बया आज ना उद्यां आपल्या नाशाला देखील अशीच कारण होईल ह्या भयानें जो तो तिचा गुन्हा मुद्देमाल पकडून तिची खोडकी जिरविण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून वाट पहात होता.

अशी स्थिति असल्यामुळें आज मुरारी पांखरें विकण्याच्या निमित्तानें किल्ल्यांत आला व बार्बाराच्या वसतिस्थानासभोंवार घिरट्या घालूं लागला, तेव्हांपासून एका शंकाग्रस्त माणसाची त्याच्यावर नजर होती; तो मनुष्य म्हणजे मराठ्यांच्या पदरचा विश्वासू शिलेदार व गंगाजी नाइकाचा एक धाकटा भाऊ नारायणजी हा होय. नाइकांचें सारेंच घराणें फिरंग्यांच्या जाचानें कैक वर्षें पूर्णपणें गांजून गेलेलें असल्यानें व नारायणजीनेंही ती गांजणूक पुष्कळच सहन केली असल्यानें फिरंगी म्हटला, कीं तो अधम–विश्वासघातकी; मग तो स्त्री–पुरुष कोणीही असो, अशी त्याची ठाम समजूत बनली होती. त्यामुळें तो प्रथमपासून बार्बाराचा संशय घेत होता. तशांत निर्मळच्या लढ्याच्या वेळीं एक अज्ञात संदेशवाहक कबुतर ज्याच्या बहिरीससाण्यानें पकडून आणलें तो शिपाई नारायणजीच्याच पथकांतील असल्यानें त्या रहस्याचा उलगडा लावण्याची नारायणजीच्या मनाला उत्कंठा लागून राहिली होती. तो शोध त्याला आजवर लागला नव्हता; तरीदेखील त्यानें किल्लेदार, चिमाजीअप्पा वगैरे खाशा मंडळीला बार्बारावर फार विश्वास न ठेवण्याला सुचविलें होतें. पण नारायणजी सर्वच फिरंग्यांचा एकजात

द्वेष करणारा ज्वलज्जहाल शिपाईगडी आहे हें ओळखून त्याच्या तक्रारीकडे सर्वांनीं मुद्दाम कानाडोळा करण्याचें व्रत अंगिकारिलें होतें.

असो. मुरारी बार्बोराच्या निवासस्थानापासून 'कबुतरें घ्याऽऽ कबुतरेंऽऽऽ !' असें ललकारत निघाला, तो बार्बोराच्या निवासस्थानापासून बराच दूर गेला असें पाहून नारायणजी त्याला संशयावरून पकडण्याचें ठरवून तावडतोब आपले दोन हत्यारबंद शिपायी बरोबर घेऊन त्याच्यामागोमाग गेला व त्याला गांठून दुरूनच दरडावून विचारलें, " अरे ए पांखरेंविक्या ! तूं कोणाच्या परवानगीनें किल्ल्यांत आलास ? "

मुरारी जागच्याजागीं थबकून नारायणजीकडे पहात उद्गारला, " शिपाईदादा ! पोटार्थी धंदेवाला मीं, इतर इतके धंदेवाईक लोक किल्ल्यांत येतात तसाच मीही आलों.–" बोलतां बोलतां मुरारीची जीभ अडखळली. तो नारायणजीच्या दृष्टीला दृष्टि भिडवून त्याच्याकडे पाहूं लागला.

मुरारीच्या उत्तरानें नारायणजीचें समाधान झालें नाहीं; उलट मुरारी अड-खळलेला पाहून त्याला जास्तच संशय आला. त्यानें जास्त दरडावणीच्या भाषेंत मुरारीला पुन्हा विचारलें, " पोटार्थी धंदेवाला जर तूं आहेस; तर आतां बार्बोरा-बाईशीं हळुहळू कानगोष्टी कसल्या करीत होतास ? तूं मला वाटतें, आमच्या शत्रूंचा हेर आहेस.—" एवढे शब्द नारायणजीच्या तोंडून निघण्याला व मुरारीच्या अस्तनींतील एक लिफाफा अचानक खालीं पडावयाला एक गांठ पडली. मुरारीनें तो लिफाफा उचलून घेण्याची शक्य तितकी चपळाई केली; पण तो नारायणजी व त्याचे शिपायी यांच्या दृष्टीआड राहूं शकला नाहीं. नारा-यणजीनें लगेच आपल्या लोकांना आज्ञा केली, " पकडा त्या बदमाषाला ! "

शिपायांनीं नारायणजीच्या आज्ञेप्रमाणें मुरारीला तावडतोब पकडलें. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, मुरारी जरादेखील डगमगला नाहीं. त्यानें निर्भयपणें नारायणजीला विचारलें, " नारायण ! मीं तुला ओळखलें; पण तूं मात्र मला ओळखलें नाहींस."

नारायणजीनें विस्मयपूर्वक मुरारीच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पहात विचारलें, " तूं कोण ? "

मुरारीनें लगेच आपल्या उजव्या हाताचें मनगट अस्तनी वर सारून

नारायणजीपुढें केलें व त्या मनगटावरील एक वण नारायणजीला दाखवून विचारलें, "लहानपणीं तूं एकदां मुरारजीच्या हाताला चावल्याचें तुला आठवतें का ?"

"कोण तूं ? मुरारीदादा !" नारायणजीनें लगेच मुरारीला कडकडून मिठी मारून उद्गार काढले, "मुरारीदादा ! मीं तुला प्रथम ओळखलें नाहीं."

नारायणजीबरोबरचे शिपाई हा प्रकार पाहून आश्चर्यानें एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. हे दोघेही भाऊ भाऊ तर नसतील ना, अशी त्या शिपायांना शंका आली. ती अक्षरशः खरी होती. मुरारी ऊर्फ मुरारजी हा नारायणजीचा वडील भाऊच होता.

'बरें; आतां इथें फार वेळ मोडण्यांत अर्थ नाहीं. मला प्रथम श्रीमंतांची गांठ घ्यावयाची आहे. श्रीमंत येथें आहेत ना ?"

"होय, आहेत; पण तुम्ही आतां कोठून आलां ?" नारायणजीनें विचारलें.

"चला, श्रीमंतांकडे जातां जातां सर्व कांहीं सांगतों." असें म्हणून मुरारी चिमाजीअप्पांकडे जाण्यासाठीं निघाला. त्या जाग्यापासून चिमाजीअप्पांचा वाडा कांहीं फार दूर नव्हता. ते दोघेही बघु सुमारें पन्नास पावलें चालून गेल्या-वर त्यांना दुरून चिमाजीअप्पा समोरील बुरुजाच्या गच्चीवर मोकळ्या हवेंत बाजीबा किल्लेदारासमवेत रामानंदांशीं बोलत असलेले आढळले. त्या मंडळींचें कांहीं खासगी संभाषण चाललें असेल, म्हणून नारायणजीनें दरवाजापाशीं जातांच पहारेकऱ्याला चिमाजीअप्पांकडे पाठवून त्यांची परवानगी घेतली व मग दोघेही वर गेले.

मुरारी वर जातांच चिमाजीअप्पा व रामानंद यांना नमस्कार करतो, तोंच रामानंदांनीं त्याच्या चर्येकडे क्षणभर निरखून पाहिलें. त्यांना पहिल्याच क्षणाला मुरारीची ओळख पटूं लागली; पण मुरारीच्या बदललेल्या वेषानें क्षणभर त्यांची फसवणूक केली. त्यांनीं विचारलें, "कोण ? मुरारी का तूं ?"

"होय स्वामि !" मुरारीनें नम्रतापूर्वक मान नमवून हात जोडून उत्तर दिलें.

"वाः !" रामानंदांनीं मनापासून हंसत मुरारीला विचारलें, आज बहुरूप्यानें कोणतें सोंग आणलें आहे ?"

"आज बहुरूपी सेनापति सिल्व्हेराचा खास विश्वासू संदेशवाहक बनून बार्बोराच्या साह्यानें मराठ्यांविरुद्ध फिरंग्यांनीं रचिलेल्या कारस्थानाच्या सांखळी-चा महत्त्वाचा दुवा सांधण्यासाठीं किल्ल्यावर आला आहे." मुरारी उत्तरला.

मुरारीचे बोल ऐकून बाजीबाचें तोंड खर्रकन् उतरलें. त्यानें मुकाट्यानें खालीं मान घातली. चिमाजीअप्पांना मुरारीच्या सांकेतिक बोलण्यावरून कांहींच अर्थबोध होईना. त्यांनीं रामानंदांना विचारलें, "स्वामी ! हा कोण ?"

"हा पांच पांडवांतील नकुळ." मुरारीकडे वळून रामानंदांनीं विचारलें, "मुरारी ! होय ना रे ?"

"होय. स्वामींच्या मुखांतून परमगौरवाचे शब्द निघाले, ते मान्य करून फुकाचें मोठेपण अंगीं चिकटवून घ्यावयाला काय हरकत आहे ?" मुरारी चिमाजीअप्पांकडे वळून म्हणाला, "श्रीमंत ! आपले उजवे हात गंगाजी हे आमचे वडील बंधु व नारायणजी हा माझा धाकटा बंधु."

"एकाहून एक पराक्रमी असे आधुनिक पांच पांडव हे नाईक; आज कैक वर्षे त्यांच्या वांट्याला वनवास आला आहे." नारायणजी व मुरारी यांच्याकडे वळून रामानंद म्हणाले, "पण कांहीं चिंता नाहीं. तुमचा वनवास फिटून ही अष्टागरची पुण्यभूमि फिरंग्यांच्या दास्यांतून मुक्त होण्याची सुवेळ आतां अगदीं सन्निध आली आहे."

"मुरारी ! तूं इतके दिवस कुठें होतास ?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

"श्रीमंत ! आम्ही पांचही भाऊ वनवासी आहों. सध्यां आमचा अज्ञातवास सुरू आहे. आमच्यावर फिरंग्यांचा केवढा दांत आहे हें आपण आतां जाणतांच. आज सात आठ वर्षे झालीं, मी रात्रंदिवस डोंगरकड्यांवरून व दऱ्याखोऱ्यांतून वारा–पाऊस–ऊन्ह–थंडी न म्हणतां गुप्तपणें वणवण हिंडत आहें. हिंडतां हिंडतां स्वामींच्या पुण्यचरणांचें दर्शन मला घडलें व मी त्यांच्या शिष्यवर्गांत समाविष्ट झालों.—"

"पण गेले दोन तीन आठवडे तूं कुठें होतास ?" रामानंदांनीं विचारलें. "सेनापतीच्या हालचालींवर नजर ठेवण्याची कामगिरी तुला मीं सांगितली, तेव्हांपासून आजवर तुझा पत्ताच नाहीं. मनांत म्हटलें, तूं एखाद्या चक्रव्यूहांत सांपडलास कीं काय ?"

"चक्रव्यूहांतच सांपडलों होतों; नव्हे, शत्रूनें उभारलेल्या कुटिल कारस्थानाच्या चक्रव्यूहांत शिरून तेथील भेद आणण्यासाठीं माझी सारी खटपट सुरू होती. त्यासाठीं पूर्व तयारी म्हणून विशिष्ट ठिकाणीं मला मुरारजी नाईक माझा शत्रु मेल्याची हूल उठवावी लागली. अनेकजण मला स्वामींचा शिष्य मुरारी

म्हणून ओळखीत होते, त्या ओळखीचा फायदा घेऊन स्वामींशीं भांडून फुटून बाहेर पडलों आहें असा बोभाटा करावा लागला. इतके सारे प्रयत्न करून मी ज्या संधीची वाट पहात होतों, ती संधि मला लौकरच मिळाली. सेनापति सिल्व्हेरा मुंबईहून दुसऱ्या वेळीं परवां इकडे येतांना फजीत पावला, त्याच्या पदरीं मीं हरयुक्तीनें आश्रय मिळविला."

"पण तुला आश्रय कसा मिळाला ?" चिमाजीअप्पांनीं मध्येंच विचारलें.

"आश्रय कसा मिळाला तें फार मोठें रामायण होईल. तो आश्रय मिळविण्यासाठीं मला माझी वाणी मात्र फारच शिणवावी लागली, कुशब्दांचें अमंगल स्नान तिला अनेकदां घडलें." मुरारी चिमाजीअप्पा व रामानंद यांच्यापुढें मस्तक नमवून उद्गारला, "मी मराठमंडळाचा हाडवैरी आहें अशी सेनापतीची खात्री पटवून देण्यासाठीं ह्या जिभेला ह्या दोन परमपूज्य व्यक्तींविरुद्ध काय काय असत्य वदावें लागलें तें मला, त्या ऐकणाऱ्या सेनापतीला व परमेश्वराला माहीत; पण ज्याचा शेवट गोड, तें सर्वच गोड.—"

"तेंच मीदेखील म्हणणार होतों. ह्या सगळ्याचा शेवट गोड झाला ना ?" रामानंदांनीं विचारलें.

"आपणा सर्वांच्या कृपेनें माझा हेतु सफल झाला असें मला वाटतें. मुरारी चिमाजीअप्पांकडे वळून म्हणाला, "श्रीमंत ! आपणा सर्वांना इतके दिवस अनेक गूढें पडलेलीं आहेत. अँन्टोनिओची मुक्तता कशी झाली याचा शोध लागला का ?"

"नाहीं !"

"आणि निर्मळला शत्रूचें एक संदेशवाहक कबुतर अचानकपणें आपल्या सैनिकाच्या हातीं लागलें, तें कोणाचें होते ?"

"त्याचादेखील शोध लागला नाहीं."

"ह्या सर्व कारस्थानांच्या मुळाशीं बार्बारा आहे. तें कबुतर ह्या कबुतरांचें भावंड होतें. ह्या कबुतरांच्या साह्यानें वसईच्या किल्ल्यावर बातम्या पोंचविण्याचा बार्बाराचा उद्योग आज बारा तेरा दिवस अव्याहत चालला आहे. धोंडशास्त्री व भय्याशास्त्री यांना बंदीवासांतून मुक्त करणारी ढालगज भवानी तीच; इतकेंच काय, पण आपल्या खलबतखान्यांत होणारीं खलबतें ठिकठिकाणच्या अनुयायांना अंमलबजावणीसाठीं कळण्यापूर्वी तीं वसईच्या किल्ल्यावर सेनापतीला कळतात." मुरारी बाजीबाकडे वळून म्हणाला, "कदाचित् किल्लेदारांना ह्या गोष्टीचा कांहीं

सुगावा असेल; कारण ते फार चतुर व चौकस असून त्यांच्याच पराक्रमानें ह्रा किल्ला आपणां मराठ्यांना प्राप्त झालेला आहे. ह्या किल्ल्याची व त्याबरोबरच साऱ्या मराठमंडळाची व स्वतःचीही इभ्रत राखण्यासाठीं ते डोळ्यांत तेल घालून जपत असले पाहिजेत ! त्यांनीं ह्या फितुरीचा शोध करून त्याविषयीं योग्य तो बंदोबस्त केला पाहिजे."

मुरारीचे हे शब्द तर बाजीबाच्या वर्मी जाऊन झोंबले. त्यानें कसें तें वर मान करून पाहिलेंदेखील नाहीं.

" एकूण शेवटीं एका यःकश्चित् बायकोमाणसानेंच आम्हांला चकविलें म्हणावयाचें ! आम्हां सर्वांचीच अक्कल बार्बाराच्या कारस्थानांपुढें गुंगून गेली !" चिमाजीअप्पा रागाच्या ओघांत किंचित् ओंठ चावीत उद्गारले, " केवळ नारो शंकरांची सुटका बार्बाराच्या मध्यस्थीवरून झाली, ह्या तिच्या चांगुलपणावर भाळून आपण सर्व फसलों."

" होय !" बाजीबा इतक्या वेळांत पहिल्यानेंच बोलता झाला, " श्रीमंत ! मीं तरी बार्बाराला पहिल्या दिवशीं किल्ल्यावर आश्रय दिला, तो तिचा भलेपणा पाहूनच."

" स्त्रियांचें मोहक स्त्रीपण हाच तिचा भलेपणा आहे असें प्रत्येकाला—निदान प्रत्येक स्त्रैण पुरुषाला वाटतें." बोलतां बोलतां मुरारीनें बाजीबाच्या चर्येकडे एकसारखी टक लावली होती. तो स्त्रैणपणाचा आरोप जरी सार्वत्रिक ऊर्फ अनामिक होता, तरी तो मुख्यतः बाजीबाच्या वर्मी चांगलाच झोंबला. तें पाहून मुरारीनें त्या कडू भाषणावर थोडी साखरपेर केली, " पण बाजीबांसारखे कर्तव्यनिष्ठ तरुण मराठे गडी जे आपल्या बायका मुलांच्या व आपल्याही प्राणाची पर्वा न करतां मायदेशाच्या मंगलासाठीं झटणारे, त्यांच्यासारख्यांच्या डोळ्यांतदेखील बार्बारासारखी एक यःकश्चित् बायकोमाणूस धूळ फेंकूं शकली, ही एथल्या रणमर्दांची नामुष्की म्हणावयाची कीं बार्बाराची शहामत म्हणावयाची ? "

रामानंद म्हणाले, " तर मग मला वाटतें, फ्रॅन्सिस जो आपल्या वतीनें फिरंग्यांशीं लढण्यासाठीं म्हणून मंडपेश्वराकडे गेला, तोदेखील पोटांत असाच कांहीं दुष्ट कावा धरून गेला असला पाहिजे."

" अर्थात् ! नाहींपेक्षां त्याच्या तांडेलगिरीखालीं मंडपेश्वराचा पाडाव करण्यासाठीं गेलेलें आरमारी जहाज वाटेंतच फिरंग्यांच्या स्वाधीन होऊन तेंच आपणां-

विरुद्ध लढण्याच्या कामीं शत्रूला कसें उपयोगांत आणतां आलें असतें ?" नारायणजी म्हणाला.

"नारो शंकरांची मोकळीक झाली, ती बार्बोराच्या शब्दावर झाली, ही आपल्या मंडळीची समजूतदेखील बावनकशी असत्य आहे." मुरारी म्हणाला.

"खरें ?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

"खरें." मुरारी उत्तरला.

चिमाजीअप्पा चित्राप्रमाणें तटस्थ वृत्तीनें बाजीबाच्या तोंडाकडे पाहूं लागले. त्या पहाण्याचा अर्थ असा कीं, त्या एका गोष्टीवर भोळेपणानें विश्वासून बाजीबानेंच चिमाजीअप्पांपाशीं बार्बोराची प्रशंसा केली होती; व फ्रॅन्सिसला मंडपेश्वरावरील मोहिमेवर मराठ्यांच्या बाजूनें लढण्याला जातां आलें तेंदेखील त्याच प्रशंसेच्या जोरावर एकूण बार्बोराच्या ढालगजपणाचा सर्व दोष आपल्या माथीं येत आहे असें पाहून बाजीबाचें मस्तक भणाणून गेलें. त्याला मनस्वी मनस्ताप झाला. त्या मनस्तापाचे बार्बोरा हें एक ज्ञात कारण झालें; पण त्या-शिवाय आणखी एक अज्ञात कारणही होतें; तें असें कीं, बाजीबाची तरुण व सुशील पत्नी बगूबाई ही बार्बोराच्या थेरांना कंटाळून आपल्या माहेरीं निघून गेली होती. बाजीबानें बार्बोराशीं जोडलेली दोस्ती तिला संशयास्पद वाटल्यामुळें ती बाजीबाला रागाच्या भरांत कांहीं तोडून बोलली; त्यामुळें बाजीबानें चिडून तिला मारझोड करून माहेरीं हाकलून दिलें होतें. बगूबाईची ही अशी वाट लागली, फ्रॅन्सिसही मंडपेश्वरच्या लढाईवर गेला व त्यामुळें बाजीबाच्या संसारांत बार्बोराचा अनिर्बंध धांगडधिंगा सुरू झाला होता. बार्बोरानें बाजीबाला इतकें वश करून घेतलें होतें कीं, मराठमंडळांत कोणतीही महत्त्वाची वाटाघाट झाली, कीं ती बाजीबाच्या संमतीनेंच व्हावयाची; बाजीबानें ती बार्बोरापाशीं बोला-वयाची, बार्बोरानें ती कबुतरांच्या अथवा अन्यद्वारां वसईला पोर्शियाला कळवावयाची, पोर्शियानें ती खबर सेनापतीला द्यावयाची व सेनापतीनें मराठ्यांची मसलत हाणून पाडावयाची; अशी बाजीबापासून थेट पोर्तुगीज सेनापतीपर्यंत फितुरीची लांबण लागली होती व बाजीबाला त्याची दादही नव्हती. पण आतां मुरारीनें जो प्रकार उजेडांत आणला त्यावरून बाजीबाचें मन त्याला खाऊं लागलें कीं, ह्या सर्व अनर्थाला कारण आपण !

बार्बोरा ढालगज आहे याविषयीं बाजीबाला आतां यत्किंचित् शंका उरली नाहीं. तरीही त्यांतल्यात्यांत बाजीबाला समाधान मानावयाला एकच जागा होती; त्याच्या मताप्रमाणें बार्बोराच्या खटपटीमुळेंच नारो शंकरांची सुटका झाली होती; पण मुरारी ती गोष्टदेखील असत्य आहे असें ठांसून सांगूं लागला. तो धक्का बाजीबाच्या मनाला असह्य झाला. त्यानें मुरारीला विचारलें, "नारो शंकरांची सुटका बार्बोराच्या मध्यस्थीनें झाली नाहीं असें तूं कशावरून म्हणतोस?"

"हा पहा पुरावा. ह्या पुराव्याच्या जोरावर मी तसें म्हणतों." असें म्हणून मुरारीनें आपल्या अस्तनींतून एक पत्र काढून तें बाजीबाच्या हातीं दिलें व म्हटलें, "पोर्शियानें बार्बोराला लिहिलेल्या पत्राचा हा मराठी तर्जुमा आहे. मीं तो मुद्दाम पुराव्यासाठीं करून घेतला आहे."

बाजीबानें तें पत्र वाचून पाहिलें मात्र व तें तसेंच मुरारीच्या हातीं देऊन तो म्हणाला, "तूं म्हणतोस तेंच खरें. त्या चांडाळणीनें मला चकविलें. माझ्या डोळ्यांत धूळ फेंकून माझ्या नांवाला डाग लावला." तो नेत्रांत उभे राहिलेले संतापाश्रु आपल्या अंगरख्याच्या अस्तनीनें पुशीत उद्गारला, "माझा अधःपात झाला; मी फसलों. ह्या पापाचें प्रायश्चित मला घेतलेंच पाहिजे. बस्स!—" असें अर्धवट बोलून बाजीबा त्याच क्षणाला बैठकींतून उठून बाहेर निघाला.

"थांबा किल्लेदार! जरा थांबा." मुरारी म्हणाला.

"आतां मला श्रीमंतांसमोर उभें राहाण्याला तोंड नाहीं. मला प्रथम ह्या अनर्थाचें मूळच उपटून टाकलें पाहिजे." असें म्हणून बाजीबा तेथून बाणासारखा निघून गेला.

मुरारी बाजीबाला उद्देशून म्हणाला, "स्वतःची नामुष्की स्वतःच्या कानांनीं ऐकायला नको, म्हणून किल्लेदार घाईघाईनें निघून गेले."

नारायणजीनें हळूच विचारलें, "कीं ते बार्बोराला वेळींच सावध करून वांचविण्यासाठीं निघून गेले?" पण नारायणजीच्या बोलण्याकडे कोणीं फारसें लक्ष्य दिलें नाहीं.

चिमाजीअप्पांनीं मुरारीपासून तें पत्र मागून घेऊन वाचून पाहिलें. त्यांत पुढीलप्रमाणें मजकूर होता.

"अर्नोळा आपल्या स्वाधीन होण्यासाठीं किल्लेदाराला भरपूर लांच देण्याचेंही जरूर तर कबूल कर. त्याचें ज्या अर्थी तुझ्यावर प्रेम आहे,

त्या अर्थी तो लांच घेऊन वश होईल असें वाटतें. एक किल्लेदार तेवढा वश झाला, कीं मग आपले बेत तडीला जावयाला फारसा प्रत्यवाय नाहीं. नारो शंकर तुझ्या खटपटीनें सुटला अशी जी तेथल्या सर्व मंडळींची समजूत आहे ती आपल्या फारच हिताची आहे. त्या समजुतीच्या जोरावर तूं प्रस्तुत साऱ्या सृष्टीची उलथापालथ करूं शकशील. तूं आपलें सर्व सामर्थ्य पेशवे व रामानंद ह्या दोघांना कोंडण्यांत खर्च कर. आणि मराठ्यांशीं शिष्टाई करण्यासाठीं जेव्हां लोक येतील, तेव्हां त्यांच्याशीं वैमनस्य दाखविण्याला चुकूं नकोस. आपला हा डाव साधला, चिमाजीअप्पा पेशवा व स्वामि रामानंद हे आपल्या हातीं येऊन अर्नाळाही हातीं आला, कीं विजय आपल्या बाजूला ठेविलेला आहे."

  

( यापुढें पोर्शियाचा स्वतःच्या प्रेमसंबंधाविषयीं मजकूर होता. तिनें डोमिंगोला दोष देऊन, असेच त्याचें वर्तन सुरू राहिल्यास आपण त्याच्यावर अखेरपावेतों प्रेम करूं शकूं किंवा कसें याविषयीं संशय प्रदर्शित केला होता; पण पोर्शियाच्या निधनामुळें तिचा प्रेमविषय आपोआप संपला असल्यामुळें एथें त्याची वाच्यता कशाला ?)

पत्र वाचतां वाचतां चिमाजीअप्पांच्या गौरवर्ण चर्येवर संतापाची रक्तिमा कलेकलेनें उमटत होती. पत्र वाचून होतांच तें त्यांनीं रामानंदांच्या अंगावर टाकून नारायणजीला म्हटलें, "नारायणजी ! आत्तांच्या आतां जा व ती ढालगज भवानी आणि तो हरामखोर ह्या दोघांना कैद करून इकडे घेऊन या. त्यांच्या अपराधांना साजेशी शिक्षा त्यांना झाली पाहिजे."

रामानंद तें पत्र वाचीत असतां मुरारी चिमाजीअप्पांना म्हणाला, "श्रीमंत ! माझा एक विनंतिअर्ज आहे."

"काय ?"

"इतक्यांत लौकर तडकाफडकी आपण ह्या अपराध्यांना शासन करूं नये."

"तर काय ? अशा दगलबाजाला आणखी फितुरी करण्यासाठीं जिवंत ठेवूं ?"

"तसें मी म्हणत नाहीं. फितूर जो असेल, त्याला शासन हें झालेंच पाहिजे; पण किल्लेदार तसा फितूर नाहीं अशी एथवरच्या एकंदर प्रकारावरून माझी

खात्री झाली आहे. तो स्त्रैण असेल—नव्हे, आहे; एरव्हीं तो बार्बाराच्या आहारीं गेला नसता. तो जितका शूर तितकाच भाबडा आहे. आपणासारख्या चतुर मुत्सद्दयांनादेखील त्या बाईच्या पोटांतील कावा या घटकेपावेतों कळला नाहीं, मग किल्लेदाराला तिनें हां हां म्हणतां चकविलें यांत आश्चर्य तें काय? पण आपण त्याच्या आजवरच्या पराक्रमांकडे पाहिलें पाहिजे. सारींच माणसें सर्वस्वीं निर्दोष आपणाला कोठून सांपडणार? किल्लेदाराचा पराक्रम ह्या अर्नाळ्याच्या रूपाने आपणासमोर मूर्तिमंत नांदतो आहे; अशा रणगाजीला आपण एवढ्याशा अपराधाबद्दल हातचा गमावणार काय?" इतक्यांत रामानंदांचें पत्र वाचून झालें. मुरारी रामानंदांकडे वळून म्हणाला, "आपणाला माझे विचार कितपत पटतात? आपलें माझ्या बोलण्याकडे लक्ष होतें का?"

"हो! माझें लक्ष होतें. मलादेखील वाटतें कीं, ह्या प्रकरणांत बाजीबाचा अपराध म्हणण्यासारखा भयंकर नाहीं; मात्र एकदरींत असें वाटतें कीं, बार्बाराच्या मोहपाशांत गुरफटल्यामुळें बाजीबा बिघडला आहे. तेव्हां तिला मात्र अवश्य शासन झालें पाहिजे." रामानंद म्हणाले.

"नाहीं.—"

मुरारीला पूर्णपणें बोलूं न देतां चिमाजीअप्पांनीं एकदम त्याच्यावर ओरडून त्याला विचारलें, "काय नाहीं? मुरारी! बार्बारा ही स्त्री आहे, म्हणून तुला तिचा कळवळा येतो काय?"

"नाहीं." मुरारी म्हणाला, "श्रीमंत! मी काय म्हणतों तें आपण पूर्णपणें ऐकून तरी घ्याल? माझें उलट असें म्हणणें आहे कीं, बार्बाराला तिच्या अपराधाबद्दल देहान्त शासन तर मिळणें अवश्य आहेच; पण तें शासनदेखील तिच्या अपराधाला अपुरें होईल; यास्तव तिच्या जातभाईंचा पाडाव करण्याच्या कामीं तिच्या अस्तित्वाचा उपयोग करून घेऊन मग तिला देहान्त प्रायश्चित्त मिळावें."

एवढें मुरारी बोलतो, तोंच बाजीबा एक रक्तानें थबथबत असलेलें मुंडकें डाव्या हातीं व रक्तानें भरलेली तरवार उजव्या हातीं असा तेथें प्रविष्ट झाला व तें मुंडकें चिमाजीअप्पांसमोर ठेवून म्हणाला, "देहान्त प्रायश्चित्त! श्रीमंत! जिला आपण देहान्त प्रायश्चित्त देण्याचा विचार करीत होतां, त्या कुलटेचें हें मुंडकें पहा! गोष्ट खरी कीं, माझ्या गाढवपणामुळें हो चांडाळीण

शेफारली व सर्वांना डोईजड होऊन बसली. तिनें माझ्यावर मोहिनी घालून मला आपल्या दारचा कुत्रा बनवून सोडलें होतें. त्या संमोहावस्थेंत माझ्या हातून अनेक अपराध–अक्षम्य अपराध घडले; त्यांचा पाढा मी माझ्या तोंडानें कशाला वाचूं ? त्या सगळ्याचें सार एवढेंच कीं, मी महानीच व पातकी आहें. माझीं पापें माझ्या एथल्या बांधवांवर नाना प्रकारचीं पापें ओढवून आणण्याला कारण झालीं आहेत. ह्या सर्व अपराधांबद्दल मलादेखील देहान्त शासन मिळणेंच उचित आहे. तें शासन भोगण्याची माझी तयारी आहे; पण तें माझें मीं भोगण्यांत अर्थ नाहीं. मीं आत्महत्या केली तर 'भावी संकटांना भिऊन हा भ्याड मरून गेला' असें दुनियेभर माझें हंसें होईल; पण श्रीमंत ! तेंच शासन आपण मला दिलें तर आपल्या पदरच्या सर्व लोकांना दहशत बसेल कीं, कनक किंवा कान्ता यांच्या मोहाला बळी पडून कर्तव्यपराङ्मुख होणाऱ्या नादान देशकंटकाला पेशवेसरकार देहान्त शासन देतात !" बोलतां बोलतां बाजीबानें आपली तरवार चिमाजीअप्पांच्या पुढयांत ठेवली.

चिमाजीअप्पांना कांहीं क्षणांपूर्वीं बाजीबाचा मनस्वी संताप आला होता व संशयाच्या जाळ्यांत सांपडून ते बाजीबाला देहान्त शासन देण्यासाठीं अधीर झाले होते; पण बाजीबाची ती पूर्ण उपरति पाहून त्यांचा पूर्वीचा विचार पालटला. त्यांच्या संतापाचें अनुकंपेंत रूपांतर झालें. बार्बाराचा बाजीबानें वध केला हें जरी त्यांना रुचलें नाहीं, तरी आजवर बार्बाराच्या बाबतींत बाजीबाकडून कोणतेही अन्याय कळून वा नकळून घडले असले तरीदेखील ते बाजीबानें हेतुपुरस्सर केलेले नाहींत अशी त्यांची खात्री झाली. ते त्यास म्हणाले, "बाजीबा ! तुझी कळकळ व आजवरची सेवा पाहून आम्हीं तुला तुझ्या अपराधांची क्षमा करण्याचें ठरविलें आहे."

"पण श्रीमंत ! आपल्या क्षमेनें माझ्या पापांचें क्षालन थोडेंच होणार आहे ?" बाजीबा म्हणाला.

"क्षमेनें पापांचें क्षालन होणार नाहीं; प्रायश्चित्तानें होणार आहे." रामानंद म्हणाले.

"मीदेखील तेंच म्हणत होतों. बाजीबासारख्या कसलेल्या वीराचें साह्य या वेळीं आम्हांला अवश्य उपयोगी पडेल. आम्हांला वास्तविक बार्बाराचाही फार उपयोग होणार होता; पण किल्लेदार ! तुमच्या आततायीपणाच्या ह्या

भयंकर कृत्यामुळें आम्ही त्या उपयोगाला मुकलों आहों. तोही वचपा आतां तुम्हीं भरून काढला पाहिजे व तें तुम्हांला शक्यही आहे." मुरारी म्हणाला.

"तें कसें काय?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

"तें आपण आतां बोलूंच. प्रथम मला किल्लेदारांची कबुली पाहिजे आहे." मुरारी म्हणाला.

"किल्लेदारांविषयीं आतां तुम्हांला काळजी नको. ते आजवर आमच्या शब्दाबाहेर गेले नाहींत व पुढेंही जाणार नाहींत." चिमाजीअप्पा बाजीबाकडे वळून म्हणाले, "बाजीबा! आपल्या हातून पाप झालें असें जर तुला वाटत असेल, तर त्या पापाचें प्रायश्चित्त घेऊन पावन होण्याला तुझी तयारी असेलच. मरावयाचेंच झालें तरी एखाद्या भागूबाईप्रमाणें मरणें बरें नाहीं. रणमर्दांना रणांगणावरील मरण शोभतें."

"ठीक आहे. रणांगणावर मरण्याची माझी तयारी आहे. मरणाला मी आजवर कधीं भ्यालों नाहीं व पुढेंही भिणार नाहीं."

"ठीक आहे. घ्या तर ती तरवार इकडे." असें म्हणून चिमाजीअप्पांनीं बाजीबाची तरवार मागून घेतली व ती बाजीबालाच अर्पण करून म्हटलें, "शत्रूचें रक्त पिण्याला ह्या तरवारीनें आजपासून प्रारंभ केला आहे. हिची तहान शत्रूंचा समूळ संहार होईतों शमावयाची नाहीं; ती तिची तहान शमविण्याची जबाबदारी बाजीबा आतां तुमच्यावर आहे."

बाजीबाने चिमाजीअप्पा व रामानंद यांना नम्रतापूर्वक वंदन करून त्या तरवारीचा स्वीकार केला.

  

ती सबंध रात्र त्या सर्व मंडळीचें पुढील योजनेविषयीं गुप्त खलबत झालें. त्या खलबतांतून काय निष्पन्न झालें हें जरी इतर कोणालाही कळलें नाहीं, तरी त्याच दिवशीं सायंकाळीं सूर्यास्ताच्या सुमाराला मंडपेश्वर मराठ्यांनीं पाडाव केल्याची शुभवार्ता किल्ल्यावर येऊन थडकली. ती हां हां म्हणतां सर्वत्र पसरली. बार्बाराच्या वधाची बातमी मात्र बाहेर फुटली नाहीं. तिच्या इतर परिवाराला ताबडतोब गिरफदार करून तुरुंगांत डांबण्यांत आलें, तें देखील या कानाचें त्या कानाला कळलें नाहीं. तरीपण एकंदरींत त्या दिवशीं किल्ल्यावर भयंकर घडामोडी सुरू झाल्या. इतकी उलथापालथ होण्याचीं कारणें काय हें जाणण्यासाठीं जो तो

परमोत्सुक झाला होता व जो तो दुसऱ्यापाशीं कुतूहलपूर्वक चौकशी करीत होता. त्या चौकशींतून जरी फार कांहीं निष्पन्न झालें नाहीं, तरी जें काय थोडें-बहुत निष्पन्न झालें, त्यावरून ज्याच्या त्याच्या तोंडीं शुभवार्ता घोळूं लागल्या; त्यांचा निष्कर्ष असा कीं, 'मराठ्यांतील खंडोजी माणकर, गंगाजी नाईक अणजूरकर, शिवाजी नाईक वगैरे अनेक खाशी मंडळी कोणी सुतार, तर कोणी लोहार, तर कोणी कांसार बनून वसईच्या किल्ल्यांत ठाणें देऊन बसले असून त्यांनीं गुप्तपणें किल्ल्यावरील बरींच सूत्रें आपल्या मुठींत आणलीं आहेत. मुरारी हा त्यांच्यापैकींच एक आहे. आतां लौकरच मराठे त्या आपल्या मंडळी-कडून मिळालेल्या अंदाजानें बाहेरून वेढ्याची उभारणी करून हल्ला चढविणार व किल्ला जिंकून त्यावर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकविणार !' ह्या बातम्या अर्थात् खाशा मंडळींचीं खलबतें चोरून ऐकणाऱ्या एकनिष्ठ व विजयोत्सुक सेवकांकडून बाहेर फुटल्या होत्या, अर्थात् त्यांच्या विश्वसनीयतेबद्दल मुळींच शंका नव्हती.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच बाजीबा आणि मुरारी हे दोघे वसईला जाण्यासाठीं रवाना झाले असेंही सर्वांना माहीत झाले. मुरारीच्या जाण्याविषयीं कोणाला आश्चर्य वाटलें नाहीं; पण बाजीबा त्याच्याबरोबर कशाला गेला हें मात्र कोणालाही कळलें नाहीं. तरीपण चिमाजीअप्पा, रामानंद वगैरे खाशी मंडळी त्या दोघांनाही पोंचविण्यासाठीं मुद्दाम किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत गेली. ते दोघे नावेंत बसतांना त्यांना रामानंदांनीं शुभाशीर्वाद देऊन श्रीफळ त्यांच्या पदरीं घातलें व 'वसईच्या किल्ल्यावर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकल्याशिवाय आम्ही माघारे येणार नाहीं'. अशी प्रतिज्ञा करून बाजीबा व मुरारी नावेंत बसले. तें पाहून सर्व मंडळीनें कयास बांधला कीं, 'ह्या धर्मसंग्रामाचा शेवट लौकरच लागून मराठे विजयी होणार'.

## प्रकरण सतरावें

# मेरी आणि जोसेफ

दुधांत साखर पडावी या न्यायानें मंडपेश्वराकडील विजयी वीर त्याच दिवशीं सूर्योदयाच्या सुमाराला अर्नाळ्यावर येऊन पोचले. त्या युद्धप्रसंगाच्या सुरम्य विजयवार्ता ऐकण्यांत मंडळीचा बराचसा वेळ गेला. मात्र एखाद्या परम-रूपवती युवतीला टक्कल पडल्यामुळें तिच्या सौंदर्यांत वैगुण्य उत्पन्न व्हावें, त्या-प्रमाणें त्या विजयांतही कांहीं वैगुण्यें होतींच. त्यांतलें मुख्य वैगुण्य हें कीं, मराठ्यांकडील एक मुख्य वीर भैरव हा ऐन युद्धाच्या खणाखणींत कोठें नापता झाला होता; मराठ्यांकडील पट्टीचा गोलंदाज रॉबर्टसन हाही सोफियाच्या नादानें फिरंग्यांना वश झाला होता व सर्वांत विशेष विस्मयकारक गोष्ट ही की, मराठ्यांनीं ज्या दोन जीवांच्या आधारावर मुख्यतः ही मोहीम जिंकली होती, ती सोफियाची दासी मेरी आणि तिचा भाऊ जोसेफ हीं दोघेंही कोठें नापता झालीं होतीं. रॉबर्टसन फिरंग्यांच्या बाजूला वळला, याचें कोणाला फारसें आश्चर्य वाटलें नाहीं; प्रारंभापासूनच भैरव, विठ्ठल शिवदेव, बुबाजी नाईक, दुल्लभजी मोरे, नारो शंकर वगैरे मंडपेश्वरच्या प्रलयांत मराठ्यांच्या बाजूनें प्रामुख्यानें मृत्यूच्या जबड्यांत उभे ठाकून झगडणाऱ्या वीराग्रणींना त्याचा फारसा भरंवसा वाटत नव्हता; पण मेरी व जोसेफ ह्या दोन भावंडांनीं मराठ्यांना फिरंग्यांच्या गोटांतील भेद वेळोवेळीं अचूक देऊन विजयमंदिराचें एकेक दालन खुलें करून दिलें होतें. अगदीं प्रथम मेरीनेंच मंडपेश्वरच्या फिरंग्यांच्या तयारीची खबर भैरवाला दिल्या-मुळें मराठ्यांना आपली जय्यत तयारी करण्याला भरपूर अवसर मिळाला होता.

मंडपेश्वरचें ठाणें म्हणजे फिरंग्यांचा बालेकिल्लाच होय. तें त्यांचें साष्टी प्रांतांतील एक मुख्य धर्मपीठ व विद्यालय या नात्यानें तर त्याला महत्त्व होतेंच; पण शिवाय तें ठिकाण सुरक्षितपणाच्या दृष्टीनेंही अत्यंत महत्त्वाचें असें होतें. हें त्या स्थलाचें महत्त्व प्राचीन काळापासूनचें होतें. प्राचीन काळ म्हणजे अत्यंत धामधुमीचा; त्या काळांत बौद्ध भिक्षूंनीं कान्हेरी-मंडपेश्वरचा हा डोंगरी व वन-वैभवसंपन्न असा प्रदेश हुडकून काढून तेथें अनेक सुंदर गुहा खोदून तेथें वास्तव्य केलें. पुढें आद्य शंकराचार्यांनीं बौद्ध धर्माचा उच्छेद करून अखंड भारतवर्षांत

सनातन हिंदुधर्माचा ध्वज फडकविला. तेव्हांदेखील कांहीं बौद्ध भिक्षूंना ह्या गुहांत निर्वेध आश्रय मिळाला. कालांतरानें बौद्धधर्माचा ऱ्हास होऊन सनातन हिंदुधर्म प्रभावशाली झाला, बौद्ध भिक्षु एकामागून एक कालवश झाले व त्यांचीं तीं निवासस्थानें हिंदु साधु-संन्याश्यांच्या वास्तव्यानें मंडित झालीं. ह्या हिंदुधर्माच्या भरभराटीच्या काळांतच मंडपेश्वरचें देवालय वैभवशिखराला पोंचलें. तोंच फिरंग्यांची वक्रदृष्टि अष्टागराकडे वळली व हा निसर्गरमणीय भूमिभाग त्यांच्या काकदृष्टींतून बचावूं शकला नाहीं. फिरंग्यांनीं तो भाग आपल्या अंमलाखालीं आणून तेथल्या साधु-बैराग्यांची कत्तल केली व तेथें आपलें ठाणें दिलें त्यांनीं मंडपेश्वराच्या देवमंदिराचें ख्रिस्ती प्रार्थनामंदिर बनविलें, आजूबाजूच्या इतर पवित्र हिंदु देवालयांचीही तशीच विटंबना केली व मंडपेश्वरच्या देवाला जें अफाट उत्पन्न होतें, त्या उत्पन्नावर ख्रिस्ती धर्मगुरु मनमुराद चरूं लागले. पुढे मराठ्यांनीं वसईचा धर्मसंग्राम आरंभून फिरंग्यांचा उच्छेद मांडला; तेव्हां फिरंग्यांनीं मंडपेश्वर येथें लढाईची उत्कृष्ट तयारी करून मराठ्यांशीं तोंड देण्याचा निर्धार केला होता.

कान्हेरी मंडपेश्वरचा डोंगराळ भाग फिरंग्यांना वस्ती करण्याला जितका सोईचा, तितकाच तो जिंकून घेण्याला मराठ्यांना गैरसोईचा होता. शिवाय तेथली फिरंग्यांची तयारी मराठ्यांच्या डोळ्यांवर येण्याइतकी उघडी नव्हती. त्यामुळें मराठ्यांनीं वसई साष्टीमधील इतकीं ठाणीं जिंकून घेतलीं तरी मंडपेश्वर त्यांच्या दृष्टिपथाबाहेरच राहिला होता. मराठ्यांचा विचार असा कीं, मुख्य वसईचा किल्ला काबीज झाला, कीं फिरंग्यांची त्या प्रांतांतून उचलबांगडी झाली. मग मंडपेश्वर ताब्यांत आल्यांतच जमा. आणि फिरंग्यांनींही ऐन खडाजंगीच्या वेळीं मराठ्यांवर मागाहून छापा घालण्याला सोईचें पडावें, म्हणून मंडपेश्वरची तयारी राखली होती. ती त्यांची तयारी जर उजेडांत आली नसती, तर ऐनवेळीं मराठ्यांवर तें एक परम संकट कोसळलें असतें; पण भगवंताची इच्छा त्या धर्मसंग्रामांत मराठ्यांना विजयी करण्याची होती, म्हणून केवळ त्याच्या इच्छामात्रेंकरून चुळणें एथील प्रळय अकल्पितपणें उत्पन्न झाला व त्यामुळें मराठ्यांचा मोर्चा मंडपेश्वराकडे वळला.

त्या वेळींदेखील मेरीनें जर मराठ्यांना मंडपेश्वरचा भेद दिला नसता, तर पेटत्या दिव्यावर पतंगानें झडप घालावी त्याप्रमाणें भैरव, विठ्ठल शिवदेव व

दुल्लभजी यांची अवस्था झाली असती. मेरीनें नुसती फिरंग्यांच्या तयारीची बातमीच दिली असें नाहीं, तर कान्हेरी-मंडपेश्वराच्या आजूबाजूला फिरंग्यांची कोठें काय तयारी आहे हेंदेखील तिनें मराठ्यांना अचूक रोजच्या रोज येऊन सांगावें व मराठ्यांनीं नेमका त्या त्या ठिकाणांवर घाला घालून फिरंग्यांची वाताहात उडवावी. मेरी ही सोफियाची विश्वासू दासी, सोफिया ही फादर पोर्टोची प्रियतमा व फादर पोर्टो हा मंडपेश्वरचा प्रमुख फिरंगी पुढारी; अशी सांखळी जुळल्यामुळें व मेरीचा प्रारंभापासूनच सारा ओढा मराठ्यांकडे असल्यामुळें तिनें फादर पोर्टोच्या अंतरंगांतील बातम्या ऐकून गुपचुपपणें मराठ्यांना येऊन सांगाव्या व मराठ्यांनीं त्या रोखानें आपलें पुढील धोरण ठरवावें, असा प्रकार एकसारखा सात आठ दिवस सुरू होता. मराठ्यांना मेरी इतकी जबाबदारीची कामगिरी कशी पार पाडते हें एक गूढच होतें. पण तें गूढ एके दिवशीं स्वतः मेरीनेंच भैरवापाशीं उकलून दाखविलें होतें; तें असें कीं, मेरी सोफियाची विश्वासू हेर म्हणून मराठ्यांच्या गोटांत मराठ्यांकडील बातम्या काढण्यासाठीं साकसुरतणपणें येई व बातम्या काढून माघारी जाई. सोफियानें आपल्या हलक्या शीलाला अनुसरून मेरीला आणखी अशीही राजरोस मोकळीक दिली होती कीं, मराठ्यांचा म्होरक्या जो भैरव, त्याच्यावर मायावी प्रेम दाखवून त्याला मोहजालांत अडकवून गोता देतां आला तरी फार चांगले. इतकी मोकळीक मेरीला मिळाल्यावर फिरंग्यांच्या गोटांतून मराठ्यांच्या गोटांत राजरोसपणें दिवसा-रात्रीं केव्हांही येण्याला मेरीला कोण प्रतिबंध करणार ? बरें; मराठ्यांच्या गोटांत संचार करण्याला तर तिला सदर परवानगीच होती. मराठ्यांच्या गोटांतील लोकांचा तर असाही समज झाला होता कीं, मेरीचें भैरवावर खरेंखुरें प्रेम आहे, व त्या प्रेमापायींच ती आपला जीव धोक्यांत घालून इतकी कामगिरी करीत आहे. मेरीच्या मनांत काय असेल तें असो; पण हा प्रेमाचा विषय भैरवाच्या मात्र प्रथम तरी गांवींही नव्हता व मेरीनेंही आपल्या शालीनतेला अनुसरून ह्या बाबतींत भैरवापाशीं अथवा दुसऱ्या कोणापाशींही याबद्दल कधीं अवाक्षरही उच्चारलें नव्हतें.

पण वीज चमकावी व लगेच अदृश्य व्हावी, असाच मेरीचा हा स्वैरसंचार क्षणिक—नव्हे, केवळ आठ दिवसांपुरताच ठरला व आठव्या दिवशीं मेरी जी दिसेनाशी झाली, तिचा पुढें केव्हांही पत्ता लागला नाहीं. पण मेरीची ही जागा

तिचा धाकटा भाऊ जोसेफ यानें भरून काढली. मेरीनें आठव्या दिवशींच भैरवाला सांगितलें होतें कीं, आपल्या कामगिरीचा दिवसेंदिवस जास्त बोभाटा होत आहे व आपलें यौवन आणि सौंदर्य आपल्या मार्गांत आड येऊं पहात आहे, यास्तव यापुढें आपण ही कामगिरी जोसेफवर सोंपविली आहे. जोसेफ हा आपलाच मनुष्य आहे याविषयीं भैरव व मराठ्यांच्या गोटांतील इतर सेनानी यांची खातरजमा होण्यासाठीं मेरीनें भैरवापासून त्याच्या हातांतील आंगठी खूण म्हणून मागून घेतली होती व ती आंगठी दाखवील तो आपला भाऊ जोसेफ अशी खुणेची गोष्ट सांगितली होती. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवसापासून जोसेफ मराठयांच्या गोटांत येऊन मेरीची कामगिरी करूं लागला. जोसेफपाशीं जरी ती खुणेची आंगठी नसती तरी त्याच्या तोंडवळ्यावरून तो मेरीचा सख्खा भाऊ आहे हें कोणींही ओळखलें असतें. मेरीला ज्या प्रकारचें प्रेम भैरवावर करण्याची मोकळीक तिच्या धनिणीकडून मिळाली होती त्या प्रकारचें प्रेम जरी भैरवाचें मेरीवर नव्हतें व भैरव आपल्या प्रिय पत्नीच्या, पित्याच्या आणि एकुलत्या एका पुत्राच्या निधनदुःखांत बुडून गेल्यामुळें त्याला पूर्णपणें स्मशानवैराग्यानें घेरल्याकारणानें तशा प्रकारच्या वैवाहिक प्रेमाचा उगम त्याच्या अंतःकरणांत होणें शक्य नव्हतें. तरी मेरी ही आपली जिवलग मैत्रीण आहे असें मात्र भैरवाला वाटूं लागलें होतें व मेरीची रोज घटकाभर भेट होई तेवढ्या तुटपुंज्या काळांत त्याला आपल्या सर्व दुःखांचा विरंगुळा होई. सहवासानें प्रेम वाढतें हा निसर्गाचा नियमच आहे. त्या नियमानुसार भैरवाला मेरी ही आपली जिवलग मैत्रीणशी वाटूं लागावयाला व मेरीच्या मार्गांत संकटें येऊं लागल्यामुळें ती मराठयांच्या गोटांत यावयाचें बंद होऊन तिची जागा जोसेफनें भरून काढावयाला एक गांठ पडली. जोसेफही मेरीचाच भाऊ, मेरीइतकाच आपल्या देशाचा व धर्माचा अभिमानी आणि मराठयाचा निःसीम कैवारी असल्यानें त्यानें मेरीची उणीव सर्वस्वीं भरून काढली व भैरवाची मैत्री संपादन केली. तरी आपण एका जिवलग मैत्रिणीला मुकलों ही जाणीव भैरवाच्या मनाला रोज खिन्नता आणीत होती. त्या खिन्नतेंत जोसेफच्या मनमोकळ्या निवेदनाची आणखी भर पडली. रोज भैरवानें जोसेफपाशीं मेरीविषयीं चौकशी करावी व जोसेफनें त्याला मेरीचें कुशल कळवावें, असा प्रकार पहिले दोन तीन दिवस घडून आला व जसजसा त्या दोघांचा परिचय दृढ होत गेला, तसतसा भैरव अधिकाधिक आस्थेवाईकपणें मेरीसंबंधीं

चौकशी करूं लागला. निर्मळ भावानें भैरवानें चौकशी करावी व निर्मळ भावानें जोसेफनें त्याला मेरीचें कुशलवृत्त कळवावें, मेरीला आपली आठवण होते किंवा नाहीं असेंही भैरवानें विचारावें व जोसेफनें होकार द्यावा. तात्पर्य, मेरी जरी भैरवाच्या दृष्टीआड झाली, तरी तिच्याविषयींची कळकळ व आदरभावना भैरवाच्या अंतःकरणांत एकसारखी वाढतच होती. अखेर एके दिवशीं मेरीला भेटावयाला बोलावण्याइतका भैरव अधीर झाला व दुसऱ्या दिवशीं मेरीच्या भेटीची वाट पहातां पहातां त्याच्या हातून रणसंग्रामांतील कामगिरीलाही थोडें वैगुण्य प्राप्त झालें. मेरीविषयींची भैरवाची ही आतुरता पुढें कोणत्या थराला गेली असती व त्या आतुरतेच्या भरांत त्याच्या हातून स्वीकृत कार्यांत किती वैगुण्य प्राप्त झालें असतें भगवान जाणे! पण दुसऱ्या दिवशीं सकाळींच मराठे आणि फिरंगी यांच्यांत निकराची लढाई जुंपून त्या लढाईंत उभय पक्षांचा भयंकर संहार झाला, त्या रणकंदनांत अखेर जरी मराठयांनाच विजय प्राप्त झाला, तरी मराठ्यांचे कैक सेनानी जखमी झाले व भैरव त्या समरांगणांत जो घुसला, तो पुन्हा कोणालाच आढळला नाहीं. त्यानें रणांगणांत निकरानें उडी घातली व तोफांतून निघणाऱ्या तप्त लोहगोलांचा पर्जन्यासारखा अग्निवर्षाव सुरू असतांही त्या वर्षावांतून तो शत्रूची फळी फोडून थेट आंत घुसला, एवढें मात्र मराठे सैनिकांनीं पाहिलें, व त्यांतल्या एका सैनिकानें तर असेंही सांगितलें कीं, त्या रणकंदनांतून जोसेफ बाहेर येतांना पाहून त्याला वांचविण्यासाठीं भैरवानें तें साहस केलें. तें खरें असो किंवा खोटें असो, त्या घटकेपासून भैरव, जोसेफ व मेरी यांपैकीं कोणीही मराठ्यांना भेटलें नाहीं. त्या दिवशींचा रणसंग्राम आटोपून मराठयांनीं मंडपेश्वराच्या मंदिरावर आपला भगवा झेंडा फडकविला आणि नंतर सर्वत्र स्थिरस्थावर झाल्यावर आपल्या चुकलेल्या मंडळींचीं प्रेतें तरी सांपडतात कीं काय तें शोधून पाहिलें; पण व्यर्थ! त्या चुकलेल्या मंडळीपैकीं रॉबर्टसनचा तेवढा तपास पूर्वी सांगितल्याप्रमाणें लागला, अर्थात् तो तपास लागून न लागल्यांतच जमा; व भैरव सांपडला नाहीं तो नाहींच. मेरी व जोसेफ यांचा खरें सांगावयाचें तर मराठ्यांनीं फारसा कसून तपास केलाच नाहीं. त्यांची गरज संपली, मंडपेश्वर पाडाव झाला, मग त्या दुय्यम माणसांसाठीं फारशी यातायात कोण करणार! त्यांतूनही प्रत्यक्ष मंडपेश्वरच्या रणांगणावर ज्यांनीं त्या दोन भावंडांची अमोल कामगिरी प्रत्यक्ष पाहिली होती, त्यांना मात्र त्या दोघांची विस्मृति पडणें शक्य

नव्हतें; पण तीच मंडळी अर्नाळ्यावर येऊन पोंचल्यावर त्या मंडळीला लाभलेला विजय व अखेर तेथें हातीं लागलेला अमूप दाणागोटा आणि संपत्ति पाहून त्या लढाईंत एकंदरींत मराठ्यांचें जें नुकसान झालें त्याविषयीं कोणाला फारशी हळहळ वाटण्याचें कारण उरलें नाहीं. अतएव मंडपेश्वरच्या विजयाला यदृच्छेनें चिकटलेलीं हीं वैगुण्यें विशेष जमेंत धरण्याजोगीं नव्हतीं.

असो. याप्रमाणें विठ्ठल शिवदेव, दुल्लभजी मोरे, बुबाजी नाईक वगैरे मंडळी अर्नाळ्यावर येऊन पोंचतांच चिमाजीअप्पांनीं त्यांचें अपूर्व स्वागत केलें व रामानंदांनींही त्यांना शुभाशीर्वाद देऊन त्यांचा गौरव केला. त्या मंडळीनें मंडपेश्वरच्या देवालयांतील चांदी-सोन्याचीं अनेक भांडीं, घंटा, मूर्ति, बहुमोल अलंकार वगैरे लक्षावधी रुपयांचा ऐवज लुटून आणला होता, त्याच्या राशी चिमाजीअप्पांसमोर रचण्यांत आल्या. तेव्हां चिमाजीअप्पांनीं ती दौलत पाहून उद्गार काढले, " ही आमच्या रणशूर लोकांची कमाई त्यांनाच वांटून देण्याचा आमचा विचार आहे.—"

इतक्यांत नारो शंकर पुढें होऊन म्हणाला, " सरकार ! जरा सबूर करा. मंडपेश्वरचा विजय हा आमचा खरा विजय नव्हे. ॲन्टोनिओ व फादर पोर्टो ह्या दोन सैतानांनीं हा एवढा प्रसंग आमच्यावर ओढवून आणला आहे; ते ह्या अनार्थाबद्दल खरे जबाबदार असून फरारी आहेत. त्यांच्या रक्ताचें सिंचन ह्या दौलतीवर केल्याशिवाय ती पावन व्हावयाची नाहीं."

" आणि फ्रॅन्सिसचें काय ! " दुल्लभजी मोरे पुढें होऊन म्हणाला, " सरकार ! आपण जें खणखणीत नाणें म्हणून आमच्या हातीं दिलें, तें ऐन उलाढालींत अगदीं बद्द वाजलें. फ्रॅन्सिस ऐन वेळीं आमचा पक्ष सोडून आपल्या जातभाईंना जाऊन मिळाला. त्याचें शासन करण्याची आपण अगोदर कांहीं तजवीज करावयाला हवी. आम्हीं तिकडे असें ऐकलें आहे कीं, बार्बारा नांवाच्या ढालगज स्त्रीचा तो प्रियकर असून त्या स्त्रीला आपण भोळ्या भावानें किल्ल्यावर आश्रय दिला आहे.—"

" तो प्रश्न पूर्वीच निकालांत निघाला आहे; त्या बाबतींत अपराध्यांना योग्य शासन झालें आहे." चिमाजीअप्पा म्हणाले. तोंच एक उमदा सैनिक पुढें होऊन चिमाजीअप्पांसमोर आला व हात जोडून म्हणाला, " सरकार ! आपण अपराध्यांना शासन झालें असें म्हणतां खरें; पण खरे अपराधी अजून जिवंतच आहेत.

विषवृक्षाचें मूळ कायम राखून त्याच्या वरवरच्या फांद्या आपण तोडल्या व तेवढ्यावरून विषवृक्षाचा नायनाट झाला असा आपण आपला वृथा गैरसमज करून घेतला आहे. त्या अपराध्यांच्या शासनाची आपण तांतडीनें तजवीज केली पाहिजे. शत्रूनें आपलें एक अव्वलींचें मोहरेंही इरेला धरलें आहे."

त्या उमद्या तरुणाचा एकंदर रुबाब, त्याचें सौंदर्य, त्याच्या चर्येवरील तेज, त्याच्या वाणींतील माधुर्य, हरिणाच्या डोळ्यांप्रमाणें त्याच्या डोळ्यांत खेळणारें पाणी वगैरे पाहून जो तो त्याच्या चर्येकडे टकमका पाहूं लागला. त्याच्या ओंठांवर मिसरूडदेखील उगवली नव्हती, इतकें त्याचें वय कोंवळें होतें व त्याचें शरीरही फार गोंडस असल्यानें त्याला रणांगणावरील काबाडकष्ट सहन करण्याचा सराव नसावा असें स्पष्ट दिसत होतें. त्याच्या अंगावरील कपडे धुळीनें माखलेले असून श्रमातिरेकानें त्याच्या गौरवर्ण गोंडस चर्येवर लालीच लाली पसरली होती; पण त्या स्थितींतही विरल अभ्राच्छादनाखालीं शोभणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणें त्या तरुणाचें सौंदर्य खुलून दिसत होतें. असा हा नवीन तरुण कोण, असा प्रश्न सर्वांनाच पडला. त्या तरुणानें तेथें येतांच सर्वांचें चित्त आपणाकडे वेधून घेतलें होतें. जो तो त्याचें सौंदर्य, लहान वय, धाडस, धीटपणा व चपलता यांचें मनांतल्या मनांत कौतुक करीत होता.

नारो शंकर, दुल्लभजी मोरे, बुबाजी नाईक वगैरे मंडळी त्या तरुणाकडे पाहून आपसांत कुजबुजत होती, "हा जोसेफ तर नसेल ?"

तोंच चिमाजीअप्पांनीं त्या तरुणाला त्याचें नांव विचारलें. तेव्हां त्यानें किंचित् गोंधळून उत्तर दिलें, "आपणाला मी अपरिचित आहें खरा; पण—" तो नारो शंकर, दुल्लभजी वगैरे मंडळीकडे वळून पहात म्हणाला, "ही आपली रथी-महारथी मंडळी त्यांना मंडपेश्वरच्या लढाईत स्वतःच्या जीवाचीही पर्वा न करतां साह्य करणाऱ्या जोसेफला ओळखीत असली पाहिजे."

'जोसेफ' हें नांव ऐकतांच त्या मंडळीला मुळींच शंका उरली नाहीं. सर्वांना जोसेफ भेटतांच परमानंद झाला. चिमाजीअप्पांनीं मंडपेश्वरच्या वृत्तान्तांत जोसेफचें नांव प्रामुख्यानें ऐकलें होतें. त्यांना त्याचा परिचय होण्याला वेळ लागला नाहीं. शिवाय दुल्लभजी मोरे वगैरे मंडळीनेंही जोसेफची फार प्रशंसा केली. चिमाजीअप्पांना मराठ्यांच्या साह्यकर्त्या मेरीचें नांव आठवलें. त्यांनीं जोसेफला विचारलें, "जोसेफ ! मेरी तुझी बहीण ना ?"

ह्या प्रश्नाचें जोसेफकडून उत्तर मिळण्यापूर्वींच दुल्लभजी आगंतुकपणें उत्तरला, "होय." लगेच त्यानें जोसेफकडे वळून विचारलें, "जोसेफ! मेरीचा शोध लागला का?"

"नाहीं. कां बरें?" जोसेफनें दुल्लभजीकडे नापसंतीच्या नजरेनें पहात विचारलें. दुल्लभजी त्या प्रश्नानें मनांतल्या मनांत शरमिंदा होऊन म्हणाला, "नाहीं; उगाच विचारलें."

ती अगदीं क्षुल्लक गोष्ट; पण ती पुष्कळांच्या बहुतेकांच्या ध्यानीं आली व जो तो दुल्लभजी आणि जोसेफ यांच्या तोंडांकडे मधून मधून टकमक पाहूं लागला. बहुधा दुल्लभजीच्या हातून मेरीच्या बाबतींत कांहीं प्रमाद घडला असेल असा सर्वांचा तर्क झाला. तो विषय सर्वांनीं तेवढ्यावरच सोडला व चिमाजी-अप्पांनीं जोसेफला विचारले, "जोसेफ! आमचें कोणतें मोहरें शत्रूनें इरेला धरलें आहे?"

जोसेफ उत्तरला, "आपल्याला भैरवांचा शोध लागला का?"

"नाहीं." विठ्ठल शिवदेव उत्तरले.

"काल मंडपेश्वर येथील निकराच्या सामन्यांत भैरवांनीं घालून घेतलें, त्यानंतर ते बहुधा आपणांपैकीं कोणालाच भेटले नसतील!"

"नाहीं. म्हणूनच आम्हां सर्वांना त्याच्याविषयीं काळजी वाटते आहे." दुल्लभजी म्हणाला.

"काल सकाळच्या खडाजंगींत भैरवांनीं एकदम मंदिरावर चाल केली व ते मंदिरांत घुसले, तेव्हां मी त्यांच्याबरोबर होतों. आपणांमधून सोफियाच्या नादानें फुटून निघालेला रॉबर्टसन तेव्हां सोफियाच्या महालांत फादर पोर्टोशीं सोफिया-च्या बाबतींत झगडत होता व फ्रॅन्सिस तेव्हां आंतील फिरंग्यांना धीर देऊन लढण्याला प्रवृत्त करीत होता. फ्रॅन्सिस मीं भैरवांना दाखवून दिला. त्यांनीं त्याला जागच्या जागींच ठार मारलें. नंतर सोफियाच्या महालाकडे मी त्यांना घेऊन गेलों. तेथें सोफियाच्या नादानें बेभान बनलेला रॉबर्टसन भैरवांवर सर्पासारखा फूत्कारत उलटला. बराच वेळपर्यंत त्यांची दंगल चालली होती. आंतील कांहीं फिरंगी सैनिकही सोफियाची बाजू घेऊन भैरवांवर तुटून पडले. तेव्हां मीं त्यांना तेथल्या एका गुप्त भुयाराचा मार्ग दाखवून दिला. भैरवांनीं जातां जातां रॉबर्ट-सनला तर लोळविलेच व ते निघाले तेव्हां मीं त्यांना पोयसरच्या प्रार्थनामंदिरा-

पाशीं थांबावयाला सांगितलें. पोयसर एथें आपणां मराठ्यांचा पूर्वीच जय झाला असून तेथें फिरंग्यांपैकीं चिटपांखरूं देखील उरलें नव्हतें; व मंडपेश्वराहून निघालेलें भुयार पोयसरपावेतों पोंचलें होतें. मीं भैरवांना त्या भुयारांतून जाऊन पोयसरला थांबावयाला सांगितलें याचें कारण, तें भुयार फादर पोर्टो, सोफिया, मी व ॲनी आणि ह्या त्यांच्या दोन दासी यांनाच काय तें माहीत होतें. पैकीं एक दासी पूर्वींच प्राणभयानें कोठें पळाली होती. सोफिया व फादर पोर्टो यांनीं मंडपेश्वर आतां पाडाव होणार असें नक्की पाहून प्राणरक्षणासाठीं भुयारांतून प्रथम पोयसर एथें व तेथून वसईला पळून जाण्याचें ठरविलें होतें. तेथें त्यांना बिनबोभाट अटक करतां येईल ह्या भरंवशानें मीं भैरवांना आगाऊ तिकडे जावयाला सांगितलें. त्याप्रमाणें ते भुयारांतून निसटले. रॉबर्टसन व फादर पोर्टो यांच्या झटापटींत आपली आतां धडगत नाहीं असें पाहून सोफिया मला बरोबर घेऊन भुयारांतून निसटली. आमच्या मागोमाग फादर पोर्टोही रॉबर्टसनच्या हातचा बराचसा मार खाऊन पळत आला. आंतील फिरंगी सैनिकांनीं ऐन वेळीं फादर पोर्टोच्या बाजूनें भांडणांत पडून रॉबर्टसनला लोळविलें, म्हणूनच केवळ फादर पोर्टो जिवंत सुटला. पुढें आम्ही पोयसरला जाऊन पोंचतों, तों भैरव तेथें टपून बसलेले होतेच. त्यांनीं तेथल्या तेथेंच फादर पोर्टो व सोफिया यांना मुक्ति देण्यासाठीं त्यांच्यावर हत्यार उचलिलें. तोंच आमच्या मागोमाग दहा बारा सशस्त्र फिरंगी शिपाई चालून आले. त्यांनीं भैरवांवर निकराचा हल्ला केला. तरी-ही भैरवांनीं त्यांच्याशीं दोन हात करून त्यांना कापून काढलें व अखेर ते जखमी होऊन बेशुद्ध पडले. फादर पोर्टो मात्र तेवढ्यांत संधि साधून पळाला. त्याचा सोफियाला बरोबर घेण्याचा विचार होता. पण ती जखमी होऊन बेशुद्ध पडली असल्यानें त्यांनीं मला तिची काळजी घ्यावयाला सांगून तेथून पोबारा केला. मीं भैरवांना तशा बेशुद्ध स्थितींत तेथल्या प्रार्थनामंदिरांत एका एकांताच्या जागीं नेऊन त्यांना अंमळ सावध केलें. सुदैवानें शत्रूंच्या हालचालींवर टेहळणी करणारा एक घोडेस्वार तिथें आला. त्याला प्रथम आमच्या मंदिरांतील हालचालीची चाहूल लागली तेव्हां तो आपली तरवार सरसावून आंत आला; पण आंत येतांच त्यानें भैरवांना ओळखलें. भैरव तेव्हां नुक्ते कुठें अंमळ शुद्धीवर येऊन डोळे उघडून पाहूं लागले होते. त्यांनीं पुन्हा आपल्या गोटांत जाण्याची इच्छा दर्शविली; पण त्यांनीं तशा स्थितींत पुन्हा माघारें मंडपेश्वरीं जाणें धोक्याचें

वाटलें. तेव्हां मला एक युक्ति सुचली. मी बोलूनचालून शत्रूचाच बातमीदार असल्यानें शत्रूकडून माझ्या केंसालाही धक्का लागणें शक्य नव्हतें. 'फादर पोटोंनें मला भैरवाला घोड्यावर घालून वसईला पोंचविण्याला सांगितलें आहे' असा बहाणा करून भैरवांचा जीव बचावण्याचें मीं ठरविलें. माझी युक्ति त्या स्वाराला व भैरवांनाही पसंत पडली. लगेच त्या स्वारानें आपल्या मांडीखालील घोडा माझ्या स्वाधीन केला. मी भैरवांना घेऊन घोड्यावर स्वार होऊन घोडा दौडीत निघालों. वाटेंत मला कांहीं ठिकाणीं फिरंग्यांचे शिपाई भेटले. पण फादर पोटोंच्या आज्ञेचें निमित्त पुढें करून मीं भैरवाचें रक्षण केलें. असा त्रास पावलोपावलीं होऊं लागला, तेव्हां लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं मला भैरवांना बंदीवान करावें लागलें; पण सोपाऱ्यापाशीं आम्ही आलों व येथल्या शिवालयांत गेल्या रात्रीं वस्ती केली; तेव्हां फादर पोटोंचे शिपाई अचानक आमचा शोध करीत आले. त्यांनीं माझ्यापाशीं भैरवाविषयीं चौकशी करितांना 'वाटेतच माझ्या हातावर तुरी देऊन पळाले' असा बहाणा केला.—"

"पण भैरव खरोखर कुठें आहे ?" रामानंदांनीं उत्सुकतेनें मध्येंच विचारलें.

"माझें ऐका तर खरें !" जोसेफ पुढें म्हणाला, "आम्ही देवालयांत वस्तीला उतरलों तेव्हां तिथें जवळच्या धर्मशाळेंत एक तरुण ख्रिस्ती बैरागीण उतरलेली आम्हांला आढळली. ती बैरागीण आपला देश स्वतंत्र व्हावा, आपल्या बांधवांचा धर्मच्छल थांबावा, मराठे विजयी व्हावे व आपल्या पतीला सद्गति सद्बुद्धि सुचावी अशी परमेश्वराची प्रार्थना करतांना मीं ऐकलें, त्यावरून मला तिच्याविषयीं अनुकंपा वाटली व तिचा आधारही वाटला. ती फार प्रेमळ आहे. तिनें फादर पोटोंचे शिपाई आमच्या तपासावर आहेत असें पहातांच आमच्यापाशीं येऊन कळकळीनें आमची विचारपूस केली. माझ्या मायदेशासाठीं व मायधर्मासाठीं झटणारा प्रत्येक जीव मला परमेश्वराप्रमाणें प्रिय आहे, अशी त्या बैरागिणीनें आपली ओळख करून दिली. भैरवाची प्रकृति जास्तच बिघडलेली त्यांना घोड्याच्या पाठीवर घालून तेथून अन्य ठिकाणीं नेण्याचीही सोय नाहीं, त्यामुळें नाइलाजानें मीं त्यांना त्या बैरागिणीच्या स्वाधीन करून त्यांच्या रक्षणाची तजवीज करण्यासाठीं इकडे आलों."

"पण इतक्यात फादर पोटोंचे लोक भैरवाचा शोध करीत तेथें गेले तर ! तो सैतान तर भैरवाच्या जिवावर टपलेला आहे !" रामानंद म्हणाले.

"तशी वेळ सहसा येणार नाहीं. त्या भयाण पडक्या देवालयांत जावयाला माणसें फार भितात.* ख्रिस्ती लोकांना तें हिंदूंचें जाज्वल्य दैवत म्हणून तेथें जाण्याला भय वाटतें व हिंदूंच्या दृष्टीनें तें देवालय ख्रिस्ती लोकांच्या अत्याचारांमुळें भ्रष्ट झालेलें आहे. इतकेंही करून कोणी तेथें गेलेंच, तर 'भैरव इकडे आलाच नाहीं; हा आजारी आहे हा माझा भाऊ आहे' असें सांगून वेळ निभावून नेण्याइतकी ती बैरागीण धूर्त आहे."

"एकूण ही बैरागीण म्हणजे साक्षात् देवताच तुम्हांला भेटली म्हणावयाची!" रामानंद म्हणाले.

"होय! मात्र त्या बैरागिणीनें मी इकडे यावयाला निघालें तेव्हां माझ्यापाशीं श्रीमंत पेशव्यांना अनुलक्षून एक विनंति केली आहे."

"ती कोणती?" चिमाजीअप्पांनीं विचारलें.

"ती म्हणाली कीं, 'मी भैरवांचें रक्षण करतेंच; माझ्या जिवांत जीव आहे तोंवर मी त्यांच्या केंसालाही धक्का लागूं देणार नाहीं; पण ह्या सेवेचा मोबदला म्हणून श्रीमंत पेशव्यांनीं मला पाठची बहीण समजून माझें सौभाग्य मला द्यावें'. ही तिची विनंति मींही मान्य केली आहे."

ही तरुण बैरागीण कोण असावी याविषयीं तेथल्या मंडळींत आपसांत थोडीफार भवति न भवति झाली; पण कोणाचीही मति तर्कावडंबराचा भेद करून पुढें जाऊं शकली नाहीं. मात्र भैरव अजून सुखरूप आहे ही सुवार्ता ऐकून सर्वांना अत्यंत समाधान वाटलें. त्याला पूर्ण आयुरारोग्य लाभावें अशी परमेश्वराची प्रार्थना करून

---

*हल्लींच्या सोपारा स्टेशनापासून दीड मैलांवर सोपारा हें अतिप्राचीन गांव आहे. फार प्राचीन काळीं एथें कोंकणप्रांताची राजधानी होती. त्या वेळीं एथें सुमारें तीनशें हात उंचीचे मोठमोठे वाडे होते. लक्षावधि लोक एथें रहात असत व एथें कोट्याधीश व्यापाऱ्यांच्या पेढया होत्या. एथून लाखों रुपयांचा माल जहाजांतून लांबलांबच्या मुलुखीं जात असे. तेव्हां गांवासभोंवार मोठा तट असून त्याला अठरा दरवाजे होते. एथें सोन्याचें नाणें चालत होतें. पुढें मुसलमान, ख्रिस्ती वगैरे लोकांनीं ह्या गांवाचा विध्वंस केला! प्राचीन काळच्या कांहीं देवमूर्ति सांपडल्या आहेत, त्या एथें तळ्याच्या कांठावरील देवालयांत ठेविल्या आहेत. त्यांत एक नऊ फूट उंचीची त्रिमुखी शिवाची भव्यमूर्ति आहे.

रामानंद चिमाजीअप्पांना म्हणाले, "श्रीमंत ! सोपाऱ्याच्या आसमंतांतील भाग हें माझें शक्तिस्थान आहे. तेथल्या शेंकडों लोकांना मीं सोपारा एथील शिवालयांत पावन करून घेतलें आहे. यास्तव मीच तेथें गेलों तर भैरवाचें रक्षण करणें मला फार सुलभ जाईल. फादर पोर्टो जर सुदैवानें अजून वसईला जाऊन पोंचला नसला, तर त्याचाही मी समाचार घेऊं शकेन. त्याप्रमाणेंच आपल्याला निकराच्या हल्ल्यासाठीं जेवढे सैनिक मिळतील तेवढे हवेच आहेत; ते मला सोपाऱ्यासभोंवारच्या भागांतील माझ्या शिष्यवर्गामधून उभे करतां येतील."

"ठीक आहे." चिमाजीअप्पा म्हणाले, "पण तुम्हांला थोडेसे सैनिक बरोबर पाहिजेतच."

"होय." असें म्हणून रामानंदांनीं तेथल्या मंडळींतून खास स्वतःच्या विश्वासांतील असे पंचवीस लोक निवडून काढले. त्यांत बुबाजी नाईक व दुळभजी मोरे हे दोघेही होते. रामानंदांच्या आज्ञेप्रमाणें त्या सर्व पंचवीस जणांनीं आंतून सशस्त्र पेहराव करून वरून कफनी व झोळी असा बैराग्यांना शोभेसा वेष धारण केला व त्या शिष्यपरिवारासह रामानंद त्याच घटकेला सोपाऱ्याकडे निघाले. जोसेफ अर्थात् त्यांच्याबरोबर होताच; पण मुद्दाम आपली व मराठ्यांची एकी नाहीं हें जगाला दाखविण्यासाठीं घोड्यावर स्वार होऊन सर्वांच्यापुढें निघून जाण्याचें त्यानें ठरविलें. रामानंदांबरोबरच्या लोकांना स्वीकृत कार्य करण्याला हुरूप यावा व इतर सैनिकांनाही आशा उत्पन्न व्हावी म्हणून चिमाजीअप्पांनीं त्या बैठकींत जाहीर केलें, "मंडपेश्वरच्या लढाईंत मिळालेली लूट तूर्त वांटण्यांत येणार नाहीं; ती सरकारजमा न करतां ह्या धर्मसंग्रामाचा शेवट लागेतों राखून ठेवण्यांत येईल व अखेर इतर ठिकाणच्या प्राप्तीची त्या लुटींत भर घालून ती सर्व संपत्ति विजयी वीरांना वांटून देण्यांत येईल. जे वीर ह्या धर्मसंग्रामांत कामाला येतील, त्यांच्या कुटुंबांची काळजी आम्ही प्रथम घेऊं."

चिमाजीअप्पांची ती योजना सर्वांना सारखीच मानवली. रामानंदांनीं मात्र मध्येंच प्रश्न टाकला, "श्रीमंत ! हें सर्व ठीक, पण आपण हें विसरूं नका कीं, मंडपेश्वरच्या मोहिमेचें सारें श्रेय मेरी व जोसेफ ह्या बहीण-भावंडांचें आहे."

"तें आम्ही कधींच विसरणार नाहीं." चिमाजीअप्पा जोसेफकडे वळून

म्हणाले, " फिरंग्यांचे इतके सरदार आपण ठार केले, त्यांपैकीं एखाद्याची जिंदगी जोसेफला देऊन आम्ही त्याला जन्माचा सुखी करूं."

दुल्लभजी मध्येंच म्हणाला, " पण श्रीमंतांनीं मेरीला अगदींच विसरूं नये. ह्या मोहिमेंत जोसेफइतकीच मेरीचीही कामगिरी महत्त्वाची व प्रशंसनीय आहे."

दुल्लभजीनें पुन्हा मेरीचें नांव काढतांच जोसेफ रागानें लाल झाला व दुल्लभजीला म्हणाला, ' दुल्लभजी ! जोंपर्यंत मेरीचा हा पाठीराखा भाऊ जिवंत आहे, तोंपर्यंत तिच्या कल्याणासाठीं तुमच्यासारख्यानें चिंता वहावयाला नको आहे. तिची तीदेखील स्वतःची काळजी घेण्याला समर्थ आहे." लगेच तो चिमाजी-अप्पांकडे वळून डोळ्यांत आंसवें आणून उद्गारला, " सरकार ! मीं काय किंवा माझ्या बहिणीनें काय, आम्हीं उभयतांनीं आजवर जें केलें तें आमचें कर्तव्य म्हणूनच केलें. याबद्दल आपण आमचे आभारी होण्याचें कांहींच कारण नाहीं. आतां आपण माझ्यासाठीं व माझ्या बहिणीसाठीं एकच करा; जी दौलत आपण पुढें आम्हांला देणार, ती दुल्लभजींसारख्या आपल्या पराक्रमी शिलेदाराला द्या व 'खाशांना मेरीसारखी खुबसुरत तरुणी तूं जनानखाना शोभविण्यासाठीं आणून देणार होतास, त्याबद्दल हें बक्षीस घे' असें सांगा, म्हणजे मेरीच्या मागचा त्याचा ससेमिरा थांबेल. एवढे उपकार माझ्यावर व माझ्या बहिणीवर आपण केले, म्हणजे पुरे आहेत. आज मेरी आपणाला कोणी मराठा आपल्या किंवा आपल्या खाशांच्या जनानखान्यांत ओढून नेईल या भयानेंच अज्ञातवासांत दिवस कंठीत आहे."

चिमाजीअप्पांना ज्या गोष्टीची खरी चीड, त्याच गोष्टीबद्दल जोसेफनें मराठ्यांच्या सैनिकांविरुद्ध तक्रार करतांच ते संतापानें अगदीं लाल होऊन गेले व म्हणाले, " सांग, तुझ्या बहिणीची अशी आगळीक कोणीं केली ? " त्यांनीं दुल्लभजीकडे वळून विचारलें, " दुल्लभजी ! तुम्हीं काय ? "

चिमाजीअप्पांचा तो रुद्रावतार पाहून सर्व मराठे सैनिक अगदीं घाबरून गेले. दुल्लभजी तर भीतीनें लटलटां कांपूं लागला. जोसेफही दुल्लभजीकडेच मर्मभेदक दृष्टीनें पाहूं लागला. त्यावरून सर्वांना अंदाज करतां आला कीं, दुल्लभजीच खरा अपराधी आहे. दुल्लभजीनें चिमाजीअप्पांसमोर येऊन दोन्ही हात जोडून विनंति केली, " सरकार ! मी अपराधी आहें. मेरी सोफियासारख्या नीच स्त्रीच्या दास्यत्वांत कुजत पडलेली पाहून मला तिची कींव आली व तिच्या रूपयौवनाचें चीज होऊन तिचा पुढील जन्म सुखांत जावा, म्हणून मी

तिला एके दिवशीं एवढेंच म्हणालों कीं, तुझी इच्छा असल्यास तुला श्रीमंत पेशव्यांच्या पदरीं आश्रय मिळेल."

"पण तुम्हांला ही उठाठेव कोणीं सांगितली होती?" चिमाजीअप्पांनीं रागानें विचारलें. दुल्लभजीनें लाजेनें खालीं मान घातली.

"जाऊं द्या सरकार! झालें तें होऊन गेलें. हा दुल्लभजींचा दोष नसून हा आमच्या नशिबाचा खेळ आहे. आमचें नशीब धड असतें, तर उभ्या अष्टागरांत विस्तारलेला आमचा वंश व कुबेराशीं स्पर्धा करणारी आमची दौलत यांचा फिरंग्यांच्या अत्याचारांत फडशा कां उडाला असता?" जोसेफ स्फुंदून स्फुंदून रडत उद्गारला. त्याला रडें आंवरेनासें झालें व त्यामुळें त्याच्या मुखांतून शब्द निघेनासा झाला.

जोसेफचे ते बाणेदारपणाचे व कळवळ्याचे उद्गार ऐकून सर्व मंडळीला कमालीची हळहळ वाटली. चिमाजीअप्पांनीं जोसेफचें जिव्हाळ्याच्या शब्दांनीं शांतवन करून त्याला विचारलें, "खरें; जोसेफ! तूं कोणाचा कोण एवढें जर आम्हांला कळेल, तर आम्ही शक्य ती दाद घेऊं."

"जाऊं द्या! वंशाचें नांव सांगण्यासारखी कांहीं कामगिरी न करितां उगाच नांव सांगून मी माझ्या पूर्वजांच्या नांवाला कमीपणा कशाला आणूं? मी हें तरी बोललों याचें कारण मला तो मनस्ताप सहन होईना. दुल्लभजींनाही मी फारसा दोष देऊं इच्छीत नाहीं. मेरी सध्यां ज्या परिस्थितींत आहे, त्या परिस्थितींतून तिला वर काढण्यासाठींच त्यांनीं तिच्यापाशीं तसे उद्गार काढले असतील; पण ते तिच्या मनाला मात्र झोंबले. वास्तविक मी एवढेंदेखील बोलावयाला नको होतें; पण आवेशाच्या भरांत तोंडून शब्द निघून गेले. ते कोणींही मनावर घेऊं नयेत. मी आतां पुढें जातों; माझ्या मागोमाग स्वामि येतीलच." एवढें बोलून जोसेफ तेथून निसटलाच.

झालें. तो विषय तेवढ्यावरच आटोपला. चिमाजीअप्पादेखील दुल्लभजीला जास्त कांहीं बोलले नाहींत. 'दुल्लभजीनें केला तो अपराधच खरा, पण त्यानें तो आपल्या स्वामिभक्तीचें प्रदर्शन करण्यासाठीं केला व अशा वाममार्गानें स्वामिभक्तीचें प्रदर्शन करण्याची बुद्धि त्याला झाली याचें कारण श्रीमंत बाजीराव पेशव्यांचा रंगेलपणा' हें मनांतल्या मनांत ओळखून ते स्वस्थ बसले. मात्र त्यांना व इतरांनाही जोसेफची एकंदर वर्तणूक फार गूढ वाटली. नारायणजी

नाईक व बुबाजी नाईक यांना तर 'हीं बहीण-भावंडें आपल्या नाईक वंशांपैकीं तर कोणी नसतील' अशीही शंका आली. पण पुन्हा जोसेफ भेटेपावेतों त्या शंकेचें निरसन होणें शक्यच नव्हतें.

  

भैरवाच्या बचावाची तजवीज याप्रमाणें झाली. रामानंद पुन्हा एकदां चिमाजी-अप्पांशीं पुढील बेतांबद्दल वाटाघाट करून आपल्या बैरागी वेषधारी सैनिकांसह सोपाऱ्याकडे जावयाला निघाले. त्या दिवशीं सायंकाळपावेतों अर्नाळ्याच्या बंदोबस्ताची पहाणी झाली व ठिकठिकाणच्या उद्योगांवर गुंतून पडलेल्या मराठे वीरांना पुढील बेतांविषयीं खलिते रवाना झाले. नारो शंकर व विठ्ठल शिवदेव ह्या चुलते-पुतण्यांना बाजीबाच्या गैरहजेरींत अर्नाळ्याचा बंदोबस्त सांगण्यांत आला व बरेंच बैठें सैन्य त्यांच्या मदतीला देण्यांत आलें. मुरारीनें वसईच्या किल्ल्यांतील एकंदर रचनेचा व तयारीचा नकाशा तयार करून आणला होताच व फिरंग्यांच्या हालचालींविषयीं इतर बितंबातम्याही आणल्या होत्या. त्या सर्व विचारांत घेऊन कोणीं कोठून केव्हां चढाव करावा, कोणीं कोठें नाकेबंदी करावी, किल्ल्याला सुरुंग लावावयाचे ते कोठून लावावे, बाहेरून तोफांचा मारा कोणत्या दिशेनें किल्ल्याच्या कोणत्या भागावर करावा वगैरे सर्व गोष्टी चिमाजीअप्पांनीं स्वतः ठरविल्या. अर्नाळ्यावर पक्का बंदोबस्त राखून ऐन वेळीं साह्याला धांवून येण्यासाठीं फौज आणि दारूगोळा जय्यत तयार ठेवावा अशी नारायणजी व बुबाजी यांना सक्त ताकीद दिली. सुमारें बाराचौदा दिवसांपूर्वी पैदा केलेल्या माहिती-प्रमाणें फिरंग्यांना वश असणाऱ्या अनेक मातबर लोकांकडून ऐन वेळीं वसईकर फिरंग्यांना साह्य होण्याचा संभव होता. अशा लोकांच्या दौलतीही अफाट होत्या व त्यांचें त्यांमुळें आजूबाजूच्या लोकांवर वजनही बरेंच होतें. त्यांचा समाचार घेण्याची कामगिरी त्या प्रांतांचे माहीतगार नारायणजी व बुबाजी नाईक यांना सांगण्यांत आली व त्यांना आणि खंडोजी माणकर धारावीकडे बंदोबस्तांत गुंतला होता त्यालाही सूचना येतांच एकजुटीनें वसईवर चालून येण्याची सूचना देण्यांत आली.

याप्रमाणें कामांची वांटणी झाल्यावर चिमाजीअप्पांनीं सर्व मंडळीला पुन्हा एकवार ह्या धर्मयुद्धाचें महत्त्व समजावून सांगितलें व 'ह्या धर्मसंग्रामांत विजय मिळवून मराठ्यांचा भगवा झेंडा वसईच्या किल्ल्यावर फडकवून वाजतगाजत

विजयोत्साहानें माघारे येऊं तरी, नाहींपेक्षां रणांगणांत मरून तरी जाऊं' अशी शपथ प्रथम आपण घेऊन मग इतरांकडून घेवविली. त्या वेळीं सर्वांची बालंबाल खात्री झाली कीं, आतां मात्र धर्मसंग्रामाला निकराचें तोंड लागलें.

  

त्याच दिवशीं वसईहून सेनापतींचा जासूद एक खलिता घेऊन आला कीं, 'सेनापति आपल्या कन्येच्या दुःखांत बुडून गेल्यामुळें त्यांनीं आपले सरदार अँटोनिओ यांना तहाचें बोलणें करण्यासाठीं पाठविण्याचें ठरविलें आहे. वजीरगड ही वाटाघाटीची जागा मुक्रर करण्यांत आली आहे; तरी श्रीमंत पेशव्यांनीं सरदार ॲन्टोनिओ यांच्याशीं तहाची वाटाघाट करून मसुदा ठरवावा. त्याला सेनापतीची मंजुरी मिळेल'.

त्याच दिवशीं चिमाजीअप्पा 'तहाची वाटाघाट' करण्यासाठीं वजीरगडाकडे निघाले; पण त्यांची एकंदर तयारी तहाची वाटाघाट करण्याची नसून निराळीच शत्रूशीं कडेकोट सामना देण्याची होती. याचा अर्थ काय बरें!

## प्रकरण एकोणिसावें

# असें कसें झालें ?

अखेर मार्गारेट दुसऱ्याच दिवशीं कालवश झाली व तिच्या खुनाचा आरोप डोमिंगोवर शाबीत होऊन त्याला सेनापतीनें गोळी घालून ठार करण्याची शिक्षा फर्माविली. वास्तविक डोमिंगोला यापूर्वीच ती शिक्षा व्हावयाची, पण स्वतः डोमिंगोला तो आरोप कबूल नव्हता व त्याच्या पित्याची-किल्लेदार पेरीराचीही खात्री होती कीं, डोमिंगो हा खुनी नसून मार्गारेटच्या कोणा वैऱ्याचें तें काम असलें पाहिजे. परंतु ज्या खंजिरानें मार्गारेटचा खून झाला, तो खंजीर डोमिंगोचाच होता, त्यावर डोमिंगोचें नांव होतें. इतका मुद्देमाल सांपडल्यावर डोमिंगोला खुनी कोण म्हणणार नाहीं ? आपला खंजीर खुनी माणसाला कसा सांपडला, याविषयीं डोमिंगोनें कसून तपास करून पाहिला; पण व्यर्थ ! तरीही डोमिंगोला एकच आधार होता, तो मार्गारेटच्या साक्षीचा, मार्गारेट कितीही अधःपतित असली तरी ती आपणावर खुनाचा वृथारोप तरी लादणार नाहीं अशी डोमिंगोची खात्री होती; पण डोमिंगोचें दुर्दैव त्याच्या हात धुऊन पाठीस लागलें होतें, तें तेथें तरी त्याला कसा हात देणार ? मार्गारेटची एकदां जी दांतखिळी बसली होती, ती पुन्हा अखेर-पावेतों उघडलीच नाहीं. अर्थात् डोमिंगोच अपराधी ठरला; व पेरीराला त्याच्या बाजूनें सेनापतीपाशीं एक शब्ददेखील बोलण्याला तोंडच उरलें नाहीं. 'आपलें नशीब' असें म्हणून कर्माला हात लावून स्वस्थ बसणें त्याला प्राप्त झालें. बिचारी दुखणाईत कॉन्स्टन्स तर आपल्या एकुलत्या एका पुत्राला प्राणदंडाची शिक्षा झालेली ऐकून त्या धक्क्यासरशीं इहलोक सोडून गेली.

डोमिंगोला झालेल्या शिक्षेची अंमलबजावणी पूर्वदिवशींच व्हावयाची, पण त्याच दिवशीं अर्नाळ्याहून सेनापतीचा विश्वासू सेवक मुरारी व बार्बोरानें आपल्या प्रेमपाशांत बांधून फिरंग्यांच्या बाजूला वळवून घेतलेला अर्नाळ्याचा किल्लेदार बाजीबा हे दोघे अर्नाळ्याचें राजकारण करून माघारे वसईच्या किल्ल्यांत आले. त्यांच्याशीं पुढील गोष्टींची वाटाघाट करण्यांत सेनापति गुंतला असतां तेवढ्यांत फादर पोटोंही सुखरूपपणें तेथें येऊन पोंचला. त्याच्या तोंडून मंडपेश्वरच्या पराजयाची विश्वसनीय माहिती ऐकण्यांत बराच वेळ गेला व उरलेला वेळ बाजीबा व मुरारी यांनीं सिद्ध केलेल्या राजकारणानुसार पुढील

बेताची उभारणी करण्यांत गेला. मुरारीला कोणती कामगिरी सांगण्यांत आली होती तें वाचकांना माहीत आहेच. त्याच्याबरोबर बाजीबा आला, तो–त्या दोघांनीं सेनापतीची समजूत करून दिली तिला अनुसरून बोलावयाचें तर–बाह्यतः मराठ्यांच्या बाजूनें सेनापतीशीं तहाची वाटाघाट करण्यासाठीं व अंतस्थतः मराठ्यांच्या एकूण एक बेतांची बातमी सेनापतीला देऊन पोर्शिया व बार्बारा यांनीं महत्प्रयासानें उभारलेल्या कारस्थानाची सांगता करण्यासाठीं आला. इतकेंही करून सेनापतीनें त्या दोघांच्या शब्दावर विसंबूनच पुढील बेत ठरविले होते, असें नसून त्याला तशा अर्थाचा संदेश बार्बाराकडून तिच्या पाळींव कबुतरामार्फत कळला होता. तो पुढीलप्रमाणें होता—

" मराठे तहाला उत्सुक आहेत; कारण त्यांची तयारी बरीच ढांसळली आहे. त्यांच्यांत आपसांतच फूट माजली आहे. त्यांच्याकडील युद्ध-सामुग्री संपत आली असून अर्नाळा तर वाटेच्या चोरानें जिंकावा इतका तयारीच्या अभावीं सोपा झाला आहे. अर्नाळ्याचा किल्लेदार बाजीबा आपणाला पूर्ण साह्य आहे. त्याला पूर्ण वश करून घेण्यासाठीं अर्नाळा व त्याच्या सभोंवारचा प्रांत त्यालाच युद्धोत्तर देण्याचें वचन द्यावें. चिमाजी-अप्पांनीं आपल्या लोकांशीं तहाची वाटाघाट करण्यासाठीं फक्त थोडे खिद-मतगार घेऊन वजीरगडावर यावें असें आपण त्यांना कळवावें व आपणही थोड्या लोकांनिशींच यावें; म्हणजे पेशव्यांना संशय न येतां आपला कार्य-भाग होईल. मराठ्यांना संशय घेण्याला मुळींच जागा राहूं नये यासाठीं स्वतः सेनापतीनें त्याच्याशीं तहाची वाटाघाट करण्यासाठीं जातीनें सामोरें यावें हें फार उत्तम. रामानंद एथेंच आहेत. त्यांना पकडणें फारसें अवघड नाहीं. किल्लेदार बाजीबा इकडे येतील त्यांच्याबरोबर कोणी एखादा जबाबदार माणूस थोडेसे शिपाई बरोबर घेऊन पाठविला, कीं त्यांच्याबरोबर रामानंदांना पकडून तिकडे पाठवितां येईल."

बार्बाराच्या ह्या संदेशाप्रमाणें व्यवस्था ताबडतोब झाली. बाजीबा व मुरारी यांनीं जें सांगितलें, त्याच्याशीं बार्बाराच्या पत्रांतील मेळ तंतोतंत पडला; अर्थात् शंका अशी कोणतीच उरली नाहीं. मात्र बार्बाराच्या सूचनेप्रमाणेंच बाजीबा व मुरारी यांचेंही मत जरी स्वतः सेनापतीनें तहाची वाटाघाट करण्यासाठीं वजीरगडावर जावें असें पडलें, तरीदेखील सेनापति कन्याविरह व

पत्नीविरह अशा दोन महान् कौटुंबिक आपत्तींत सांपडला होता आणि ह्या कामागिरीवर सरदार ॲन्टोनिओनें जावें असें पूर्वीच ठरलें होतें, त्यामुळें अखेर तोच बेत मुक्रर झाला. बाजीबा त्याच दिवशीं रामानंदांना पकडण्याची कामगिरी पार पाडण्यासाठीं व इतर बेतांची पूर्तता करण्यासाठीं भग्याशास्त्र्यांसह अर्नाळ्याकडे माघारा निघून गेला. भग्याशास्त्री ॲन्टोनिओबरोबर तहाच्या वाटाघाटीसाठीं जावयाचे होते; पण 'न जाणो, आपलें व चिमाजीअप्पांचें वैमनस्य, त्यांनीं आपणाला कैदेंत लोटलें असतां आपण पळून इकडे आलेले, त्यांनीं आपणाला पुन्हा गोत्यांत घातलें तर काय करणार' अशा भयानें ते मागें पाऊल घेण्याच्या विचारांत होते. पण त्यांना अनायासें फुकाची मर्दुमकी गाजवितां आली तर पाहिजे होती. त्यांनीं जेव्हां रामानंद अर्नाळ्यावर एकटेच आहेत, अर्नाळ्याचा किल्लेदार बाजीबाही आपलाच साह्यकारी आहे असें पाहिलें, तेव्हां रामानंदांना पकडून वसईला आणण्याची कामागिरी आनंदानें पत्करली. त्याची धूर्तपणाची विचारपरंपरा अशी होती कीं, 'रामानंद हे आपले व आपल्या सासऱ्यांचे खरे प्रतिस्पर्धी! त्यांच्या चळवळीमुळेंच आपले धर्माधिकार गमावून बसण्याचा प्रसंग आपणां उभयतांवर आला; व त्यांचा नायनाट होईतों आपणाला आपले ते अधिकार पुन्हा मिळण्याची आशा नाहीं. तेव्हां अशा हाडवैऱ्याचा नायनाट आपणाला आपल्या डोळ्यांदेखत करतां आला तर फार चांगलें; आपणाला एका दगडानें दोन पक्षी मारतां येतील.—हाडवैऱ्याचा नाशही होईल व एवढी बहादुरकी गाजविल्याबद्दल फिरंग्यांपाशीं आपली प्रतिष्ठा वाढून आपणाला अपार मान-धन-वैभव हक्कानें संपादन करतां येईल'. याच वेळीं भवितव्यता कांहीं निराळीच घटना घडवून आणण्यांत गुंतली होती व ती भग्याशास्त्र्याचे हे मनकवडे नष्ट विचार ऐकून मनांतल्या मनांत हंसत होती. पण तें तिचें हंसें कोणाला ऐकूं जाणार!

असो. याप्रमाणें महत्त्वाच्या उलाढाली करण्यांत तो सबंध दिवस व ती सबंध रात्र लोटली, आणि दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाच्या सुमाराला डोमिंगोला देहान्तशासन द्यावयाचें असा बेत मुक्रर झाला. तो दुसरा दिवस उजाडतो न उजाडतो, तों ॲन्टोनिओ पूर्वयोजनेनुसार चिमाजीअप्पांशीं तहासंबंधीं वाटाघाट करण्यासाठीं निवडक पंचवीस सैनिकांना बरोबर घेऊन वजीरगडाकडे रवाना झाला. शक्य तों ॲन्टोनिओनें चिमाजीअप्पांना गौरवपूर्वक वसईच्या किल्ल्यांत प्रत्यक्ष

सेनापतींशीं तहाची नक्की वाटाघाट करण्यासाठीं बोलावून आणावयाचें व मग कैद करावयाचें, आणि तें नच जमल्यास त्याला भर बैठकींत आपल्या लोकांकडून ठार करवून वजीरगडच्या भुयारांतून स्वतः माघारें किल्ल्यांत पसार व्हावयाचें असा कानमंत्र ॲन्टोनिओला तो ह्या कामगिरीवर यावयाला निघाला तेव्हां सेनापतीकडून मिळाला होता. मारेकऱ्यांचें काम करण्यासाठीं ॲन्टोनिओनें आपल्याबरोबर जे सैनिक घेतले होते, ते मुरारीच्या तालमेंत तयार झालेले,मुरारी-प्रमाणेंच पेशव्यांशीं हाडवैर मांडून बसलेले व सेनापतीकडून मिळणाऱ्या बक्षिसां-वर खुष होणारे असे होते. फिरंगी शिपाई बरोबर असल्यास कदाचित् चिमाजी-अप्पांना संशय येईल ह्या भयानें मुद्दाम ही व्यवस्था करण्यांत आली होती. वजीर-गडावरील कारस्थान सिद्धीला जातांच ती बातमी ताबडतोब किल्ल्यावर कळावी यासाठीं तोफेचा बार ही खूण मुद्दाम सेनापतीच्या सांगण्यावरून मुक्रर करण्यांत आली होती. सेनापति केवळ चिमाजीअप्पा व रामानंद यांना कोंडल्यानें मराठ्यांचा मोड होईल अशा भरंवशावर स्वस्थ बसून नव्हता. मराठ्यांनीं वसईच्या किल्ल्यासभोंवार जमिनीवरून, त्याप्रमाणें पाण्यांतूनही कसकसा वेढा घातला आहे हें त्यानें बारकाईनें पाहून ठेविलें होतें; मराठ्यांवर कोठून कसा हल्ला करावयाचा तेही मुक्रर करून ठेविलें होतें. निकराची लढाई झाल्याशिवाय धर्मसंग्रामाचा शेवट होणार नाहीं हें सेनापति पूर्ण ओळखून होता व तो संग्राम शक्य तितका लौकर होऊन एकदां हें युद्ध शेवटावें असा त्याचा दृढ मानस होता. आणखी फार दिवस लढाई चालविण्याला—वसईचा किल्ला हें रणस्थल मुक्रर झाल्यामुळें—पुरेसा दारूगोळा किल्ल्यावर होता, लांब पल्ल्याच्या तोफा व बंदुका वगैरे उत्तमोत्तम साहित्यही होतें व मनुष्यबळही अगदींच कमी होतें असें नाहीं. किल्ल्यासारख्या सुरक्षित जागेंतून फिरंग्यांना शत्रूशीं लढावयाचें होतें व म्हणूनच बेताच्या माणसांनींही काम भागण्याजोगें होतें; पण त्या माणसांना खावयाला अन्न कोठून द्यावयाचें व त्यांचे पगार कोठून चुकते करावयाचे हा एक असा बिकट प्रश्न सेनापतीसमोर उत्पन्न झाला होता कीं, तो त्याला सोडवितां येणेंच शक्य नव्हतें. तो प्रश्न सोडवावयाचा तर मराठ्यांचा वेढा फोडून बाहेर जाणें अवश्य होतें; वेढा फोडण्यासाठीं निकराचा संग्राम करणें प्राप्त होतें व त्या निकराच्या संग्रामांत मराठ्यांना हैराण करून सोडण्यासाठींच सेनापतीनें चिमाजीअप्पा व रामानंद यांना गोत्यांत आणून इरेला घालण्याचा

डाव रचिला होता. चिमाजीअप्पांना पकडल्याची अथवा ठार केल्याची खूण तोफेच्या आवाजानें पटतांच इकडे एकदम विवक्षित ठिकाणाहून मराठ्यांवर तोफांच्या गोळ्यांचा पाऊस पाडून मराठ्यांची फळी फोडावयाची ह्या बेतानें सर्व योजना करण्यांत आली होती. पण सेनापतीच्या तरी पाठीला डोळे थोडेच होते ! आपल्या पाठीमागें शत्रूनें कसकसा व्यूह रचिला आहे, हें त्या बिचाऱ्याला काय माहीत ! त्याचा बराचसा भरंवसा फितूर मराठ्यांवर होता; पण मराठ्यांची फितुरी हें त्यांच्या गनिमी काव्याचें एक प्रधान अंग असेल अशी त्याला कल्पनाही नव्हती.

असो. ॲन्टोनिओला वजीरगडाकडे रवाना करून व किल्ल्यावरील संग्राम-सिद्धतेची पुन्हा एकवार कसून पहाणी करीत करीत सेनापति तुरुंगाच्या ज्या भागांत डोमिंगोला डाम्बून ठेवण्यांत आलें होतें तेथें आला व तुरुंगावरील अधिकाऱ्याला त्यानें आज्ञा केली, " जा. डोमिंगोला बाहेर आणा."

आज डोमिंगोच्या शिक्षेची अंमलबजावणी होणार हें कळल्यानें किल्लेदार पेरीरा व डोमिंगोचा जिवलग सेवक आल्मेडा हे त्याची अखेरची भेट घेण्यासाठीं तेथें अगोदर आले होते. वास्तविक डोमिंगो तेथें इतका प्रिय होता कीं, त्याच्या अखेरच्या दर्शनासाठीं तेथें किल्ल्यांतील बहुतेक जनसमूह लोटला असता. सेनापतीला हें माहीत होतें, म्हणूनच त्यानें आज डोमिंगोच्या शिक्षेची अंमल-बजावणी होणार ही गोष्ट शक्य तों गुप्त राखण्याची खबरदारी घेतली होती. फार काय, पेरीरालाही त्यानें आपला हा विचार कळविला नव्हता. उद्देश हा कीं, ही बातमी आधीं सर्वांना समजल्यास लोक कदाचित् डोमिंगोवरील प्रेमाखातर बंडही करावयाला तयार होतील, कदाचित् पेरीरा पुत्रप्रेमामुळें त्या बंडखोरांचा पुढारी होईल व मग आपणावर मोठा कठीण प्रसंग ओढवेल. सेनापति केवळ आंतील बंडाळीला भीत होता असें नाहीं; डोमिंगोप्रमाणेंच पेरीरा हाही मराठ्यांशीं कसा-बसा तह करून रक्तपात थांबवावा या मताचा असल्यानें त्याचा पक्ष जोरावेल, तो मराठ्यांशीं तह करूं शकेल, वेळीं डोमिंगोला देखील बंधमुक्त करणें प्राप्त होऊन तोदेखील तहाच्या बाबतींत पुढाकार घेईल, व मग पोर्तुगीज सरकारपुढें तोंड काढण्यालाही आपणाला जागा उरणार नाहीं—इतके दिवस जो लौकिक आपण कमावला त्यावर सफा पाणी पडेल, ह्या पापाला सेनापति भीत होता. तेवढ्यासाठीं त्यानें आज पेरीराला मुद्दाम किल्ल्याच्या एका

महत्त्वाच्या भार्गी ऐनवेळीं सूचना होतांच लढाई सुरू करण्याचा हुकूम देऊन अडकावून ठेविलें होतें. इतक्या बंदोबस्तानें आजच डोमिंगोला देहान्त शासन करण्यांतही सेनापतीचा एक डाव होता. डोमिंगो हाच खरा तहाचा पुरस्कर्ता असल्यानें त्याला ठार केल्यामुळें तहवाद्यांचीं तोंडें आपोआप बंद होतील व त्या सर्वांना चांगली दहशत बसेल. असा कयास बांधूनच सेनापतीनें हा डाव मांडला होता.

पण सेनापति ज्या अडचणीला भीत होता, तीच अडचण पेरीराच्या रूपानें समोर दत्त म्हणून उभी असलेली पहातांच त्याच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली. त्यानें आपल्या अधिकाराच्या तोऱ्यांत पेरीराला विचारलें, “ किल्लेदार ! तुम्ही तुमची कामगिरी सोडून या वेळीं इकडे कां आलां ? ”

पेरीरा कांहीं बोलेना. तो खालीं मान घालून डोळ्यांना रुमाल लावून मुकाट्यानें बाहेर जाऊं लागला. मात्र जातां जातां त्यानें सेनापतीची एवढीच प्रार्थना केली, “ सेनापतिसाहेब ! मी माझ्या कामगिरीवर जातों. जोंवर मी सरकारी नोकर आहें, तोंवर मलाही लष्करी शिस्त पाळलीच पाहिजे; पण जातां जातां माझी आपणाला एवढीच प्रार्थना आहे कीं, माझा मुलगा तो आपलाच मुलगा असे आपण समजा व त्याला जीवदान द्या. इतकेंही करून आपल्या अंतः-करणांतील दयेचा झरा आटलाच असला, तर निदान ह्या प्रकरणाची पूर्ण चौकशी करून मग शिक्षेची अंमलबजावणी करा. तोंवर प्रभुकृपेनें मला रणां-गणावर मरण आलें तर सोन्याहून पिंवळें झालें.”

इकडे बाहेर सेनापति व किल्लेदार यांचें संभाषण सुरू असतांना डोमिंगोचा नवीन विश्वासू सेवक सायमन डोमिंगो ज्या खोलींत कैदेंत कुजत पडला होता, तेथें गेला. डोमिंगोच्या खोलीचा लोखंडी गजांचा दरवाजा अजून बंदच होता. डोमिंगो दरवाजाकडे पाठ करून गुढगे टेंकून बसला होता. सायमननें दरवाजाच्या लोखंडी गजांतून आंत डोकावून पाहिलें, तों डोमिंगो समोरच्या भगवान् येशू ख्रिस्ताच्या प्रतिमेसमोर ‘बायबल’ वाचीत बसला होता. त्या प्रभुस्तवनांत तो इतका रंगून गेला होता कीं, त्या कोठडी-बाहेरील सृष्टींत काय चाललें आहे; फार कशाला, दरवाजाबाहेर आपला परम-विश्वासू सेवक सायमन उभा आहे इकडेही त्याचें लक्ष्य नव्हतें. तो ख्रिस्तानें आपल्या ‘प्रेषित’ नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या बारा शिष्यांना केलेल्या उपदेशांतील

भाग वाचण्यांत रंगून गेला होता व सायमन तो बहुमोल उपदेश ऐकत स्तब्ध-पणें तेथें उभा राहिला.

"...जे स्वतः लोकांवर दया करितात तेच दयेला पात्र होतील. जे अंतः-करणानें शुद्ध असतील त्यांनाच परमेश्वर भेटेल तुम्ही आज माझ्या मागें फिरत आहां, पण तुम्ही त्याच वेळीं धन्य व्हाल किंवा धन्य ठराल, कीं लोक जेव्हां तुमची निंदा करतील, तुमच्या पाठीं लागतील व माझ्यासाठीं तुमच्या कपाळीं सर्व प्रकारचे अपवाद येतील. शपथ वाहूं नका. आकाशाची शपथ वाहूं नका; कारण तें देवाचें आसन आहे. पृथ्वीची शपथ वाहूं नका; कारण कीं, ती परमेश्वराची पायरी आहे. येरूशलेमची शपथ वाहूं नका; कारण कीं, त्याची ती राजधानी आहे इतकेंच काय; स्वतःच्या मस्तकाची सुद्धां शपथ वाहूं नका, कारण कीं, तें तुमचें नाहीं. त्या मस्तकावरचा एक केंसही आपल्या इच्छे-प्रमाणें तुम्हांला काळा किंवा पांढरा करतां येत नाहीं. होय म्हणावयाचें असेल तर होय म्हणावें; नाहीं म्हणावयाचें असेल तर नाहीं म्हणावें; याहून जास्त जें बोलाल तें सैतानाचें बरळणें आहे. वाईटाचा प्रतिकार करूं नका; इतकेंच नव्हे तर कोणीं तुमच्या उजव्या थोबाडींत मारली, तर डावा गाल पुढें करा. जर कोणीं तुम्हांवर फिर्याद केली आणि तुमच्या अंगावरील वस्त्रही काढून घेतलें तर त्याला म्हणावें कीं, हे दुसरे वस्त्रही घेऊन जा. जो कोणी तुम्हांला वेठीस धरून मैलभर रखडीत नेईल, त्याला म्हणावें कीं, मी तुजबरोबर आणखी मैलभर येतों. आजपर्यंत तुम्हांला सुज्ञजन सांगत आले आहेत कीं, शेजाऱ्यांवर प्रेम करावें व शत्रूचा द्वेष करावा; तसेंच डोळा फोडणाराचा डोळा फोडावा व दांत पाडणाराचा परत दांत पाडावा असेंही तुम्ही ऐकत आलां आहां; पण मी येशू तुम्हांला असें प्रतिपादितों कीं, तें चूक आहे, तुम्ही शत्रूवरही प्रेमच करा. जे तुमच्यावर बोटें मोडतील त्यांचेंही शुभ चिंतीत जा. जे तुमचा द्वेष करतात त्यांजवर उपकार करा. जे कोणी तुम्हांला छळतात व दुष्टाव्याने राबवितात 'त्यांना देव सुखी ठेवो' असें म्हणा. हें तरी मी तुम्हांला कां सांगतों ? तर आपण परमेश्वराचीं लेंकरें आहों, ह्या तुमच्या म्हणण्याला कांहींतरी अर्थ उरावा. परमेश्वर काय करतो पहा. भल्याच्या व वाइटाच्या घरावर आपल्या सूर्याचा प्रकाश तो सारखाच पाडतो ना ? न्यायी व अन्यायी यांच्या घरावर त्याचे मेघ सारखेच वर्षतात ना ? मग तुम्ही त्याचीं लेंकरें सुष्टांशीं सुष्ट व दुष्टांशीं दुष्ट काय म्हणून

होणार ? जो तुमच्यावर प्रेम करतो, त्यावर तुम्हीं प्रेम केलें अथवा तुम्हीं आपल्या बंधूलाच नमस्कार केला तर त्यांत नवल काय ? वाटेचा चोरदेखील ही गोष्ट करतो. तुम्हीं त्याच्याहून कांहीं जास्त असावें. परमेश्वर जसा समदृष्टि आहे तसें तुम्हीं असावें......"

डोमिंगोचें हें वाचन ऐकतां ऐकतां सायमनचे डोळे पाण्यानें भरून आले. तो स्वतःशींच हुंदहूं लागला. त्याच्या त्या बेभान स्थितींत दहावीस पळें गेलीं व तो पुन्हा भानावर आला तेव्हां डोमिंगोला हांक मारूं लागला, "धनीसाहेब !"

पण डोमिंगोला ती हांक ऐकूं गेली नाहीं. तो आतां भगवान् येशू ख्रिस्तानें मृत्यूच्या दोन दिवस पूर्वी आपल्या शिष्यांना केलेला उपदेश वाचीत होताः' ...... 'तुम्हांला खात्रीनें सांगतों कीं, तुमच्यापैकीं एकजण मला शत्रूच्या हवालीं करील'. तेव्हां सगळे शिष्य एकमेकांकडे संशयानें पाहूं लागले..." तेव्हांच सायमन संशयानें स्वतःकडे पाहूं लागला. डोमिंगो पुढें वाचूं लागला, "त्यानें भाकरीचा एक तुकडा जलांत भिजवून सायमनचा मुलगा यहुदा इस्कारयोत याच्या हातीं दिला. शेवटचें सांगणें म्हणून येशूनें त्यांना सांगितलें, 'माझें जसें तुमच्यावर प्रेम आहे तसें तुम्ही एकमेकांवर करा. तसें तुम्हीं केलें, म्हणजेच तुम्ही माझे शिष्य आहां हें ठरेल. मुलांनो! मी आतां जातों. तुमचा माझा सहवास फार थोडा उरला आहे. मी जातों तेथें तुमच्याच्यानें येववणार नाहीं'. सायमन म्हणाला, 'प्रभू! तूं कोठे जातोस ? माझ्याच्यानें तुझ्यामागें कां येववणार नाहीं ? मी तुझ्यासाठीं जीव द्यावयाला तयार आहे'. येशूनें विचारलें, 'काय म्हणतोस ? तूं माझ्यासाठीं जीवदेखील देशील ? अरे भोळ्या ! तुझ्या हातून तें तर होणारच नाहीं. आतां रात्र पडली आहे. तुला सांगतों पहांटेचा कोंबडा आरवण्याच्या पूर्वी तूं लोकांना त्रिवार सांगशील कीं, येशूचा आणि माझा कांहीं संबंध नाहीं..."

इतका वेळ सायमन आपलें स्फुंदन शक्य तों आंवरून धरीत होता; पण आतां त्याला तें आंवरेना. त्याचे हुंदके ऐकून डोमिंगोनें मागें वळून पाहिलें व विचारलें, "सायमन ! प्रिय सायमन ! तूं या वेळीं इकडे कशाला आलास ? माझी शेवटची भेट घेण्यासाठीं काय ?"

"होय.—" पुढें सायमनच्या तोंडून शब्द निघेना.

" वेड्या ! माझ्यावर कोणतें संकट ओढवलें आहे याची तुला जाणीव आहे का ? मी आतां ह्या जगाचा फार तर पाव किंवा अर्ध्या घटकेचा सोबती आहें."

" मी आपला जन्माचा सोबती—"

" वेड्या ! तूं कसला माझा सोबती ? मी जातों तेथे तुझ्याच्यानें येववणार नाहीं."

" धनीसाहेब ! मी आपला जन्माचा सोबती असें आजवर मुक्तरवानें सांगत आलों—"

" पण ही सोबत तुला परिणामीं नडेल. इतका तुझा माझ्या ठायीं लोभ आहे असें जर सेनापतीला कळेल, तर तो माझ्याबरोबर तुलाही मार्गारेटच्या खुनांतील आरोपी गणून तुलाही देहान्त शासन देईल. यास्तव असाच एथून प्रथम पळ काढ व कोणीं विचारलें तर सांग कीं, आपला व डोमिंगोचा कांहींच संबंध नाहीं."

सायमन ढसढसां रडत गद्गदकंठानें उद्गारला, " धनीसाहेब ! मीं एक पाप केलें, तें लपविण्यासाटीं आणखी दुसरें पाप करूं काय ? नाहीं, नाहीं. मी अपराधी आहें व त्याबद्दल मलाच शासन होणें अवश्य आहे. मीं तुमच्याशीं दगलबाजी केली आहे.—"

इतक्यांत तुरुंगावरील मुख्याधिकारी दुसऱ्या दोन शिपायांसह तेथें येऊन थडकला व कोठडीचा दरवाजा उघडून डोमिंगोला म्हणाला, " डोमिंगो ! तुझी वेळ भरत आली. तुझी अखेरची कांहीं इच्छा असेल तर सांग,"

" मला एकवार माझ्या पिताजींची भेट घ्यावयाची आहे." डोमिंगो शांतपणानें म्हणाला.

" तें शक्य नाहीं. किल्लेदारसाहेब सेनापतिसाहेबांच्या हुकुमाप्रमाणें आपल्या कामगिरीवर निघून गेले आहेत. तुझी आणखी कांहीं इच्छा असली तर सांग."

" मग आणखी माझी कांहीं इच्छा नाहीं.—" डोमिंगो आपली आवडती भगवान् येशू ख्रिस्ताची प्रतिमा हृदयाशीं धरून गद्गद कंठानें उद्गारला, " हें माझ्या प्रभूचें पवित्र प्रतीक माझ्या आयुष्याच्या शेवटापर्यंत माझ्यापाशीं ठेवण्याला परवानगी असावी."

" तेवढी परवानगी तुम्हांला मिळेल. चला आतां." अधिकारी म्हणाला.

ठीक आहे. चला. " असें म्हणून डोमिंगो आपण होऊन हंसतमुखानें त्या अधिकाऱ्याच्या स्वाधीन झाला. अधिकाऱ्याच्या सांगण्यावरून शिपायांनीं त्याला आपल्यामध्यें घालून वधस्थानाकडे चालविलें. सायमनला तो भयंकर प्रकार

पहावेना व शोक आंवरेना. तो डोमिंगोच्या पायांना मिठी मारून म्हणाला, "धनी! धनी! मार्गारेटचा खून मीं केला आहे. आपला खंजीर घेऊन मीं तिला ठार मारले!—"

"खरेंच का?" डोमिंगोनें एकदम चमकून मागे वळून विचारले. तो आणखीही कांहीं बोलला असता; पण शिपायी त्याला थांबूं देईनात. सायमन त्या अधिकाऱ्याच्या पायां पडून काकुळतीला येऊन विनवूं लागला, "साहेब! मार्गारेटचा खून मीं केला आहे व त्याबद्दल मी देहान्त प्रायश्चित्त भोगावयाला तयार आहे. आपण डोमिंगोला बंधमुक्त करून मला देहान्त शासन करा."

तो अधिकारी अत्यंत मितभाषणी व धोपट मार्गी होता. त्याला सायमनच्या विनवणीकडे लक्ष देण्याची आवश्यकता भासली नाही. तो पुढें जातां जातां बेफिकीरपणे उत्तरला, "तुला जे काय सांगावयाचे तें सेनापतिसाहेबांपाशीं जाऊन सांग."

"सेनापतिसाहेब या वेळीं कुठें भेटतील?"

"आपल्या बंगल्यावर."

"त्यांच्याकडून हुकूम येईपावेतो तुम्ही शिक्षेची अंमलबजावणी तरी थांबवाल का?—"

इतक्यांत भयसूचक घंटा घण् घण् घण् घण् वाजूं लागली व आल्मेडा चालत होता त्यापासून थोड्या अंतरावर तोफेचा एक रसरशीत गोळा येऊन आदळला. त्या गोळ्याच्या धुराचा लोळ एवढा उसळला की, त्या धुरांत कोणालाच कांहीं दिसेनासें झाले. एका मागून दुसरा, त्याच्या मागून तिसरा, चौथा असे रसरशीत गोळे किल्ल्यांत जागोजाग वर्षू लागले व त्यामुळें एका-मागून एक इमारती भराभर कोसळूं लागल्या व पेटूं लागल्या. थोड्याच वेळांत किल्ल्यावर सर्वांना कळून चुकलें कीं, मराठ्यांनीं किल्ल्यावर निकराचा हल्ला चढविला असून स्वतः सेनापति सिल्व्हेरा 'मारीन किंवा मरेन पण मागें हटणार नाही' अशा निर्धारानें मराठ्यांना तोंड देण्यासाठीं आपल्या निवडक सैन्यानिशीं रोमिडिओ नांवाच्या बुरुजाच्या आश्रयानें उभा राहून लढत आहे."

असें कसें झाले? सेनापतीचे सर्वच बेत त्याच्या गळ्यांत कसे आले?

## प्रकरण विसावें

# सेनापति सिल्व्हेरा ठार !

तो सबंध दिवस व ती सबंध रात्र मराठे व फिरंगी यांचा खणाखणीचा संग्राम सुरू होता. 'नोसा सिनोरा ड रोमिडिओ' नांवाचा वसईच्या किल्ल्याचा बुरूज अत्यंत विशाल व अजिंक्य असा होता, आणि तो अजूनही आहे; म्हणून सेनापति सिल्व्हेरानें तेंच संग्रामाचें केंद्र बनवून व स्वतः आघाडीचें आधिपत्य स्वीकारून तोफा, बंदुका, बाण, यांचा प्रतिपक्षावर नुसता भडिमार चालविला होता. इतर ठिकाणींही निरनिराळे पोर्तुगीज अधिकारी प्रतिपक्षाशीं झगडण्याची शिकस्त करीत होते. स्वतः चिमाजीअप्पा सेनापतीशीं सामना देण्यासाठीं मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे ह्या आपल्या डाव्या उजव्या हातांसह खडे होते. मराठ्यांच्या तोफखान्यावर मल्हाररावांची खास देखरेख असून राणोजी शिंदे व चिमाजीअप्पा यांच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांतील अचूक नेम मारणारे निधड्या छातीचे सैनिक शत्रूवर बाणांचा व बंदुकांच्या गोळ्यांचा पाऊस पाडीत होते. उभय पक्षींच्या तोफांचा गडगडाट एवढा प्रचंड होता कीं, त्या गडगडाटांत आपण बोललेलें आपणालाच ऐकूं येण्याची पंचाईत ! आणि धूर तर इतका मुसमुसला होता की, कोणाला आपल्या डोळ्यांनीं आपला हातदेखील पहाणें मुष्किलीचें व्हावें ! प्रथम बराच वेळ सेनापति सिल्व्हेरानें इतर ठिकाणीं मराठ्यांना जेरीला आणण्याची शिकस्त करून पाहिली व त्या प्रयत्नांत निराशा पदरीं पडूं लागल्यामुळें निर्वाणींचा प्रयत्न म्हणून तो रोमिडिओ बुरुजावर येऊन 'मारीन किंवा मरेन' अशा निकरानें तो लढूं लागला होता. त्याच वेळीं इतर ठिकाणींही लढाई सुरूच होती. मराठे वीर सैनिक व त्यांचे शंकराजी केशव फडके, मानाजी आंग्रे, खंडूजी माणकर, विठ्ठल शिवदेव विंचूरकर वगैरे पुढारी वीर शूर होते हें तर खरेंच; पण पोर्तुगीजांचे सैनिक व सेनानीही कमी प्रतीचे होते असें नाहीं. फादर पोर्टोसारखा एखादा पळपुटा अपवादादाखल सोडून दिला, तर इतर बहुतेक फिरंगी जिवावर उदार होऊनच त्या निर्वाणीच्या संग्रामांत सामील झाले होते. आणि फादर पोर्टो जरी प्रत्यक्ष रणक्षेत्रावर पळपुटा ठरला असला, तरी त्याच्या वाणींत प्रसाद होता, त्याला वक्तृत्वाची ईश्वरी देणगी

होती व धर्मगुरु या नात्यानें त्याचा शब्द झेलून त्याप्रमाणे मरणाच्या मोलानें झगडण्याला अनेक लोक तयार व्हावे इतकी त्याची लौकिकमान्यता होती. अंतरंगांत कोणाच्या कोणाला शिरतां येतें, तें फादर पोटोंचें अंतरंग इतरांना कळणार ! फादर पोटों किल्ल्यावर ठिकठिकाणीं खडाजंगीच्या युद्धाच्या जागीं जाऊन सुरक्षित जागीं उभा राहून आपल्या परिणामकारक वाणीने धर्माच्या नांवावर फिरंग्यांना मराठयांविरुद्ध चेतवीत होता व त्या चेतविण्याचाही त्याला इष्ट तोच परिणाम होत होता. बरें; इतकेंही करून कोणी भ्याड वीर मरणाच्या भयाने माघार घेऊन मागच्या मागें पळेन म्हणेल, तर पिछाडीला हत्यारबंद सैनिकांची एकेक तुकडी अशा पळपुट्या लोकांना जागच्या जागीं ठार करण्यासाठी सेनापतीच्या सक्त हुकुमाने तयार होतीच.

त्या खडाजंगींत उभयपक्षीं दरएक क्षणाला सैनिकसंहार एकसारखा सुरू होता; पण त्यांतल्या त्यांत मराठ्यांपेक्षां फिरंग्यांकडील प्राणहानिच जास्त होत होती. मराठयांच्या हेरांनीं किल्ल्याच्या अंतर्बाह्य रचनेची बित्तंबातमी आपल्या गोटांत पूर्वीच पोंचविल्यामुळें किल्ल्यावर कुठें कोणकोणत्या मारगिरीच्या जागा आहेत, किल्ल्यावरील अमुक एका ठिकाणाहून नेम मारला तर तो कुठें लागू पडेल, किल्ल्यावरील फिरंग्यांच्या आघाडीची किमान मर्यादा कोणती, कोणतें ठिकाण कितपत मजबूत आहे, दारूगोळ्याचा पुरवठा कोठें आहे वगैरे सर्व गोष्टी मराठयांना पूर्वीच बव्हंशानें कळून चुकल्या होत्या व त्या सर्व गोष्टींचा विचार करूनच मराठयांनीं वेढ्याची रचना पायाशुद्ध अशी केली होती. इतकेंही करून मराठा सैन्य असावें तितकें शिस्तीनें खडें नसल्याने ऐन खडाजंगींत मराठयांचे धांवते टप्पे जरा मागेपुढें होत व किल्ल्यावरील मारादेखील बेसुमार असे; त्यामुळें कांहीं कांहीं मराठे सैनिक जाया होत; पण याच्या उलट मराठयांचे तोफांचे व बंदुकांचे नेम पूर्व माहितीवरून किल्ल्यावर अचूक मारले जात असल्यानें फिरंग्यांची मात्रा क्षणोक्षणीं फारच नासाडी होई. शिवाय मधून मधून कांहीं तोफा नादुरुस्त व्हाव्या, दारूसामान ओलें हातीं लागल्यामुळें तें ऐनवेळीं निरुपयोगी ठरावें व कधींकधीं तर फिरंग्यांचे पट्टीचे गोलंदाज व बिनीचे प्रमुख लढवय्ये अदृश्य मार्गानें आकाशाची कुऱ्हाड कोसळावी अशा अज्ञात घाल्यांखालीं नेस्तनाबूत होऊन पडावे. तरीही मुरारीसारखे मराठयांकडील पुरे माहीतगार व मराठयांचे कट्टे वैरी युद्धक्षेत्रावरील मराठयांच्या हालचालींची अचूक बातमी

सेनापतीला देण्यासाठीं एकसारखे कष्टत होते. अशी ही खडाजंगी सुरू असतांना स्वतः सेनापति सिल्व्हेरा जेथें उभा होता, तेथें एक पोर्तुगीज तरुण मध्येंच सैन्यांत घुसून 'मला वाट द्या. मी बातमीदार आहें. सेनापतीसाहेबांना शत्रूच्या कारस्थानाविषयीं महत्त्वाची बातमी देण्यासाठीं मला आतांच्या आतां त्यांची भेट घेणें अवश्य आहे. उशीर लागेल तर अनर्थ होईल' असें ओरडत पुढें चालला व पोर्तुगीज शिपायांनींही त्याला वाट दिली.

तो बातमीदार कोण होता व त्यानें काय केलें हें सांगण्यापूर्वी सेनापति सिल्व्हेराच्या अपेक्षेविरुद्ध प्रत्येक गोष्ट क्रमाक्रमानें कशी घडत आली याचें सिंहावलोकन करणें प्राप्त आहे. मुरारी हा कोणत्या प्रकारचा व कोण मनुष्य होता हें पूर्वीं माहीत झाले आहेच व अर्नाळ्याचा किल्लेदारही पश्चात्तापानें पावन झाल्यावर सर्वांच्या परिचयाचा झाला आहे. हे दोघेही वीर ज्या अर्थी चिमाजीअप्पांच्या सल्ल्यानें वसईच्या किल्ल्यावर गेले, त्या अर्थी ते मराठ्यांचे हितसंरक्षक म्हणूनच गेले होते हें सांगावयाला नकोच. त्यांनीं अंगिकारिलेलें काम जरी अत्यंत नाजुक होतें, तरी तें नाजुक काम करण्याची पात्रता त्यांनीं उभयपक्षीं संपादन केली होती. मुरारी तर सेनापतीचा 'विश्वासू' सेवक होताच व बाजीबा बार्बाराच्या मोहजालांत सांपडून पोर्तुगीजां-च्या बाजूला वळल्याचें बार्बाराकडून पोर्शियाला आलेल्या गुप्त संदेशावरून सेनापतीला माहीत झालें होतें. गनिमीकाव्यांत मुरलेल्या त्या दोघां मुरब्बी मराठे वीरांनीं सेनापतीचे दांत सेनापतीच्या घशांत लोटण्याकडे ह्या परिस्थिती-चा पुरेपूर उपयोग करावयाचें ठरवून पुढील कारस्थान रचिलें. मुरारीनें पाळींव कबुतरें मुद्दाम आपणाकडे राखून ठेविलीं होतीं. सेनापतीनें चिमाजीअप्पा व रामानंद यांना तहाच्या वाटाघाटीच्या निमित्तानें दगा देण्यासाठीं रचिलेल्या कारस्थानाची मुरारीला पूर्ण माहिती होती; शिवाय पोर्शियानें बार्बाराला लिहिलेल्या पत्रावरून—ज्या पत्राचा तर्जुमा मुरारीनें चिमाजीअप्पांना वाचावयाला दिला त्या पत्रावरून—सेनापतीचा दुष्ट आशय अगदीं उघड झाला होता. त्या पत्राला बार्बाराकडून जें उत्तर जाणार त्या पत्रावर सेनापतीच्या पुढील बेतांची मदार असणार हें सूर्यचंद्राइतकें शाश्वत सत्य होतें. हें उत्तर बार्बाराकडून जाणार याविषयींही मुरारीला शंका नव्हती. दरम्यान् बाजीबाच्या हातून बार्बाराचा वध झाला ही गोष्ट निराळी; पण तो वध झाला नसता व बार्बारा

उत्तर पाठवूं शकली असती तरी तें पत्र वसईच्या किल्ल्यावर जाऊन पोंचण्याचा मुळींच संभव नव्हता. बार्बोरानें मुरारीकडून मिळालेल्या कबुतरांपैकीं एखाद्या-मार्फत तो संदेश पाठविला असता, तर तें कबुतर भुर्रकन् अंतरिक्षांत कोठें तरी भराऱ्या मारीत गेलें असतें अथवा फार तर आपल्या खुराड्यांत म्हणजे खंडूजी माणकर, गंगाजीनाईक वगैरे मंडळी जी कोणी सुतार, कोणी लोहार, तर कोणी कासार अशी निरनिराळे धंदेवाईक बनून किल्ल्यावर गुप्तपणें वसाहत करून बसली होती त्या मंडळीच्या आटोक्यांत गेलें असतें. तसें झालें असतें तरी ती मंडळी तो संदेश मधल्यामध्यें पकडून त्याची योग्य ती वासलात लावण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून टपून बसली होती; पण बाजीबाच्या हातून अकस्मात् बार्बोराचा खून झाला, त्यामुळें ती भानगड आपोआप बिनबोभाट मिटली.

तरीही मुरारीनें ज्या उद्देशानें पाळींव कबुतरें आपल्या ताब्यांत ठेविलीं होतीं तो उद्देश यशस्वितेनें तडीला नेलाच. बार्बोराचा वध झाला ही गोष्ट प्रथमपासूनच गुप्त राखण्याची पूर्ण खबरदारी घेऊन चिमाजीअप्पा वगैरे सर्व मंडळीच्या संमतीनें पुढील योजना ठरली व त्या योजनेला पोषक अशी वसईच्या फिरंग्यांची दिशाभूल करणारी बातमी त्यानें आपल्याकडील कबुतरांमार्फत वसईला पोंचती होईल अशी खबरदारी घेतली. ज्याप्रमाणें बार्बोराच्या वधाची बातमी गुप्त राखण्याची अर्नाळ्यावर कसोशीची खबरदारी घेण्यांत आल्यामुळें वसईला कळली नव्हती, त्याप्रमाणेंच पोर्शियाचें आकस्मिक प्राणोत्क्रमण, मार्गारेटच्या खुनाचा प्रयत्न, डोमिंगोवर त्या प्रयत्नाचा आलेला आळ वगैरे विस्मयजनक प्रकार घडण्याच्या पूर्वीच मुरारीनें वसई सोडली असल्याकारणानें मुरारी व बाजीबा हे वसईला येऊन पोंचेपावेतों त्यांना तें माहीत नव्हतें. पोर्शिया व अर्थात् सेनापति वगैरे खाशी मंडळी बार्बोराच्या उत्तराची चातकासारखी वाट पहात असणार हें ओळखून मुरारीनें रात्रभर पुढील बेतांचें गुप्त खलबत झाल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळींच बार्बोराच्या हस्ताक्षराप्रमाणें अक्षर काढून एक चिठी लिहून ती एका कबुतराच्या पायाला बांधली व त्या कबुतराला उडवून दिलें. 'चिमाजीअप्पांची वजीरगडावर भेट घेणें सोईचें होईल. रामानंद अर्नाळ्यावरच आजारी आहेत; त्यांना पकडण्याची व्यवस्था भय्याशास्त्र्यांच्या हातून बिनबोभाट होऊं शकेल. चिमाजीअप्पांचा



वसईच्या किल्ल्यावरील एक बुरूज

ग्रह भय्याशास्त्र्यांविषयीं पुन्हा अनुकूल झाला आहे व शुध्दि संघटणाच्या बाबतींत यापुढें भय्याशास्त्र्यांच्या मतानें वागण्याची रामानंदांची तयारी आहे. भय्याशास्त्र्यांना सर्वधर्माधिकारी मानणारा समाज फारच मोठा आहे. एथला किल्लेदार पूर्णपणें आपल्या बाजूला वळला आहे. त्याचा आपणाला अर्नाळा जिंकण्याच्या कामीं फारच उपयोग होईल. त्याला मुद्दाम आज मुरारीबरोबर तिकडे पाठवीत आहें. ते दोघेही अत्यंत विश्वासू असे मनुष्य आपणाला लाभलेले आहेत. ते इतर सर्व खुलासा करतील'. असा मजकूर त्या चिठींत लिहिलेला होता. पोर्शिया जरी पूर्वींच कालवश झाली होती, तरी तिच्या सर्व बेतांचा सेनापतीला पूर्ण सुगावा व त्यांना पूर्ण संमति असल्यानें पाळींव कबुतरांच्या खुराड्यापाशीं सेनापतीचे विश्वासू सेवक कबुतराची वाट पहात बसले होतेच. त्यांना अर्नाळ्याहून रवाना झालेलें कबुतर योग्य वेळीं मिळालें व ती बातमी सेनापतीला कळली. लगेच तिसऱ्या प्रहरीं बाजीबा व मुरारी हे किल्ल्यावर जाऊन पोंचले. पुढें त्यांच्या जिव्हाळ्याच्या वाटाघाटी झाल्या व त्या अंमलांतही आल्या. बार्बाराच्या नांवानें आलेल्या संदेशांत व बाजीबा आणि मुरारी यांनीं निवेदन केलेल्या परिस्थितींत अंतर पडणें शक्यच नव्हतें. उलट त्या दोन्हा गोष्टींची एकवाक्यता झाल्यानें सेनापतीचा बाजीबा व मुरारी यांच्यावरील विश्वास वज्रलेप झाला. त्यानें त्या दोघांनाही त्यांच्या मेहनतीबद्दल योग्य पारितोषिक देण्याचें अभिवचन दिलें. बाजीबाच्या साह्याशिवाय अर्नाळा आपल्या ताब्यांत येणें शक्य नाहीं व रामानंदही हातीं सांपडणें शक्य नाहीं, असें मुरारीचें मत पडलें व तें सेनापतीलाही ग्राह्य झालें. भय्याशास्त्री व बाजीबा यांची मुलाखत होऊन ते दोघे अर्नाळ्यावर रवाना झाले. चिमाजीअप्पांना वजीरगडावर कोंडण्याच्या कामीं मुरारीनें स्वखुषीनें पुढाकार घेऊन ॲन्टोनिओला मनःपूर्वक साह्य करण्याचें कबूल केलें; मात्र यांत मराठ्यांचा अर्धा डाव फसला. त्यांच्या मनांतून वजीरगडावर खुद्द सेनापतीलाच कोंडावयाचें होतें; पण सेनापति कन्या-विरह व पत्नीविरह ह्या दोन विरहानलांत होरपळून निघाला असल्यानें त्याला वजीरगडावर जावयाला उमेद नव्हती व तशा स्थितींत त्याला आग्रह करणें शोभणार नाहीं हें ओळखून मुरारीनेंही आग्रह केला नाहीं; पण त्यामुळें मराठ्यांचें कारस्थान फारसें बिघडलें असें नाहीं. त्यांचें तरी शत्रुपक्षाकडील एकट्या सेनापतीला नामोहरम करून थोडेंच भागणार होतें ! ॲन्टोनिओ, फादर पोर्टो,

भग्याशास्त्री वगैरे पोर्तुगीज सत्तारूपी राक्षसाचे अवयव निकामी करणें हेंही मराठ्यांच्या कारस्थानाचें एक प्रधान अंग होतेंच.

त्यामुळे एवढेंच झालें, सेनापति कैदेंत पडण्याच्या ऐवजीं ॲन्टोनिओ सांपडला. मराठ्यांनीं वजीरगडच कारस्थानाच्या सांगतेसाठीं प्रथम निश्चित केला, याचें कारण चिमाजीअप्पांना वसईच्या शेजारीं, पण सुरक्षित अशी जागा छावणीसाठीं पाहिजे होती अशी जागा वजीरगड ही आहे व तीं अनायासें त्या वाटाघाटीच्या निमित्तानें मराठ्यांच्या हातीं येणार होती. नारो शंकराची मुक्तता झाल्यावर तो वजीरगडच्या गुप्त वाटेनेंच बाहेर आला होता व वसईच्या किल्ल्यांत गुपचूपपणें आपल्या लोकांना घुसण्यासाठीं ती वाट फार सोईची आहे असें त्याचेंही मत पडले. म्हणून ती वाट बिनबोभाट आपल्या ताब्यांत ठेवण्याची मराठ्यांना फार आवश्यकता भासली. मुरारी जो ॲन्टोनिओला साह्य करण्याच्या मिषानें बरोबर राहिला होता, तोही ह्याच अंतस्थ हेतूनें. इतकेंच काय; पण आयत्या वेळीं किल्ल्यावरील अधिकाऱ्यांनीं ती वाट बंद करण्याचें मनांत आणलें तरीदेखील ती उघडीच रहावी यासाठीं मुरारीनें सेनापतीपाशीं त्या वाटेच्या बंदोबस्ताचें बाह्यात्कारीं फार अवडंबर माजवून तें बंदोबस्ताचें काम गुप्तपणें किल्ल्यांत कारस्थाने करणाऱ्या आपल्या लोकांच्या हातीं आणून ठेविले होतें.

चिमाजीअप्पांना वजीरगडावर कसें अचानक कोंडावें याची बेमालूम योजना उत्साहपूर्वक सेनापतीला सुचविणाराही मुरारीच असल्यानें त्याच्या शब्दाशिवाय त्या कारस्थानाच्या बाबतींत इकडची काडीदेखील तिकडे होत नव्हती. त्या सर्व गोष्टी चिमाजीअप्पांना आगाऊच माहीत असल्यामुळें ते जे त्या दिवशीं तहाची वाटाघाट करण्याच्या मिषानें बाहेर पडले, ते निर्वाणीचा धर्मसंग्राम सुरू करण्याच्या निर्धारानेच बाहेर पडले होते. मात्र बरोबर फौज अशी कोणींच घ्यावयाची नाहीं अशी तहाच्या वाटाघाटीसंबंधीं जी अट होती, ती उभयपक्षीं सारख्याच कावेबाजपणानें एकमेकांना नकळत मोडण्यांत आली होती. पण त्यांतही मराठ्यांच्या गनिमी काव्याच्या मसलतीचाच विजय होता. चिमाजीअप्पांनीं आपणाबरोबर सैनिक घेतले होते ते कोणी गुराखी तर कोणी दूधवाला तर कोणी भाजीविक्या अशा निरनिराळ्या वेषांनीं वजीरगडाच्या टापूंत इतस्ततः अत्यंत जागरूकपणें अनुकूल संधीची व खुणेची वाट पहात हिंडत होते. सेनापतीला चिमाजीअप्पा कैद झाल्याची बातमी कळविण्यासाठीं म्हणून तोफेची जी खूण मुरारीच्या सल्ल्यानें

मुक्र करण्यांत आली होती, तीच ह्या सैनिकांचीही खूण होती व ती ठरविणारा मुरारीच ! बरें; अॅन्टोनिओने आपलें विश्वासघातकी डोकें लढवून चिमाजीअप्पांना ऐनवेळीं पकडण्यासाठीं म्हणून जे सैनिक मुरारीच्या पारखीनें निवडून बरोबर घेतले होते, ते मुरारीचे हस्तक होते. त्यामुळें ऐनवेळीं अॅन्टोनिओला कोंडण्याच्या कामीं जरादेखील अडचण पडली नाहीं. सेनापति ज्या तोफेच्या आवाजाची वाट पहात होता त्या तोफेचा आवाज बरोबर अॅन्टोनिओ चिमाजीअप्पांच्या कह्यांत सांपडला तेव्हां झाला. अर्थात् मुरारीच्या लोकांनीं चिमाजीअप्पांच्या संमतीनेंच त्या वेळीं ती तोफ उडविली. त्या खुणेनें तिकडे सेनापतीनें शेफारून जाऊन मराठ्यांवर तोफांचा भडिमार करण्याला सुरुवात केली व त्याच खुणेसरखे चिमाजीअप्पांचे सारे वेषधारी सैनिक अॅन्टोनिओलाच काय पण त्याच्या तर्फेच्या मुंगीलाही बाहेर पळूं द्यावयाचें नाहीं किंवा भुयारांतून किल्ल्यांतही शिरूं द्यावयाचें नाहीं अशा पूर्वनियोजित बेतानुसार सावधगिरीनें आपलीं हत्यारें सरसावून उभे राहिले. अॅन्टोनिओबरोबरच्या लोकांत जे कांहीं खास त्याचे लोक होते त्यांनीं अॅन्टोनिओच्या अंगुलिनिर्देशानुसार चिमाजीअप्पांना गराडा देण्याची चुळबूळ करतांच बाकीच्या शिपायांनीं एका निमिषांत तेथल्या तेथें त्यांची कत्तल केली, व चिमाजीअप्पांबरोबरच्या थोड्या वेषधारी शरीरसंरक्षकांनीं अॅन्टोनिओवर छापा घातला. अॅन्टोनिओनें लगेच प्राणरक्षणासाठीं भुयाराकडे धांव घेतली; पण भुयाराचे दरवाजे बंद ! बिचारा नेमका कात्रींत सांपडला, व थोड्या वेळापूर्वी तेथें गुरें वळणाऱ्या गुराख्यांच्या आणि भाजीविक्यांच्या हातीं कैद झाला. मुरारीच्या देखरेखीखालीं अॅन्टोनिओला अर्नाळ्यावर रवाना करण्यांत आलें.

ह्या सर्व गोष्टी इतक्या बेमालूमपणें झाल्या कीं, त्या दिवशीं लढाई ऐन रंगांत येईतों काय झालें याची सेनापतीला दाददेखील लागूं शकली नाहीं. सायंकाळच्या वेळीं जेव्हां मुरारी धापा टाकीत किल्ल्यावर आला, तेव्हां त्याच्या तोंडून 'अॅन्टोनिओनें चिमाजीअप्पांना पकडण्यांत उतावीळपणा केल्यामुळें आपला डाव हुकला व चिमाजीअप्पांच्याऐवजीं त्यांच्या लोकांच्या हातून अॅन्टोनिओच कैद झाला. तो कैद होतांच लगेच चिमाजीअप्पांना शरण गेला. त्यामुळें त्याचा जीव बचावला व आमची मात्र लांडगेतोड झाली. अशी अभूतपूर्व अनिष्ट बातमी सेनापतीला मिळाली ! पण आश्चर्याची व मुरारीच्या चतुराईची गोष्ट ही कीं, मुरारीवरची सेनापतीची श्रद्धा कायमच होती

व फिरंग्यांच्या बचावासाठीं शक्य तेवढे उपाय करण्याकरितां किल्ल्या-वर अनिरुद्ध संचार करण्याला त्याला मोकळीकच होती. तो काय करीत होता व काय करीत नव्हता याची दाद कोण घेणार! मुरारी देखील आपलें आसन अढळ राखण्यासाठीं मधून मधून शिकस्तीची कारवाई करीत होता. उदाहरणार्थ, भग्याशास्त्री व बाजीबा अर्नाळ्यावर रामानंदांना पकडण्यासाठीं म्हणून रवाना झाले व बाजीबा अर्नाळ्यावर बंदोबस्तानें ॲन्टोनिओ आणि भग्याशास्त्री यांना पक्या कैदेंत डाम्बून ठेवून मराठ्यांच्या मदतीसाठीं चालून आला, तेव्हां अर्नाळ्याहून बार्वाराचा संदेश कबुतरामार्फत 'रामानंद कैद झाले. अर्नाळा पूर्णपणें बाजीबाच्या हातीं आला असून बाजीबा ॲन्टोनिओला बंधमुक्त करून त्याच्यासह चिमाजीअप्पांना पकडण्यासाठीं जय्यत तयारीनें येत आहे' असा संदेश सेनापतीच्या हातीं आला. 'बुडत्याला काडीचा आधार' या न्यायानें सेनापतीला त्या आणीबाणीच्या प्रसंगीं अशा बातम्यांचाही मोठाच धीर वाटणें साहजिक होतें. दृष्टीआड सृष्टि कशी रचिली जात आहे हें त्याला बिचाऱ्याला कसें कळणार!

असो. अशा परिस्थितींत सेनापति 'यश किंवा मरण' अशा निर्धारानें रेमि-डिओ बुरुजावर उभा राहून लढत असतां तो बातमीदार तरुण एकाएकीं धांवत धांवत त्याच्याजवळ येऊन उभा राहिला. त्या तरुणानें क्षणभर—फक्त एक क्षणच स्वतःशीं कसला तरी विचार केला व मनाचा काय धडा करावयाचा तो करून आपल्या कमरपट्ट्याकडे हात नेतां नेतां हांक मारली, "सेनापतिसाहेब! महत्त्वाची बातमी आहे."

सेनापतीनें लगेच तशा धुमश्चक्रींत मागें वळून पहातां पहातां विचारलें, "कोण? आल्मेडा काय?"

"होय, मी आल्मेडा!" तो डोमिंगोचा विश्वासू सेवक आल्मेडाच होता.

"काय बातमी आहे?" सेनापतीनें प्रश्न केला.

"डोमिंगोला मार्गारेटच्या खुनाबद्दल देहान्त शासन करण्यांत आपण फार मोठी चूक केली.—"

"त्या गोष्टी जाऊं देत."

"नाहीं. जाऊं देत कशा? तो गुन्हा खरोखर कोणीं केला तें मला माहीत आहे."

"मग खरोखर गुन्हा कोणीं केला?"

" मार्गारेटच्या पतीनें. आपण त्याच्या संसाराची होळी केली म्हणून त्यानें आपणां उभयतांवर सूड उगविण्याची प्रतिज्ञा केली आहे. तो आपला वैरी आपल्या नाशावर टपलेला असून त्याचें पारिपत्य करणे आतां आपल्या आवांक्याबाहेरचें आहे." आल्मेडानें बोलतां बोलतां आपल्या कमरपट्ट्यांतून सर्रकन् खंजीर बाहेर काढला व सेनापतीच्या छातीवर रोंखून तो उद्गारला, " तोच आपला वैरी मी माझ्या प्रतिज्ञेची हो ही अशी पूर्तता—"

इतक्यांत तोफेचा एक रसरशीत गोळा नेमका सेनापति उभा होता तेथें येऊन आदळला व त्यानें सेनापति आणि आल्मेडा हे दोघेही गतप्राण होऊन पडले. आजूबाजूला उभे असलेले कैक पोर्तुगीज सैनिकही त्या गोळ्याच्या आघातासरसे यमसदनीं गेले.*

एका अज्ञात वीरानें मात्र अशा प्रळयकाळीं देखील आपल्या धैर्याची कमाल केली. धडाधड तोफांचे गोळे डोक्यावर वर्षत आहेत, सेनापतीच्या आकस्मिक निधनामुळें हवालदील झालेले फिरंगी शिपाई कच खाऊन मागें हटत आहेत, तोफांचे गोळे भराभर वर्षत आहेत. अशा वेळीं एक तरुण धूमकेतूसारखा तेथें उपस्थित झाला व त्यानें तशा प्राणघातक गर्दीतून वाट काढून सेनापतीचें अर्धेमुर्धे छिन्नविच्छिन्न कलेवर शिपायांच्या पायांतळीं धुळींत लोळत पडले होतें, तेथवर गेला. त्यानें क्षणभर सभोंवतीं पाहून चट्कन् आपल्या कमरेच्या तरवारीनें सेनापतीच्या कलेवराचें शीर तेवढें कापून घेतलें व 'हर हर महादेव' अशी आरोळी ठोकून तेथून पळ काढला.

सेनापति सिल्व्हेराचा शेवट म्हणजेच पर्यायानें वसईतील पोर्तुगीज सत्तेचा शेवट होय, हें सूचित करण्यासाठींच कीं काय, यदृच्छेनुसार तोफेचा दुसरा एक गोळा किल्ल्यांतील टेहळणी बुरुजाच्या माडीला चाटून गेला व त्या बुरुजावर आज जवळ जवळ दोन शतकेपर्यंत अव्याहतपणें फडकणारें पोर्तुगीज सत्तेचें निशाण आगीच्या झळीसरसें पेटलें.

---

* सेनापति सिल्व्हेरा ता. १५।४।१७३९ रोजीं 'नोसा सिनोरा डि रेमिडिओ' नांवाच्या बुरुजावरून लढत असतां एका तोफेच्या गोळ्यासरसें त्याला वीरोचित मरण आलें.

प्रकरण एकविसावें

## दुधांत साखर

दिवा विझतांना मोठा होतो, किंवा प्राणोत्क्रमणाच्या सरहद्दीवर येऊन पोंचलेल्या जीवाचा श्वासोच्छ्वास अखेरच्या घटकेला जोराजोरानें वाहूं लागतो, त्याप्रमाणें सेनापति सिल्व्हेराच्या पश्चात् वसईच्या किल्ल्यांतील पोर्तुगीज सत्तेची प्राणांतिक दुरवस्था झाली. किल्लेदार पेरीरा हा प्रथमपासूनच आपला पडता काळ ओळखून मराठ्यांशीं तह करण्याला उत्सुक होता. पण सेनापतीनें केलेल्या विश्वासघातामुळें तहाचें काम बरेंच दुर्घट होऊन बसलें होतें. तहासंबंधींच्या वाटाघाटींचें पुन्हा जें नाटक पोर्शिया व बार्बारा यांच्या कारस्थानानुसार रचण्यांत आलें, त्यांत जरी उभयपक्षीं सारखेच डावपेंच लढविण्यांत आले होते, किंबहुना मुरारी, बाजीबा वगैरे मराठा वीरांचीच ती कारवाई होती, तरी मुरारीनें त्या अपयशाचें खापर बेमालूमपणें ॲन्टोनिओच्या माथीं फोडल्यामुळें ती चूकदेखील आपल्याच लोकांकडून झाली अशीही वसईच्या सर्व फिरंगी अधिकाऱ्यांची खात्री झाली. अर्थात् आतां मराठ्यांशीं तहाची वाटाघाट करण्याला फिरंग्यांना तोंडच उरलें नसल्याकारणानें अखेरपावेतों लढण्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हतें. आधींच फिरंग्यांची बाजू लंगडी ! त्यांना गोव्याकडून मदत येईल तर तिकडे व्यंकटराव घोरपड्यानें नुक्तींच गोव्यांत फिरंग्यांची हाडें नरम केलेलीं! मुंबईकर इंग्रज मराठ्यांचें वाढतें यश पाहून त्यांच्याशीं दावेदारी उत्पन्न न व्हावी यासाठीं फिरंग्यांना मदत करावयाला नाखूष; त्यांतूनही कांहीं मदत मुंबईकरांनीं केलीच तर तिच्यावर पाळत राखून वाटेंतच तिची लूट करण्यांत अंताजीपंत कावळ्यांचा हातखंडा होता; वसईखेरीज त्या प्रांतांतील इतर सर्व मुलुख मराठ्यांनीं आपल्या अंमलाखालीं आणलेला असल्यानें त्या मुलुखांतून कोणत्याच प्रकारचा उपराळा वसईमधील फिरंग्यांना होण्याची आशा अजिबात खुंटली होती; त्यांत आणखी फिरंग्यांच्या विश्वासघातकीपणामुळें मराठ्यांच्या मनांत पक्का अविश्वास उत्पन्न झालेला; अशा वेळीं तह करावा असें आपण मनांत आणलें तरीदेखील मराठे तयार होणार नाहींत अशी वसईच्या किल्ल्यांतील फिरंगी अधिकाऱ्यांची

बालंबाल खात्री असल्यानें व अजूनही कांहीं फिरंगी अधिकाऱ्यांना आपण परिणामीं विजयी होऊं अशी घमेंड असल्यानें सेनापतीच्या पश्चात् देखील तो रणसंग्राम तसाच आणखी कैक दिवस सुरू राहिला; व पेरीरालाही त्या प्रसंगांतून बाहेर पडण्याला कांहीं मार्ग उरला नसल्यानें यशापयशाचा भार परमेश्वरावर टाकून संग्राम सुरू ठेवणें भाग पडलें. त्याला पुत्रनिधन, पत्नीनिधन अशा भयंकर कौटुंबिक आपत्तींनीं अगदीं हैराण करून सोडलें होतें हें जरी खरें, तरी त्याबद्दल दुःख करण्यापुरतीदेखील उसंत त्याला मिळेना. तशांत आणखी सेनापति सिल्व्हेराच्या पश्चात् गोवें सरकारनें पेरीराची सेनापतीच्या जागीं नेमणूक केली. एवढा मोठा मान प्राप्त होतांच त्या मानाला साजेशी कांहीं कामगिरी करून दाखविण्याची ईर्षा साहजिकपणेंच पेरीराच्या ठायीं उत्पन्न झाली; व त्यानें नव्या दमानें नव्या युक्त्यांनीं मराठ्यांशीं निकराचा संग्राम मांडला.

पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, सेनापति सिल्व्हेराच्या वेळेपासून मुरारी वगैरे जे मराठे लोक पोर्तुगीजांचे साह्यकर्ते म्हणून गाजत होते, त्यांचा पोर्तुगीजांच्या ह्या नव्या डावपेंचांतही अनिरुद्ध संचार सुरूच होता. इतकेंच काय, पण वसईच्या किल्ल्यांत माजलेल्या बजबजपुरींत त्या चातुर्यवान् लोकांचें चांगलेंच फावलें होतें. त्या चातुर्यवान् लोकांत सेनापति सिल्व्हेराच्या पश्चात् आणखी जोसेफची भर पडली होती. जोसेफ थोड्या दिवसांपूर्वीं अर्नाळ्यावर चिमाजीअप्पांना भैरवाच्या संकटग्रस्ततेची बातमी द्यावयाला आला व रामानंद वगैरे मंडळीला घेऊन सोपाऱ्याला माघारा गेला, हें वाचकांना आठवत असेलच. भैरवाच्या सुदैवानें रामानंद, जोसेफ वगैरे मंडळी सोपाऱ्याला जाऊन पोंचण्यापूर्वींच फादर पोर्टो भैरवाचा शक्य तेवढा शोध करून व शोध लागत नाहीं असें पाहून अन्य उपायांनीं मंडपेश्वरच्या पराजयाचा सूड मराठ्यांवर कसा उगवितां येईल याविषयींची योजना सेनापतीच्या मतानें ठरविण्यासाठीं वसईच्या किल्ल्यावर जाऊन तळ देऊन बसला होता. शिवाय 'कोणाची पेटे दाढी व कोण पेटवी विडी' या न्यायानें त्या तशा आणीबाणीच्या वेळींही फादर पोर्टोचें आपल्या प्रियतमे-विषयीं—सोफियाविषयीं चिंतन सुरूच असून तिच्या शोधार्थ त्याचे भगीरथ प्रयत्न सुरू होते. जोसेफ हा मंडपेश्वरापासून सोफियाचा अर्थात् फादर पोर्टोचाही एकनिष्ठ सेवक होता व शिवाय प्रथमपासूनच त्याचा मराठ्यांकडे जिव्हाळ्याचा ओढा होता हे वाचकांना माहीत आहेच. त्या संधीचा वसईच्या किल्ल्यावर

अनिरुद्ध संचार करण्याच्या कामीं पुरेपुरे उपयोग करून घेण्याला जोसेफला मुक्त-द्वार होतें. आणि त्यानेंही त्या संधीचा जेवढा म्हणून फायदा करून घेतां आला तेवढा करून घेतला. जोसेफच्या डोक्यावर पहिली मोठी जबाबदारी भैरवाच्या रक्षणाची होती; ती जबाबदारी त्याला अनायासें पार पाडतां येऊन भैरव व जोसेफ या दोघांनींही अहमहमिकेनें आपल्या शत्रूंना शासन करण्याची प्रतिज्ञा केली व वसईच्या किल्ल्याकडे मोर्चा वळविला, तेव्हांपासून ते दोघेही आपापल्या कार्यांत अगदीं चूर होऊन गेले.

अशाप्रकारच्या एकाहून एक चतुराईच्या कारवाया मराठमोळ्याच्या कैवाऱ्यां-नीं चालविल्या असल्यामुळें वसईच्या किल्ल्यांत फिरंग्यांचा एखादा गुप्त बेत ठरलारे ठरला, कीं त्या बेताची बितबातमी मराठ्यांच्या गोटांत तेव्हांच कळे. मराठ्यांच्या गोटांतील बातम्याही किल्ल्यांतील फिरंग्यांना कळत. मुरारी, बाजीबा, जोसेफ हे फिरंग्यांच्या मताप्रमाणें त्यांचेच हेर असल्यानें त्यांच्याकडून बातम्यांची नुसती खैरात किल्ल्यावर झडे. शिवाय बार्बारा फिरंग्यांचें हितसंरक्षण करण्यासाठीं अर्नाळ्यावर होतीच! ती ठार होऊन पंधरवडा लोटला तरीदेखील फिरंग्यांची प्रामाणिक समजूत अशी कीं, ती अर्नाळ्यावर मारे मजबूत ठाणें देऊन बसली आहे! बरें; सिल्व्हेरा कालवश झाल्यावरदेखील पाळीव कबुतरांच्या साह्यानें फिरंग्यांची दिशाभूल करणारे संदेश मधून मधून वसईच्या किल्ल्यांत धडकविण्याचा मराठ्यांचा सपाटा सुरूच होता. 'बुडत्याचा पाय खोलांत' या न्यायानें त्या बातम्यांवर फिरंग्यांचा विश्वास बसावा यांत आश्चर्य नाहीं.

नुसत्या वरवरच्या हल्ल्यानें किल्ला कांहीं पाडाव होणें शक्य नव्हतें व पावसाळा तर डोकीवर आला. एकदां पाऊस पडूं लागला कीं, लढाई थांबली व लढाई थांबली कीं इतके दिवस गाजविलेली मर्दुमकी व्यर्थ! मराठ्यांच्या सैन्यांत विशेष भरणा शेत-कऱ्यांचाच असल्यानें त्यांचा देह रणांगणांत व चित्त शेतवाडींत, अशी स्थिति होऊं नये म्हणून चिमाजीअप्पांना कांहीं तरी नवी उपाययोजना करून ह्या मोहिमेचा एकदांचा सोक्षमोक्ष करणें अवश्य झालें. फिरंग्यांनीं मराठ्यांचें हें वर्म ओळखून मराठ्यांना मोहिमेचा वीट आणण्यासाठीं मुद्दाम धिमेपणानें सारा कारभार चालविला होता. ही बातमी हेरांमार्फत कळतांच तर चिमाजीअप्पांनीं जास्तच तांतडी करून आपल्या बाजूच्या सर्व मातबर लोकांना एकत्र जमवून किल्ल्यावर तोफांचा भडि-मार करून आंत जाण्याला वाट पाडावयाला सांगितलें. पण किल्ल्याचा दुर्भेद्य

तट मराठयांच्या तोफांना दाद देईना. मोर्चेबंदी करून लगट करण्याचा प्रयत्न मराठयांनीं करून पाहिला; पण फिरंग्यांनीं त्या मोर्चेबंदीवर तोफांचा भडिमार करून मराठयांचा संहार आरंभिला. किल्ल्यांत शिरण्याला वाट मिळाल्या-शिवाय इतर सर्व उपाय व्यर्थ आहेत असें पाहून चिमाजीअप्पांनीं होळकर, शिंदे वगैरे खाशा मंडळीच्या सल्ल्यानें किल्ल्याच्या निरनिराळ्या बुरुजांखालीं सुरुंग खोदवून ते पेटून किल्ल्यांत जाण्यासाठीं वाट पाडण्याची तरतूद चालविली.

सुरुंगाची सर्व सिद्धता झाल्यावर चिमाजीअप्पांनीं आपल्या सर्व सैनिकांना आपणासभोंवार बोलावून सांगितलें, "आज आपण जो उपाय शत्रूचा पाडाव करण्यासाठीं योजिणार तो अगदीं शेवटचा आहे. शत्रूला पाडाव करण्याचे इतर सर्व उपाय अयशस्वी ठरले असें पाहूनच हा उपाय आम्हीं योजिला आहे. 'शत्रूला मारून विजयी होऊं तरी, किंवा धारातीर्थीं पतन पावून स्वर्गीं तरी जाऊं'. अशा निर्धारानें ज्यांचें पुढें पाऊल उचलत असेल, त्यांचेंच या ठिकाणीं काम आहे. इतक्या ईर्षेनें आम्हीं हा धर्मसंग्राम आजवर चालविला; आतां किल्ला काबीज केल्याशिवाय, किल्ल्यांत प्रवेश करून मराठयांचा भगवा झेंडा किल्ल्यावर फडकविल्याशिवाय आम्ही माघारे गेलों, तर आजवर ह्या पुण्यकार्यांत ज्यांनीं देह ठेविले, ते वीर आपला उपहास करतील, व आपलीं बायकापोरेंही 'अहारे पळपुटे शेंदाड शिपायी' म्हणून आमची छीःथूः करतील. असली नामुष्की सहन करण्यापेक्षां मरण शतपटीनें चांगलें. एवढें यश जर आमच्या प्रयत्नांना देण्याची तुमची तयारी नसेल, एवढें साहस करण्याची धमक जर तुमच्या अंगीं नसेल, तुम्ही भ्याडपणानें जर 'आम्ही मराठे अंगीकृत कार्यासाठीं मरूं, पण मागें हटणार नाहीं' ह्या आपल्या बिरुदावळीला काळिमा लावणार असाल, तर एकतरी करा, आम्हांला तोफेच्या तोंडीं बांधून किल्ल्यांत उडवून द्या; म्हणजे जिवंतपणीं किल्ला जिंकलेला पहावयाचें आमच्या कपाळीं नसलें तर आमचें शव तरी किल्ल्यांत पडेल व पराजयानें काळेंकुट्ट झालेलें तोंड घेऊन माघारीं जाण्याचा अत्यंत अपमानास्पद प्रसंग आमच्यावर येणार नाहीं."

बोलतां बोलतां चिमाजीअप्पांच्या कंठीं गहिंवर दाटून आल्यामुळें त्यांना जास्त बोलवेना. आणि आतां त्यांनीं जास्त बोलण्याचें कारणही उरलें नाहीं. एकूणएक सैनिकांनीं चिमाजीअप्पांच्या इच्छेप्रमाणें शपथा घेतल्या. त्या सैनिकांत स्वयंस्फूर्तीचें नवचैतन्य ओतण्यासाठीं स्वामि रामानंदही नेमके त्याचवेळीं

सोपाऱ्याकडून पांचशें ताज्या दमाचे लढवय्ये शिपाई घेऊन तेथें आले व त्यांनीं 'धर्मासाठीं मरावें, मरोनि अवघ्यासि मारावें, मारतां मारतां घ्यावें, राज्य आपुलें', हा ओजस्वी उपदेश असल्या सामर्थ्यवान् वाणीनें सर्वांच्या मनावर ठसविला. त्या उपदेशाचा असा विलक्षण परिणाम सर्वांच्या मनावर झाला कीं, जो तो दुर्गप्रवेशाचा किंवा दुर्गप्रवेशाप्रीत्यर्थ धारातीर्थीं देह ठेवण्याचा आघाडीचा मान मिळविण्यासाठीं अहमहमिकेनें सर्वांच्या पुढें जाण्याला अधीर झाला. लोकजागृतीचें आपलें काम झालें असें पाहून चिमाजीअप्पांनीं रामानंदांना हात जोडून विनंति केली, "स्वामि ! आपण आपल्या ह्या सर्व लेंकरांना शुभाशीर्वाद द्या."

रामानंदांनीं सर्व सैनिकांना मंगल आशीर्वाद दिला. लगेच मराठ्यांचा निकराचा हल्ला सुरू झाला. प्रथम मराठ्यांकडील तोफांची सरबत्ती होऊन तटाला लहानसें खिंडार पडलें. पण तें इतकें लहान खिंडार होतें कीं, त्यांतून आंत मराठ्यांचा प्रवेश होणें शक्यच नव्हतें. नंतर चिमाजीअप्पांनीं सुरुंगांना बत्त्या देण्याला आज्ञा केली. प्रथम राणोजी शिंद्यांचे सुरुंग उडवावे असें ठरलें. कारण ती जागा किल्ल्यांत घुसण्याला सोईची होती. तेथें आंतील बाजूला फिरंग्यांचा खजिना आहे. असा सुगावा मुरारीमार्फत मराठ्यांना पूर्वी मिळाला होता. शिंद्यांनीं तयार केलेले सुरुंग एकंदर पांच होते, व ते पांचही तटाखालीं भले भरभक्कम खोदण्यांत आले होते. त्या पांचांपैकीं तीन सुरुंग अगदीं जवळ जवळ होते व दोन अंमळ दूर होते. प्रथम त्या दोन सुरुंगांपैकीं एकाला बत्ती देण्यांत आली पण तो चांगलासा उडाला नाहीं. नंतर जवळ जवळ असलेल्या तीनही सुरुंगांना एकदम बत्ती देण्यांत आली. त्यांपैकीं दोन एकदम उडून तटाला मोठें खिंडार पडलें. त्याबरोबर मराठे सैनिक मोठ्या आवेशानें 'हरहर महादेव' अशी घनगर्जना करीत हल्ला करण्याकरितां आवेशानें पुढें धावले. कांहीं तटावरही चढले त्या आवेशाच्या भरांत बत्ती दिलेला आणखी एक सुरुंग उडावयाचा आहे याचेंही त्यांना भान राहिलें नाहीं; व दुर्दैवानें तो सुरुंग अचानक उडून घात झाला. तटावरील सैनिकांच्या चिंध्या चिंध्या होऊन ते वर हवेंत पऱ्यांसारखे उडून खालीं पडले, खालील लोक तटाखालीं सांपडून चिरडून मेले व जे थोडेसे शिल्लक राहिले त्यांच्यावर पोर्तुगीजांनीं हुक्के, गरनाळा, दारूचीं मडकीं, बरकंदाजी वगैरेंचा भडिमार करून त्यांना यमदरबाराची वाट दाखवून दिली. ह्या भयंकर अपघातानें

मराठ्यांची अतिशय प्राणहानि झाली, व आतां ते कच खातात कीं काय असें भय उत्पन्न झालें. तेव्हां स्वतः रामानंद, चिमाजीअप्पा, राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर वगैरे खाशा मंडळीनें सर्व सैन्याच्या आघाडीला जाऊन मुरारी, भैरव, नारो शंकर वगैरे कसलेल्या वीराग्रणींना आपापल्या निवडक सैन्याच्या तुकड्यांसह आपल्या मागोमाग यावयाला आज्ञा केली. खाशी मंडळी इतकी जिवावर उदार होऊन पुढें झालेली पाहतांच पुन्हा मराठा सैनिकांना दुप्पट धीर आला.

इतक्यांत जोसेफनें तेथें धांवत येऊन सूचना दिली, " आपला पांचवा शिल्लक असलेला सुरुंग ज्या बुरुजाखालीं आहे, तेथेंच किल्ल्यातील दारूचें भलेंमोठें कोठार आहे व तेथून दुसरीकडे दारूसामान लांबविण्यासाठीं फिरंग्यांची धांवपळ चालली आहे."

एवढी बातमी मिळतांच मल्हारराव होळकरांनीं नारो शंकराला हांक मारून सांगितलें, " नारायणराव ! पहातोस काय ? सुरुंगाला बत्ती दे ! "

तो सुरुंग नारो शंकराच्याच सूचनेवरून मल्हारराव होळकरांनीं खास आपल्या देखरेखीखालीं तयार केला असून तो किल्ल्याच्या सेंटसेबास्टियन नांवाच्या बुरुजाच्या खालीं होता. धन्याची आज्ञा मिळतांच नारो शंकरानें मुरारी व भैरव यांच्या साह्यानें त्या सुरुंगाला बत्ती दिली. सुदैवानें तो सुरुंग फारच चांगला उडाला, आंतील दारूचें कोठारही पेटून एकदम भडका झाला. अर्धा बुरूज त्या प्रचंड आघातासरसा कोसळून जणुं काय आकाशांत फेंकला गेला ! त्याबरोबर मराठे वीर प्राणांची पर्वा न करतां आंत घुसले. सेनापति पेरीरा हा वेळपर्यंत अन्यत्र मानाजी आंग्रे वगैरे लोकांचा हल्ला परतविण्यांत गढून गेला होता. तो बुरूज पडल्याची अशुभ वार्ता ऐकून आपल्या सैन्यानिशीं तेथें धांवून आला व आपलें बलसर्वस्व वेंचून आजच सोक्षमोक्ष करावयाचा अशा निर्धारानें लढूं लागला. सर्व फिरंगी इतर ठिकाणचे हल्ले सोडून सेनापतीच्या साह्याला धांवून आले; व हुके, गरनाळा, दारूचीं मडकीं, राळ, माशांचें तेल, बरखंदाजी वगैरे सर्व साहित्य किल्ल्यांत होतें नव्हतें तेवढें तेथें एकत्र करण्यांत येऊन त्या सगळ्याचा मराठ्यांवर नुसता वर्षाव करण्यांत आला. सुरुंगाच्या आगींत दारू, राळ, तेल अशी भर पडतांच ती आग एकदम जास्त भडकली. पण जसे फिरंगी, तसेच मराठेही इरेला पेटले असल्या-मुळें त्यांनीं त्या अग्निप्रलयालाही दाद दिली नाहीं. मराठे शिपाईही जळालों तर जळालों, मेलों तर मेलों', अशा निर्धारानें एकदां जेथें चढून गेले, तेथें खंदेपणानें

उभे राहून लढून फिरंग्यांना चोप देऊं लागले. मराठ्यांनीं पाडलेल्या खिंडारांच्या तोंडाशीं, मराठ्यांचा आंत शिरण्याचा मार्ग बंद करण्यासाठीं आगीच्या डोम्बा-डोम्बांत राळ, दारू व तेल ओतून जणुं यज्ञकर्मच फिरंग्यांनीं मांडलेलीं होतीं. कारण फादर पोर्टो हा आपली धर्मोपदेशक सेना घेऊन सेंट सेबास्टियन बुरुजा-वर एका अत्यंत सुरक्षितपणाच्या जागीं उभा राहून संकटनिवारक प्रार्थनेचा नुसता घोष करीत होता. इकडे मराठ्यांतही नवोत्साह उत्पन्न करण्यासाठीं रामा-नंदांच्या स्फूर्तिदायक उपदेशाचा अमृतवर्षाव सतत सुरू होता.

अशी उभय सैन्यांची लगट होतां होतां, अकस्मात् फिरंग्यांकडील वीर फादर पोर्टोच्या चिथावणीवरून रामानंदांचा बळी घेण्यासाठीं तशा हलकल्लोळांतून धांवले. त्यांतला एक मेला, दुसरा मेला, तिसरा मेला असे टप्प्याटप्प्याच्या अंतरानें चार वीर बळी पडले व पांचव्यानें मात्र घात केला ! त्याच्या हातांतील बंदुकीचा नेम अचूक असल्यानें पहिल्या गोळीसरसे रामानंद घायाळ होऊन खालीं पडले. पण तेवढ्यानें मराठे नाउमेद झाले नाहींत; उलट जास्त खवळले मात्र ! शत-गुणित त्वेषानें ते 'हर हर महादेव' हा एकच महामंत्र जपीत पुढें घुसले. चिमाजी-अप्पांनीं आपल्या लोकांना 'स्वामींचा घात शत्रूनें केला; आपल्या काळजावरच घाला घातला. स्वामींचें रक्त आपणांसाठीं सांडलें. ह्याची कांहीं लाज बाळगा, व स्वामींच्या रक्ताच्या एकेका थेंबाचा लाल डाग जो ह्या भूमीला पडला असेल तो धुऊन काढण्यासाठीं तेथें एकेका फिरंग्याचें रक्त ओता'. अशी आज्ञा केली, व स्वतः एकदम अगदीं आघाडीला उडी घातली. त्यांचा रोख मुख्यतः सेनापति व फादर पोर्टो यांच्यावर होता. चिमाजीअप्पांच्या मागोमाग मल्हारराव होळकर व गंगाजी नाईक पुढें घुसले. त्या तिघांबरोबर अनुक्रमें भैरव व नारो शंकर आणि मुरारजी नाईक हे होते. हे तिघेही हस्तक मुद्दाम आपल्या खाशांचें शरीरसंरक्षण करण्यासाठीं अग्रभागीं चालत होते. नारो शंकरानें प्रथम सेनापति पेरीराला टेहळून त्याच्यावर बंदुक झाडली. ती गोळी सेनापतीच्या उजव्या दंडाला चाटून गेली व सेनापति मटकन् खालीं बसला. तेवढ्यांत भैरवानें आंत दूरवर घुसून फादर पोर्टोला देहान्त शासन देण्यासाठीं त्याचा शोध चालविला. पण फादर पोर्टो अशा वेळीं कशाला पुढें येईल ! तो तेथून जीव घेऊन पळाला व बेपत्ता झाला. तरीही भैरव 'हा हरामखोर पळून कुठें पळणार ! तो सप्तपाताळांत गेला तरी त्याला मी हुडकून काढीन' अशा ईर्षेनें त्याचा शोध करीतच होता.

रामानंदांवरील अत्याचारामुळें चिडून गेलेल्या मराठा सैन्यानें जो निकराचा हल्ला केला, तोच त्या धर्मसंग्रामांतील अखेरचा हल्ला ठरला. सेनापति जखमी होतांच फिरंग्यांनीं जी कच खाल्ली ती कायमची ! हजारों मराठा वीरांनीं वसई-प्रांतांतील भूमि सतत तीन वर्षेंपावेतों आपल्या रक्तानें सारवून निर्मल केली, तिच्यांतील खांचखळगे आपल्या देहांच्या भरीनें बुजवून काढले व त्या भूमीवर भवितव्यता रामानंदांच्या रक्तानें प्रस्तुतच्या धर्मसंग्रामांतील मराठ्यांचा विजय-लेख लिहूं लागली. सेनापति पेरीरा तशा जखमी स्थितींत शांततासूचक शुभ्र ध्वज हातीं घेऊन चिमाजीअप्पांना शरण आला !†

त्याच वेळीं वसईच्या किल्ल्यांतील निशाण-बुरुजावर अकस्मात् मराठ्यांचा भगवा झेंडा फडकूं लागला; त्याला सर्व मराठ्यांनीं प्रचंड जयजयकारांत वंदन केलें. इतक्या धुमश्चक्रींत एवढें असामान्य साहस करणारा वीर जो कोणी असेल, त्याला सर्वांकडून धन्यवाद मिळूं लागले. मात्र तो भाग्यशाली वीर कोण, हें त्या खणाखणींत कोणालाच ओळखतां आलें नाहीं.

ॐ ॐ ॐ

सेनापति पेरीरा शरण आल्यामुळें धर्मसंग्राम उभयपक्षीं थांबला खरा; व उभय पक्षींच्या थोर माणसांनीं वजीरगडावर एकत्र जमून सलोख्याची वाटाघाट आज-च्या आज करावी असेंही ठरलें. तरीही फिरंग्यांना पुन्हा पूर्ववत् विश्वासघात करण्याची दुर्बुद्धि सुचूं नये म्हणून चिमाजीअप्पांनीं प्रथम होळकर, शिंदे, वगैरे सहकाऱ्यांच्या साह्यानें किल्ल्याची यथावत् नाकेबंदी करविली. किल्ल्यांत व सभोंवार योग्य पहारा राहील अशी व्यवस्था केली. त्याच वेळीं त्या धर्मसंग्रामांत जखमी होऊन पडलेल्या किंवा ठार झालेल्या मंडळींचा शोध करून समाचार घेण्यालाही ते विसरले नाहींत. लढाईंत उभयपक्षींचे पुष्कळच लोक ठार झाले असल्यानें त्या सर्वांचा एकदम तपास लागणें शक्यच नव्हतें. पण त्यांतील ठळक ठळक व्यक्ति ज्या आढळेनात, त्यांचा तपास करतां नारो शंकर, नारायणजी नाईक, शिवाजी नाईक, बुबाजी नाईक, खंडोजी माणकर वगैरे बरीच खाशी मंडळी जखमी होऊन बरीच हैराण झालेली त्यांना आढळून आली. अर्थात् त्या

† ही अखेरची खडाजंगीची लढाई ता. ५।५।१७३९ रोजीं झाली व त्याच दिवशीं पोर्तुगीज लोक चिमाजीअप्पांना शरण येऊन मराठ्यांशीं तह करण्याला तयार झाले.

मंडळींची हैराणगत लढाई थांबली म्हणून उजेडांत आली. नाहींपेक्षां शरिरांतील रक्ताचा शेवटचा थेंब सांडेपावेतों ती मंडळी लढत उभी असलेलीच आढळली असती. त्या मंडळीला ताबडतोब सुरक्षितपणें उपचारासाठीं वजीरगडावर पाठविण्याची व्यवस्था झाली. गंगाजी नाईक, मुरारी नाईक वगैरे बरीच खाशी मंडळी जी प्रथमपासून किल्ल्यांत राहून कारस्थानें करण्यांत गढून गेली होती, त्या मंडळीचाही पत्ता नव्हता; त्याप्रमाणेंच अशा खडाजंगींत किल्ल्यावर भगवा झेंडा फडकविणारा वीर कोण याचाही कांहीं पत्ता लागेना; मराठयांची निःसीम उपकारकर्ती मेरी व जोसेफ हीं तेजस्वी बहीणभावंडें व मंडपेश्वरच्या लढाईचा धैर्यशाली नायक भैरव ही मंडळीही कोठें दिसेना. ह्या सर्व मंडळींविषयीं चिमाजीअप्पांनाच काय, पण मराठमंडळांतील सर्वांना पराकाष्ठेची आस्था वाटत होती, व ती सर्व मंडळी फिरंग्यांच्या डोळ्यांत शल्यासारखी बोंचणारी असल्यानें त्यांच्या जीविताबद्दल सर्वांना दारुण चिंता वाटूं लागली होती. भैरव हा दुल्लभजी मोऱ्यांचा स्नेही व गंगाजी नाईक हे बुबाजीचे वडील बंधु, शिवाय ह्या रणसंग्रामांचे खरे स्फूर्तिदायकही नाईकच ! तेव्हां त्या मंडळींचा तपास करण्यासाठीं खंडोजी माणकर, दुल्लभजी मोरे व बुबाजी नाईक आपल्या सर्व यातना गिळून किल्ल्यांत शिरले. आतां लढाई थांबल्यामुळे फिरंग्यांकडून त्यांना किल्ल्यांत कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध होणें शक्य नव्हतें हे जरी खरें, तरी न जाणो, त्यांनीं मरतां मरतां विश्वासघात करण्याचें मनांत आणल्यास त्यांचें घ्या काय !— असा दूरदर्शीपणाचा विचार करून नारो शंकरानें चिमाजीअप्पांना सुचविलें, "श्रीमंत ! आमच्या व आमचे जे लोक किल्ल्यांत असतील त्यांच्या सुरक्षितपणाबद्दल हमी म्हणून आपण सेनापतीला आपल्या पदरीं ओलीस ठेवावें असें मला वाटतें."

सेनापति पेरीरा जरी शरण आला होता, तरी चिमाजीअप्पांनीं त्याचा दर्जा ओळखून त्याचा एका शब्दानेंही अपमान केला नव्हता. त्यामुळे त्यांना नारो शंकराच्या सूचनेप्रमाणे वागण्याचें धैर्य होईना. पण सर्वस्वीं फिरंग्यांवर विश्वासून राहणेंही त्यांना हिताचें वाटेना. अखेर त्यांनीं एक तोड काढली. उभय पक्षांच्या सलोख्याची बैठक रात्रौं व्हावयाची असें पूर्वी ठरलें होतें, ती बैठक लौकर भरविण्याचें निमित्त करून चिमाजीअप्पांनीं सेनापति पेरीरा व त्याच्या हाताखालील आणखी दोन प्रमुख अधिकारी यांना आपणासमक्ष बोलावून किल्ल्यांतील मराठे

लोकांच्या जीविताच्या सुरक्षितपणाबद्दल त्यांच्याकडून हमी घेतली व सलोख्या-ची वाटाघाट तांतडीनें करण्याच्या सबबीवर त्या तिघांनाही आपणाबरोबर वजीरगडावर बोलावून घेतलें. सेनापति पेरीराला मराठ्यांचा हा डाव कळला नाहीं; पण त्यानें आपला पडता काळ ओळखून कांहीं कुरकूर न करितां निमूटपणें चिमाजीअप्पांमागोमाग वजीरगडचा रस्ता धरिला. इतकी सर्व बाजूंनीं गळेचेंपी झाल्यावर फिरंग्यांची किल्ल्यावर गडबड करण्याची काय छाती !

  

तिकडे चिमाजीअप्पा वगैरे मराठमंडळांतील खाशी मंडळी वजीरगडावर फिरंग्यांशीं सलोख्याची वाटाघाट करण्यांत गढून गेली असतां दुल्लभजी मोरे, खंडोजी माणकर, बुबाजी नाईक, नारो शंकर वगैरे मंडळी किल्ल्यांत स्वकीयांचा शोध करण्यांत गढून गेली होती. त्या शोधांत त्यांना गंगाजी नाईक वगैरे कांहीं मंडळी वेषांतरानें बऱ्याच दिवसांपासून किल्ल्यांत वावरत होती ती भेटली. त्या मंडळीकडून एवढें कळलें कीं, किल्ल्यांतील निशाण बुरुजावर भगवा झेंडा रोंवणारा बहाद्दर वीर जखमी झालेल्या स्थितींत कोणा एका तरुण बैरागिणीबरोबर बाहेर गेला. आतां ओघानेंच प्रश्न उत्पन्न झाला कीं, ही बैरागीण कोण ? इथें पुन्हा कांहीं दगलबाजी तर नसेल ? आणखी थोडा तपास करतां असें कळून आलें कीं, ती बैरागिणीच्या वेषांत वावरणारी तरुण स्त्री सरदार अँन्टोनिओची बायको गजरा होती. ती गजरा होती असें कळतांच मात्र गंगाजी नाईक, दुल्लभजी मोरे, खंडोजी माणकर वगैरे सर्व मंडळीला भैरवाच्या जीविताविषयीं फार काळजी वाटूं लागली. त्यांना गजरा व्यक्तिशः कोणत्या वृत्तीची आहे हें जरी माहीत नव्हतें, तरी ती अँन्टोनिओची बायको आहे व ज्या अर्थी ती बैरागिणीच्या वेषांत वावरत आहे. त्या अर्थीं ती शत्रूची हेरगिरीच करीत असली पाहिजे; तिचा नवरा मुख्यतः भैरवाच्या बाबतींतच मराठ्यांचा खडा हाडवैरी बनला व तुरुंगांत डाम्बला गेला, त्याचा भैरवावर सूड उगविण्यासाठींच तिनें हें कांहीं तरी कारस्थान रचिलें असेल.

पण बुबाजी नाइकाचें मत गजरेच्या बाबतींत भिन्न पडलें. तो म्हणाला, "जर मला माहीत असलेली बैरागीण तीच ही असेल, तर ती भैरवाशीं शत्रुत्व करील असें मला वाटत नाहीं. कारण मीं सोपाऱ्याला पाहिलें, त्या बैरागिणी-मुळेंच भैरवाचें रक्षण झालें."

" पण तिनें आपले नांवगांव काय सांगितलें ? " खंडोजी माणकरानें विचारलें.

बुवाजी नाईक म्हणाला, " त्याविषयीं ती मनमोकळेपणानें कांहींच बोलली नाहीं. पण 'आपल्या पतीनें देशद्रोहाचें महत्पाप जें जोडलें, त्या पापाचें यथाशक्ति क्षालन व्हावें म्हणून मी झटत आहें' असें मात्र ती तेव्हां म्हणाली. ती भैरवाला आपला पाठीराखा भाऊ मानून त्याची शुश्रूषा करीत असे व ती भैरव आणि जोसेफ यांच्या संमतीनें फूल ना फुलाची पाकळी जी काय देशसेवा हातून होईल ती करण्यासाठीं जोसेफबरोबरच किल्ल्यांत आली होती."

त्या मंडळीचें पूर्वोक्त संभाषण किल्ल्यावरील भव्य ख्रिस्ती प्रार्थनामंदिराच्या दाराशीं हमरस्त्यांत चाललें होतें. या वेळीं सूर्य अस्ताला जाऊन नुक्ताच काळोख —नव्हे, ती शुक्लपक्षांतील आरंभींची रात्र असल्यामुळें चांदणें पडूं लागलें होतें. त्या चांदण्याच्या प्रकाशांत प्रार्थनामंदिराच्या अर्धवट उघड्या महाद्वारापाशीं कोणाचीशी चाहूल लागली, म्हणून गंगाजी नाइकानें दरडावून विचारलें, " कोण आहे ? "

पण उत्तर कांहीं मिळालें नाहीं. त्यामुळें सर्व मंडळीला संशय येऊन ते सर्वजण आपापलीं शस्त्रें सांवरून मंदिरांत घुसण्यासाठीं मंदिराच्या पायऱ्या चढूं लागले; तों आंतून एक तरुण स्त्री घाबऱ्याघुबऱ्या बाहेर येऊन गंगाजी नाइकाच्या पायां पडून उद्गारली, " तुम्ही मला जीवदान द्याल, तर तुमच्या फायद्याच्या बऱ्याच गोष्टी मी तुम्हांला सांगूं शकेन. मी पाहिजे तर तुमच्यापैकीं कोणाचीही दासी म्हणून देखील रहावयाला तयार आहें; पण मला मारूं नका."

" तूं कोण ? " दुर्लभजी मोऱ्यानें विचारलें.

" मी सोफियाबाईची दासी. ॲनी माझें नांव."

" मग तूं एकटीच इकडे कुठें भटकते आहेस ? तुझी धनीण कुठें आहे ? "

" तुम्ही मला अभय देत असाल तर मी सर्व कांहीं सांगतें. माझ्या धनिणीची माहिती सांगतें, फादर पोर्टोचा पत्ता सांगतें, फार काय तुम्ही ज्यांचा शोध करीत आहां, त्यांचा देखील पत्ता मला माहीत आहे; पण मला अगोदर अभय पाहिजे. मी फिरंग्यांची दासी म्हणून मराठे शिपाई मला पकडून ठार करण्यासाठीं माझ्या पाळतीवर आहेत."

इतक्यांत प्रार्थनामंदिराच्या मागून 'पकडा, पकडा त्या हरामजादीला ! सकाळपासून पळते आहे !' असे उद्गार ऐकूं आले. त्या सरशीं ॲनी गंगाजी व

दुल्लभजी यांच्या पायांवर लोटांगण घालून जास्तच काकुळतीच्या स्वरानें जीवदान मागूं लागली.

तोंच चार सशस्त्र मराठे शिपाई तेथे येऊन पोंचले. गंगाजीनें त्या शिपायांना तेव्हांच ओळखलें. गंगाजी वगैर मंडळीनें किल्ल्यांत गुप्त कारस्थानें करून शत्रूची सर्वतोपरी नासाडी करण्यासाठीं जी मंडळी निरनिराळ्या वेषांत कामाला लावली होती, आणि आज सकाळीं धर्मसंग्राम आटोपल्यावर गंगाजीच्याच आज्ञेनें जे लोक किल्ल्यांतील नष्ट फिरंग्यांना पकडण्यांत किंवा ठार करण्यांत गढून गेले होते, त्यांपैकींच ते चार लोक होते. गंगाजी हळूच दुल्लभजीला म्हणाले, "हे तर आपलेच लोक आहेत."

"त्यांना जरा आंवरतें घ्यावयाला सांगा." दुल्लभजी म्हणाला, "ह्या पोरी पासून आपणाला बरीच महत्त्वाची माहिती मिळण्याजोगी आहे. शिवाय ती बाटगी असली तरी हिंदु आहे."

"मी हिंदु आहें हो, मी हिंदु आहें. मी तुमची बहीण आहें!—मी तुमची लेंक आहें! तुमच्याखेरीज मला कोण वांचविणार!" ॲनी दुल्लभजी व गंगाजी यांच्या पायां पडून उद्गारली.

गंगाजीनें आपल्या लोकांना हात आंवरता घ्यावयाला सांगितल्यामुळें ॲनी-च्या जिवावरचा प्रसंग टळला; त्यामुळें ॲनीला पुष्कळच धीर आला. गंगाजीनें तिला विचारलें, "तुझी धनीण व तो तिचा हरामखोर प्रियकर कुठें आहे?"

"माझी धनीण चुळण्याला आहे; आणि फादर पोटोंही आजच मेरीबरोबर चुळण्याला गेले आहेत."

"काय? मेरीबरोबर?" दुल्लभजीनें आश्चर्यचकित होऊन विचारलें, "मेरी इतके दिवस बेपत्ता झाली होती, ती पुन्हा इकडे कुठें उमटली?"

"मेरी बेपत्ता झाली नव्हती; मेरी तुमच्याबरोबरच होती. ती पुरुषवेष घेऊन जोसेफ बनून तुमच्यांत वावरत होती. आतां सर्वच गोष्टींचा निकाल लागला, तेव्हां खरें बोलायला हरकत नाहीं; मेरी फिरंग्यांच्या गुप्त हेरांपैकीं एक होती. सोफियाबाई व फादर पोटों यांच्या सांगण्यावरून तिनें मराठ्यांच्या गोटांतील गुप्त बितंबातम्या काढून आणून फिरंग्यांना कळविण्याचा क्रम आजवर अव्याहत सुरू ठेविला होता. आणि फादर पोटोंच्या पाठीवर तुमचे इतके लोक असतां

त्या सर्वांच्या डोळ्यांत धूळ फेंकून फादर पोर्टोला सुरक्षितपणें येथून तुम्हां सर्वांच्या दृष्टीआड चुळण्याला घेऊन जाणारी तीच."

"बरें; भैरवाविषयीं तुला कांहीं माहिती आहे का ?" दुल्लभजीनें विचारलें. पण थोड्या वेळापूर्वी भैरवाविषयीं जी माहिती त्यांना मिळाली होती, त्याहून नवीन अशी कांहींच माहिती ॲनीपासून मिळाली नाहीं. तरीही ॲनीनें त्याही बाबतींत मखलाशी करण्याला कमी केलें नाहीं. मेरीच्या कारस्थानाला भैरव पूर्णपणें बळी पडला आहे व त्याला पकडून फादर पोर्टोंच्या स्वाधीन करण्याचा मेरीचा इरादा आहे, असें सांगावयाला तिनें कमी केलें नाहीं. ती आणखी असेंही म्हणाली, "तुम्ही जर जलदी कराल, तर तुम्हांला ही सर्व मंडळी चुळण्याला नक्की सांपडेल."

"पण मेरी चुळण्यालाच गेली असेल कशावरून ?"

"कशावरून म्हणजे ? सोफियाबाई चुळण्याला आहेत ही खबर मींच तिला व फादर पोर्टोंना दिली."

"बरें; तूं तुझ्या धनिणीला सोडून इकडे कशाला आलीस ?"

"मंडपेश्वरच्या प्रळयांत जो आमच्या वांट्याला अज्ञातवास आला आहे, तो अजून कायम आहे. तेथून आम्ही बचावलों म्हणजे काय, प्रभूची कृपा व आमच्या आयुष्याची दोरी खबरदार, म्हणून सारें जमलें. सोफिया ही फादर पोर्टोंची प्रियतमा म्हणून सर्वांच्या डोळ्यांत कशी सलत आहे हें तुम्हांला माहीत आहेच. आम्हांला पकडून ठार करण्यासाठीं लोक एकसारखे डोळ्यांत तेल घालून टपलेले आहेत. इतक्या लोकांच्या काकदृष्टींतून बचावण्यासाठीं मी व सोफियाबाई अशा दोघीही भिकाऱ्यांच्या तांड्यांतून आज इतके दिवस वण वण करीत हिंडत आहों. आमचा विचार फादर पोर्टोंचा तपास करून त्यांच्याकडे जाण्याचा होता; पण बरेच दिवस फादर पोर्टोंचा शोधच लागेना. अखेर एकदांचा शोध लागला कीं, फादर पोर्टो येथें सुखरूप आहेत; तेव्हां त्यांना भेटून आपल्या बचावाची कांहीं तरतूद करावयाला सांगण्यासाठीं सोफियाबाईनीं मला इकडे पाठविलें. त्या स्वतः-देखील आल्या असत्या; पण त्यांना येथें येण्याला सरकारची बंदी आहे. म्हणून त्यांना मी वाटेंतच चुळण्याच्या वेशीवरच्या एका पडक्या देवालयांत ठेवून फादर पोर्टोंना भेटण्यासाठीं इकडे आलें."

"मग तूंही फादर पोर्टोबरोबर कां गेली नाहींस ?"

" मी गेलें नाहीं; कारण येथें येतांनाच मला कोण त्रास पडला. मी जोसेफची बहीण आहें असें खोटेंच सांगून कसाबसा आंत प्रवेश मिळविला. पण इथल्या लोकांनीं मला ओळखलें, व माझ्या प्राणावरच गदा आणण्याचा विचार केला. फादर पोर्टोविषयीं सर्व लोक किती खवळले आहेत हें मी प्रत्यक्ष पहातें आहें. त्याच्याबरोबर मी बाहेर गेलें असतें तर त्याच्याबरोबर माझीही खोड मोडायला लोकांनीं कमी केलें नसतें. आणखी असें कीं, आतां फादर पोर्टोकडे किंवा सोफियाबाईकडे जाण्यांत काय फायदा ? त्यांच्याच जीविताची जिथें शाश्वती नाहीं, तिथें मला कोण विचारणार ? "

ॲनीच्या निवेदनानें अनेक तर्ककुतर्क त्या मंडळीच्या मनांत घोळूं लागले. त्यांत कांहीं वितर्कही होते व कुतर्कही होते. जोसेफ व मेरी हीं एकच आहेत असें ॲनीनें सांगितलें, तेव्हां दुल्लभजीला स्वाभाविकपणेंच जोसेफच्या अर्नाळ्यावरील भाषणाची आठवण झाली. दुल्लभजीनें नकळत केलेल्या आगळिकीबद्दल जोसेफनें जो सात्विक संताप प्रगट केला होता, तो त्याला आतां आठवला. मात्र आपणां मराठ्यांना फसविण्यासाठीं तिनें वेषांतर केलें असें जें ॲनीचें म्हणणें, तें दुल्लभजीला संभवनीय वाटलें नाहीं. बुबाजीचेंही मत दुल्लभजीप्रमाणेंच होतें. इतकेंच काय; पण बुबाजीच्या तर्कानें याच्याही पुढचा एक टप्पा गांठला होता. सोपाऱ्याला भैरव आजारी असतां त्याच्या रक्षणासाठीं रामानंद गेले तेव्हां त्यांच्याबरोबर बुबाजीही होता. तेव्हां जोसेफचें भैरवाशीं वागणें अत्यंत प्रेमळपणाचें असलेलें बुबाजीनें पाहिलें होतें. भैरवानें वारंवार मेरीची चौकशी करतांना ऐकलें होतें; इतकेंच काय, पण एकदां ती भैरवाची रक्षणकर्ती तरुण बैरागीण, भैरव, जोसेफ व बुबाजी हीं चौघेजणें एकत्र असतां मेरी व भैरव यांच्या लग्नाचीही गोष्ट निघाली होती. भैरव बारंवार मेरीची चौकशी करूं लागलेला पाहून त्या बैठकींत 'तुम्ही मेरीशीं लग्न करावयाला तयार आहां का' असें जोसेफनें मध्येंच हंसत हंसत भैरवाला विचारलें होतें व भैरवानें तेव्हां 'देवीची इच्छा असेल तर तसेंही होईल' असें उत्तर दिलें होतें. त्यापूर्वी मेरी मंडपेश्वरीं मराठ्यांच्या गोटांत येत असे तेव्हांदेखील त्या दोघांचें परस्परांशीं वर्तन अत्यंत प्रेमळपणाचें असे, हें बुबाजीनें पाहिलें होतें; तेव्हांच त्याला 'ह्या दोघांचें एकमेकांवरील प्रेम विवाहविषयक असलें पाहिजे' असा संशय आला होता. त्याला जोड सोपारा येथील त्या दोघांच्या संभाषणाची मिळाली होती. सोपाऱ्याच्या त्याच बैठकींत 'जो कोणी

वीर पुरुष प्रस्तुतच्या धर्मसंग्रामांत आपल्या पराक्रमाची शिकस्त करून दाखवील त्याला वरण्याचा मेरीचा संकल्प आहे. नाहींपेक्षां ती आजन्म अविवाहितच राहील' असें जोसेफ हंसत हंसत बोलून गेला होता. ह्या सर्व गोष्टी बुबाजीला एकसमयावच्छेदेंकरून आतां ॲनीच्या निवेदनावरून आठवल्या त्या त्यानें खंडोजी, गंगाजी व दुल्लभजी यांच्याशीं बोलूनही दाखविल्या.

" तर मग मला वाटतें, भैरवानें सिल्व्हेराचें शीर कापून आणून श्रीमंतांच्या चरणीं अर्पण केलें, पुन्हा किल्ल्यावर भगवा झेंडा फडकवून आपल्या शौर्याची शिकस्त केली, ती सारी मेरीच्या आराधनेसाठीं तर नसेल ? " खंडोजी माणकर म्हणाला.

" असेल, तसेंच असावें असें मलाही वाटतें." बुबाजी नाईक म्हणाला.

मेरी व भैरव यांचें लग्न झालें असतें, तर त्यांत ॲनीच्या पदरचे चार चवल वेंचणार होते अशांतला अर्थ नाहीं; पण तरीही मेरीच्या भावी संसाराविषयीं ती मंडळी इतक्या आस्थेनें बोलूं लागली व त्यांची स्तुति करूं लागली, तें ॲनीला सहन होईना. इतका वेळ आपण मेरीविषयीं मंडळीचें मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला तो वाया गेला असें पाहून ॲनी जरा स्वतःशींच विचार करून कोणाला न कळत किंचित् ओंठ चावून म्हणाली, " खरेंच; एक गोष्ट सांगायची राहिली. मेरी सरदार ॲन्टोनिओची मेहुणी आहे, हें मला मेरीच्याच तोंडून आज कळलें. आणि भैरव तर ॲटोनिओचा हाडवैरी, तेव्हां अर्थात् तो मेरीचाही हाडवैरीच. अशा हाडवैऱ्याशीं मेरी कसा काय संसार थाटते, पहावें."

" काय ! गजरा व मेरी ह्या बहिणी बहिणी आहेत ? " खंडोजी माणकरानें विस्मयपूर्वक प्रश्न केला. " हें शक्यच नाहीं. गजरेला बहीणच नाहीं. ती आपल्या आईची एकुलती एक मुलगी होती हें मला माहीत आहे."

" कशावरून ? " बुबाजी नाइकानें विचारलें.

" कशावरून म्हणजे ? गजरा माझी सावत्र बहीण आहे." खंडोजी उत्तरला.

" असें ? मग ती ॲन्टोनिओसारख्या पाजी माणसाच्या गळ्यांत कशी पडली बरें ? " दुल्लभजी म्हणाला, " बाकी, तसें असेल असा मलाही आतां संशय येतो."

" कसला संशय येतो ? गजरा व मेरी बहिणी बहिणी असतील असा ? " खंडोजीनें विचारलें.

"होय." बुबाजी अंमळ डोकें खाजवून आठवण करून म्हणाला, "खंडोजी ! थोड्या दिवसांपूर्वी अर्नाळ्यावर आपण सर्वजण श्रीमंत पेशव्यांच्या बैठकींत भावी परिस्थितीचा विचार करीत बसलों असतांना तूं तुझ्या पित्याला फादर पोर्टोनें ठाण्याच्या बुरुजांत चिणून कसें ठार मारलें व तुझी बहीण कशी बेपत्ता झाली, तो वृत्तान्त सांगितल्याचें मला आठवतें. ती तुझी बहीण म्हणजेच मेरी असा तर प्रकार नसेल ? कारण, मेरीनें मंडपेश्वरीं आपली कर्मकथा आम्हांला अर्धवट निवेदन केली होती, त्यावरून तिच्या बापालाही फादर पोर्टोनें भिंतींत चिणून ठार मारलें असल्याचें व त्याचा सूड घेण्यासाठींच आपण डोळ्यांत तेल घालून जपत असल्याचें तिनें सांगितलें होतें. आणि आतां त्या गोष्टी एकामागून एक पटत चालल्या याचें कारण, ती तरुण बैरागीण आम्हांला सोपाऱ्याला भेटली, तेव्हां तिनें तुझी फारच कळकळीनें चौकशी केली होती."

खंडोजी माणकर हा सारा वृत्तान्त ऐकून अगदीं भांबावून गेला. मेरीची कुळकथा तो आज प्रथमच ऐकत होता, व ती त्याच्या बहिणीच्या कुळकथेशीं तंतोतंत जुळत होती. ॲन्टोनिओची बायको म्हणजेच बैरागीण हें खरें असल्यास ती आपली बहीण गजराच असली पाहिजे याविषयींही खंडोजीला तिळप्राय शंका नव्हती; पण ह्या सर्व गूढाचा उलगडा भैरव, मेरी वगैरे मंडळींची समक्ष भेट झाल्याशिवाय होणें शक्य नव्हतें. खंडोजी यावर जास्त कांहीं न बोलतां बुबाजीला म्हणाला, "चला; आपण असेच्या असेच चुळण्याला जाऊं. म्हणजे एकंदर खरा प्रकार आपणांला कळेल." तो गंगाजी नाइकाकडे वळून म्हणाला, "नाईक ! तुम्ही इतक्या दूर यावयाचें कारण नाहीं. गडावर श्रीमंत वगैरे सर्व मंडळी आमची वाट पहात असतील, आपण गडावर जाऊन हा सर्व प्रकार मंडळीला सांगा. आम्ही रातोरात येतों."

"पण मी मात्र तुमच्याबरोबर येणार. मला माझ्या मैत्रिणीपासून दूर राह्यचें नाहीं." ॲनी म्हणाली. इतका वेळ ॲनीच्या बोलण्याचा जो रोंख होता, तो आतां अजिबात बदलला होता; इतका वेळ ती मेरीला खड्ड्यांत लोटण्यासाठीं बोलत होती. पण आतां मेरीला चांगले दिवस येणार; तिचें शासन होणें शक्य नाहीं व आपण तिचा दुष्टावा केल्याबद्दल आपणावर मात्र एखादी नसती घोरपड येण्याचा संभव, त्यापेक्षां आरंभापासूनच आपण मेरीच्याच कृपाछत्राखालीं रहावें

हें बरें; असा विचार तिनें केला. एरव्हीं तरी ॲनीनें आजवर मेरीशीं उघड उघड दावेदारी अशी कधीं मांडली नव्हतीच!"

असो. याप्रमाणें विचार ठरून ती मंडळी मार्गाला लागणार, तोंच भैरव, मेरी व ती तरुण बैरागीण हीं तिघेंही तेथें दत्त करून हजर! त्या बैरागिणीनें तेथें येतांच खंडोजीला हांक मारली, "दादा!"

तोंच मेरीनें पुढें होऊन तिच्या तोंडावर हात ठेवून म्हटलें, "अक्का! तूं इतकी उतावीळ कशी? आपण प्रथम आपली ओळख द्यायची ती आपल्या कार-स्थानाच्या सांगतेची व मग नात्याची ओळख द्यायची!"

मेरीनें जरी आपल्या 'अक्का'चें तोंड दाबलें, तरी तेवढ्या तुटपुंज्या शब्दांवरून सर्व मंडळीला कळून चुकलें कीं, आपले सर्व तर्क खरे ठरले!

# उपसंहार

मराठ्यांना वसईच्या धर्मसंग्रामांत लाभलेला निर्विवाद विजय, फिरंग्यांची सर्वच बाजूंनीं हलाखीची दशा, त्या दशेच्या जोडीला फिरंग्यांचीं कैक शतकांचीं महत्पापें, यांची परस्पर तुलना करतां व हिंदुस्थानच्या हिताहिता-विषयीं पूर्ण बेफिकीर असलेल्या परक्या इतिहासलेखकांनीं देखील मराठ्यांना सबंध मराठशाहींतील–शिवशाहींतील व पेशवाईंतील–संस्मरणीय विजयांत वसई एथील विजयाला सर्व दृष्टींनीं अद्वितीय ठरवून अग्रपूजेचा मान दिला आहे तो विचारांत घेतां चिमाजीअप्पांनीं सेनापति पेरीराशीं जो सलोख्याचा तह केला, त्या तहांतील मराठ्यांच्या सौजन्याला जगाच्या इतिहासांत तुलना नाहीं. जितक्या म्हणून सवलती फिरंग्यांनीं मागितल्या, तितक्या सर्व चिमाजीअप्पांनीं त्यांना उदार मनानें दिल्या व वर आणखी त्याप्रमाणें वसईंतून तोंड काळें करून जाण्यासाठीं फिरंग्यांना आठ दिवसांचा अवसरही दिला.§

---

§ ता. ५।५।१७३९ रोजीं चिमाजीअप्पा व सेनापति पेरीरा यांच्यांत म्हणजे मराठे व पोर्तुगीज यांच्यामध्यें जो तह झाला, त्यांतील बारा शर्ती पुढीलप्रमाणें— (१) पोर्तुगीज फौज व बुणगें यांना मराठ्यांनीं सर्व हत्यारांसह बँड वाजवीत व निशाण उभारून सुरक्षितपणें किल्ल्याबाहेर जाऊं द्यावें. (२) वसई येथें रहात असलेलीं ख्रिस्ती, हिंदी किंवा मुसलमानी कुटुंबें किंवा लोक वसई सोडून जाऊं इच्छितील, तर त्या सर्वांना त्यांच्या मालमत्तेसह मराठ्यांनीं जाऊं द्यावें. (३) वसईच्या बंदरांत पोर्तुगीजांचीं जहाजें असतील त्यांसही आपला दारूगोळा व तोफखाना घेऊन सुरक्षितपणें बंदरांतून जाऊं द्यावें. (४) कलम २ प्रमाणें लोकांना निघून जाण्यासाठीं गलबतांची वगैरे गरज लागल्यास तीं गलबतें मराठ्यांनीं पुरवावीं; आणि ते लोक आपल्या स्थळीं जाऊन पोंचेतों रस्त्यांत त्यांना आंग्रे वगैरे कोणाकडून त्रास न होईल अशी तजवीज व्हावी. (५) ख्रिस्ती पाद्र्यांनाही आपली मालमत्ता घेऊन सुरक्षित जाऊं द्यावें. (६) पोर्तुगीज लोकांचा दारूगोळा, दाणागोटा वगैरे जो वसईंत आहे तो सर्व बरोबर घेऊन जाण्याची त्यांना मोकळीक असावी. (हें कलम मात्र चिमाजीअप्पांनीं मानलें नाहीं. त्यांनीं पोर्तुगीजांचें तें सर्व सामान स्वतः विकत घेतलें.) (७) जे ख्रिस्ती लोक आपखुषीनें

ह्या धर्मसंग्रामांत मराठयांचा जो विजय झाला, त्याची फलश्रुति कांहीं सामान्य नाहीं. पोर्तुगीजांचा सुमारें पाऊणशें मैल लांबीचा प्रदेश ह्या संग्रामांत मराठयांना मिळाला. ह्या टापूंत एकंदर तीनशें चाळीस गांवें होतीं. शिवाय आठ मोठीं शहरें, वीस किल्ले, दोन मजबूत तटबंदीचे डोंगर आणि वसई व ठाणें अशीं दोन मोठीं ठिकाणें इतका स्थावर अर्थ-लाभ मराठयांना झाला. धनधान्य तर मराठयांना अमूप मिळालें. शत्रूचा पंचवीस लाख रुपयांचा दारूगोळा व जहाजें वगैरे सामान, लहानमोठ्या सुमारें सहाशें तोफा वगैरे वाया जाऊन वर तेवीस लाख रुपये युद्धखर्चाप्रीत्यर्थ त्यांना पाण्यांत व आगींत ओतावे लागले! ह्या पंचाहत्तर मैल लांबीच्या प्रदेशांत साष्टी बेट तर केवळ सोन्याची लंका होती. त्या बेटांत धान्याची व मिठाची निपज फार मोठी होते. व अनेक मोठमोठया खाड्यांच्या योगानें जहाजांची वाहतूक फार फार सुलभ झाल्यामुळें त्या भागांतील देशसंरक्षण थोड्या खर्चांत तडीला जाऊन व्यापारही गडगंज चाले. असें घबाड त्या वसई-साष्टी भागांत होतें, म्हणूनच नेहमीं त्या बेटावर ज्याचा त्याचा डोळा असावयाचा! तो मुलुख पोर्तुगीजांच्या दास्यांतून सोडवून मराठयांनीं आपल्या ताब्यांत घेतला, तरी त्यापूर्वीपासून व त्या वेळींही काकदृष्टि मुंबईकर इंग्रजांचा त्यावर डोळा होताच; व तो डोळा ढळूं न देतां इंग्रजांनीं तो प्रांत घशांत पडेपावेतों अव्याहत खटपट चालविली.

---

वसईच्या हद्दींत राहतील त्यांच्या धर्माचरणाला मराठ्यांनीं अडथळा करूं नये किंवा त्यांच्या जिंदगीचा अपहार करूं नये. हें कलम मुसलमान व हिंदु यांनाही लागू असावें. (८) एकमेकांनीं पकडलेले कैदी ज्यांचे त्यांना परत करावे. (९) किल्ला खालीं करून निघून जातेवेळीं पोर्तुगीजांना कोणत्याही प्रकारचा त्रास होऊं नये म्हणून चिमाजीअप्पांनीं आपली फौज दूर मद्रापुराला न्यावी व पोर्तुगीज लोक जहाजांत बसून तोफेच्या टप्प्याच्या बाहेर जाईतों मराठी फौजेनें किल्ल्यांत प्रवेश करूं नये. (१०) वसईंतील कोणताही माल किंवा सामान योग्य किंमत दिल्याशिवाय मराठ्यांनीं नेऊं नये. (११) वसई शहरांत तीन ख्रिस्ती देवळें आहेत तीं तशींच राहूं द्यावीं. त्यांतील मूर्तींना व डागदागिन्यांना मराठयांनीं हात लावूं नये. (१२) या तहावर सही झाल्यानंतर त्याप्रमाणें पोर्तुगीजांकडून वर्तन होण्या-साठीं पोर्तुगीजांचा एक अंमलदार मराठयांच्या ताब्यांत असावा व मराठयांचा एक अंमलदार पोर्तुगीजांच्या जहाजावर असावा.

इंग्रजांचें वर्तन वसईच्या धर्मसंग्रामाच्या वेळीं कसें धरसोडीचें व आपमतलबाचें होतें याची ओझरती ओळख ह्या कथानकांत पूर्वी करून देण्यांत आलीच आहे; तेंच त्यांचें वर्तन पुढेंही सुरू राहिलें. अंताजीपंत कावळ्यांसारख्या मुरब्बी माहीतगाराला चिमाजीअप्पांनीं इंग्रजांवर पहारेकरी नेमल्यामुळें ऐन खडाजंगींत इंग्रज कांहीं लांडे कारभार करूं शकले नाहींत, तरी त्या धर्मसंग्रामांत मराठ्यांना विजयश्रीनें वरिलें असें कळतांच मराठ्यांच्या मनांत आपणांविषयीं जें काय किल्मिष उत्पन्न झालें असेल, तें वेळींच दूर करून आपला बचाव करण्यासाठीं तोंडपुजेपणाचे उपद्व्याप सुरू करण्यांत इंग्रजांनीं मुळींच दिरंगाई केली नाहीं.*

* वसईला चिमाजीअप्पांची सरशी होत असलेली पाहून मुंबईकर इंग्रजांचें धाबें आधींच दणाणलें होतें. आपण मराठ्यांविरुद्ध पोर्तुगीजांना मदत करतों हें मराठ्यांना माहीत झाल्यामुळें ते आपणावर पुढेंमागें सूड घेण्याला कमी करणार नाहींत असें भय इंग्रजांना वाटत होतें. वसईच्या संग्रामांत अखेर मराठे विजयी होणार हें हेरून इंग्रजांनीं आधींपासूनच मराठ्यांशीं लाडीगोडीच्या गोष्टी सुरू केल्या होत्या. त्यांनीं चिमाजीअप्पांकडे कॅप्टन इंचबर्ड याला वकील म्हणून पाठवून दोस्ती करण्याचें पूर्वींच ठरविलें होतें. त्याप्रमाणें वसईच्या संग्रामाचा निकाल लागतांच इंचबर्डसाहेब वसईला चिमाजीअप्पांकडे येऊन थडकला व त्यानें चिमाजीअप्पांपाशीं कावेबाजपणानें दोस्तीसंबंधीं बरीच वाटाघाट केली. चिमाजीअप्पानें इंचबर्डसाहेबाची इंग्रजांच्या लुच्चेगिरीच्या व दुटप्पीपणाच्या वर्तनाबद्दल खूप हजेरी घेतली; तें सर्व इंचबर्डसाहेबानें कोडगेपणानें मुकाटपणें सहन केलें. अखेर उभयपक्षीं तहाचा पंधरा कलमी मसुदाही तयार झाला; पण त्याचें पुढें काय झालें तें इतिहासांत नमूद नाहीं. कदाचित् चिमाजीअप्पा 'शेराला सव्वाशेर व चोरावर मोर' शोभणारे असल्यामुळें त्यांच्यापाशीं इंग्रजांची कांहीं डाळ शिजली नसेल. इंग्रजांकडून कॅप्टन गॉर्डन या नांवाचा दुसरा एक वकील वसईचा किल्ला पूर्णपणें मराठ्यांच्या हातीं आला त्याच दिवशीं ता. १२-५-१७३९ रोजीं सातार्‍यास शाहूमहाराजांकडे अशाच प्रकारची मायावी शिष्टाई करण्यासाठीं गेला होता; पण तेथेंही त्याचा फारसा जम बसूं शकला नाहीं. पण ह्या गॉर्डनसाहेबानें त्या वेळीं शाहूमहाराजांच्या कारभारी मंडळांतील चुरशीचा व दरबारांतील इतर धडामोडींचा अचूक तलास लावण्याचें छिद्रान्वेषी कार्य जें केलें तें इतिहासांत नमूद आहे. त्यावरून इंग्रजांच्या तद्विषयक कावेबाजपणावर चांगलाच प्रकाश पडतो.

त्या गोष्टी विस्तारशः सांगण्याचें हें स्थळ नव्हे. त्याविषयीं ओझरतें दिग्दर्शन पूर्वी कथानकांत करण्यांत आलेंच आहे; व पुढेंही ओघाओघानें ह्या सर्व गोष्टी प्रकाशांत यावयाच्या आहेत.

  

आतां, युद्ध म्हटलें कीं, त्यांत प्राणहानि व द्रव्यहानि होणार हें नव्यानें कोणीं सांगावयाला नकोच. तरीपण एकंदरींत फिरंग्यांचा जसा धुव्वा उडाला, तसा मराठ्यांचा उडाला नाहीं.* मराठ्यांकडील बरेच वीर जखमी झाले व त्यांत रामानंदांची जखम जरी विशेष चिंता करण्यासारखी होती, तरी ती संग्रामाचा गोड परिणाम रामानंदांच्या कानीं पडतांच अंतरींच्या आल्हादानें व समाधानानें अर्धी अधिक भरून आली, व कोणाला त्यांच्याविषयीं चिंता करण्याचें कारण उरलें नाहीं. इतर कांहीं अव्वलीचे मोहरे त्या रणक्षेत्रावर बळी पडले. त्यांत अग्रपूजेचा

* "वसईच्या वेढ्यांत मराठ्यांचें पांच हजार माणूस ठार व जाया झालें असें चिमाजीअप्पानें ब्रह्मेंद्रस्वामींस लिहिलेल्या पत्रांत नमूद आहे. ह्या सर्व वेढ्यांत फिरंग्यांचें आठशें माणूस ठार झालें अशी कितीएकांची समजूत आहे व मराठ्यांचें पांच हजार माणूस ठार झालें, त्याअर्थी पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांची रग चांगलीच जिरविली असें कित्येक लोक समाधान करून घेतात. परंतु हें समाधान केवळ भ्रामक आहे. खरा प्रकार असा होता कीं, शेवटचा सुरुंग उडून हल्ला केला त्या एकाच वेळीं फिरंग्यांचें आठशें माणूस ठार व जखमी झालें. 'पोर्तुगीज लोक शेवटच्या पराभवाचे वेळेच्या नुकसानीची गणती देतात' असें पोर्तुगीज रिपोर्टांवरून एक लिहितो. ६ फेब्रुवारीपासून ५ मेपर्यंत पोर्तुगीजांचे किती लोक ठार झाले याचा कोठें आंकडा पहाण्यांत आला नाहीं. परंतु एका शेवटच्या हल्ल्यांतच जर फिरंग्यांचे आठशें लोक मेले तर सबंध वेढ्यांत व मोहिमेंत किती गेले असतील याचा सामान्य अंदाज होण्यासारखा आहे. प्रो॰ फॉरेस्ट यांनीं छापिलेल्या पत्रांवरून वसईतील फिरंग्यांची काय गत झाली होती तें कळण्यासारखें आहे. दुर्दशेनें विपन्न झालेल्या लोकांस अंगावरील वस्त्रांसह चिमाजीअप्पानें जाऊं दिलें यावरून फिरंग्यांना व फिरंग्यांचा कड घेऊन बोलणारांना फुशारकी मारण्यास कितपत जागा राहते याचा उलगडा स्पष्ट शब्दांनीं करून दाखविला पाहिजे असें नाहीं."—(राजवाडे प्रस्तावना; खंड ३ रा).

मान मुरारी नाइकाचा ! सतत सुमारें अर्धशतक फिरंग्यांकडून झालेल्या अमानुष गांजणुकीनें हैराण झालेल्या गंगाजी नाईक वगैरे नाईकबंधूंवर तर वज्राघातच झाला. पण तो नाईकबंधूंनीं लोकोत्तर धैर्यानें सहन केला. मुरारीच्या निधनाची अनिष्ट वार्ता कानीं आली तेव्हां गंगाजी नाईक व चिमाजीअप्पा एका बैठकींत होते. ती दुष्ट वार्ता ऐकून चिमाजीअप्पांच्या नेत्रांत आंसवें उभीं राहिलीं. गंगाजी नाइकांनीं तीं आपल्या हातानें पुसून चिमाजीअप्पांचें सांतवन केलें, "श्रीमंत ! काय हें ! मुरारबा मेला म्हणून डोळ्यांत अश्रु ! मग मला सांगा, आज जवळ जवळ अर्धशतक फिरंग्यानें नंदाच्या गोकुळासारखा आमचा विशालवंश अमानुष अत्याचारांखालीं चेंचून केवळ नामशेष केला, त्याबद्दल आम्हीं किती रडत बसावें ! उलट मला मुरारबाच्या मरणामुळें एक प्रकारचें असें समाधान वाटतें कीं, जबरदस्त फिरंग्यांच्याविरुद्ध छातीठोकपणें उभा रहाणारा बच्चाही नाइकाचा, व कोणाही कल्पकाच्या कल्पनाशक्तीला गुंगवून सोडणारीं कारस्थानें रचून मराठयांना अपूर्व विजयाची जोड मिळवून देऊन वर स्वतःच्या प्राणाचें तुळशीपत्र अर्पण करणारा बच्चाही नाइकांचाच ! माझा मुरारबा मेला नाहीं, अजरामर झाला आणि त्याबद्दल शोक !"

स्थितप्रज्ञतेनें वरील उद्गार काढणाऱ्या प्रतिभीष्माचार्यानें खरोखरच चिमाजीअप्पांना लाजविलें. चिमाजीअप्पांनीं गंगाजीच्या पायांवर कृतज्ञतापूर्वक मस्तक नम्र करून कबुली दिली. "नाईक ! आम्ही सारे निमित्तमात्र; पण ह्या विजयाचें सारें श्रेय तुमच्या थोर वंशाकडेच आहे."

ॐ ॐ ॐ

चिमाजीअप्पांकडून कृतज्ञतापूर्वक चरणीं मस्तक नमवून घेण्याचा मान गंगाजी नाइकांबरोबरच अंताजीपंत कावळ्यांना मिळाला. कारण गंगाजी नाइकांच्या बरोबरीनेंच अंताजीपंतांचेही भगीरथ प्रयत्न ह्या परमयशाला प्रेरक असेच होते. या वेळची एक आश्चर्यातिरेकाची गोष्ट सांगावयाची म्हणजे रामानंदांची धार्मिक जागृति, वसई साष्टी प्रांतांतील सर्व हिंदूंच्या अंगीं हिंदुधर्माभिमानाचें नवचैतन्य सतत ओतीत होती, म्हणूनच सर्व हिंदुबांधव 'मारूं किंवा मरूं' अशा परमोज्ज्वल सद्भावनेनें मराठ्यांच्या भगव्या झेंडयाखालीं जमून धर्मसंग्राम लढले. रामानंदांच्या ह्या अमोल कामगिरीची जाणीव ठेवून सर्व खाशी मंडळी रामानंद रुग्णशायित असतां त्यांच्या चरणीं वंदन करूं लागली, तेव्हां रामानंदांनीं त्यांना तसें करूं न

देतां उलट चिमाजीअप्पा व अंताजीपंत यांना आपणच वंदन केलें! 'असें काय' म्हणून जेव्हां चिमाजीअप्पांनीं विचारलें, तेव्हां रामानंदांच्या तोंडून त्यांना कळलें कीं, रामानंद हे अंताजीपंत कावळ्यांचे कनिष्ठ बंधु रामचंद्रपत कावळे! कांहीं वर्षांपूर्वी फिरंग्यांनीं रामचंद्रपंतांना पकडून, ख्रिस्ती धर्माविरुद्ध चळवळ केल्याबद्दल देहान्त शासन दिलें होतें; तेव्हांपासून रामचंद्रपंत इहलोक सोडून गेले असाच अंताजीपंतांचा व इतर सर्वांचा ठाम समज होऊन बसला होता. 'तोच मी' असें जेव्हां रामचंद्रपंतांनीं सर्वांना विशद करून सांगितलें, तेव्हां सर्व मंडळीला किती आनंद, किती कौतुक व किती धन्यता वाटली, याचें वर्णन कोणीं करावें!

"वा: ! तुम्हीं इतके दिवस आम्हांला चांगलेंच चकविलें! आम्ही तुम्हांला इतके दिवस तुमची माहिती विचारीत असतां, तुम्हीं आम्हांला कांहींच थांग लागूं दिला नाहीं." चिमाजीअप्पा म्हणाले.

"आणि इतके दिवस स्वामींना भेटावें म्हणून मी खटपट करीत असतां रामाजीपंत! तूं मुद्दामच टाळाटाळ केलीस!" अंताजीपंत म्हणाले.

"त्याचें कारण एकच; त्या वेळीं समाजांत रामाजीपंतांचें काम नव्हतें; तें काम करणारे तुम्ही सारे होतांच! समाजाला तेव्हां रामानंदच पाहिजे होते." रामचंद्रपंत उत्तरले.

रामचंद्रपंतांचें मत कोणालाही पटण्याजोगेंच होतें. जी कामगिरी रामानंदांनीं स्वामि या नात्यानें केली, ती त्यांना लढवय्येगिरीनें खास करतां आली नसती.

रामचंद्रपंतांची ओळख पटल्यावर मंडळीनें त्यांना त्यांच्या इतक्या दिवसांच्या अज्ञातवासांतील वृत्तान्त विचारला व त्यांनीं तो सांगितला. फिरंग्यांकडून झालेल्या छळणुकीची करुणकहाणी एरव्हीं कोणीं ऐकली असती, तर अंगावर कांटा उभा राहिला असता; पण फिरंग्यांच्या नाशानंतर त्या कहाणीला तितकीच मनोरंजकता प्राप्त झाली. संकटें भोगतांना जिवाला जितका ताप होतो, तितकाच त्या संकटांचें यथावत् निवारण झाल्यावर ते अनुभव निवेदन करण्यांत आनंद होतो.

मात्र फिरंग्यांना जेव्हां रामचंद्रपंत जिवंत आहेत, इतकेंच काय पण त्यांनींच हिंदुधर्मजागृतीचें नवचैतन्य आखिल वसई-साष्टी प्रांतांतील लोकांच्या अंगीं उत्पन्न करून त्या लोकांकडून एवढा भयंकर धर्मसंग्राम लढविला, असें कळतांच जें

दुःख झालें असेल, त्याला उपमा त्याचीच. आपणाला त्याच्याशीं काय करावयाचें आहे!

  

मेरी व भैरव यांच्या बाबतींतील रहस्यबोध वाचकांना झालाच आहे. मात्र मेरी व भैरव समक्ष भेटून त्यांनीं खरा प्रकार निवेदन करीपावेतों इतरांनाच काय पण खंडोजी माणकरालाही अँटोनिओची बायको गजरा ही आपली सावत्र बहीण आहे, व ठाण्याच्या प्रळयांत परागंदा झालेली आपली सख्खी बहीण मिरा हीच मेरी होय हें माहीत नव्हतें. गजरा प्रथमपासूनच खंडोजी हा आपला बंधु आहे हें ओळखीत होती. पण खंडोजीला मात्र गजरेची ओळख नव्हती. बरोबरच आहे. गजरेच्या अर्थात् खंडोजी व मिरा यांच्याही बापानें जर गजरा लहान असतांच आपल्या पहिल्या बायकोच्या म्हणजे खंडोजीच्या आईच्या चिथावणीनें घरांतून घालवून देऊन माहेरीं रडत बसविलें होतें व त्या दिवसापासून तिची विचारपूसही केली नव्हती, तर खंडोजीला तरी गजरेची ओळख कशी असणार! तशांत गजरेचें कोणत्या परिस्थितींत ॲन्टोनिओशीं लग्न झालें हें जेव्हां गजरेच्या तोंडून खंडोजीला कळलें, तेव्हां तर गजरेला नांव ठेवावयाला खंडोजीला तोंडच उरलें नाहीं. चुळणें येथील प्रळयांत ॲन्टोनिओला पळ काढावा लागला तेव्हां गजरा जी मराठ्यांची नजर चुकवून पळाली, ती तेव्हांपासून आजवर बैरागिणीच्या वेषानें अज्ञातवासांत दिवस कंठीत होती. यदृच्छेनें भैरवाची व तिची ओळख झाली व भैरवावर उपकार करण्याची संधि तिला लाभली, तेव्हां तिला बिचारीला थोडा धीर आला. तरीही ॲन्टोनिओसारख्या देशद्रोही नीच पुरुषाची पत्नी होऊन राहणें कपाळीं आल्याबद्दल गजरेला पराकाष्ठेचा खेद होत होता व तें नातें समाजांत आपल्या अवमानाला निःसंशय कारण होईल ह्या भयानें आपल्या आयुष्याच्या अखेरीपावेतों कोणालाही आपली ओळख द्यावयाची नाहीं असा तिचा मानस होता. भैरवावर तिनें यथाशक्ति उपकार केले त्याचीं कारणें दोन. पूर्वी भैरवापाशींच तिचें लग्न व्हावयाचें ठरलें होतें व तेव्हांपासून भैरव तिला प्रिय होता हें एक, व दुसरें, भैरवाच्या बाबतींत आपल्या पतीनें किती अन्याय केले होते याची तिला जाणीव असल्यानें पतीच्या त्या पापाची अंशतः फेड करणें हें तिला आपलें परमपवित्र कर्तव्यसें वाटलें. तेव्हां देखील गजरेनें आपली ओळख दिली नाहीं; पण भैरव व मेरी ह्या दोघांचा ॲन्टोनिओवर

पक्का दांत असून त्याला ह्या जगांतून नाहींसा करण्यासाठीं तीं दोघें टपलेलीं आहेत असें गजरेला आढळून आलें, आणि चिमाजीअप्पा पेशवेही अॅन्टोनिओला देहान्त शासन दिल्याशिवाय राहणार नाहींत अशी गजरेची खात्री होती, म्हणून केवळ आपलें सौभाग्य अभंग राखण्यासाठीं तिला भैरव व मेरी यांजपाशीं आपली ओळख देणें भाग पडले.

प्रथम सोपारा एथें भैरवाला रक्षिण्यापासून तों भैरव वसईच्या किल्ल्यावर भगवा झेंडा फडकवून श्रमांनीं आणि यातायातीनें बेशुद्ध पडला तेव्हां त्याला तेथून सुरक्षितपणें गुपचूप किल्ल्याबाहेर नेईपावेतों गजरा भैरवाच्या छायेसारखी त्याच्या मागोमाग त्याला जपत होती. दरम्यान् मेरीशीं तिची चांगली मैत्री झाली होती, व मेरीनें आपलें हृद्गतही तिच्यापाशीं ओकलें होतें. तेव्हांच मेरी ही आपली बहीण आहे हें गजरेला कळून चुकलें होतें. त्या दोघींचा जो पूर्वसंकेत ठरला होता, त्याप्रमाणेंच गजरेनें भैरवाला थेट चुळणें गांवीं—भैरवाच्या जन्मगांवीं—नेलें. फादर पोटोंनें चुळण्यांत ज्या ठिकाणीं भैरवाला जिवंत जाळण्याचा बेत केला होता, त्याच ठिकाणीं फादर पोटोंला जिवंत जाळण्याची शिक्षा देऊन अंमलांत आणावयाची, व हे सर्व सोहाळे भैरवासमोर झाले पाहिजेत असा मेरीचा अत्याग्रह होता व त्याला गजरेचीही संमति होती. आतां, गजरा जर भेटली नसती व इतर सर्व गोष्टी यथावत् झाल्या असत्या, तर जी गत फादर पोटोंची तीच अॅन्टोनिओचीही झाली असती. चुळणें येथेंच नाहींतर अन्यत्र पण अॅन्टोनिओलाही फादर पोटोंप्रमाणेंच देहान्तशासन होईल अशी खटपट करण्याला मेरी व भैरव यांनीं कमी केलें नसतें, आणि त्या खटपटींत त्यांना यशही आलें असतें पण अॅन्टोनिओला त्याच्या साध्वी पत्नीची पुण्याई लाभली, त्यामुळें त्याचा बचाव झाला. हा सर्व प्रकार चिमाजीअप्पांना जेव्हां कळला, तेव्हां त्यांनींही अॅन्टोनिओचे सर्व अपराध पोटांत घालून त्याला सोडून देण्याचें कबूल केलें. एवढेंच काय; पण गजरेला चोळीबांगडीदाखल एक गांवही त्यांनीं इनाम दिला. अॅन्टोनिओनेंही आपल्या सर्व अपराधांबद्दल सर्व मंडळींची क्षमा मागून यापुढें पेशव्यांशीं राजनिष्ठेनें वागण्याची शपथ घेतली. सर्वसामान्य क्षमा झाली; पण त्याशिवाय मेरीवर दीर्घकालपावेतों पापी दृष्टि ठेविल्याबद्दल तिच्या पायांवर मस्तक ठेवून तिची क्षमा मागण्यालाही त्यानें कमी केलें नाहीं. सर्वांबरोबरच मेरीनेंही अॅन्टोनिओला क्षमा केली. पण ती आपल्या बहिणीकडे पाहून! एरव्हीं

ॲन्टोनिओ दुर्जन आहे असा जो तिचा व इतर मंडळींचा अनुभवसिद्ध ग्रह झालेला होता तो कायमच होता.

ॐ ॐ ॐ

ॲन्टोनिओ अशाप्रकारें बायकोच्या पुण्याईवर सुटला; व त्याचा जोडीदार फादर पोर्टो याला चुळणं येथें कांहीं दिवसांपूर्वी त्यानें भैरवाला ज्या लोहस्तंभाशीं बांधून जिवंत जाळण्याचें योजिलें होतें त्याच लोहस्तंभाशीं बांधून जिवंत जाळण्यांत आलें. आतां वाचकांच्या परिचयांतील राहतां राहिली सोफिया! मंडपेश्वर येथें मराठ्यांचा विजय झाला तेव्हांपासून सोफियाच्या वांट्याला कसा वनवास आला होता, हें ॲनीच्या शब्दांत पूर्वी विशद झालेंच आहे. मेरीला ॲनीकडून सोफिया चुळणें गांवाच्या वेशीवरील पडक्या देवालयांत आहे असें कळलें, त्याच क्षणाला मेरीच्या मनानें घेतलें कीं, 'भैरवाच्या मंडळीला अग्निकुंडांत तडफडत असतांना पहाण्याला ही कुलटा तान्हेलेली होती नव्हे का? आणि ती मला फादर पोर्टोला विलासदासी म्हणून अर्पण करण्यालाही तयार झाली होती. तिला तिच्या अपराधांचें यथावत् प्रायश्चित्त द्यावयाचें म्हणजे तिला धडाडलेल्या अग्निकुंडांत जाळूनच ठार मारलें पाहिजे'. पण मेरी फादर पोर्टोला घेऊन चुळण्याच्या वेशीवर जाऊन पोंचते, तों तेथें सोफिया नाहीं! पुढें ती गांवांत जाते, तों गांवकऱ्यांनीं सोफियाचे डोळे फोडून तिच्या तोंडाला डाम्बर फांसून तिची गांवभर धिंड काढली आहे असा भयानक प्रकार तिला आढळून आला. त्याबरोबर मेरीचें मन द्रवलें. सोफियाला जिवंत जाळण्याचा तिचा विचार तर पालटलाच; पण तिनें त्या चिडलेल्या गांवकऱ्यांपासून सोफियाची मुक्तता केली. ॲनी इतके दिवस सोफियाची प्रेमळ दासी म्हणून मिरवीत असे, तिला मेरीनें आपल्या धनिणीची काळजी घ्यावयाला सांगितलें. पण ती कबूल होईल तर शपथ! तिनें मेरीला उत्तर दिलें, "मला यापुढें जन्मभर तुझीच दासी होऊन राहणें बरें वाटतें."

ॲनी कोणत्याही हेतूनें बोलो, मेरीनें तिला उदार अंतःकरणानें आपल्या पदरीं आश्रय देण्याचें कबूल केलें एवढें खरें. वारा वाहील तशी पाठ फिरविण्यांत व देखल्या देवाला दंडवत घालून कार्यभाग साधण्यांत ॲनी जात्याच फार कुशल होती. ॲनीला असें भय वाटलें असेल कीं, न जाणो, जी गत आपल्या धनिणीची झाली तीच आपलीही करण्याचें ह्या खवळलेल्या लोकांनीं मनांत आणलें तर त्यांचें काय घ्या!

ॐ ॐ ॐ

मेरी व भैरव यांचें लग्न व्हावयाचें, हें वाचकांना आतां माहीत झालें आहेच. त्या दोघांना व त्यांच्या बरोबर ॲनीलाही रामानंदांनीं आपल्या नेहमींच्या लोकप्रिय विधीनें शुद्ध करून घेतलें. ॲंटोनिओलाही स्वतःला उपरति झाली म्हणा किंवा गजरेनें त्याच्या डोळ्यांत अंजन घातलें म्हणून म्हणा, हिंदुधर्माचा स्वीकार करावासा वाटला. मेरीचें नवें नांव मिरा असें ठेवण्यांत आलें. ॲन्टोनिओनेंही आपलें पूर्वीचें अंताजी हें नांव धारण केलें. ॲनीही त्या दिवसापासून अनूबाई या नांवानें ओळखली जाऊं लागली. पुढें लौकरच मिरा व भैरव यांचा विवाह चुळणें गांवींच मोठ्या थाटानें झाला. चिमाजीअप्पांनीं पूर्वी कबूल केल्याप्रमाणें भैरव व मेरी यांना त्यांच्या अमोल कामगिरीबद्दल चुळण्याजवळचीं पांच गांवें इनाम दिलीं व शिवाय त्यांच्या लग्नाच्या वेळीं त्यांना अहेरादाखल बहुमोल वस्त्रालंकारही दिले. मिराचें पुण्याहवाचन अर्थात् खंडोजीनें ठेवलें; व वराचें पुण्याहवाचन स्वतः मानाजी आंग्र्यांनीं ठेवलें. कारण भैरव हा त्यांचा एकनिष्ठ सेवक होता. गजरा मात्र त्या लग्नांत वरभगिनी करवली या नात्यानें मिरवली. जनाबाईदेखील जरी मिराची दासी म्हणून राहिली होती, तरी तिला मिरेनें लग्नांत आपल्या बहिणीचा मान दिला.

  

मंडपेश्वरीं मिळालेली दौलत जी चिमाजीअप्पांनीं आपल्या सर्व सैनिकांना शेवटीं वांटण्यासाठीं राखून ठेविली होती, तिच्यांत आणखी भर घालून त्यांनीं आपलें वचन पुरें केलें. अंताजीपंत कावळे, गंगाजी नाईक, खंडोजी माणकर, दुल्लभजी मोरे वगैरे मंडळींचा व आणखी ज्या कोणाकोणाचीं वतनें फिरंग्यांनीं घशांत टाकलीं होतीं, तीं ज्यांचीं त्यांना परत मिळालीं. त्याप्रमाणें शिंदे, होळकर, आंग्रे वगैरे खाशा मंडळीच्या पदरच्या नारो शंकर प्रभृति लोकांना त्यांच्या त्यांच्या कामगिरीबद्दल योग्य पारितोषिकें देण्यांत आलीं. बाजीबा किल्लेदाराकडे अर्नाळ्याची किल्लेदारी कायम ठेवण्यांत आली. त्याच्या सद्गुणांना बार्बाराचें जें ग्रहण लागलें होतें, तें सुटतांच तो आपोआप पूर्ववत् ताळ्यावर आला व त्याची बायको जाचाला कंटाळून कोठें निघून गेली होती तीही माघारीं येऊन बाजीबाशीं सोन्याचा संसार करूं लागली.

  

भय्याशास्त्री व धोंडशास्त्री या सासरेजांवयांचे अपराध अक्षम्य होते खरे;

पण ते ब्राह्मण म्हणून तत्कालीन राजशासनानुसार त्यांना चिमाजीअप्पांकडून क्षमा झाली. त्यांना थोडक्यांत इंगा कळला व ते पुन्हा चिमाजीअप्पा पुण्याकडे जाईपावेतों तसले लांडे कारभार करण्याच्या फंदांत पडले नाहींत. आणि मग !— ह्या प्रश्नाचें उत्तर थोडक्यांत द्यावयाचें तर 'जित्याची खोड मेल्याशिवाय थोडीच जाते !' पण चालावयाचेंच ! 'गांव आहे तेथें म्हारवडा असावयाचाच !'

  

फिरंग्यांनीं कबूल केल्याप्रमाणें बरोबर आठव्या दिवशीं वसईचा किल्ला पूर्णपणें खालीं करून चिमाजीअप्पांच्या स्वाधीन केला. त्यांची चोहोंकडे कसकशी पांगापांग झाली, वगैरे गोष्टींशीं आपणाला कांहींच कर्तव्य नाहीं. त्यांचें वसईसाष्टी प्रांतांतून पूर्णपणें उच्चाटण झालें, व त्यांच्या पश्चात् लौकरच त्या भागात पुन्हा सुव्यवस्था नांदूं लागली. स्वराज्य झालें, मग रयत सर्वतोपरी सुखी झाली हें निराळें सांगायला नकोच.

  

वसई ताब्यांत आल्यावर मराठ्यांचीं सैन्यें कांहीं आपल्या धन्याबरोबर दुसऱ्या कामगिऱ्यांवर निघून गेलीं. शिंदे-होळकर पूर्वयोजनेनुसार नादीरशाहाचें पारिपत्य करण्याच्या कामीं बाजिरावांना मदत करण्यासाठीं उत्तरेकडे रवाना झाले.¶ कांहीं सैनिक नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें पर्जन्यकाळ डोक्यावर आल्यामुळें दसऱ्यापर्यंतची हंगामी रजा घेऊन शेतवाडीकडे निघून गेले. स्वतः चिमाजीअप्पा मात्र जिंकलेल्या मुलुखांतील कारभाराची घडी नीट बसविण्यासाठीं पावसाळा सुरू होईतों त्याच प्रांतीं राहिले होते. ती कामगिरी आटोपून ते पुण्याला जातात तों त्यापूर्वींच वसईच्या धर्मसंग्रामासंबंधीं विजयवार्ता पुणें साताऱ्याकडे जाऊन धडकल्या होत्या, व ज्याच्या त्याच्या तोंडून चिमाजीअप्पांविषयीं धन्यवाद निघत होते. चिमाजीअप्पा नुक्तेच दिल्लीकडे बाजिरावांबरोबर उत्तरदिग्विजय संपादन करून नंतर वसईकडे आले होते. वसईलाही त्यांनाच विजयश्रीनें वरिलें. मग त्यांना धन्यवाद

---

¶ शिंदे होळकर रवाना झाले खरे; पण त्या पूर्वींच नादिरशहा दिल्लीचा विध्वंस करून व अपरंपार लूट मिळवून बाजीरावदेखील उत्तरेकडे जाऊन पोंचण्यापूर्वींच माघारा जावयाला निघाला होता. त्यामुळें मराठ्यांना नादिरशहाशीं सामना देण्याचा प्रसंगच पडला नाहीं.

कोण देणार नाहीं! ते वसईकडील व्यवस्था लावून, भ्रष्ट झालेल्या देवालयांचे जीर्णोद्धार वगैरे करून व वज्राबाईचा नवस फेडून साताऱ्याला माघारे गेले, तेव्हां प्रत्यक्ष शाहू-महाराज त्यांना वेशीपावेतों सामोरे आले होते. त्यांच्या आगमनाच्या दिवशी उभें सातारा नगर नानापरींनीं शृंगारण्यांत आलें होतें. त्याच दिवशीं शाहू-महाराजांनीं खास दरबार भरवून चिमाजीअप्पांचा वसईच्या धर्मसंग्रामांतील अभूतपूर्व विजयाप्रीत्यर्थ अभूतपूर्व सत्कार केला. आपणही त्या वीर पुरुषाच्या जयजयकारांत ह्या कथानकापुरती एथेंच विश्रांति घेऊं.

ॐ तत्सत्